॥ ॐ नमः परमर्षिभ्यः ॥

# उपनिषद्रत्नप्रकाश



रत्न दहावें

# छान्दोग्योपनिषद्



[ मूळ मंत्र, पदशः अन्वय, मराठी अर्थ, विस्तृत विवरण, अध्यायांचे उपक्रम व उपसंहार इत्यादि सह ]



ग्रन्थकार

सदाशिवशास्त्री भिडे,

संस्थापकः—गीताधर्ममण्डळ, पुणें.

आवृत्ति पहिली



शके १८५४ ] पुणें [ सन १९३२

किंमत २॥ रुपये

प्रकाशकः-

गजानन विश्वनाथ केतकर,

चिटणीस, गीताधर्म-मंडळ, टिळकरोड, पुणें २.

सदाशिवशास्त्री भिडे

संस्थापक गीता-धर्म-मंडळ पुणें, यांचे

**राष्ट्रीय वेदांतग्रंथ**

मूळ मंत्र, पदशः अन्वय, मराठी अर्थ, विस्तृत विवरण, उपक्रमोपसंहार, विषयानुक्रमणिका व मंत्रसूचि याप्रमाणें खालील सर्व ग्रंथाची रचना आहे.

१ **मुण्डकोपनिषद्** किं. १ रु., २ **प्रश्नोपनिषद्** किं. १२ आणे, ३ **केनोपनिषद्** किं. ८ आणे, ४ **कठोपनिषद्** किं. १। रु., ५ **ईशावास्योपनिषद्** किं. ६ आणे, ६ **मांडूक्योपनिषद्** किं. ३ आ. ७ **ऐतरेयोपनिषद्** किं. ४ आ. ८ **तैत्तिरीयोपनिषद्** किं. १८=८ **बृहदारण्यक** किं. ३।। रु ९ **गीतारहस्यदीपिका** कापडी ३ रु. कागदी २।। रु. १० **गीतापाठावृत्ति** अन्वयार्थासह मूळ समग्र गीता किं. ८ आ. सर्व पुस्तकें एकदम घेतल्यास विशेष सवलत मिळेल. **गीता-धर्म-मंडळ पुणें.**

मुद्रकः-

श्रीपाद रघुनाथ राजगुरु,

" राजगुरु आणि कं. प्रेस, "

५१३ शनवार, पुणें

# छान्दोग्योपनिषद्

## उपक्रम

' यदेव विद्यया करोति श्रद्धया चोपनिषदा
तदेव वीर्यवत्तरं भवति । ' ( छा. १. १. १० )

छान्दोग्योपनिषदाचे आठ अध्याय व १५४ खंड आहेत. खण्डांतील मंत्र कमीजास्त असून कोठें कोठें तर एकाच मंत्रानें खण्ड पुरें झालें आहे. ईशावास्योपनिषद् खेरीज करून इतर नऊही उपनिषदें ब्राह्मण ग्रंथांतीलच आहेत. त्या सर्वांत छान्दोग्योपनिषद प्राचीन आहे असें त्याच्या भाषेवरून कोणाच्याही सहज लक्षांत येईल. सामवेदाचें ताण्ड्य या नांवाचें ब्राह्मण प्रसिद्ध आहे; त्या ताण्ड्य ब्राह्मणांतीलच हें छान्दोग्योपनिषद् आहे. दशोपनिषदांपैकीं केनोपनिषद् देखील ताण्ड्य ब्राह्मणांतच समाविष्ट आहे. अध्याय, खण्ड व मंत्र अशी या छान्दोग्य-उपनिषदाची रचना आहे. या उपनिषदांत अनेक ऐतिहासिक आख्यानें आलीं असून संवादही बरेच आले आहेत. त्या आख्यानांवरून व संवादांवरून श्रद्धा व उत्कट जिज्ञासा हींच ब्रह्मविद्येच्या अधिकाराचीं मुख्य लक्षणें होत असें ठरतें. ब्रह्मज्ञानाला उपासना व कर्तव्यनिष्ठा यांचें सहकार्य असलें म्हणजे, साधकाला अमृतत्वाची प्राप्ति लवकर होते, असें या उपनिषदांत अनेक ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून अमृतत्वदायक ब्रह्मविद्या हाच या उपनिषदाचा विषय होय, असें सिद्ध होतें. ठिकठिकाणीं प्राचीन मंत्र किंवा श्लोक या उपनिषदांतही आले असल्यामुळें, या उपनिषदाचा प्राचीन वैदिक वाङ्मयाशीं संबंध असल्याचें सिद्ध होत आहे. जन्ममरणांतून मुक्ति व ब्रह्मप्राप्ति हेंच या ब्रह्मविद्या प्रतिपादन करणाऱ्या उपनिषदाचें प्रयोजन होय. याप्रमाणें हें अनुबंध-चतुष्टय लक्षांत घेऊन अभ्यासकांनीं या छान्दोग्योपनिषदाचें अध्ययन करावें, अशी विनंति करून आतां मुख्य विषयाला प्रारंभ करितों.

---

# छान्दोग्योपनिषद्

## पहिल्या अध्यायाची विषयानुक्रमणिका.

### खण्ड १ लें.



### खंड २ रें.

विषयानुक्रमणिका

## विषयानुक्रमणिका

### खंड ४ थें.



### खंड ५ वें.



### खंड ६ वें.

## विषयानुक्रमणिका

### खंड ७ वें.



### खंड ८ वें.



### खंड ९ वें.

## विषयानुक्रमाणिका

### खंड १० वें.



### खंड ११ वें.

विषयानुक्रमणिका

## खंड १२ वें.



## खंड १३ वें.



---

# छान्दोग्योपनिषद् ।

## दुसऱ्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

विषयानुक्रमणिका

विषयानुक्रमणिका

खंड १८ वें.



खंड १९ वें.



खंड २० वें.



खंड २१ वें.



खंड २२ वें.



खंड २३ वें.

## विषयानुक्रमणिका



---

# विषयानुक्रमणिका.

## अध्याय तिसरा.

## विषयानुक्रमणिका.

## विषयानुक्रमणिका.

## विषयानुक्रमणिका.

# चौथ्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

## खंड १ लें:



## खंड २ रें:



## खंड ३ रें:

खंड ९ वें:



खंड १० वें:



खंड ११ वें:



खंड १२ वें:



खंड १३ वें:



खंड १४ वें:



खंड १५ वें:

खंड १६ वें:



खंड १७ वें:



———

# पांचव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका.

## खंड १ लें.



## खंड २ रें.



## खंड ३ रें.

# सहाव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

## खंड ९ वें.



## खंड १० वें.



## खंड ११ वें.



## खंड १२ वें.



## खंड १३ वें.

खंड १४ वें.



खंड १५ वें.



खंड १६ वें.

# सातव्या अध्यायाची विषयानुक्रमाणिका



## खंड १ लें



## खंड २ रें



## खंड ३ रें



## खंड ४ थें



## खंड ५ वें

## अनुक्रमाणिका

### खंड ६ वें



### खंड ७ वें



### खंड ८ वें



### खंड ९ वें



### खंड १० वें



### खंड ११ वें



### खंड १२ वें



### खंड १३ वें

## अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



---

# आठव्या अध्यायांची विषयानुक्रमणिका

## खंड १ लें



## खंड २ रें



## खंड ३ रें

## अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका

### खंड ८ वें



### खंड ९ वें



### खंड १० वें



### खंड ११ वें



### खंड १२ वें

## अनुक्रमणिका

# छान्दोग्योपनिषद्

ॐ आप्यायन्तु ममाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च सर्वाणि सर्वं ब्रह्मौपनिषदं माऽहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणं मेऽस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

मम अङ्गानि वाक् प्राणः चक्षुः श्रोत्रम् अथो बलम् सर्वाणि इन्द्रियाणि च आप्यायन्तु। सर्वम् औपनिषदम् ब्रह्म ( अस्ति )। अहम् ब्रह्म मा निराकुर्याम्। ब्रह्म मा मा निराकरोत्। (तस्य) अनिराकरणम् अस्तु। मे अनिराकरणम् अस्तु। तदा ये उपनिषत्सु धर्माः ते आत्मनि निरते मयि सन्तु।

माझे अवयव, वाणी, प्राण, नेत्र, कर्ण आणि सामर्थ्य तशींच सर्व इंद्रियें हीं पुष्ट ( तेजस्वी ) होवोत. हें सर्व ( पिण्डब्रह्माण्ड ) उपनिषदांनीं प्रतिपादलेलें ब्रह्मच आहे. माझ्या हातून ब्रह्माचें दूरीकरण होऊं नये. (माझ्या ब्रह्मज्ञानांत अंतर पडूं नये. तसेंच ) ब्रह्म माझ्यापासून दूर होऊं नये. ( त्या ब्रह्माचें माझ्याशीं नित्य सांनिध्य असो ); आणि माझें ( त्याच्याशीं ) नित्य सांनिध्य असो ( माझी बुद्धि सतत ब्रह्मनिष्ठ असो ). त्यावेळीं जे गुण उपनिषदांत सांगितलेले आहेत ते आत्मरत अशा माझ्या ठिकाणीं असोत (विकास पावोत). द्विरुक्ति आदराकारितां आहे.

## प्रथमोऽध्यायः प्रथमः खण्डः ।

ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत । ओमिति ह्युद्गायति तस्योपव्याख्यानम् ॥ १ ॥

ॐ इति एतत् अक्षरम् उद्गीथम् उपासीत। हि ॐ इति उद्गायति। तस्य उपव्याख्यानम्। ( प्रवर्तते )।

ॐ अशा ह्या अक्षरस्वरूप उद्गीथाची उपासना (अभ्यास) करावी. कारण, ॐ असें म्हणून उद्गाता ( यज्ञांतील सामगायक ऋत्विज ) गायन करितो. त्या ( ॐ ) चें व्याख्यान ( उपासना, सामर्थ्य व फल ) आरंभिलें आहे.

प्रस्तुत मंत्रापासून छांदोग्य उपनिषदाला प्रारंभ होत आहे. या मंत्रांतील 'उद्गीथ' शब्दाचा याज्ञिकी अर्थ लक्षांत घ्यावयास पाहिजे. यज्ञांतील साम-गायन करण्याचें काम ज्या ऋत्विजाकडे असतें त्याला उद्गाता असें म्हण-तात. त्याचे दोन साथीदार असून प्रस्तोता व प्रतिहर्ता अशीं त्यांचीं नांवें आहेत. गायनांतील मुख्य पद्य उद्गात्यानेंच म्हणावयाचें असतें. या मुख्य पद्या-लाच 'उद्गीथ' असें म्हणतात; व मुख्य पद्य—गाणें म्हणजेच उद्गायन करणें अशा अर्थाचे शब्दप्रयोगही उपनिषदांतून येतात. उद्गीथासंबंधींची विशेष माहिती बृहदारण्यकात दिली आहे. ( उ. नि. र. प्र. बृ. अ. १ ब्रा. ३ सांराश पृष्ठ ५७ ). ॐकाराच्या उच्चारानेंच उद्गीथाचें गायन केलें जातें. म्हणून उद्गीथानेंच ॐकाराची उपासना करावी असें सांगून, त्याच्या विशेष व्याख्यानास प्रारंभ होत आहे, असें या मंत्रांत सांगितलें आहे.

**एषां भूतानां पृथिवी रसः पृथिव्या आपो रसः। अपा-मोषधयो रस ओषधीनां पुरुषो रसः पुरुषस्य वाग्रसो वाच ऋग्रस ऋचः साम रसः साम्न उद्गीथो रसः ॥ २॥**

**एषाम् भूतानाम् पृथिवी रसः। पृथिव्याः आपः रसः। अपाम् ओषधयः रसः। ओषधीनाम् पुरुषः रसः। पुरुषस्य वाक् रसः। वाचः ऋक् रसः। ऋचः साम रसः। साम्नः उद्गीथः रसः ( अस्ति )।**

या भूतांचें सार (परिणत स्वरूप ) पृथ्वी आहे. पृथ्वीचें सार पाणी, पाण्याचें सार वनस्पति, वनस्पतींचें सार मनुष्य, मनुष्यांचें सार वाचा, वाचेचें सार ऋग्वेद ( मंत्र ), ऋचांचें सार सामवेद, सामांचें सार उद्गीथ ( गायन ) होय.

पृथिव्यादि आठ विषयांचा रस शब्दानें या मंत्रात संबंध दर्शविला आहे. या रस शब्दाचे अर्थ कोठें सार, कोठें आश्रय, तर कोठें परिणत स्वरूप असे त्या त्या संदर्भावरून घ्यावयास पाहिजेत. मानवी प्राण्याचा वाणी हाच विशिष्ट धर्म आहे. वेदविद्येचें अध्ययन ( येथें उपलक्षणाने सर्व विद्या अभिप्रेत आहेत असें समजावें ) करण्यांतच मनुष्याच्या वाक्शक्तीचें सार्थक आहे. ऋग्वेदापासूनच सामवेद निर्माण झाला असून, उद्गीथ हा सामवेदांतील एक प्रधान भाग आहे. या आठ पदार्थांच्या संबंधावरून येथें उद्गीथाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें आहे.

**स एष रसानाꣳ रसतमः परमः परार्ध्योऽष्टमो यदुद्गीथः ॥ ३ ॥**

**यत् अष्टमः उद्गीथः सः एषः रसानाम् रसतमः परमः परार्ध्यः ( अस्ति )।**

जो ( पृथ्वी इत्यादिकांतील ) आठवा ( रस ) उद्गीथ तो हा सारांतील सारभूत असा अत्यंत श्रेष्ठ आहे.

**कतमा कतमर्क्कतमत्कतमत्साम कतमः कतम उद्गीथ इति विमृष्टं भवति ॥ ४ ॥**

**कतमा कतमा ऋक्, कतमत् कतमत् साम, कतमः कतमः उद्गीथः इति विमृष्टम् भवति।**

ऋचा कोणती ? (ऋचा म्हणजे काय ?) साम म्हणजे काय ? उद्गीथ म्हणजे काय ? असे हे विचाराचे प्रश्न आहेत.

**वागेवर्क्प्राणः सामोमित्येतदक्षरमुद्गीथः । तद्वा एतन्मिथुनं यद्वाक्च प्राणश्चर्क्च साम च ॥ ५ ॥**

**वाक् एव ऋक् प्राणः साम ॐ इति एतत् अक्षरम् उद्गीथः । यत् वाक् च प्राणः च ऋक् च साम च तत् वै एतत् मिथुनम्।**

वाचा हीच ऋचा होय, प्राण हेंच साम होय. ॐ असें हें अक्षर उद्गीथ होय. जें वाचा व प्राण किंवा ऋचा व साम तेंच हें मिथुन म्हणजे जोडी आहे.

**तदेतन्मिथुनमोमित्येतस्मिन्नक्षरे सꣳसृज्यते यदा वै मिथुनौ समागच्छत आपयतो वै तावन्योन्यस्य कामम् ॥६॥**

**तत् एतत् मिथुनम् ॐ इति एतस्मिन् अक्षरे संसृज्यते। यदा वै मिथुनौ समागच्छतः तौ वै अन्योन्यस्य कामम् आपयतः।**

ती ही ( वाणी व प्राण ) जोडी ॐ अशा ह्या अक्षरांत संयुक्त असते. ज्यावेळीं दोन ( अनुकूल )पदार्थांचा संयोग होतो, तेव्हांच त्या परस्परांची इच्छा पूर्ण होते. ( आकांक्षा फलद्रूप होते ).

वाणी व प्राण यांच्या विशिष्ट संयोगानेंच ॐकाराचा उच्चार होतो. त्यांच्यामध्यें परस्पर अनुकूलता नसेल तर ॐकाराचा उच्चार बरोबर होणार नाहीं, असें दर्शविण्याकरितांच मिथुनाचें म्हणजे दांपत्यभावाचें या मंत्रांत उदाहरण घेतलें आहे.

**आपयिता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षर मुद्गीथमुपास्ते ॥ ७ ॥**

**यः एवम् विद्वान् एतत् अक्षरम् उद्गीथम् उपास्ते ( सः ) कामानाम् ह वै आपयिता भवति।**

ह्याप्रमाणें ( ॐ कारस्वरूप ) जाणणारा जो ह्या ( ॐकार-रूपी ) अक्षररूपी उद्गीथाची उपासना करितो, तो सर्व मनोरथ पूर्ण करणारा होतो.

**तद्वा एतदनुज्ञाक्षरं यद्धि किं चानुजानात्योमित्येव तदाहैषो एव समृद्धिर्यदनुज्ञा समर्धयिता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्ते ॥ ८ ॥**

**तत् वै एतत् अनुज्ञाक्षरम्। यत् हि किंचित् अनुजानाति ॐ इति एव तदा आह। एषा उ एव समृद्धिः यत् अनुज्ञा। यः एवम् विद्वान् एतत् अक्षरम् उद्गीथम् उपास्ते ( सः ) कामानाम् समर्धयिता ह वै भवति।**

तें हें ( ॐ ) संमतिदर्शक अक्षर असतें. जेव्हां ( कोणी ) कांहीं संमति देतो,तेव्हां ॐ ( होय ) असेंच म्हणतो. ही संमति

हेंच समृद्धीचें लक्षण असतें. जो असें जाणणारा त्या अक्षररूप उद्गीथाची उपासना करितो तो सर्व इष्ट वस्तूंची समृद्धि करणारा होतो.

ॐ हें परमेश्वराचें नामाधिधान आहे असें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे; परंतु ॐ चें व्यावहारिक स्वरूपच या मंत्रांत दर्शविलें आहे. 'होय' अशा अर्थी ॐ या शब्दाचा व्यवहारात उपयोग होत होता. ॐ चा पारमार्थिक दृष्टीनें विचार करितांना देखील त्याच्या व्यावहारिक व ऐतिहासिक स्वरूपा कडे दुर्लक्ष करितां कामा नये, असें या मंत्रात सुचविलें आहे. ॐ चें व्यावहारिक स्वरूप देखील समृद्धिकारक असल्याचें या ठिकाणी सांगितलें आहे. त्यावरून ज्या प्रतीकाची उपासना करावयाची, त्याचे व्यावहारिक, ऐतिहासिक इत्यादि सर्व प्रकारचें ज्ञान असणे उपासनेच्या दृष्टीनें देखील अत्यंत अगत्याचें आहे असें सिद्ध होते. होकारार्थी ॐ या शब्दाचा प्रयोग क्वचित् प्रसंगीं काव्यांतूनही आढळून येतो. (शिशुपालवध, सर्ग १ श्लोक शेवटचा. )

**तेनेयं त्रयीविद्या वर्तते ओमित्याश्रावयत्योमिति शꣳसत्योमित्युद्गायत्येतस्यैवाक्षरस्यापचित्यै महिम्ना रसेन॥९॥**

**तेन इयम् त्रयी विद्या वर्तते । एतस्य एव अक्षरस्य अपचित्यै रसेन महिम्ना ॐ इति आश्रावयाते ॐ इति शंसाति ॐ इति उद्गायति।**

त्या ॐ कारानें युक्त अशी ही ( प्रसिद्ध ) त्रयी म्हणजे ऋक्, यजु व सामवेद विद्या आहे. ह्या ॐ अक्षराच्या उपासनेकरितां रसमय सामर्थ्यानें म्हणजे प्राणशक्तीनें ( होता ) ॐकारपूर्वक ( स्तोत्रें ) ऐकवितो; ( अध्वर्यु ) ॐकारपूर्वक यजनाची आज्ञा करितो; ( उद्गाता ) ॐकारपूर्वक सामगायन करितो.

**तेनोभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद । नाना तु विद्या चाविद्या च यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा**

**तदेव वीर्यवत्तरं भवतीति खल्वेतस्यैवाक्षरस्योपव्याख्यानं भवति ॥ १० ॥**

**यः एतत् एवम् वेद च यः न वेद च उभौ तेन ( कर्म ) कुरुतः। विद्या च अविद्या च नाना तु। यत् एव श्रद्धया उपनिषदा विद्यया करोति तत् एव वीर्यवत्तरम् भवति। इति खलु एतस्य एव अक्षरस्य उपव्याख्यानम् भवति।**

जो हें ( ॐकाराचें महत्त्व ) ह्याप्रमाणें जाणतो व जो ( हें ) जाणत नाहीं ते दोघेही त्या ॐकारानेंच कर्म करीत असतात. आत्मविद्या एकविध व अविद्या—आधिभौतिक विद्या मात्र नानाविध आहेत. जें कर्म श्रद्धेनें ( अस्तिक्य बुद्धीनें ) आणि औपनिषत्तत्त्वज्ञानपूर्वक करण्यांत येतें, तेंच अधिक सामर्थ्यवान् होतें, असें हें खरोखर ह्या ॐ अक्षराचें वर्णन आहे.

प्रस्तुत मंत्राला अनेक कारणांनीं फारच महत्त्व आलें आहे. या मंत्रांतील पहिल्या वाक्यावरून, कर्म व ज्ञान यांचा संबंध अवश्य नाहीं, असें सिद्ध केलें आहे. म्हणजे पहिलें वाक्य हा एक कर्माविषयींचा सामान्य नियम आहे, असें कांहीं टीकाकार म्हणतात, परंतु तें बरोबर नाहीं. कारण मागील मंत्रांत ऋत्विजांकडून ॐकाराचा यज्ञांत कसकसा उपयोग केला जातो तें सांगितलें आहे. तसेंच ॐकाराचें तात्त्विक, व्यावहारिक व पारमार्थिक ज्ञान कसें आवश्यक आहे तेंही पूर्वीच्या मंत्रांत सांगितलें आहे. यज्ञांत काम करणाऱ्या ऋत्विजांना ॐकाराचें तात्त्विक, व्यावहारिक व पारमार्थिक ज्ञान असतेंच असें नाहीं. मंत्रांचें अर्थज्ञान मुळींच नसतांना देखील नुसत्या कवाइती पद्धतीनेंसुद्धां कर्म करण्यांत येतें. अर्थज्ञानशून्य कर्माला कवाइती कर्म असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा कवाइती पद्धतीनें ॐ काराचा उपयोग केला जातो, येवढेंच पहिल्या वाक्यांत दर्शविलें; त्याचा सामान्य नियमाप्रमाणें अर्थ केला तर त्यांतून इतकेंच निष्पन्न होईल कीं, कर्म हें ज्ञानपूर्वक किंवा ज्ञानावांचून देखील करितां येणें शक्य

आहे. ज्ञानशून्य अशा कवाइती पद्धतीनें कर्म करावें असा मात्र त्याचा अर्थ करितां कामा नये. या मंत्राच्या दुसऱ्या वाक्यांत मात्र कर्मविपर्यांचा सामान्य नियम आला आहे. त्यावरून पहिल्या वाक्यांतील अर्थ सामान्य नियमासारखाच घ्यावा असें म्हणण्यास हरकत नाहीं.

विद्या म्हणजे अध्यात्म विद्या आणि अविद्या म्हणजे आधिभौतिक विद्या असाच येथेंहि अर्थ समजावयास पाहिजे; तरच 'नाना' या शब्दाचा अर्थ सुसंगतपणें लावतां येईल. कर्माला विद्या व अविद्या या दोहोंचीही गरज असते. अविद्येच्या–आधिभौतिक विद्येच्या योगानें पदार्थांचे गुण-धर्म, देवता, सामर्थ्य, इत्यादिकांचा आपल्या कल्पनेस किंवा इच्छेस अनुसरून उपयोग करितां येतो. त्यावरून आधिभौतिक विद्येच्या योगानें (अविद्येच्या योगानें) कर्माचें काम भागण्यासारखें आहे. मग विद्येची म्हणजे अध्यात्मज्ञानाची आवश्यकता काय? असा प्रश्न सहाजिकच उत्पन्न होतो. त्याचें उत्तर श्रुतीनें असें दिलें आहे कीं, कर्माला आध्यात्मिक ज्ञानाची जोड असेल तरच तें कर्म अत्यंत सामर्थ्यदायक व कल्याणकारक होतें. 'यदेव विद्यया करोति' या वाक्याचा ब्रह्मसूत्रकारांनीं देखील स्पष्ट उल्लेख केला आहे. ( ब्र. सू. ४।१।१८ ). ह्यावरून, आत्मज्ञान व कर्म यांचा विरोध आहे हें म्हणणें श्रुतीला मुळींच संमत नाहीं. किंबहुना, तें श्रुतीच्या विरुद्ध आहे असेंच सिद्ध होतें. येथें विद्या म्हणजे अध्यात्मविद्या असाच अर्थ सूत्रकारांना देखील अभिप्रेत आहे. म्हणून हा मंत्र अध्यात्म-ज्ञानपूर्वक कर्तव्याचरणाचा–म्हणजेच कर्मयोगाचा प्रतिपादक आहे असें निःसंशय ठरतें.

---

## पहिल्या खंडाचा सारांश.

ॐकाराचें वर्णन मुण्डक, प्रश्न, कठ, इत्यादि उपनिषदांत आलें असून, माण्डूक्योपनिषदांत तर ॐकार हाच प्रतिपाद्य विषय आहे. तसेंच तैत्तिरी-योपनिषदाच्या शीक्षाध्यायांत देखील ॐकाराचें वर्णन आलें आहे. यावरून

ॐकाराचें महत्त्व सर्व उपनिषदाना संमत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या खंडात उद्गीथाच्या उपासनेचें वर्णन केलें आहे. ही उद्गीथोपासना देखील ॐकार स्वरूपच असावी असें प्रारंभींच म्हटलें आहे. सामगायनांत उद्गीथसंज्ञक जो भाग गायिला जातो त्यांत ॐकाराचाच उपयोग करावा असा त्याचा अभिप्राय आहे.

गायनाच्या प्रारंभीं केवळ रागाचे आलाप घेण्याची पद्धति जुन्या गायकींत रूढ होती. या पद्धतीच्या गाण्याला आलापजोड असें म्हणतात. हे आलाप गातांना कांहींतरी अक्षरोच्चार करावा लागतो. तीं अक्षरें तोम् नोम्, अशासारखीं असतात. सामगायनांत ओ, हायि, हा, ऊ, ई अशा अक्षरांचा आलाप गातांना उपयोग केला जातो. इतर अक्षरांचा उपयोग न करितां मुख्य आलापांत ॐकाराचाच उपयोग करावा, असें छान्दोग्य श्रुतीचें मत आहे.

उद्गीथ हा सामगायनांतील मुख्य भाग आहे. या खंडाच्या दुसऱ्या मंत्रांत उद्गीथाचें महत्त्व चढत्या क्रमानें दाखविलें आहे. ज्याप्रमाणें ' काव्येषु नाटकं रम्यम् ' या सुभाषित श्लोकांत क्रमानें शाकुंतल नाटकाच्या चौथ्या अंकांतील चार श्लोक हे सर्वांत चांगले असें दर्शविलें आहे, तशाच खुबीनें या दुसऱ्या मंत्रांत उद्गीथाचें महत्त्व वर्णन केलें आहे. सामवेद हें उद्गीथाचें मूळ आहे. परंतु सामवेदाचा देखील उगम ऋग्वेदांतूनच झाला आहे. साम गायन करणाऱ्या वैदिक ऋषींनीं ऋग्वेदांतीलच अनेक ऋचा निरनिराळ्या सुरांमध्यें बसवून त्यांना सामवेदाचें स्वरूप दिलें. म्हणजे प्रथम ऋचा, नंतर त्या ऋचांचें सामवेदांत रूपांतर आणि त्या सामवेदांतून उद्गीथ गायनाची उत्पत्ति, असा हा क्रम समजावा. ज्या वाक्यांमध्यें चरणांची व्यवस्था असते, त्यांनाच ऋचा असें म्हणतात. या ऋचा गीति म्हणजे पद्यस्वरुपांत आल्या म्हणजे त्यांना साम ही संज्ञा प्राप्त होते, असें पूर्वमीमांसेमध्यें सांगितलें आहे. त्यावरून ऋग्वेद हें सामवेदाचें मूळ स्वरूप होय असें ठरतें.

आरण्यक ग्रंथांनीं, त्यांतल्यात्यांत उपनिषदांनींच, ॐकाराला विशेष महत्त्व दिलें आहे. या ॐकाराचा प्राचीन मंत्रवाङ्मयांत फारसा कोठें उल्लेख आढळत नाहीं, असें कित्येकांचें म्हणणें आहे, पण तें बरोबर नाहीं. 'ऋचो अक्षरे परमे व्योमन्' इत्यादि मंत्रांत ॐकारच विवक्षित आहे असें मान्य करावयास पाहिजे. ॐ हा शब्द वैदिक वाङ्मयाच्या आरंभापासून अनुस्यूत आहे, असें सर्व ग्रंथकारांचें मत आहे. ॐ हा शब्द व्यवहारात देखील प्राचीनकाळीं उपयोजिला जात होता. ॐकाराची उपासना करणारानें ॐकाराच्या व्यावहारिक स्वरूपाचें ज्ञान देखील संपादन करावयास पाहिजे असें या खंडात श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे. उपासनामार्गात प्रतीकांच्या व्यावहारिक स्वरूपाचा विचार करण्याची आवश्यकता नाहीं, अशी कित्येकांची समजूत असते परंतु ती अगदींच चुकीची आहे. ॐकाराच्या उपासनेचें फल सागतांना श्रुतीनें व्यवहाराची कल्पना सोडलेली नाहीं. ( उ. नि. र. प्र. प्रश्नोपनिषद्, प्रश्न ५, मंत्र ६ पृष्ठ ९५–९६ ). म्हणून व्यावहारिक व पारमार्थिक अशा दोनही रीतींनीं प्रतीकाचा विचार करणें उपासनामार्गात अत्यंत अगत्याचें आहे. किंबहुना प्रतीकाचा एकांगी विचार केल्यानें उपासना अपुरीच ठरते. याचा अर्थ असा कीं, उपासनेला तत्त्वज्ञानाचा पाठिंबा नसेल तर, ती उपासना पूर्ण होत नाहीं. ज्याप्रमाणें अध्यात्मज्ञानानें उपासनेला पूर्णता येते, त्याप्रमाणेंच कर्माला देखील अध्यात्मविद्येच्याच योगानें पूर्णता येते. ज्ञानशून्य असें कर्म घडणें जरी शक्य असलें तरी, तें निरुपयोगीच समजावें. श्रद्धा म्हणजे आस्थेवाइकपणा आणि अध्यात्मविद्या या दोहोंची जोड जर कर्माला मिळाली तर तें कर्म अत्यंत तेजस्वी होतें. यालाच गीतेनें कर्मयोग असें म्हटलें आहे. उपासना, ज्ञान व कर्म या तीनही तत्त्वांचा प्रस्तुत खंडांत चांगला मेळ घालून दाखविला आहे. त्यावरून छांदोग्याचा उपक्रम कर्मयोग स्वरूपानेंच कसा झाला आहे, तें चांगलेंच दिसून येतें. याप्रमाणें कर्म व ज्ञान यांचें सहकार्य कसें अत्यंत कल्याणकारक आहे तें सांगून श्रुतीनें हें खंड समाप्त केलें आहे.

## अथ द्वितीयः खण्डः

**देवासुरा ह वै यत्र संयेतिरे उभये प्राजापत्यास्तद्ध देवा उद्गीथमाजह्रुरनेनैनानभिभविष्याम इति ॥ १ ॥**

**देवाः असुराः उभये प्राजापत्याः ह वै यत्र संयेतिरे। तत् ह देवाः अनेन एनान् अभिभविष्यामः इति उद्गीथम् आजह्रुः।**

देव व असुर असे दोघेही प्रजापतीचे उपासक जेव्हां कलह करूं लागले, तेव्हां देव ह्या (उद्गीथा) नेंच ह्यांचा (असुरांचा) पराभव करूं, अशा विचारानें उद्गीथ (सामगायन) विद्या आणिते झाले.

प्रस्तुत मंत्रापासून देवासुरांच्या कलहाविषयीं एका आख्यायिकेला प्रारंभ होत आहे. ही कथा बृहदारण्यकाच्या पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या ब्राह्मणांत आली आहे. आर्यलोक भरतखंडांत येण्यापूर्वी जो व्यवहार घडला त्याचें वर्णन प्रायः देवासुरांच्या रूपानेंच केलेलें असतें असें इतिहासज्ञ म्हणतात. देव व असुर हे दोघेही प्रजापतीचे उपासक होते. त्यावेळीं प्रजापति ही वैदिक धर्मांतील मुख्य देवता होती; म्हणून देव व असुर हे दोघेही वैदिक धर्मी होते असें निःसंशय समजावें. सम्+यत हा धातु स्पर्धा, भांडण किंवा युद्ध करणें अशा अर्थानेंच वैदिक वाङ्मयांत येतो. देवांनीं असुरांचा पराभव करण्याकरिता उद्गीथाला आणिलें, म्हणजे सामगायनाचा उपयोग करून असुरांचा पराभव करावा, असें देवांनीं ठरविलें.

**ते ह नासिक्यं प्राणमुद्गीथमुपासांचक्रिरे तꣳ हासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयं जिघ्रति सुरभि च दुर्गन्धि च पाप्मना ह्येष विद्धः ॥ २ ॥**

**ते ह नासिक्यम् प्राणम् उद्गीथम् उपासांचक्रिरे ह। असुराः तम् पाप्मना विविधुः। (यस्मात्) पाप्मना विद्धः तस्मात् तेन सुरभि च दुर्गन्धि च उभयम् जिघ्रति।**

त्या (देवां) नीं नाकांतून वाहणाऱ्या प्राणाची उद्गीथरूपानें उपासना केली, तेव्हां असुरांनीं त्या (प्राणा) ला पातकानें विद्ध केलें. ज्याअर्थीं हा (प्राण) पापयुक्त झाला, त्याअर्थीं त्या प्राणाच्या योगानें मनुष्य सुगंध व दुर्गंध हे दोन्हीही वास घेऊं शकतो.

**अथ ह वाचमुद्गीथमुपासांचक्रिरे ता<sup></sup>ं हासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तयोभयं वदति सत्यं चानृतं च पाप्मना ह्येषा विद्धा ॥ ३॥**

**अथ ह वाचम् उद्गीथम् उपासांचक्रिरे।असुराः ह ताम् पाप्मना विविधुः। हि एषा पाप्मना विद्धा तस्मात् तेन सत्यम् च अनृतम् च उभयम् वदति।**

नंतर (देवांनीं) वाणीची उद्गीथरूपानें उपासना केली. असुरांनीं ती (वाणी) पापानें विद्ध केली. ज्याअर्थीं ही (वाणी) पापयुक्त झाली, त्याअर्थीं (मनुष्य) सत्य व असत्य दोन्हीही बोलूं शकतो.

**अथ ह चक्षुरुद्गीथमुपासांचाक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयं पश्यति दर्शनीयं चादर्शनीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥ ४ ॥**

**अथ ह चक्षुः उद्गीथम् उपासांचक्रिरे। असुराः तत् ह पाप्मना विविधुः। हि एतत् पाप्मना विद्धम् तस्मात् तेन दर्शनीयम् च अदर्शनीयम् च उभयम् पश्यति।**

नंतर (देवांनीं) डोळ्यांची उद्गीथरूपानें उपासना केली. असुरांनीं त (डोळे) पापानें विद्ध केले. ज्याअर्थीं हे (डोळे) पापयुक्त झाले, त्याअर्थीं (मनुष्य) पाहण्यास योग्य व पाहण्यास अयोग्य हीं दोन्हीही पाहूं शकतो.

**अथ ह श्रोत्रमुद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयꣳ श्रृणोति श्रवणीयं चा श्रवणीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥ ५ ॥**

**अथ ह श्रोत्रम् उद्गीथम् उपासांचक्रिरे। असुराः ह तत् पाप्मना विविधुः। हि एतत् विद्धम् तस्मात् तेन श्रवणीयम् च अश्रवणीयम् च उभयम् श्रृणोति।**

नंतर ( देवांनीं ) कर्णेंद्रियाची उद्गीथरूपानें उपासना केली. असुरांनीं तें कर्णेंद्रिय पापानें विद्ध केलें. ज्याअर्थी हें ( कर्णेंद्रिय ) पापयुक्त झालें, त्याअर्थी ( मनुष्य ) ऐकण्यास योग्य व ऐकण्यास अयोग्य हीं दोन्हीही ऐकूं शकतो.

**अथ ह मन उद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयꣳ संकल्पयते संकल्पनीयं चासंकल्पनीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥ ६ ॥**

**अथ ह मनः उद्गीथम् उपासांचक्रिरे। असुराः ह तत् पाप्मना विविधुः। हि तत् पाप्मना विद्धम् तस्मात् तेन संकल्पनीयम् च असंकल्पनीयम् च उभयम् संकल्पयते।**

नंतर ( देवांनीं ) मनाची उद्गीथरूपानें उपासना केली. असुरांनीं तें ( मन ) पापानें विद्ध केलें. ज्याअर्थी हें ( मन ) पापयुक्त झालें, त्याअर्थी ( मनुष्य ) त्या ( मना ) नें कल्पना करण्यास योग्य व कल्पना करण्यास अयोग्य अशा दोन्ही प्रकारच्या कल्पना करूं शकतो.

**अथ ह य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासांचक्रिरे तꣳ हासुरा ऋत्वा विदध्वंसुर्यथाऽश्मानमाखणमृत्वा विध्वꣳसेतैवम् ॥ ७ ॥**

**अथ ह अयम् मुख्यः प्राणः तम् एव उद्गीथम् उपासांचक्रिरे। यथा आखणम् अश्मानम् ऋत्वा विध्वंसेत एवम् असुराः ह तम् ऋत्वा विदध्वंसुः।**

नंतर देवांनीं हा ( जो ) मुख्य ( हृदयस्थ ) प्राण, त्याची उद्गीथरूपानें उपासना केली. ज्याप्रमाणें एखादा (ढिसूळ पदार्थ) न फुट-

णाऱ्या ( कहार जातीच्या )दगडावर पडून नाश पावतो त्याप्रमाणें दैत्य त्या ( मुख्य प्राणा ) वर पडून नष्ट झाले—( त्यांचाच पराभव झाला. )

**यथाश्मानमाखणमृत्वा विध्वँसत एवँ हैव स विध्वँसते य एवंविदि पापं कामयते यश्चैनमभिदासति स एषो ऽश्माखणः ॥ ८ ॥**

**यथा आखणम् अश्मानम् ऋत्वा विध्वंसते एवम् ह वै यः एवंविदि पापम् कामयते यः एनम् अभिदासति च सः विध्वंसते। सः एषः अश्माखणः।**

जसा ( एखादा पदार्थ ) कहार दगडावर पडला असतां फुटून जातो तसा, जो असें प्राणाचें महत्व जाणणाऱ्या उद्गीथोपासका-विषयीं दुष्ट वासना ठेवतो आणि जो त्याचा नाश करण्यास प्रवृत्त होतो, त्याचाच नाश होतो. तो हा (मुख्य प्राण ) आश्माखण ( दुर्भेद्य ) आहे.

दुसऱ्या मंत्रापासून सातव्या मंत्राच्या अखेरपर्यंतचें वर्णन जवळजवळ बृहदारण्यकासारखेंच आहे. सातव्या व आठव्या मंत्रांत अश्माखण हा शब्द आला आहे. तो छांदोग्याच्या काळांत व्यवहारामध्यें अगदीं रूढ झालेला असावा असें दिसतें. मुख्य प्राणाची उपासना करणारा मनुष्य अत्यंत सामर्थ्यवान् होतो. अशा सामर्थ्यसंपन्न मनुष्याच्या वाटेस जर कोणी गेला तर त्याचा नाश होतो. हें प्राणविद्येचें सहजसिद्ध असें फल येथें सांगितलें आहे.

**नैवैतेन सुरभि न दुर्गन्धि विजानात्यपहतपाप्मा ह्येष तेन यदश्नाति यत्पिबति तेनेतरान्प्राणानवति एतमु एवा-न्ततोऽवित्त्वोत्क्रामति व्याददात्येवान्तत इति ॥ ९ ॥**

**हि एषः अपहतपाप्मा तेन एतेन न एव सुरभि न दुर्गन्धि विजानाति। ( सः ) यत् अश्नाति यत् पिबति तेन इतरान् प्राणान् अवति। एतम् उ एव अन्ततः अवित्त्वा उत्क्रामति अन्ततः व्याददाति एव इति।**

हा (मुख्य प्राण) निष्पाप असतो; त्यामुळें तो सुगंध किंवा दुर्गंध जाणत नाहीं (लक्षांत घेत नाहीं). तो जें खातो व जें पितो त्याच्या योगानें इतरांचें ( इतर इंद्रियशक्तींचें ) संरक्षण करितो. हें ( अन्नपान ) शेवटीं न पोंचल्यामुळें तो ( देहांतून ) निघून जातो, म्हणून शेवटीं तोंड वासतें ( पसरतें ).

इंद्रियद्वारां विषयांचें ज्ञान होतें, त्याबरोबरच त्या विषयांना अनुसरून इंद्रियांमध्यें अनुकूल किंवा प्रतिकूल संवेदना उत्पन्न होतात. कडू–गोड, सुगंध–दुर्गंध, सुरूप–कुरूप इत्यादि गुणभेद इंद्रियांच्या अभिरुचीवरच अवलंबून असतात. म्हणजे मनुष्याच्या जिव्हेला जो पदार्थ गोड लागतो तो पदार्थ इतर प्राण्यांना गोडच लागेल असा नियम नाहीं. म्हणून इंद्रियांतील रागद्वेषावरच विषयांचा चांगुलपणा किंवा वाईटपणा अवलंबून असतो;परंतु या रागद्वेषांचा संबंध मुख्य प्राणाकडे येत नाहीं. जे खाद्यपेय पदार्थ पोटांत जातील त्यांचें पचन करून, त्यांतील जो अहितकारक भाग असेल त्याचें निःसारण करावें आणि हितकारक भागाच्या योगानें सर्व शक्तींचें पोषण करावें, असा याचा थोर स्वभाव आहे.म्हणून सर्व अवयवांच्या किंवा इंद्रियांच्या शक्ति या मुख्य प्राणशक्तीवरच अवलंबून असतात. अर्थात् या मुख्य प्राणशक्तीचें पोषण व संवर्धन केल्यानें इतर सर्व शक्तींचें पोषण व संवर्धन होतें.याकरितां मनुष्यानें काळजीपूर्वक या मुख्य प्राणाची उपासना करावी, असा श्रुतीचा उपदेश आहे.

**तँ हाङ्गिरा उद्गीथमुपासांचक्र एतमु एवाङ्गिरसं मन्यन्तेऽङ्गानां यद्रसः ॥ १० ॥**

**अङ्गिराः ह तम् उद्गीथम् उपासांचक्रे। अङ्गानाम् यत् रसः एतम् उ आङ्गिरसम् मन्यन्ते।**

अङ्गिरस् ऋषीनें त्या ( मुख्य प्राणा ) ची उद्गीथरूपानें उपासना केली. अंगांचा ( अवयवांचा ) जो रस (सार) त्याला( मुख्य प्राणाला ) आंगिरस मानतात.

मुख्य प्राणाला आङ्गिरस असें म्हणतात. त्याचीं दोन कारणें या मंत्रांत सांगितलीं आहेत. एक अङ्गिरस् ऋषीनें या प्राणतत्त्वाचें प्रथम संशोधन केलें, आणि त्याचें स्वरूप व महत्त्व उद्गीथरूपानें लोकास समजावून दिलें, म्हणून अङ्गिरस् ऋषीच्या नांवावरूनच याला आङ्गिरस असें म्हणतात. दुसरें कारण असें कीं, सर्व अंगांचा, सर्व अवयवांचा रस म्हणजे अर्क असा हा प्राण आहे, म्हणून त्याला आङ्गिरस हें नांव पडलें आहे.

**तेन तꣳ ह बृहस्पतिरुद्गीथमुपासांचक्र एतमु एव बृहस्पतिं मन्यन्ते वाग्घि बृहती तस्या एष पतिः ॥ ११ ॥**

**बृहस्पतिः तम् उद्गीथम् उपासांचक्रे। हि वाक् बृहती तस्याः एषः पतिः तेन एतम् उ एव बृहस्पतिम् मन्यन्ते।**

बृहस्पति ऋषीनें त्या ( मुख्य प्राणा ) ची उद्गीथरूपानें उपासना केली. वाणी म्हणजे बृहती, तिचा हा पति ( स्वामी ) म्हणून त्याला (मुख्य प्राणाला)च बृहस्पति मानतात.

**तेन तꣳ हायास्य उद्गीथमुपासांचक्र एतमु एवायास्यं मन्यन्त आस्याद्यदयते ॥ १२ ॥**

**आयास्यः तम् उद्गीथम् उपासांचक्रे ह। यत् आस्यात् अयते तेन एतम् उ आयास्यम् मन्यन्ते।**

आयास्य ऋषीनें त्या ( मुख्य प्राणा ) ची उद्गीथरूपानें उपासना केली. त्याची गति मुखांतून असते म्हणून त्याला आयास्य मानतात.

**तेन तꣳ ह बको दाल्भ्यो विदांचकार स ह नैमिशीयानामुद्गाता बभूव स ह स्मैभ्यः कामानागायति ॥१३॥**

**तम् ह बकः दाल्भ्यः विदांचकार। सः ह नैमिशीयानाम् उद्गाता बभूव तेन सः ह एभ्यः कामान् आगायतिस्म।**

दल्भ्याचा पुत्र बक ऋषि ही मुख्य प्राणविद्या जाणत होता. तो नैमिशीयांचा उद्गाता, म्हणजे यज्ञांत सामगायन करणारा ऋत्विज होता. म्हणून त्यानें त्या (नैमिशीयां) करितां इष्टफल-दायक मंत्रांनें गायन केलें;

मंत्र १०, ११, १२ या तीन मंत्रात अंगिरस्, बृहस्पति व आयस्य या तीन ऋषींचीं नांवें आलीं आहेत. त्यावरून अङ्गिरस्, बृहस्पति व आयस्य या तीनही ऋषींनीं प्राण व उद्गीथ याचा विचार करून उद्गीथोपासना प्रवृत्त केली असें सिद्ध होतें. प्राणसामर्थ्य व उद्गीथोपासना यांचा संबंध, प्राणाचें महत्त्व इत्यादि विषयांचें तत्त्वज्ञान देखील याच ऋषींनीं तयार केलें. अङ्गिरस्, बृहस्पति व आयास्य हीं नांवें ऋषींचीं असून, या नांवांचे ऋषि या उद्गीथोपासनेचे प्रवर्तक होत, असें दहा ते बारा अखेरच्या मंत्रांत स्पष्ट सांगितलें असलें, तरी देखील, त्या तीनही शब्दांचे दुसरे अर्थ त्या मंत्रांत करून दाखविले आहेत; त्या-वरून प्रस्तुत मंत्रांचे काळात भूतकालीन इतिहासावर विस्मरणाचा किंवा अज्ञानाचा पडदा पडून भूतकालीन इतिहासावर किंवा ऐतिहासिक व्यक्तींवर आध्यात्मिक कल्पना बसविण्याची पद्धति रूढ होऊं लागली होती, असा तर्क करण्यास हरकत नाहीं. तेराव्या मंत्रांत बकदाल्भ्य ऋषीचा उल्लेख आला आहे. या ऋषीनेंच यज्ञांतील सामगायनांत उद्गीथाचा प्रचार प्रथम सुरू केला, असें या मंत्रावरून सिद्ध होतें, आङ्गिरसादि ऋषींनीं प्रवृत्त केलेल्या या उद्गीथोपासनेचें ज्ञान बकदाल्भ्यानें संपादन केलें आणि नैमिषारण्यांतील यज्ञांत त्यानें उद्गीथ गायन केलें, असें या मंत्रांत सांगि-तलें आहे. दहा ते तेरा अखेरपर्यंतचे मंत्र ऐतिहासिक दृष्ट्या फार मह-त्त्वाचे आहेत.

**आगाता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षर-मुद्गीथमुपास्त इत्यध्यात्मम् ॥ १४ ॥**

**यः एतत् विद्वान् अक्षरम् उद्गीथम् उपास्ते (सः) ह वै कामानाम् आगाता भवति। इति अध्यात्मम्।**

जो हें ( मुख्यप्राणज्ञान ) जाणणारा ( ॐकार ) अक्षररूप उद्गीथाची उपासना करितो. तो इष्टफलदायकमंत्रांचा गायनकर्ता ( यज्ञांतील उद्गाता ) होतो. हें (उद्गीथोपासनेंतील) अध्यात्म प्रकरण होय.

देवांनीं उद्गीथाची उपासना करण्याकरितां कसकसे प्रयत्न केले व त्यांचे हे प्रयत्न असुरांनीं कसे हाणून पाडिले, त्याचें वर्णन सातव्या मंत्रापर्यंत झालें आहे. देवांनी मुख्य प्राणाच्या योगानें जेव्हा उद्गीथाची उपासना केली, तेव्हां असुरांचा पराभव होऊन देव विजयी झाले, असें या आख्यायिकेचें पर्यवसान आहे. देव व असुर म्हणजे सात्विक व तामस मनोवृत्ति असा अर्थ बहुतेक टीकाकारांनीं स्वीकारला आहे, तो अर्थ श्रुतीला अभिप्रेत आहे असें मानलें तरी देखील, देवासुरांचें हें आध्यात्मिक रूपक एका प्राचीन इतिहासाचें निदर्शक आहे यांत शंका नाहीं. भूतकालीन ऐतिहासिक गोष्टींचें आलंकारिक वर्णन वैदिक काळांत शिष्टसंमतच होतें. या इतिहासाचें स्पष्टीकरण आम्हीं बृहदारण्यकांत केलें आहे. करितां वाचकांनीं हें खंड वाचतांना बृहदारण्यकांतील पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या ब्राह्मणाकडे पूर्ण लक्ष द्यावयास पाहिजे. हें खंड त्या ब्राह्मणाशीं ताडून पाहिलें असता असें दिसून येईल कीं, बृहदारण्यकांतील पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या ब्राह्मणांतील कथा या खंडांतील कथेची पूरक आहे.बृहदारण्यकांतील कथा यापेक्षा बरीच विस्तृत आहे, तथापि ऐतिहासिक दृष्ट्या छान्दोग्यांतील हें प्रकरण अधिक महत्त्वाचें आहे. सामवेद संहितेचा रचनाकार कोणीहि असला तथापि, सामगायनाचा प्रारभकाल देवासुरांच्या विभागांतच येतो यांत शंका नाहीं. आर्यलोक भरतखंडांत येऊन स्थायिक होण्यापूर्वीच ते सामगायनांत निष्णात होते, असें या वर्णनावरून उघड

होत आहे. याप्रमाणें उद्गीथोपासनेचा इतिहास, त्याचें महत्त्व व आध्यात्मिक स्वरूप वर्णन करून श्रुतीनें हें खंड समाप्त केलें आहे.

---

## अथ तृतीयः खण्डः

**अथाधिदैवतं य एवासौ तपति तमुद्गीथमुपासीतोद्यन्वा एष प्रजाभ्य उद्गायति । उद्यꣳस्तमो भयमपहन्त्यपहन्ता ह वै भयस्य तमसो भवति य एवं वेद ॥ १ ॥**

**अथ अधिदैवतम्। यः असौ तपति तम् एव उद्गीथम् उपासीत। एषः उद्यन् वै प्रजाभ्यः उद्गायति उद्यन् तमः भयम् अपहन्ति। यः एवम् वेद (सः) तमसः भयस्य ह वै अपहन्ता भवति।**

आतां उद्गीथाचें देवतास्वरूप सांगतात. जो हा (सूर्य) प्रकाशतो त्याचीच उद्गीथरूपानें उपासना करावी. हा (सूर्य) उदय पावून सर्वांच्याकरितां गायन करितो (सर्वांना आनंद देतो). तो उदय पावून अंधकार व भीति नष्ट करितो. जो ह्याप्रमाणें जाणतो तो अंधकार व भय यांचा नाश करणारा होतो.

शरीरांतील सर्व शक्तींचा मुख्य प्राण हाच आधार आहे. या प्राणाच्या आधारानेंच सर्व इंद्रियें व अवयव शक्तिमान् व कार्यक्षम होतात. अशा या मुख्य प्राणाचा उद्गीथाशीं कसा संबंध येतो, तें स्पष्टपणें दाखवून उद्गीथाचें आध्यात्मिक वर्णन श्रुतीनें मागील खंडांत केलें आहे. या खंडांत उद्गीथाचें आधिदैविक वर्णन करावयाचें आहे. शरीरांतील सर्व शक्तींमध्यें जसा प्राण, तद्वतच ब्रह्मांडांतील सर्व देवतांमध्यें सूर्य ही मुख्य देवता आहे. या आदित्यालाच उद्गीथ असें समजावें. म्हणजे उद्गीथ गायन करितांना गाणाऱ्यानें आदित्याचेंच ध्यान करावें; त्याबरोबरच आदित्यमंडलाचें ज्ञान संपादन करणें ओघानेंच प्राप्त होतें. ध्यानाला ज्ञानाची आवश्यकता कशी असते त्याचें स्पष्टीकरण माण्डूक्योपनिषदांत झालें आहे. ज्ञानपूर्वक आदित्य-

मंडलाचें ध्यान करीत ॐकारयुक्त उद्‌गीथ गायन केलें असतां उद्गीथाची आधिदैविक उपासना पूर्ण होते. या उपासनेच्या योगानें मनुष्याच्या अंतः-करणांतील अज्ञानांधकार नष्ट होऊन तो सर्व भयापासून मुक्त होतो. या आधिदैविक उपासनेचें, म्हणजे उद्‌गीथरूपानें केलेल्या आदित्योपासनेचें फल बुद्धिग्राह्य असेंच श्रुतीनें या मंत्रांत सांगितलें आहे,

**समान उ एवायं चासौ चोष्णोऽयमुष्णोऽसौ स्वर इती-ममाचक्षते स्वर इति प्रत्यास्वर इत्यमुं तस्माद्वा एतमिम-ममुं चोद्‌गीथमुपासीत ॥ २ ॥**

**अयम् च असौ च समानः उ एव। अयम् उष्णः असौ उष्णः । स्वरः इति इमम् स्वरः इति प्रत्यास्वरः इति अमुम् च आचक्षते। तस्मात् वै इमम् अमुम् च एतत् उद्गीथम् उपासीत।**

हा ( प्राण ) व हा ( सूर्य ) हे सारखेच आहेत. हा ( प्राण ) उष्ण आहे आणि हा सूर्य उष्ण आहे. स्वर म्हणजे गतिमान् असें ह्या ( प्राणा ) ला म्हणतात तसेंच स्वर ( गतिमान् ) प्रत्या-स्वर ( परत येणारा ) असें ह्या सूर्यालाही म्हणतात; म्हणून ह्या ( प्राणा )ची आणि ह्या ( सूर्या ) ची ह्या उद्‌गीथरूपानें उपासना करावी.

या मंत्रांत प्राणाचें व सूर्याचें शब्दानें व गुणानें सादृश्य दाखविलें आहे. स्वर हा शब्द वैदिक वाङ्मयांत प्राण व सूर्य या दोहोंनाही अनुलक्षून येतो. हेंच शब्दसादृश्य होय. शरीरांतील उष्णतेचें उगमस्थान प्राणशक्ती-मध्येंच आहे. या मुख्य प्राणाला ब्रह्मतत्त्वाचा-आत्मतत्त्वाचा आधार असतो. ह्या आधारानेंच प्राणामध्यें तेजःशक्ति प्रादुर्भूत होते. तिच्या योगानेंच प्राण शरीरांत उष्णता उत्पन्न करून ती कायम ठेवितो. परंपरेनें आत्माच या उष्णतेचा उत्पादक असला तरी, तो या प्राणाच्या द्वारानेंच उष्णतेचा उत्पादक होतो हें लक्षांत घेतलें म्हणजे, श्रुतीनें प्राणाला उष्ण-

तेचा उत्पादक कसें ठरविलें तें बरोबर समजतें. पिंडातील उष्णतेचा उत्पादक जसा प्राण, त्याप्रमाणेंच सूर्य हाच ब्रह्मांडांतील उष्णतेचा उत्पादक आहे. उष्णता हें जीवनशक्तीचें मुख्य कारण आहे. यावरून प्राण व सूर्य हे दोघेही उष्णतेच्या योगानें पिंडब्रह्मांडांतील जीवनशक्ति कायम राखणारे आहेत, असें सिद्ध होतें. त्याबरोबरच उद्गीथाचा प्राणाशीं जसा निकट संबंध येतो, तसाच त्याचा सूर्याशींही संबंध येतो, हें लक्षांत ठेविलें पाहिजे; व याच अभिप्रायानें श्रुतीनें प्राण व सूर्य या दोहोंची उद्गीथरूपानेंच उपासना करावयास सांगितलें आहे.

**अथ खलु व्यानमेवोद्गीथमुपासीत यद्वै प्राणिति स प्राणो यदपानिति सोऽपानः । अथ यः प्राणापानयोः संधिः स व्यानो यो व्यानः सा वाक । तस्मादप्राणन्ननपानन्वाचमभिव्याहरति ॥ ३ ॥**

**अथ खलु व्यानम् एव उद्गीथम् उपासीत । यत् वै प्राणिति सः प्राणः । यत् अपानिति सः अपानः । अथ यः प्राणापानयोः संधिः सः व्यानः । यः व्यानः सा वाक् । तस्मात् अप्राणन् अनपानन् वाचम् अभिव्याहरति ।**

आतां:—व्यानाचीच उद्गीथरूपानें उपासना करावी. ( मनुष्य ) जें वायूचें आकर्षण करितो ( नाकांतून आंत ओढून घेतो ) तो प्राण होय· आणि जें निःसारण करितो ( बाहेर सोडितो ) तो अपान होय. आणि जी प्राण व अपान यांच्यामधली स्थिति ( वायूचा निरोध ) तो व्यान होय. जो व्यान तीच वाणी होय. ( कारण बोलण्याच्या वेळीं श्वासोच्छवासाचा निरोधच असतो ) म्हणून वायू आंत न घेत असतां किंवा बाहेर न सोडीत असतां वाणीचा उच्चार होत असतो.

**या वाक्सर्क्तस्मादप्राणन्ननपानन्नृचमभिव्याहरति यर्क्तत्साम तस्मादप्राणन्ननपानन्साम गायति यत्साम स उद्गीथस्तस्मादप्राणन्ननपानन्नुद्गायति ॥ ४ ॥**

**या वाक् सा ऋक् तस्मात् अप्राणन् अनपानन् ऋचम् अभिव्याहरति । या ऋक् तत् साम तस्मात् अप्राणन् अनपानन् साम गायति । यत् साम सः उद्गीथः । तस्मात् अप्राणन् अनपानन् उद्गाति ।**

जी वाणी तीच ऋचा ( मंत्र ); म्हणून प्राण व अपान ह्या क्रिया न चालत असतां ( बंद असतां ) मंत्राचा उच्चार करण्यांत येतो. जी ऋचा तेंच साम; म्हणून प्राणापानक्रिया बंद असतांच साम गायिलें जातें. जें साम तेंच उद्गीथ; म्हणून प्राणापानक्रिया बंद असतां उद्गीथाचें गायन करितां येतें.

प्राण व अपान या दोहोंची क्रिया ज्या वेळीं बंद ठेवावी लागते, त्या वेळच्या स्थितींत प्राणशक्तीला व्यान असें म्हणतात. कोणतेंही ओझें उचलतांना मनुष्याला या व्यानशक्तीचाच उपयोग होतो. सतारीची अगर बीनाची तार खेंचतांना जो दम रोखून धरावा लागतो, तोदेखील व्यानच होय. जो आपलें प्राणसामर्थ्य सोज्वळ राखतो त्यालाच या व्यानशक्तीचा पूर्ण उपयोग करितां येतो. या व्यानाचें विवेचन प्रश्नोपनिषदांतही आलें आहे ( प्रश्नोपनिषद्, ३.६ पृ. ४९-५० ). बोलतांना, एखादें पद्य किंवा मंत्र पठण करिताना किंवा गायन करीत असतांना या व्यानावरच सर्व क्रिया अवलंबून असतात. उद्गीथाच्या उपासनेंत गायनालाच विशेष महत्त्व आहे. व्यानसामर्थ्याची गायनाला आवश्यकता असल्यामुळेंच व्यानाची उद्गीथरूपानें उपासना करावयास सांगितलें आहे. गवई लोक प्रभातकाळीं मंद्र सप्तकांत जें स्वरसाधन करितात त्याच्या योगानें हें व्यानसामर्थ्य वृद्धिंगत होतें. हें स्वरसाधन उपासना पद्धतीनें म्हणजे प्रणवोच्चार, प्राण व आदित्यमंडल यांचें ज्ञान आणि सूर्याचें ध्यान या विषयांचें एकीकरण करून केल्यास तीच व्यानाची उद्गीथरूप उपासना होईल यांत शंका नाहीं. एकाग्र चित्तानें परमेश्वराचें ध्यान करीत ॐकारानें स्वरसाधन करणें हीच ती उपासना होय.

**अतो यान्यन्यानि वीर्यवन्ति कर्माणि यथाग्नेर्मन्थनमाजेः सरणं दृढस्य धनुष आयमनमप्राणन्ननपानꣳस्तानि करोत्येतस्य हेतोर्व्यानमेवोद्गीथमुपासीत ॥ ५ ॥**

**अतः यानि अन्यानि वीर्यवन्ति कर्माणि यथा अग्नेः मन्थनम् आजेः सरणम् दृढस्य धनुषः आयमनम् तानि अप्राणन् अनपानन् करोति। एतस्य हेतोः व्यानम् एव उद्गीथम् उपासीत।**

म्हणून जीं निरनिराळीं सामर्थ्याचीं कामें ( असतात), उदाहरणार्थ अग्नीचें मंथन ( लांकडावर लांकूड जोरानें घांसून अग्नि उत्पन्न करणें ), सीमेपर्यंत धांवणें, बळकट धनुष्य वांकविणें, हीं ( कामें ) प्राणापानाची क्रिया बंद ठेवूनच करितात. ह्या कारणास्तव व्यानाचीच उद्गीथरूपानें उपासना करावी.

**अथ खलूद्गीथाक्षराण्युपासीतोद्गीथ इति प्राण एवोत्प्राणेन ह्युत्तिष्ठति वाग्गीर्वाचो ह गिर इत्याचक्षतेऽन्नं थमन्ने हीदꣳ सर्वꣳ स्थितम् ॥ ६ ॥**

**अथ खलु उद्गीथाक्षराणि उद्गीथः इति उपासीत। प्राणः एव उत् हि प्राणेन उत्तिष्ठति। वाक् गीः ह वाचः गिरः ( उत्तिष्ठन्ति ) इति आचक्षते। अन्नम् थम् हि अन्ने इदम् सर्वम् स्थितम्।**

आतां:—उद्गीथ ह्या शब्दाच्या अवयवांची उद्गीथरूपानें उपासना करावी. उत् ( हा अवयवच ) प्राण होय. कारण प्राणानेंच ( मनुष्य ) उठतो, म्हणजे हालचाल करितो. गी हा अवयव वाणी होय. कारण वाणीपासूनच भाषण घडतें असें म्हणतात. थ हा अवयव अन्न होय. कारण अन्नानेंच हें सर्व शरीर स्थिर राहतें(जगतें).

**द्यौरेवोदन्तरिक्षं गीः पृथिवी थमादित्य एवोद्वायुर्गीरग्निस्थꣳ सामवेद एवोद्यजुर्वेदो गीर्ऋग्वेदस्थं दुग्धेऽस्मै**

**वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतान्येवं-
विद्वानुद्गीथाक्षराण्युपास्त उद्गीथ इति ॥ ७ ॥**

**द्यौः एव उत् अन्तरिक्षम् गीः पृथिवी थम्। आदित्यः एव उत् वायुः गीः अग्निः थम्। सामवेदः एव उत् यजुर्वेदः गीः ऋग्वेदः थम्। यः वाचः दोहः (तम्) दोहम् वाक् अस्मै दुग्धे। यः एवम् विद्वान् एतानि उद्गीथाक्षराणि उद्गीथः इति (उपास्ते सः) अन्नवान् अन्नादः भवति।**

द्युलोक हाच उत् हा अवयव, अंतरिक्ष हेंच गी आणि पृथ्वी हेंच थ होय. तसेंच सामवेद हेंच उत्, यजुर्वेद हें गी आणि ऋग्वेद हें थ होय. जें वाणीचें दूध म्हणजे विद्यारूप फल तें वाणीच ह्याला ( उद्गीथोपासकाला)देते. जो ह्याप्रमाणें जाणणारा ( पुरुष ) ह्या उद्गीथाची ( उत् गी थ ) अवयवांची उद्गीथरूपानें उपासना कारितो तो समृद्धिमान् व उपभोक्ता होतो.

**अथ खल्वाशीः समृद्धिरुपसरणानीत्युपासीत येन साम्ना
स्तोष्यन्स्यात्तत्सामोपधावेत् ॥ ८ ॥**

**अथ खलु आशीः समृद्धिः। उपसरणानि इति उपासीत। येन साम्ना स्तोष्यन् स्यात् तत् साम उपधावेत्।**

आतां मनोरथपूर्णता सांगतात. ( मनोरथपूर्तींच्या ध्यान इत्यादि ) साधनांची अशी ( पुढें सांगितल्याप्रमाणें ) उपासना करावी. ज्या सामानें स्तवन करावयाचें असेल त्या सामाचेंच ध्यान ( मनन ) करावें.

**यस्यामृचि तामृचं यदार्षेयं तमृषिं यां देवतामभिष्टो-
ष्यन्स्यात्तां देवतामुपधावेत् ॥ ९ ॥**

**यस्याम् ऋचि अभिष्टोष्यन् स्यात् ताम् ऋचम् (उपधावेत्)। यत् आर्षेयम् तम् ऋषिम् याम् देवताम् ताम् देवताम् उपधावेत्।**

ज्या मंत्रानें ( सामपद्धतीनें ) स्तवन करावयाचें असेल त्या मंत्राचें, जो ( त्या मंत्राचा द्रष्टा ) ऋषि असेल त्या ऋषीचें, जी ( त्या ऋचेची ] देवता असेल त्या देवतेचें ध्यान मनन करावें.

वैदिक वाङ्मयांतील प्रत्येक मंत्रास छंद, ऋषि व देवता असतात. कांहीं मंत्र छंदावांचूनच म्हणजे गद्यात्मक आहेत, त्यांना यजुस् किंवा गाथा असें म्हणतात. ऋग्वेद व सामवेद यांतील मंत्र प्रायः छंदोबद्धच आहेत. त्यांचे ऋषि व देवता याचें ज्ञान असणें अत्यंत अवश्य आहे. मंत्रांचे ऋषि व देवता कोणत्या ह्याचें सूत्रकारांनीं फार परिश्रमपूर्वक संशोधन केलें आहे. छंद, ऋषि व देवता हें मंत्रांचें बहिरंगज्ञान होय. मंत्रांचा अर्थ पूर्णपणें समजणें हेंच त्यांचें अंतरंगज्ञान होय. सामगायन करणाऱ्यानें आपण कोणत्या देवतेचें स्तोत्र गात आहों याचा नीट विचार करून त्या देवतेचें ध्यान करीतच सामगायन केलें पाहिजे असें येथें सांगितलें आहे.

**येन छन्दसा स्तोष्यन्स्यात्तच्छन्द उपधावेद्येन स्तोमेन स्तोष्यमाणः स्यात्तꣳ स्तोममुपधावेत् ॥ १० ॥**

**येन च्छन्दसा स्तोष्यन् स्यात् तत् छन्दः उपधावेत्। येन स्तोमेन स्तोष्यमाणः स्यात् तम् स्तोमम् उपधावेत्।**

ज्या छंदानें ( श्लोकवृत्तानें ) स्तवन करावयाचें असेल त्या छंदाचा विचार म्हणजे मनन करावें. ज्या स्तोमानें ( साममंत्रसमूहानें ) स्तवन करावयाचें असेल त्या स्तोमाचें ध्यान—मनन करावें.

**यां दिशमभिष्टोष्यन्स्यात्तां दिशमुपधावेत् ॥ ११ ॥**

**याम् दिशम् अभिष्टोष्यन् स्यात् ताम् दिशम् उपधावेत्।**

ज्या दिशेचें स्तवन करावयाचें असेल त्या दिशेचें ध्यान मनन करावें.

**आत्मानमन्तत उपसृत्य स्तुवीत कामं ध्यायन्नप्रमत्तोऽभ्याशो ह यदस्मै स कामः समृध्येत यत्कामः स्तुवीतेति यत्कामः स्तुवीतेति ॥ १२ ॥**

**अन्ततः आत्मानम् उपसृत्य स्तुवीत । यत् कामम् ध्यायन् अप्रमत्तः ह यत्कामः स्तुवीत सः कामः अस्मै अभ्याशः समृध्येत ।**

शेवटीं आत्म्याजवळ जाऊन ( एकाग्र होऊन ) वर सांगितलेलें स्तवन करावें. ज्या मनोरथाचें ध्यान करीत असतां सावध (बिन-चूक)पणें (मनुष्य) ज्या मनोरथाचें स्तवन करील, तो मनोरथ त्याला (स्तवन करणाऱ्याला) शीघ्र परिपूर्ण ( फलदायक ) होईल. द्विरुक्ति खण्ड समाप्तिदर्शक आहे.

प्रस्तुत मंत्रांत ' आत्म्याजवळ जाऊन ' असें म्हटलें आहे, त्याचा अर्थ एकाग्र चित्तानें सामगायन करावें असा आहे. ज्या मनोरथाची प्राप्ति होण्याकरितां सामगायन करावयाचें त्या मनोरथाची इच्छा दुर्बळ होऊं देऊं नये. अशा इच्छाशक्तीचा उपयोग मनोरथपूर्तीचे कामीं चांगला होतो. इच्छाशक्ति हें एक महत्त्वाचें साधन आहे, तें दुर्बळ मनाच्या माणसाला लवकर हस्तगत होत नाहीं. म्हणून इतर साधनांबरोबर हें साधनदेखील मनुष्यानें अवश्य संपादन करावें, असें येथें श्रुतीनें सांगितलें आहे.

## तिसऱ्या खंडाचा सारांश.

उद्‌गीथाच्या आधिदैविक उपासनेचें वर्णन या खंडांत झालें आहे. प्रथम आदित्याचें वर्णन करून त्याचें व प्राणाचें साहश्य दाखविलें आहे. पुढें उद्‌गीथरूपानें व्यानाची उपासना करावयास सांगितलें आहे. गायनामध्यें प्राणसामर्थ्याचा व्यानाच्या रूपानेंच उपयोग होत असल्यामुळें, उद्‌गीथो-पासनेंत व्यानाला विशेष महत्त्व येणें स्वाभाविकच आहे. वैदिक कालांत बहुजनसमाज रानटी स्थितींत होता, अशा परिस्थितींत ब्राह्मणधर्माचेंच

स्तोम माजलेलें असून सर्वांच्या डोळ्यांपुढें याज्ञिकी कल्पनाच वावरत होत्या असें कित्येक स्थूलदर्शी इतिहासज्ञांना वाटतें. त्याची ही समजूत कशी अगदींच निराधार आहे, तें या खंडांतील पांचव्या मंत्रावरून चांगलेंच दिसून येईल. या मंत्रांत व्यान सामर्थ्याचीं निदर्शक अशीं तीन उदाहरणें दिलीं आहेत. त्यांतील अग्निमंथनाचें उदाहरण खेरीज करून बाकीचीं दोन उदाहरणें केवळ व्यवहारांतीलच आहेत. ठराविक वेळांत नियमित मर्यादेपर्यंत धांवत जाणें आणि धनुष्य आकर्ण ( कानापर्यंत ) ओढणें हीं तीं दोन उदाहरणें होत. यावरून चढाओढीचे व शरीरसामर्थ्याचे खेळ, धनुर्विद्या इत्यादि गोष्टी लोकांच्या फारच परिचयाच्या होत्या असें निःसंशय सिद्ध होतें. म्हणून यज्ञयागांप्रमाणेंच क्षात्रधर्म, शरीरसामर्थ्य इत्यादि विषयांचा अभ्यास लोकांकडून तत्परतेनें केला जात होता असेंच समजावयास पाहिजे.

सांप्रतकालीं संगीतविद्या फारच अर्थशून्य झाली आहे. मुसलमानी भाषेंतील पद्यें ( चिजा ) गातांना त्यांच्या अर्थाकडे मुळींच लक्ष दिलें जात नाहीं. छांदोग्याच्या काळांत सामगायनांतील अर्थज्ञान असेंच नष्ट होईल कीं काय अशी भीति वाटूं लागली होती. म्हणूनच छंद, ऋषि, देवता इत्यादिकांचें ज्ञान असणें अत्यंत अवश्य आहे, असें या खंडांत प्रतिपादन केलें आहे. छंदःशास्त्रावर छंद या नांवाचाच एक प्राचीन उपग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याचा समावेश वेदांगांत झाला असून इतर उपग्रंथांबरोबर त्याचेंही पठण केलें जातें; परंतु अर्थज्ञानावांचूनच या ग्रंथाचें पठण करण्याची पद्धति सर्वत्र प्रचलित झाल्यामुळें, अष्टाध्यायीसारख्या ग्रंथांच्या नुसत्या पठणानें जसें व्याकरणाचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणेंच छंद ग्रंथांच्या नुसत्या पठणानें छंदांचें—वृत्तांचें ज्ञान व्हावयाचें नाहीं हें उघड आहे. सामगायन करणाऱ्यानें तरी या ग्रंथाचें ज्ञानपूर्वक अध्ययन करावयास पाहिजे. छंद, ऋषि, देवता इत्यादि विषयांचें ज्ञान संपादन करून सामगायन केलें तरच उद्गीथोपासना पूर्ण व फलदायक होते. या इतर साधनां-

बरोबरच मनुष्यानें इच्छाशक्तीची काळजी घेतली पाहिजे, असें इच्छाशक्तीचें महत्त्व दर्शवून श्रुतीनें हें खंड समाप्त केलें आहे.

**अथ चतुर्थः खण्डः ।**

**ओमित्येतदक्षरमुदगीथमुपासीतोमीति ह्युदगायति तस्योपव्याख्यानम् ॥ १ ॥**

**ॐ इति एतत् अक्षरम् उद्गीथम् उपासीत। ॐ इति हि उद्गायति। तस्य उपव्याख्यानम्।**

ॐ ह्या अक्षरस्वरूप उद्गीथाची उपासना करावी. ॐ असें म्हणूनच उद्गाता गायन करितो. त्याचें व्याख्यान ( असें आहे).

प्रारंभीच्या मंत्राचा हा पुनः अनुवाद केला आहे.

**देवा वै मृत्योर्बिभ्यतस्त्रयीं विद्यां प्राविशᳪस्ते छन्दोभिरच्छादयन्यदेभिरच्छादयᳪस्तच्छन्दसां छन्दस्त्वम्॥२॥**

**मृत्योः बिभ्यतः देवाः वै त्रयीम् विद्याम् प्राविशन्। ते छन्दोभिः अच्छादयन्। यत् एभिः अच्छादयन् तत् छन्दसाम् छन्दस्त्वम्।**

मृत्यूपासून भय पावणारे देव ( ऋग्यजुःसाम ) वेद विद्येंत प्रविष्ट झाले. ( विस्मृतीनें नष्ट होऊं लागलेल्या देवतांचा मंत्रांत समावेश करण्यांत आला. ) ते ( देव ) स्वतःला छंदांनीं आच्छादित करिते झाले. ( देवानीं स्वतःला ह्या छंदांनीं आच्छादित केलें.) हेंच त्या छंदांचें छंदत्व होय. (आच्छादित करणारे म्हणून त्यांना ‘ छन्द ’ म्हणावयाचें ).

मुडकोपनिषदाच्या दुसऱ्या खंडाच्या प्रारंभीं असें म्हटलें आहे कीं, प्राचीन मंत्रांत आढळून येणारीं कर्मे वैदिक ऋषींनीं अग्निहोत्रसंस्थेंत समाविष्ट केलीं (उ. नि. र. प्र. मुण्ड. १।२।१ पृ. २० ते २२). मुण्डकांतील हा उल्लेख ऐतिहासिकदृष्टया किती महत्त्वाचा आहे, तें त्या मंत्राच्या विवेचनांत सविस्तर दाखविण्यांत आलेंच आहे. त्याप्रमाणेंच प्रस्तुत मंत्रा-

पासून सुरू झालेली देवताविषयक आख्यायिका ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाची आहे. देव मृत्यूला भ्याल्यामुळें ते वेदविद्येंत शिरले, तेव्हां वैदिक छंदांनी त्यांना आच्छादित केलें—झांकून ठेविलें, असा या मंत्राचा थोडक्यांत अर्थ आहे. ज्याप्रमाणें प्राचीन मंत्रांत वर्णिलेला व्यवहार मागें पडूं लागला, त्याप्रमाणेंच देवताही मागें पडूं लागल्या. महत्त्वाच्या स्थित्यंतराबरोबर देवतादेखील बदलल्या. त्यामुळें प्राचीन कर्मांचें संरक्षण व्हावें, म्हणून तीं कर्में अग्निहोत्रसंस्थेस जोडण्यांत आलीं. त्याप्रमाणेंच प्रत्येक मंत्र देवतेच्या नांवास जोडण्यांत आला. या व्यवस्थेमुळें प्राचीन कर्में व देवता यांचें स्मरण कायम राहिलें. इतिहासाच्या दृष्टीनें वैदिक ऋषींची ही कामगिरी अत्यंत प्रशंसनीय आहे, हें कोणाही इतिहाससंशोधकास कबूल करावें लागेल. प्रत्येक छंदाबरोबर देवता देखील मंत्रांशीं संयुक्त झाल्यामुळें त्यांना आतां विस्मरणरूप नाशाचें भय उरलें नाहीं.

**तानु तत्र मृत्युर्यथा मत्स्यमुदके परिपश्येदेवं पर्यपश्यदृचि साम्नि यजुषि। ते नु विस्त्वोर्ध्वा ऋचः साम्नो यजुषः स्वरमेव प्राविशन् ॥ ३ ॥**

**यथा उदके मत्स्यम् परिपश्येत् एवम् मृत्युः तान् तत्र ऋचि यजुषि साम्नि उ पर्यपश्यत्। ते नु विस्त्वा ऊर्ध्वाः (सन्तः) ऋचः साम्नः यजुषः स्वरम् एव प्राविशन्।**

जसा पाण्यांत मासा दिसावा तसे ते ( देव ) मृत्यूला तथ म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ह्यांत दिसूं लागले. त्या ( देवां) नीं तें ओळखून, वर चढत, ऋग्वेद सामवेद व यजुर्वेद यांचा स्वर म्हणजे मूळ वर्ण जो ॐकार त्यांत प्रवेश केला ( ॐकाराचा आश्रय केला ).

**यदा वा ऋचमाप्नोत्योमित्येवातिस्वरत्येवꣳ सामैवं यजुरेष उ स्वरो यदेतदक्षरमेतदमृतमभयं तत्प्रविश्य देवा अमृता अभया अभवन् ॥ ४ ॥**

**यदा वै ऋचम् आप्नोति ॐ इति एव अतिस्वरति। एवम् साम एवम् यजुः यत् एषः उ स्वरः एतत् अक्षरम् एतत् अमृतम् अभयम् । तत् प्रविश्य देवाः अमृताः अभयाः अभवन् ।**

ज्यावेळीं (कोणी) ऋग्वेद म्हणूं लागतो त्यावेळीं ॐ हाच (प्रथम) उच्चार करितो. त्याचप्रमाणें सामवेद व त्याचप्रमाणें यजुर्वेद (म्हणतांना ॐ हाच प्रथम उच्चार करितो). जो हा ॐकार स्वर आहे तेंच अक्षर, तेंच अमृत व अभय (तत्त्व) होय. त्यांत प्रवेश केल्यानें देव अमृत व अभय झाले.

वेदविद्येंत प्रविष्ट झाल्यावर देखील देव पुरते निर्भय झाले नाहींत, म्हणून त्यांनीं ॐकारांत प्रवेश केला. तेव्हां ते पूर्ण निर्भय झाले, असा या दोन मंत्रांचा अभिप्राय आहे. प्रत्येक मंत्राशीं जसा देवतेचा संबंध असतो, तद्वतच प्रत्येक देवतेचा ॐकाराशीं संबंध आहे असे समजावें. ॐ हें कोणत्याही देवतेचें नांव आहे असें मानण्यास हरकत नाहीं. स्वरूपबोधक किंवा गुणबोधक अशीं देवतांची अनेक नांवें असतात. मात्र तीं भिन्न भिन्न आहेत. उदाहरणार्थ, गजानन हें गणपतीचें स्वरूपबोधक नांव आहे, तें शंकर विष्णु इत्यादि देवताना लावणें अयुक्त आहे. परंतु ॐकाराची गोष्ट तशी नाहीं. ॐकार हा कोणत्याही देवतेचा वाचक किंवा नाममंत्र होऊं शकतो. अशा दृष्टीनें पाहिल्यास ॐकार सर्व-देवताक मंत्र आहे असें ठरतें.

**स य एतदेवं विद्वानक्षरं प्रणौत्येतदेवाक्षरꣳ स्वरममृत-मभयं प्रविशति तत्प्रविश्य यदमृता देवास्तदमृतो भवति ॥ ५ ॥**

**यः एवम् विद्वान् एतत् अक्षरम् प्रणौति सः एतत् एव स्वरम् अमृतम् अभयम् अक्षरम् प्रविशति । तत् प्रविश्य यत् अमृताः देवाः तत् अमृतः भवति।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा (ह्या) अक्षराचें स्तवन (उपासना) करितो, तो स्वररूप,अमृत,अभय अशा अक्षरांत( ॐकारांत ) प्रवेश

करितो. त्यांत प्रवेश केल्यावर जसे देव अमृत झाले तसाच तोही अमृत होतो.

## चवथ्या खंडाचा सारांश.

अवघ्या पांच मंत्रांनींच हें खंड पूर्ण झालें आहे. या खंडाचा पहिला मंत्र व छान्दोग्याचा प्रारंभींचा मंत्र हे दोन्ही एकच आहेत; म्हणूनच त्या मंत्राला अनुवाद असें म्हटलें आहे. प्राचीन देवतांचें स्मरण कायम राहण्याविषयीं वैदिक ऋषींनीं कशी व्यवस्था केली, त्याचा उल्लेख विवरणांत आलाच आहे. वेदविद्येंत प्रविष्ट होऊन देखील देवांचें भय पुरतेंसें नष्ट झालें नाहीं, म्हणून ते ॐकारांत प्रविष्ट झाले, तेव्हां मात्र ते पूर्ण निर्भय झाले, असें तिसऱ्या व चौथ्या मंत्रांत सांगितलें आहे. त्यावरून वेदांपेक्षां देखील ॐकाराचें महत्त्व अधिक आहे, असें श्रुतीनें दर्शविलें आहे. देवतांचा संबंध ॐकाराच्या द्वारानें उपासनामार्गांत आल्यावरच त्या देवता पूर्ण निर्भय झाल्या, हें म्हणणें युक्तिवादाच्या दृष्टीनें देखील योग्यच ठरतें. ॐकाराचें महत्त्व अधिक ठरलें तरी, तेवढ्यावरून वेद कनिष्ठ आहेत, अशी कल्पना करणें योग्य नाहीं. कारण, देवांचा ॐकारांत प्रवेश झाला तरी, तो वेदांतूनच झाला आहे. यावरून उपनिषदांना प्राचीन वैदिक वाङ्मयाचें महत्त्व कमी करावयाचें होतें ही कल्पना फोलच ठरते. ॐकाराची उपासना केली तरी, ती वैदिक उपासनाच आहे. कारण, ॐकार हा देखील वैदिक मंत्र आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद इत्यादिकांशीं ॐकाराचा निकट संबंध आहे. इतर मंत्रांच्या उपासनेपेक्षां ॐ ह्या वैदिक मंत्राची उपासना श्रेष्ठ आहे हें ह्या खंडांत श्रुतीनें दाखविलें आहे.

### अथ पञ्चमः खण्डः ।

**अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथ इत्यसौ वा आदित्य उद्गीथ एष प्रणव ओमिति ह्येष स्वरन्नेति ॥ १ ॥**

**अथ खलु यः उद्गीथः सः प्रणवः यः प्रणवः सः उद्गीथः इति। असौ वै आदित्यः उद्गीथः एषः प्रणवः। एषः ॐ इति स्वरन् एति।**

आतां जो उद्गीथ तोच प्रणव आणि जो प्रणव तोच उद्गीथ होय. (ऋग्वेदांत ज्याला प्रणव म्हणतात त्यालाच छान्दोग्यांत उद्गीथ म्हणतात). हा सूर्य उद्गीथ आहे आणि तोच प्रणव आहे. हा (सूर्य) ॐ असा नाद करीत प्राप्त होतो.

**एतमु एवाहमभ्यगासिषं तस्मान्मम त्वमेकोऽसीति ह कौषीतकिः पुत्रमुवाच रश्मींस्त्वं पर्यावर्तयाद्बहवो वै मे भविष्यन्तीत्यधिदैवतम् ॥ २ ॥**

**अहम् एतम् उ एव अभ्यगासिषम् तस्मात् त्वम् मम एकः( पुत्रः) असि। त्वम् रश्मीन् पर्यावर्तयात् ते बहवः वै भविष्यन्ति । इति कौषीतकिः पुत्रम् उवाच ह। इति अधिदैवतम्।**

मी ह्या आदित्याचेंच स्तवन केलें, म्हणून तूं माझा एक पुत्र झाला आहेस. तूं (सूर्याच्या) किरणाचें वारंवार स्तवन कर (म्हणजे) तुला पुष्कळ पुत्र होतील: असें कोषीताकि ऋषि पुत्राला म्हणाला. हा आधिदैवत (देवताविषयक) विचार होय.

**अथाध्यात्मं य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासीतोमिति ह्येष स्वरन्नेति ॥ ३ ॥**

**अथ अध्यात्मम्। यः अयम् मुख्यः प्राणः तम् एव उद्गीथम् उपासीत। हि एषः ॐ इति स्वरन् एति।**

आता अध्यात्म (आत्मविषयक) विचार सांगतात. जो हा मुख्य प्राण (आहे), त्याची उद्गीथरूपानें उपासना करावी. कारण हा (प्राण) ॐ असा नाद करीत येतो. (प्राणवायु आंत घेतांना ॐ असा नाद होतो.)

**एतमु एवाहमभ्यगासिषं तस्मान्मम त्वमेकोऽसीति ह कौषीतकिः पुत्रमुवाच प्राणांस्त्वं भूमानमभिगायताद्बहवो वै मे भविष्यन्तीति ॥ ४ ॥**

अहम् एतम् उ एव अभ्यगासिषम् तस्मात् त्वम् मम एकः (पुत्रः) असि। मे बहवः भविष्यन्ति इति त्वम् प्राणान् भूमानम् अभिगायतात्। इति कौषीतकिः पुत्रम् उवाच ह।

मी ह्या (मुख्य प्राणा)चें स्तवन केलें म्हणून तूं माझा एक पुत्र झाला आहेस. मला पुष्कळ (पुत्र) व्हावे अशा हेतूनें तूं प्राणांचें व्यापक स्वरूप जाणून स्तवन कर. असें कौषीतकि ऋषि पुत्राला म्हणाला.

**अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथ इति होतृषदनाद्धैवापि दुरुद्गीतमनुसमाहरतीत्यनुसमाहरतीति ॥ ५ ॥**

अथ यः उद्गीथः सः प्रणवः यः प्रणवः सः उद्गीथः खलु इति (होता) होतृषदनात् दुरुद्गीथम् ह एव अपि अनुसमाहरति इति।

आतां, जो उद्गीथ तोच प्रणव (आणि) जो प्रणव तोच उद्गीथ असल्यामुळें, होता आपल्या स्थानावरूनच (उद्गात्याचें) खंडित गायन (ॐकारानेंच) पुढें जोडतो.म्हणजे अखंडित करितो. (द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.)

## पांचव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडातील विषय पूर्वीच्या खंडांत येऊन गेला असल्यामुळें, येथें त्याचें पुनः विवेचन करण्याचे कारण नाहीं, म्हणून मंत्रांचींही विवरणें केलीं नाहींत. कौषीतकी ऋषीनें आपल्या पुत्रास कसा उपदेश केला तें सांगून, पूर्वींच्या विषयास या खंडानें बळकटी आणिली असल्यामुळें, त्यावर पुनरुक्तीचा दोष येत नाहीं. पांचव्या मंत्रांत ॐकाराचा एक विशेष

उपयोग सांगितला आहे, तो असा कीं, यज्ञामध्यें सामगायन करणाऱ्या उद्गात्यानें आपल्या गायनांत जर कांहीं चूक केली (त्याचा स्वर चुकला) तर, होता या नांवाचा ऋत्विज होतृषद्नापासून म्हणजे आपल्या बसावयाच्या जागेवरूनच ( जाग्यावरून न उठतां ) उद्गीथानें ( ॐकारानें ) उद्गात्याचा चुकलेला स्वर जोडून देतो. यावरून उपासनेप्रमाणेंच यज्ञकर्मांत देखील ॐकाराचें कसें अत्यंत महत्त्व आहे तें चांगलेंच दिसून येतें.

अथ षष्ठः खण्डः ।

**इयमेवर्गग्निः साम तदेतदस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयत इयमेव साग्निरमस्तत्साम ॥ १ ॥**

**इयम् ( पृथ्वी ) एव ऋक् अग्निः साम। तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते। इयम् एव सा अग्निः अमः तत् साम।**

ही पृथ्वी हीच ऋचा व अग्नि हेंच साम (होय). तें हें साम ह्या ऋचेवरच अधिष्ठित (असतें). म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. ही (पृथ्वी) हेंच सा (अक्षर) आणि अग्नि हेंच अम (अक्षर) होय. (दोन्ही मिळून) साम (असा शब्द) झाला आहे.

साम हा संयुक्त शब्द असून सा आणि अम असे त्याचे दोन अवयव आहेत. या अवयवांचें निरनिराळ्या तत्त्वांशीं रूपकाच्या पद्धतीनें ऐक्य दर्शविलें आहे. उद्देश हा कीं, पृथिव्यादि तत्त्वांच्या महत्त्वासारखेंच सामाचेंही महत्त्व लक्षांत घेण्याजोगें आहे, ही गोष्ट अभ्यासकाच्या मनांत ठसावी. यापुढील प्रत्येक मंत्रांत पृथ्वी व अग्नि यांसारखीच तत्त्वांची एकेक जोडी घेतली आहे.

**अन्तरिक्षमेवर्ग्वायुः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयतेऽन्तरिक्षमेव सा वायुरमस्तत्साम ॥ २ ॥**

**अन्तरिक्षम् एव ऋक् वायुः साम। तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते । अन्तरिक्षम् एव सा वायुः अमः तत् साम ।**

अन्तरिक्ष (वातावरण) ही ऋचा आणि वायु हें साम होय. तें हें साम ह्या ऋचेवर अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. अन्तरिक्ष हें सा ( अक्षर ) व वायु हें अम (अक्षर) हे दोन्ही (अवयव) मिळून साम हा शब्द झाला आहे.

**द्यौरेवर्गादित्यः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते द्यौरेव सादित्योऽमस्तत्साम ॥३॥**

**द्यौः एव ऋक् आदित्यः साम । तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते । द्यौः एव सा आदित्यः अमः तत् साम ।**

द्यौः (वातावरणापलीकडील आकाश) ही ऋचा व सूर्य हें साम होय. तें हें साम ऋचेवर अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. द्युलोक हा सा रूपी अवयव, आणि सूर्य हा अम रूपी अवयव. ते (दोन्ही मिळून) साम शब्द झाला आहे.

**नक्षत्राण्येवर्क्चन्द्रमाः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते नक्षत्राण्येव सा चन्द्रमा अमस्तत्साम ॥ ४ ॥**

**नक्षत्राणि एव ऋक् चंद्रमाः साम। तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते। नक्षत्राणि एव सा चन्द्रमाः अमः तत् साम-**

नक्षत्रें ही ऋचा आणि चंद्र हें साम होय. तें हें साम ऋचेवर अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जाते. नक्षत्रें हा सा रूपी अवयव व चंद्र हा अम रूपी अवयव. हे दोन्ही मिळून साम हा शब्द झाला आहे.

**अथ यदेतदादित्यस्य शुक्लं भाः सैवर्गथ यन्नीलं परः कृष्णं तत्साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते अथ यदेवैतदादित्यस्य शुक्लं भाः सैव सा यन्नीलं परः कृष्णं तदमस्तत्साम ॥ ५ ॥**

**अथ यद् एतद् आदित्यस्य शुक्लम् भाः सा एव ऋक् अथ यद् परः कृष्णम् नीलम् तत् साम। तत् एतद् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते। अथ यत् एव एतत् आदित्यस्य शुक्लम् भाः सा एव सा अथ यद् परः कृष्णम् नीलम् तत् अमः तद् साम।**

आतां जें हें सूर्याचें शुभ्र तेज तेंच ऋचा आणि जें अत्यंत काळें (म्हणजे) नील (तेज) तें साम होय. तें हें साम ह्या ऋचेवर अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. आतां जें हें सूर्याचें शुभ्र तेज, तेंच सा (अक्षर) आणि जें अत्यंत काळें (म्हणजे) नील (तेज) तें अम (अक्षर) होय. तीं ( दोन्ही मिळून ) साम (शब्द) झाला आहे.

प्रस्तुत मंत्रांत सूर्याच्या निळ्या प्रकाशांचा उल्लेख आला आहे. तो सूर्यबिंबावर जे डाग दिसून येतात त्याचा निदर्शक असावा असें निश्चित अनुमान करण्यास हरकत नाहीं. कारण, सूर्यबिंबाचें प्रत्यक्ष अवलोकन करण्यास उपयोगी पडण्याजोगीं नलिकायंत्रासारखीं कांहीं साधनें उपनिषत्-कालामध्यें देखील ऋषींनीं तयार केलीं होतीं, असें तज्ज्ञांचें मत आहे. म्हणून नील तेजाच्या उल्लेखाविषयीं अव्यवहार्य कल्पना करण्याचें मुळींच कारण नाहीं.

**अथ य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते हिरण्यश्मश्रुर्हिरण्यकेश आप्रणखात्सर्व एव सुवर्णः ॥ ६ ॥**

अथ यः एषः अन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषः दृश्यते (सः) हिरण्यश्मश्रुः हिरण्यकेशः आप्रणखात् सर्वः एव सुवर्णः (अस्ति)।

आतां जो हा सूर्यबिंबांत तेजोमय पुरुष दिसतो तो, ज्याच्या तोंडावरील केस तेजोमय आहेत, ज्याच्या मस्तकावरील केस तेजोमय आहेत, जो नखाग्रापासून सर्व (नखशिखान्त) तेजोरूप आहे, असा आहे.

**तस्य यथा कप्यासं पुण्डरीकमेवमक्षिणी तस्योदिति नाम स एष सर्वेभ्यः पाप्मभ्य उदित उदेति ह वै सर्वेभ्यः पाप्मभ्यो य एवं वेद ॥ ७ ॥**

यथा कप्यासम् पुण्डरीकम् एवम् तस्य अक्षिणी तस्य उत् इति नाम। सः एषः सर्वेभ्यः पाप्मभ्यः उदितः। यः एवम् वेद (सः) ह वै सर्वेभ्यः पाप्मभ्यः उदेति।

जसें आरक्त कमल (असतें) तसे त्याचे नेत्र आहेत. त्याला 'उत्' असें नांव आहे. तो हा (सूर्य) सर्व दोषांहून पलीकडे असतो. जो ह्याप्रमाणें जाणतो तोही सर्व दोषांपासून पलीकडे जातो—म्हणजे निर्दोष होतो.

**तस्यर्क्च साम च गेष्णौ तस्मादुद्गीथस्तस्मात्त्वेवोद्गातैतस्य हि गाता स एष ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्तेषां चेष्टे देवकामानां चेत्यधिदैवतम् ॥ ८ ॥**

तस्य ऋक् च साम च गेष्णौ। तस्मात् उद्गीथः। तस्मात् तु एव उद्गाता हि एतस्य गाता। ये च अमुष्मात् पराञ्चः लोकाः तेषाम् देवकामानाम् च सः एषः ईष्टे। इति अधिदैवतम्।

त्याचे ऋग्वेद व सामवेद हे गायनाचे भाग आहेत, म्हणून (तो) उद्‌गीथ (होय). म्हणूनच तो ऊद्‌गाता म्हणजे उद्‌गीथाचें गायन करणारा असतो. कारण, तो ह्या ( उत् नामक सूर्य देवते )चा गायक असतो. जे ह्या सूर्याहून पलीकडचे ( वरचे ) लोक आहेत त्यांचा आणि देवांच्या मनोरथांचा तोच स्वामी होतो. हा देवताविषयक विचार होय.

## सहाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत सामाचें महत्त्व दर्शविण्याकरितां त्याचें निरनिराळ्या तत्त्वांशीं ऐक्य दाखविलें आहे. मंत्रवाङ्मयांत आदित्य हीच सर्वांत मुख्य देवता मानली आहे. त्याप्रमाणें उपनिषदांनीं देखील आधिदैविक विचारांत व उपासनाशास्त्रांत आदित्यालाच अग्रस्थान दिलें आहे. या खंडांत देखील पुढच्या चारही मंत्रांत आदित्याचेंच वर्णन केलें आहे. अम ही आदित्याचीच संज्ञा-( नांव ) आहे. सर्व ऋचांतून या अमाचीच म्हणजे आदित्याचीच उपासना करावयास सांगितल्यामुळें, ऋचा व अम यांची जोडी वैदिक वाङ्मयांत सुस्थिर झाली आहे. ऋचा हा शब्द स्त्रीलिंगी आहे, म्हणूनच सा हा शब्द तिचा निदर्शक ठरतो. सा+अम मिळून साम हा शब्द तयार झाला आहे. गायनाकरितां किंवा स्तवनाकरितां पद्य म्हणून ऋचा ( सा ) आणि स्तवनीय देवता म्हणून आदित्य ( अम ) या जोडीचा स्वीकार केल्यामुळें गायनात्मक वैदिक भागाला साम हें अन्वर्थक नांव प्राप्त झालें आहे.

साम शब्दांतील या दोन अवयवांचें प्रथम निरनिराळ्या तत्त्वांशीं ऐक्य दाखविलें आहे. त्यांतही सूर्याचा उल्लेख आलाच आहे. पृथ्वी व अग्नि, अन्तरिक्ष आणि वायु, द्युलोक व सूर्य, चंद्र व नक्षत्रें, आणि सूर्याचें शुक्ल व नील तेज अशीं हीं पांच द्वंद्वें-जोड्या आहेत. या सर्वांत आदित्य व ऋचा यांचेंच वर्णन मुख्य आहे. सामाचें हें आधिदैविक ज्ञान संपादन

करून सामगायन करणारा उद्गाता सर्वांचे मनोरथ पूर्ण करणारा होतो असें फल सांगून श्रुतीनें हें खंड समाप्त केलें आहे.

**अथ सप्तमः खण्डः ।**

**अथाध्यात्मं वागेवर्क्प्राणः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते । वागेव सा प्राणोऽमस्तत्साम ॥ १ ॥**

**अथ अध्यात्मम् । वाक् एव ऋक् प्राणः साम । तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम् । तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते । वाक् एव सा प्राणः अमः तत् साम ।**

आतां आत्मविषयक विचार (सांगतात). ( येथें देखील सा व अम या अवयवांचें पूर्वींप्रमाणेंच वर्णन केलें आहे). वाणी हीच ऋचा व प्राण हें साम होय. तें हें साम या ऋचेवरच अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवरच अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. वाणी हाच सा (अवयव) आणि प्राण हा अम (अवयव). ते (दोन्ही मिळून) साम शब्द झाला आहे.

**चक्षुरेवर्गात्मा साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते । चक्षुरेव सात्मामस्तत्साम ॥ २ ॥**

**चक्षुः एव ऋक् आत्मा साम । तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम् । तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते । चक्षुः एव सा आत्मा अमः तत् साम ।**

नेत्र हीच ऋचा व आत्मा म्हणजे जीवात्मा हें साम होय. हें साम ह्या ऋचेवरच अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. नेत्र हाच सा अवयव असून आत्मा हाच अम होय. या दोन ( अवयवां ) नीं हा साम शब्द झाला आहे.

**श्रोत्रमेवर्ङ्मनः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते । श्रोत्रमेव सा मनोऽमस्तत्साम ॥ ३ ॥**

**श्रोत्रम् एव ऋक् मनः साम। तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते। श्रोत्रम् एव सा मनः अमः तत् साम।**

कान हीच ऋच। व मन हेंच साम होय. तें हें साम ह्या ऋचेवरच अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. श्रवण हाच सा अवयव असून मन हाच अम होय. ह्या ( दोन अवयवां ) नीं हा साम ( शब्द झाला आहे.

**अथ यदेतदक्ष्णः शुक्लं भाः सैवर्गथ यन्नीलं परः कृष्णं तत्साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते । अथ यदेवैतदक्ष्णः शुक्लं भाः सैव साथ यन्नीलं परः कृष्णं तदमस्तत्साम ॥ ४ ॥**

**अथ यत् एतत् अक्ष्णः शुक्लम् भाः सा एव ऋक् अथ यत् परः कृष्णम् नीलम् तत् साम। तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढम्। तस्मात् ऋचि अध्यूढम् साम गीयते। अथ यत् एव एतत् अक्ष्णः शुक्लम् भाः सा एव सा अथ यत् परः कृष्णम् नीलम् तत् अमः तत् साम।**

आतां जी नेत्रांतील शुभ्र कांति असते तीच ऋचा आणि जी अतिशय काळी म्हणजे नील कांति तेंच साम होय. तें हें साम ह्या ऋचेवर अधिष्ठित असतें. म्हणून ऋचेवर अधिष्ठित असलेलें साम गायिलें जातें. आतां जी डोळ्याची शुभ्र कांति तीच सा अवयव आहे आणि जी अतिशय काळी म्हणजे नील कांति तोच अम अवयव होय. या ( दोन अवयवां )नीं हा 'साम' शब्द झाला आहे.

**अथ य एषोऽन्तरक्षिणि पुरुषो दृश्यते सैवर्क्तत्साम तदुक्थं तद्यजुस्तद्ब्रह्म तस्यैतस्य तदेव रूपं यदमुष्य रूपं यावमुष्य गेष्णौ तौ गेष्णौ यन्नाम तन्नाम ॥ ५ ॥**

**अथ यः एषः अन्तरक्षिणि पुरुषः दृश्यते सा एव ऋक् तत् साम। तत् उक्थम् तत् यजुः तत् ब्रह्म। यत् अमुष्य रूपम् तत् एव तस्य एतस्य रूपम्। यौ अमुष्य गेष्णौ तौ गेष्णौ यत् नाम तत् नाम्।**

आतां जो हा डोळ्याच्या अंतर्भागांत पुरुष दिसतो तीच ऋचा होय व तेंच साम होय. तेंच उक्थ म्हणजे साम स्तोत्र, तोच यजुर्वेद व तोच ब्रह्म ( आत्मा ) होय. जें त्याचें ( सूर्यमंडलस्थ पुरुषाचें ) रूप तेंच ( तसेंच ) ह्याचें ( नेत्रस्थ पुरुषाचें ) रूप होय. त्याचे जे गायनभाग तेच ह्याचे. त्याचें जें नांव तेंच ह्याचें नांव होय.

**स एष ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्तेषां चेष्टे मनुष्यकामानां चेति तद्य इमे वीणायां गायन्त्येतं ते गायन्ति तस्मात्ते धनसनयः ॥ ६ ॥**

**ये च एतस्मात् अर्वाञ्चः लोकाः तेषाम् मनुष्यकामानाम् च सः एषः ईष्टे। तत् ये इमे वीणायाम् इति गायन्ति ते एतम् गायन्ति तस्मात् ते धनसनयः (भवन्ति)।**

जे ह्या ( नेत्रस्थ पुरुषाहून ) खालचे लोक म्हणजे स्थानें आहेत. त्या स्थानांचा व मानवी मनोरथांचा तोच स्वामी होतो. म्हणून जे कोणी वीणेवर ( वीणेच्या साहाय्यानें ) असें ( वर सांगितलेल्या विषयांचें ) गायन करितात,ते त्याचेंच ( आत्म्याचेंच ) गायन करितात. म्हणून ते धनसंपन्न होतात.

**अथ य एतदेवं विद्वान्साम गायत्युभौ स गायति सोऽमुनैव स एष ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्ताँश्चाप्नोति देवकामाँश्च ॥ ७ ॥**

**अथ यः एवम् विद्वान् एतत् साम गायति सः उभौ गायति। सः अमुना एव सः ( भवति )। ये च अमुष्मात् पराञ्चः लोकाः तान् च देवकामान् च एषः आप्नोति।**

आतां, जो हें सर्व जाणणारा, हें साम गायन करितो, तो दोघांचेंही ( आत्मा व आदित्य यांचें ) गायन करितो. तो ह्या

गायनानेंच तो म्हणजे आदित्यरूप होतो. जे ह्याहून पलीकडचे लोक आहेत ते व देवतांचे मनोरथ त्याला प्राप्त होतात.

**अथानेनैव ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्ताꣳश्चाप्नोति मनुष्यकामाꣳश्च तस्मादु हैवंविदुद्गाता ब्रूयात् ॥ ८ ॥**

**अथ ये च एतस्मात् अर्वाञ्चः लोकाः तान् च मनुष्यकामान् च अनेन एव आप्नोति । तस्मात् उ ह एवम् वित् उद्गाता ब्रूयात् ।**

आतां जीं ह्या सूर्यमंडळाच्या खालचीं स्थानें आहेत तीं व मानवी मनोरथ ह्यानेंच ( ज्ञानपूर्वक सामगायनानेंच )प्राप्त होतात. म्हणून ह्याप्रमाणें जाणणाऱ्या सामगायकानें ( यजमानाला ) म्हणावें.

**कं ते काममागायानीत्येष ह्येव कामगानस्येष्टे य एवं विद्वान्साम गायति साम गायति ॥ ९ ॥**

**ते कम् कामम् आगायानि इति हि यः एवम् विद्वान् साम गायति एषः एव कामगानस्य ईष्टे ।**

कीं, तुझ्या कोणत्या मनोरथाकरितां मी गायन करावें ? कारण जो असें जाणणारा सामगायन करितो, तोच मनोरथांच्या गायनाचा स्वामी असतो ( तोच इच्छित मनोरथाकरितां गायन करण्यास समर्थ असतो. ) द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.

## सातव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत साम शब्दांतील सा आणि अम या अवयवांचें ऋचा व तिची देवता या अर्थानें आध्यात्मिक वर्णन करण्यांत आलें आहे. त्यांतही शरीरांतील इंद्रियांचीं ( अवयवांचीं ) पांच द्वंद्वें ( जोड्या ) सांगितलीं आहेत. सा व अम या अवयवांचे अर्थ मागील खंडाच्या सारांशांत दिले आहेत तेच समजावे. सहाव्या मंत्रांत वीणेच्या सहाय्यानें होणाऱ्या गाय-

नाचा स्पष्ट उल्लेख करण्यांत आला आहे. संगीताच्या इतिहासांत त्याचें महत्त्व विशेष आहे. श्रौतधर्मांतील यज्ञयागांच्या प्रक्रियेमध्यें गायनाचा व क्वचित् अवांतर वाद्यांचा देखील उल्लेख येतो, तसाच वीणेचा उल्लेख वादनाकरितां म्हणून आढळतो; परंतु वीणायुक्त गायनाचा उल्लेख फारसा कोठें आढळत नाही. येथें तो स्पष्ट उल्लेख असून त्याच्या फलाचाही निर्देश केला आहे. गायन करावयाचें तें अर्थज्ञानपूर्वकच असल पाहिजे, अशा-विषयीं श्रुतीचा विशेष कटाक्ष आहे. गायनांतील अर्थाकडे गायकानें विशेष लक्ष दिल्यास तो(अर्थ) चांगलाच परिणामकारक होतो. स्वरसौंदर्याच्या योगानें एकाग्र झालेल्या मनावर अर्थाचा चागला ठसा उमटतो. म्हणून गाणा-ऱ्यानें पद्यांच्या अर्थाचा चांगला अभ्यास करावयास पाहिजे, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. सामगायनांतील अर्थ ब्रह्मज्ञानपर असतो. त्यांत आधि-भौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक विषयांचें वर्णन येतें. त्यांचें नीट अध्ययन केलेला मनुष्य जर सामगायन करील, तर तो आपले व दुसऱ्याचे ( यजमानाचे ) सर्व मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ होईल, असें सामगाय-नाचें फल सांगून श्रुतीनें हें खंड समाप्त केलें आहे.

### अथाष्टमः खण्डः ।

**त्रयो होद्गीथे कुशला बभूवुः शिलकः शालावत्यश्चै-कितायनो दाल्भ्यः प्रवाहणो जैवलिरिति ते होचुरुद्गीथे वै कुशलाः स्मो हन्तोद्गीथे कथां वदाम इति ॥ १ ॥**

**शालावत्यः शिलकः दाल्भ्यः चैकितायनः जैवलिः प्रवाहणः त्रयः हे उद्गीथ कुशलाः बभूवुः । ते ह ऊचुः उद्गीथे वै कुशलाः स्मः हन्त उद्गीथे कथाम् वदामः इति ।**

शलावत्याचा पुत्र शिलक, दल्भ गोत्रांतला चिकितायनाचा पुत्र आणि जीवलाचा पुत्र प्रवाहण हे तिघे उद्गीथ विद्येंत कुशल होते. ते म्हणाले, आम्ही उद्गीथ विद्येंत कुशल आहों; आपण उद्गीथाविषयीं संभाषण—चर्चा करूं या.

उद्गीथोपासनेविषयींच्या एका आख्यायिकेस या मंत्रापासून प्रारंभ होत आहे. बकदाल्भ्याचा उल्लेख पूर्वीच्या एका खंडांत आलाच आहे. त्यांत दाल्भ्य वंशातीलच हा चैकितायन असावा. चैकितायनेय असें एक नामाभिधान बृहदारण्यकांत आलें आहे. (उ. र. प्र. बृह. अ. १ ब्रा. ३ मं. २४ पृ. ४९). तसेंच बृहदारण्यकाच्या सहाव्या अध्यायांत पंचाग्निविद्येचा उपदेश करणाऱ्या प्रवाहण राजाचें नांव या तिघांत आहे. हे तिघेही उद्गीथ गायनांत (सामगायनांत) निष्णात असल्यामुळें, सामगायनाविषयीं चर्चा करण्यास ते पूर्ण अधिकारी होते.

**तथेति ह समुपविविशुः स ह प्रवाहणो जैवलिरुवाच भगवन्तावग्रे वदतां ब्राह्मणयोर्वदतोर्वाचꣳ श्रोष्यामीति ॥२॥**

**तथा इति ह समुपविविशुः । सः प्रवाहणः जैवलिः उवाच ह। भगवन्तौ अग्रे वदताम् ब्राह्मणयोः वदतोः वाचम् श्रोष्यामि इति ।**

ठीक आहे असें म्हणून ते एकत्र बसले. (तेव्हां) प्रवाहण जैवलि म्हणाला कीं, तुम्ही दोघे प्रथम संभाषण करा. तुम्हां ब्राह्मणांचा संवाद मी (क्षत्रिय) ऐकत बसेन.

**स ह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाच हन्त त्वा पृच्छानीति पृच्छेति होवाच ॥ ३ ॥**

**सः शालावत्यः शिलकः चैकितायनम् दाल्भ्यम् उवाच ह । हन्त त्वा पृच्छानि इति। पृच्छ इति उवाच ह।**

(त्या दोघांपैकीं) शालावत्य शिलक चैकितायन दाल्भ्याला म्हणाला कीं, मी तुला प्रश्न विचारूं कां? (तेव्हां) विचार असें तो (दाल्भ्य) म्हणाला.

**का साम्नो गतिरिति स्वर इति होवाच स्वरस्य का गतिरिति प्राण इति होवाच प्राणस्य का गतिरित्यन्नमिति होवाचान्नस्य का गतिरित्याप इति होवाच ॥ ४ ॥**

**अपां का गतिरित्यसौ लोक इति होवाचामुष्य लोकस्य का गतिरिति न स्वर्गं लोकमतिनयेदिति होवाच स्वर्गं वयं लोकँ सामाभिसंस्थापयामः स्वर्गसँस्तावँ हि सामेति ॥ ५ ॥**

**साम्नः का गतिः इति। स्वरः इति उवाच ह। स्वरस्य का गतिः इति। प्राणः इति उवाच ह। प्राणस्य का गतिः इति। अन्नम् इति उवाच ह। अन्नस्य का गतिः इति। आपः इति उवाच ह। अपाम् का गतिः इति। असौ लोकः इति उवाच ह। अमुष्य लोकस्य का गतिः इति। न स्वर्गम् लोकम् अतिनयेत् इति उवाच ह। वयम् साम स्वर्गम् अभिसंस्थापयामः हि साम स्वर्गसंस्तावम् इति।**

शिलकाचा प्रश्नः—सामाचें अधिष्ठान कोणतें? ॐकार असें दाल्भ्यानें उत्तर दिलें. प्रश्नः—ॐकाराचें अधिष्ठान कोणतें? उत्तरः—प्राण. प्रश्नः—प्राणाचें अधिष्ठान कोणतें? उत्तरः—अन्न. प्रश्नः—अन्नाचें अधिष्ठान कोणतें? उत्तरः—पाणी. प्रश्नः—पाण्याचें अधिष्ठान कोणतें?उत्तरः--तो स्वर्ग लोक. प्रश्नः—स्वर्गलोकाचें अधिष्ठान कोणतें? दाल्भ्य म्हणालाः—प्रश्नाची मर्यादा स्वर्गलोकाच्या पलीकडे नेऊं नये. आम्ही सामगायन स्वर्गलोकावरच संस्थापित करितों.कारण स्वर्गाची स्तुति करणारा साम(सामवेद)आहे.

**तँ ह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाचाप्रतिष्ठितं वै किल ते दाल्भ्य साम यस्त्वेतर्हि ब्रूयान्मूर्धा ते विपतिष्यतीति मूर्धा ते विपतेदिति ॥ ६ ॥**

**शालावत्यः शिलकः तम् चैकितायनम् दाल्भ्यम् उवाच। दाल्भ्य ते साम वै अप्रतिष्ठितम् किल। यः तु एतर्हि ब्रूयात् ते (तस्य) मूर्धा विपतिष्यति इति। ते मूर्धा विपतेत् इति।**

शालावत्य शिलक त्या चैकितायन दाल्भ्याला म्हणाला—हे दाल्भ्या! तुझें हें साम निराधार आहे. जो असें ह्मणेल (अप्रति-

ष्ठित साम प्रतिपादन करील ) त्याचें मस्तक पतन पावेल ( बुद्धि नष्ट होईल ). ( त्याप्रमाणें ) तुझीही बुद्धि नष्ट होईल.

**हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाचामुष्य लोकस्य का गतिरित्ययं लोक इति होवाचास्य लोकस्य का गतिरिति न प्रतिष्ठां लोकमतिनयेदिति होवाच प्रतिष्ठां वयं लोकꣳ सामाभिसꣳस्थापयामः , प्रतिष्ठासꣳस्तावꣳ हि सामेति ॥ ७ ॥**

**हन्त अहम् भगवतः एतत् वेदानि इति। विद्धि इति उवाच ह। अमुष्य लोकस्य का गतिः इति। अयम् लोकः इति उवाच ह। अस्य लोकस्य का गतिः इति। प्रतिष्ठाम् लोकम् न अतिनयेत् इति उवाच ह । वयम् साम प्रतिष्ठाम् लोकम् अभिसंस्थापयामः। हि प्रतिष्ठासंस्तावम् साम इति।**

( शालावत्य शिलकाला दाल्भ्य म्हणाला )—आतां मी तुमच्यापासून हें समजून घेतों. ( शिलक म्हणाला )—समजून घे. ह्या स्वर्गलोकाचें अधिष्ठान कोणतें,असें ( दाल्भ्यानें विचारल्यावर ) हा (इह) लोक असें तो (शिलक) म्हणाला. ह्या इह लोकाचें अधिष्ठान कोणतें. असें विचारतां, ह्या आधारभूत इह लोकाच्या पलीकडे सामाची मर्यादा नेऊं नये असें ( शिलक) म्हणाला. आम्ही ह्या आधारभूत इह लोकावरच साम संस्थापित करितों. कारण साम हें इहलोकाचेंच स्तावक आहे.

**तꣳ ह प्रवाहणो जैवलिरुवाचान्तवद्वै किल ते शालावत्य साम यस्त्वेतर्हि ब्रूयान्मूर्धा ते विपतिष्यतीति मूर्धा ते विपतेदिति हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाच ॥ ८ ॥**

**तम् प्रवाहणः जैवलिः उवाच ह शालावत्य। ते साम वै अन्तवत् किल। यः तु एतर्हि ब्रूयात् ते मूर्धा विपतिष्यति इति। ते मूर्धा विपतेत् इति। हन्त अहम् एतत् भगवतः वेदानि इति। विद्धि इति उवाच ह।**

त्याला ( शालावत्याला ) प्रवाहण जैवलि म्हणाला:—हे शाला-वत्या, तुझें साम निराधार आहे. जो असें म्हणेल त्याचें मस्तक पतन पावेल ( बुद्धि नष्ट होईल ). ( त्याप्रमाणें ) तुझीही बुद्धि नष्ट होईल. ( तेव्हां शालावत्य त्या जैवलीला म्हणाला—) तर मग मी हें तुझ्यापासून समजून घेतों. ( जैवलि म्हणाला )—समजून घे.

## आठव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत शिलक इत्यादि तिघांचा सामगायनाविषयीं संवाद चालू आहे. या तिघांपैकीं दोघे ब्राह्मण असून, एक क्षत्रिय आहे. या तिघांचा संवाद कोठें झाला त्या स्थळाचा निर्देश येथें मुळींच आलेला नाहीं. सामगायनाचें ध्येय काय असावें, हा या संवादांतील मुख्य विषय आहे. सामगायनाला ॐकार हा आधार, ॐकाराला प्राण, प्राणाला अन्न, अन्नाला आधार आप आणि आपाला आधार स्वर्गलोक, अशी परंपरा सांगून स्वर्गप्राप्ति हेंच सामगायनाचें ध्येय आहे, असें दाल्भ्यानें प्रतिपादन केलें आहे. दाल्भ्याचें हें ध्येय शालावत्याला नाकबूल होतें. म्हणून त्याचें साम अप्रतिष्ठित आहे, अशा अप्रतिष्ठित सामाची कल्पना करणाऱ्या मनुष्याचा बुद्धिभ्रंश झाला असला पाहिजे, असा शालावत्यानें चैकितायनाला दोष दिला; तेव्हां तू सामाची प्रतिष्ठा कोणती मानतोस ती मला समजून दे, असें दाल्भ्यानें विचारल्यावर, शालावत्यानें इहलोक हीच आपल्या सामगायनाची प्रतिष्ठा होय, असें सांगितलें. इहलोक हेंच स्वर्गलोकाचें अधिष्ठान आहे, असें शालावत्याचें मत होतें. त्यावरून स्वर्ग म्हणजे मरणानंतरच प्राप्त होणारी परिस्थिति अशी कल्पना येथें अभिप्रेत नाहीं. स्वर्गलोक व इहलोक हीं दोन्ही उत्कर्षाचींच अंगें होत. शालावत्याला स्वर्गीय उत्कर्षापेक्षां ऐहिक उत्कर्षच महत्त्वाचा वाटत होता व त्याची कल्पना दाल्भ्याच्या कल्पनेपेक्षां श्रेष्ठ प्रतीची होती, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. म्हणून

दाल्भ्याचा स्वर्गीय उत्कर्ष आणि शालावत्याचा ऐहिक उत्कर्ष या दोन्ही कल्पनांचा किंचित् सूक्ष्म विचार करावयास पाहिजे, तरच श्रुतीचा अभिप्राय सयुक्तिक कसा आहे तें नीट लक्षांत येईल. दाल्भ्याची स्वर्गीय सुखाची कल्पना वैयक्तिक स्वरूपाची आहे; आणि शालावत्याची इहलोकाविषयींची कल्पना सामाजिक स्वरूपाची आहे; असेंच अनुमान करणें भाग आहे. त्याशिवाय ' अमुष्य लोकस्य का गतिः ' या दाल्भ्याच्या प्रश्नास ' अयं लोकः ' असें जें शालावत्यानें उत्तर दिलें आहे, तें योग्य ठरणार नाहीं; आणि श्रुतीनें तर शालावत्याचें उत्तर बरोबर असल्याचें दर्शविलें आहे. वैयक्तिक सुखाच्या परमावधीचा स्वर्ग शब्दानें निर्देश करण्याची पद्धति श्रुतिसंमतच आहे. ज्या स्वर्गापेक्षां शालावत्य ऋषि ऐहिक उत्कर्षाला महत्त्व देत आहे, तो सामाजिक स्वरूपाचा असला पाहिजे असें मानणें भागच पडतें. हें जरी अनुमान असलें तथापि, तें श्रुतितात्पर्याचें निदर्शक आहे.

दाल्भ्यापेक्षां ध्येयाचे बाबतींत शालावत्य एक पाऊल पुढें गेला असला तरी,त्याचें ध्येय अपुरेंच आहे, असें प्रवाहण जैवळीचें म्हणणें आहे. कारण वैयक्तिक वा सामाजिक उत्कर्ष हेंच काय तें मानवी जीविताचें अंतिम साध्य होय असें समजणें बरोबर नाहीं. या उत्कर्षाचा ध्येयकोटींत समावेश होत असला तरी, तेवढ्यानें ध्येयाची पूर्तता होत नाहीं, असें दर्शविण्याचा प्रवाहण राजाचा उद्देश आहे. शालावत्यानें दाल्भ्याला ज्याप्रमाणें टोमणा दिला होता, तसाच टोमणा प्रवाहणानें शालावत्यालाही दिला आहे. प्रवाहणाचें प्रास्ताविक भाषण होऊनच हें खंड समाप्त झालें आहे.

**अथ नवमः खण्डः ।**

**अस्य लोकस्य का गतिरित्याकाश इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्याकाशादेव समुत्पद्यन्त आकाशं प्रत्यस्तं यन्त्याकाशो ह्येवैभ्यो ज्यायानाकाशः परायणम् ॥ १ ॥**

**अस्य लोकस्य का गतिः इति। आकाशः इति उवाच ह। इमानि सर्वाणि भूतानि आकाशात् एव समुत्पद्यन्ते वै। आकाशम् प्रति अस्तम् यन्ति। आकाशः एव हि एभ्यः ज्यायान् आकाशः परायणम्।**

( शिलक म्हणाला—) ह्या भूलोकाचें अधिष्ठान कोणतें? (जैवलि म्हणाला—) आकाश (होय). हे सर्व सृष्ट पदार्थ आकाशापासूनच उत्पन्न होतात व आकाशांतच अस्तंगत (लीन) होतात. आकाश हें त्यांच्यापेक्षां मोठें (व्यापक) आहे. आकाश हेंच सर्वांचें अधिष्ठान होय.

**स एष परोवरीयानुद्गीथः स एषोऽनन्तः परोवरीयो हास्य भवति परोवरीयसो ह लोकाञ्जयति य एतदेवं विद्वान्परोवरीयांसमुद्गीथमुपास्ते ॥ २ ॥**

**सः एषः उद्गीथः परोवरीयान्। यः एवम् विद्वान् एतत् परोवरीयांसम् उद्गीथम् उपास्ते सः एषः अनन्तः परोवरीयः भवति ह अस्य परोवरीयसः लोकान् जयति ह।**

तो हा उद्गीथ ( सर्वाधार ) व सर्वश्रेष्ठ आहे. जो असें जाणणारा त्या सर्वाधार व सर्वश्रेष्ठ उद्गीथाची उपासना करितो, तो अनन्त, सर्वाधार व सर्वश्रेष्ठ होतो; आणि ह्या ( उद्गीथा ) च्या सर्वश्रेष्ठ व सर्वाधार लोकांना प्राप्त करून घेतो.

प्रस्तुत मंत्रांत प्रवाहणानें आकाशाचें वर्णन केलें आहे. हें आकाश म्हणजे सृष्टीचें मूळकारण होय असें समजावें. सृष्टीच्या पूर्वी शुद्ध ब्रह्मतत्त्वामध्यें जें सगुणरूप प्रगट झालें,त्यालाच रयि प्राणांचें मिथुन, प्रकृतियुक्त पुरुष, परमेश्वर, हिरण्यगर्भ इत्यादि नांवें दिलीं जातात. याच तत्त्वाला अनुलक्षून प्रवाहणानें या मंत्रांत आकाश या संज्ञेचा उपयोग केला आहे. त्याला जरी आकाश असें म्हटलें असलें तथापि, तें भौतिक आकाश या अर्थानें नव्हे. मूल प्रकृति किंवा मूल कारण अशा अभिप्रायानेंच त्या संज्ञेचा उपयोग

केला आहे असें आकाशाला दिलेल्या 'परोवरीयस्' या विशेषणावरून सिद्ध होतें. परोवरीयस् हा एक संयुक्त शब्द आहे. परः आणि वरीयस् असा त्याचा पदच्छेद होईल. अत्यंत श्रेष्ठ अशा अर्थानेंच हा सयुक्त शब्द वैदिक वाङ्मयांत येतो.

**तꣳ हैतमतिधन्वा शौनक उदरशाण्डिल्यायोक्त्वोवाच यावत्त एनं प्रजायामुद्गीथं वेदिष्यन्ते परोवरीयो हैभ्यस्तावदस्मिँल्लोके जीवनं भविष्यति ॥ ३ ॥**

**शौनकः अतिधन्वा तम् एतम् (उद्गीथम्) उदरशाण्डिल्याय उक्त्वा उवाच ह। यावत् ते प्रजायाम् एनम् उद्गीथम् वेदिष्यन्ते तावत् ह अस्मिन् लोके एभ्यः जीवनम् परोवरीयः भविष्यति।**

शुनकाचा पुत्र अतिधन्वा, तो हा उद्गीथ, उदरशाण्डिल्याला सांगून (शिकवून) म्हणाला--तुझ्या संततींत जोंपर्यंत ह्या उद्गीथाचें ज्ञान राहील तोंपर्यंत ह्या लोकीं त्यांचें जीवन परमश्रेष्ठ होईल. (लोकांत त्यांची योग्यता अत्यंत श्रेष्ठ राहील).

**तथामुष्मिँल्लोके लोक इति स य एतमेवं विद्वानुपास्ते परोवरीय एव हास्यास्मिँल्लोके जीवनं भवति तथामुष्मिँल्लोके लोक इति लोके लोक इति ॥ ४ ॥**

**तथा अमुष्मिन् लोके लोकः इति। यः सः एवम् विद्वान् एतत् उपास्ते अस्य अस्मिन् लोके तथा अमुष्मिन् लोके लोकः इति परोवरीयः एव जीवनम् भवति इति ह।**

त्याचप्रमाणें परलोकीं श्रेष्ठस्थान मिळेल. जो कोणी असें जाणणारा ह्या उद्गीथाची उपासना करितो त्याचें ह्या लोकीं आणि परलोकींही श्रेष्ठ स्थान व सर्वोत्तम जीवन होतें. द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.

## ९ व्या खंडाचा सारांश.

प्रवाहण जैवलीनें आणखी एका तत्त्वाची भर घालून शालावत्याच्या ध्येयकल्पनेची पूर्तता केली आहे. सर्वश्रेष्ठ असें सृष्टीचें आदिकारण हेंच तें

तत्त्व होय. मानवी जीविताचें ध्येय नुसतें व्यावहारिक नाहीं. परमार्थावांचून त्याची पूर्तता व्हावयाची नाहीं. म्हणूनच, आकाशरूपी परमेश्वरी तत्त्वाचें ध्येय सामगायनांत असल्यावांचून तें सामगायन सुप्रतिष्ठित होत नाहीं, असें प्रवाहणाच्या भाषणाच्या द्वारानें श्रुतीनें सिद्ध केलें आहे. व्यावहारिक व पारमार्थिक अशा दोनही अंगांनीं ध्येयनिश्चय करून सामगायनाच्या रूपानें मनुष्यानें उद्गीथाची उपासना केली तर, त्याचें जीवन ऐहिक व पारमार्थिक अशा दोनही मार्गांनीं 'परोवरीयस्' म्हणजे अत्यंत श्रेष्ठ होतें. याप्रमाणें सुप्रतिष्ठित अशा सामगायनाचें फल सांगून हें खंड समाप्त झालें आहे. आठव्या खंडांत सुरू झालेली आख्यायिका येथें समाप्त झाली आहे.

**अथ दशमः खण्डः।**

**मटचीहतेषु कुरुष्वाटिक्या सह जाययोषस्तिर्ह चाक्रायण इभ्यग्रामे प्रद्राणक उवास ॥ १ ॥**

**कुरुषु मटचीहतेषु आटिक्या जायया सह चाक्रायणः उषस्तिः इभ्यग्रामे प्रद्राणकः ( सन् ) उवास ह।**

कुरुदेश टोळधाडीनें ग्रस्त झाला असतां, आपल्या आटिकी नांवाच्या पत्नीसह चक्राचा पुत्र उषस्ति अति दरिद्री ( बुभुक्षित ) असा ब्राह्मण इभ्याच्या गांवीं येऊन राहिला.

चाक्रायणाचें नांव बृहदारण्यकांतही आलें आहे. तेथें 'उपस्त' असा शब्द आला असून येथें 'उषस्ति' असा शब्द आहे. या शाब्दिक भेदावरून व्यक्ति भिन्न आहे असें समजण्याचें कारण नाहीं. जनक राजाच्या सभेंत पुष्कळ विद्वान पंडिताचा याज्ञवल्क्य ऋषीबरोबर जो वादविवाद झाला त्यांत चाक्रायणानें भाग घेतला आहे. त्यावरून उषस्ति चाक्रायण हा एक ब्रह्मवेत्त्यांपैकीं ऋषि होता. तो कुरु देशांत रहात असून, आटिकी नांवाची त्याची बायको होती. चाक्रायणाच्या बायकोचें हें नांव आर्य भाषेंतील किंवा ब्राह्मण क्षत्रियांच्या वळणाचें दिसत नाहीं. म्हणूनच कीं काय कोण जाणे, भ्रमण करण्याला समर्थ—काटक—असा तिच्या नांवाचा अर्थ कित्येक टीका-

कारांनीं केला आहे. चाक्रायण कुरुदेशात रहात होता. टोळधाडीमुळें कुरु देशांत भयंकर दुष्काळ पडला. पोट भरण्यास फारच अडचण पडूं लागली. म्हणून चाक्रायणानें स्थलांतर करून इभ्य ग्रामांत वास्तव्य केलें. तेथेंही त्याच्या पोटाचे हाल होतच होते.

**स हेभ्यं कुल्माषान्खादन्तं बिभिक्षे तꣳ होवाच । नेतोऽन्ये विद्यन्ते यच्च ये म इम उपनिहिता इति ॥ २ ॥**

**सः कुल्माषान् खादन्तम् इभ्यम् बिभिक्षे ह । तम् उवाच ह ये यत् च इमे उपनिहिताः इतः अन्ये न विद्यन्ते इति ।**

तो (उषस्ति), हुलगे खात बसलेल्या इभ्याजवळ ते मागूं लागला. तेव्हां त्याला तो (इभ्य) म्हणाला कीं, जे आणि जेवढे हे माझ्यासमोर आहेत त्यांशिवाय दुसरे मजजवळ नाहींत.

इभ्य ग्रामांत आल्यावर देखील चाक्रायणाच्या पोटाचे हाल मुळींच कमी झाले नाहींत. इभ्यग्रामांतीलच एक मनुष्य हुलगे खात बसलेला त्यानें पाहिला. 'कुल्माष' या शब्दाचा अर्थ उडीद असाही कित्येकांनीं केला आहे. माष शब्दाच्या साहचर्यानें तो अर्थ देखील स्वीकारण्यास हरकत नाहीं. चाक्रायणानें त्याच्या जवळचे हुलगे स्वतःला खावयास मागितले त्यावर इभ्य म्हणाला कीं, माझ्या जवळ आणखी हुलगे नाहींत, माझ्या पानांत आहेत येवढेच. व हे तर उष्टे झालेले आहेत. करितां तुमच्यासारख्या ब्राह्मणांनीं ते खाण्यासारखे नाहींत.

**एतेषां मे देहीति होवाच तानस्मै प्रददौ हन्तानुपानमित्युच्छिष्टं वै मे पीतꣳ स्यादिति होवाच ॥ ३ ॥**

**एतेषाम् मे देहि इति उवाच ह । तान् अस्मै प्रददौ हन्त अनुपानम् इति । उच्छिष्टम् मे पीतम् स्यात् वै इति उवाच ह ।**

तो (उषस्ति) म्हणाला, ह्यांतलेच (हुलगे) मला दे. (इभ्यानें) ते त्याला दिले; (नंतर) पाणी घे, असें तो म्हणाला. (उषस्ति) म्हणाला, मी उष्टें पाणी प्याल्यासारखें होईल.

तुझ्या उष्ट्या हुलग्यांपैकींच थोडेसे मला खावयास दे, असें चाक्रायणानें सांगितल्यावर इभ्यानें आपल्या पानांतील हुलगे त्याला देऊन त्याच्या बरोबर तो पाणीहि देऊं लागला. तेव्हां चाक्रायणानें पाणी घेण्याचें नाकारलें. तुझें उष्टें पाणी घेतल्यास मला उच्छिष्ट ग्रहणाचा दोष लागेल, असें उषस्ति चाक्रायण म्हणाला.

**न स्विदेतेऽप्युच्छिष्टा इति न वा अजीविष्यमिमानखाद-न्निति होवाच कामो म उदपानमिति ॥ ४ ॥**

**एते अपि उच्छिष्टाः न स्वित् इति। इमान् अखादन् न अजीविष्यम् वै उदपानम् मे कामः इति उवाच ह।**

हे (हुलगे) उष्टे नव्हते काय, (असें इभ्यानें विचारलें). तेव्हां तो (उषस्ति) म्हणाला, हे खाल्ले नसते तर मी जगलोंच नसतों; परंतु पाणी पिणें ही वासना होईल. (पाण्याची यावेळीं तशी आवश्यकता नाहीं).

चाक्रायणाचें वरील उत्तर ऐकून इभ्याला चमत्कार वाटला. म्हणून त्यानें विचारलें कीं, तुम्हांला हे उष्टे हुलगे चालतात मग उष्टें पाणी कां चालत नाहीं ? यावर चाक्रायणानें उत्तर दिलें कीं,माझ्या जीवनाला अन्नाची आवश्यकता फार होती, तितकी पाण्याची नाहीं. पाणी मला मिळणें शक्य आहे.अनवश्यक असा उष्टा पदार्थ मी स्वीकारीन तर तें निषिद्धाचरण होईल.

**स ह खादित्वातिशेषाञ्जायाया आजहार साग्र एव सुभिक्षा बभूव तान्प्रतिगृह्य निदधौ ॥ ५ ॥**

**सः खादित्वा अतिशेषान् जायायै आजहार । सा अग्रे एव सुभिक्षा बभूव तान् प्रतिगृह्य निदधौ।**

त्यानें (उषस्तीनें) ते थोडे खाल्ल्यावर उरलेले पत्नीला नेऊन दिले. तिला अगोदरच भरपूर अन्न मिळालें होतें, म्हणून तिनें ते घेऊन बांधून ठेवले.

चाक्रायणाला मिळालेले हुलगे बरेच होते. म्हणून आपली भूक भागविण्यापुरते त्यांपैकीं थोडेसे त्यानें खाल्ले; आणि त्यांतले कांहीं शिल्लक ठेवून त्यानें पत्नीला आणून दिले. आपल्याप्रमाणें तीही उपाशी असेल असें चाक्रायणास वाटलें. परंतु चाक्रायणाची बायको आटिकी हिनें (चाक्रायणाप्रमाणेंच भिक्षा मागून ) अन्न खाल्लें असल्यामुळें, चाक्रायणानें दिलेले हुलगे तात्काळ न खातां, दुसरे दिवशीं उपयोगीं पडावे म्हणून, तिनें ते नीट झांकून ठेविले. आटिकीचें हें करणें चतुर सुगृहिणीला शोभण्यासारखेंच होतें.

**स ह प्रातः संजिहान उवाच यद्बतान्नस्य लभेमहि लभेमहि धनमात्राꣳ राजासौ यक्ष्यते स मा सर्वैरार्त्विज्यैर्वृणीतेति ॥ ६ ॥**

**सः प्रातः संजिहानः उवाच ह । बत यत् अन्नस्य । लभेमहि धनमात्राम् लभेमहि । असौ राजा यक्षते सः माम् सर्वैः आर्त्विज्यैः वृणीत इति ।**

तो ( उषस्ति ) सकाळीं उठल्यावर म्हणाला, जर ( आपल्याला ) अन्नाचा अंश मिळेल तर ( पुढें ) आपल्याला धनही मिळेल ( मिळण्याचा संभव आहे ). कारण हा ( येथील ) राजा यज्ञ करणार आहे तो मला सर्व ऋत्विजकर्में करावयास नियुक्त करील.

वरील हकीकत घडली त्याच्या दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उषस्ति चाक्रायण निजून उठला. प्रातःकाळचें नित्यकृत्य आटोपल्यावर अन्नाची विवंचना करणें हें क्रमप्राप्तच होतें. आज त्याच्या विवंचनेंत थोडी भरच पडली होती. कारण त्या गावच्या राजाच्या घरीं आज एक यज्ञ व्हावयाचा होता. त्या यज्ञांत आपणास जर ऋत्विजाचें काम करितां आलें तर पुष्कळसें द्रव्य मिळेल आणि ही अन्नाची विवंचना कमी होईल; परंतु या क्षणीं थोडें खावयास मिळालें पाहिजे; या वेळीं अन्न खाल्लें तरच ऋत्विजाचें काम आपल्या हातून चांगल्या तऱ्हेनें होईल, नाहीं तर भुकेमुळें आपणास काम

करण्याची शक्ति येणार नाहीं,असें त्याला वाटलें.आपली ही विवंचना त्यानें आपल्या पत्नीस निवेदन केली.

**तं जायोवाच हन्त पत इम एव कुल्माषा इति तान्खा-दित्वामुं यज्ञं विततमेयाय ॥ ७ ॥**

**तम् जाया उवाच हन्त पते इमे एव कुल्माषाः इति ।(सः) तान् खादित्वा अमुम् विततम् यज्ञम् एयाय ।**

त्याला पत्नी म्हणाली, अहो पति, तेच ( काल दिलेले ) हुलगे आहेत. तो ते ( उष्टे व शिळे कुल्माष ) खाऊन त्या चालू अस-लेल्या यज्ञाकडे गेला.

पतीनें काल आणून दिलेले हुलगे आटिकीनें शिल्लक ठेविले होते, ते तिनें चाक्रायणास दिले व ते भक्षण करून तो यज्ञाकडे गेला. इभ्याबरोबर बोलतांना चाक्रायणानें असें म्हटलें आहे कीं, जर मीं हे हुलगे घेतले नसते तर मी जगलोंच नसतों. चाक्रायणाचें हें जगणें म्हणजे मुमूर्षुपणानें केवळ जिवंत राहणें नव्हे. काम करण्यास लागणारा सशक्तपणा हाच जग-ण्याचा अर्थ चाक्रायणाला अभिप्रेत होता असें या मंत्रावरून निःसंशय ठरतें.

**तत्रोद्गातॄनास्तावे स्तोष्यमाणानुपोपविवेश स ह प्रस्तो-तारमुवाच ॥ ८ ॥**

**तत्र आस्तावे स्तोष्यमाणान् उद्गातॄन् उप उपविवेश। सः प्रस्तोतारम् उवाच ह।**

तो तेथें ( यज्ञमंडपांत ) स्तवनस्थानीं सामगायन करणाऱ्या उद्गात्यांच्याजवळ जाऊन बसला; आणि तो प्रस्तोत्याला ( साम-गायन करणाऱ्या एका ऋत्विजाला ) म्हणाला.

**प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्र-स्तोष्यासि मूर्धा ते विपतिष्यतीति ॥ ९ ॥**

**प्रस्तोतः या देवता प्रस्तावम् अन्वायत्ता ताम् आविद्वान् प्रस्तोष्यसि चेत् ते मूर्धा विपतिष्यति इति।**

हे प्रस्तोत्या ! जी देवता प्रस्तावाशीं (प्रारंभींच्या सामगायनाशीं) संबद्ध आहे तिला न जाणतां जर तूं स्तवन करशील तर तुझें मस्तक पडेल (बुद्धि नष्ट होईल).

**एवमेवोद्गातारमुवाचोद्गातर्या देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ॥ १० ॥**

**एवम् एव उद्गातारम् उवाच। उद्गातः या देवता उद्गीथम् अन्वायत्ता ताम् अविद्वान् उद्गायसि चेत् ते मूर्धा विपतिष्यति इति।**

तसेंच तो उद्गात्याला म्हणाला, हे ऊद्गात्या ! जी देवता उद्गीथाशीं संबद्ध आहे ती न जाणतां जर तूं उद्गीथ गायन करशील तर तुझें मस्तक पडेल.

**एवमेव प्रतिहर्तारमुवाच प्रतिहर्तर्या देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ते ह समारतास्तूष्णीमासांचक्रिरे ॥ ११ ॥**

**एवम् एव प्रतिहर्तारम् उवाच। प्रतिहर्तः या देवता प्रतिहारम् अन्वायत्ता ताम् अविद्वान् प्रतिहरिष्यसि चेत् मूर्धा ते विपतिष्यति इति । ते समारताः तूष्णीम् आसांचक्रिरे ह ।**

तसेंच तो प्रतिहर्त्याला म्हणाला, हे प्रतिहर्त्या, जी देवता प्रतिहारकर्माशीं संबद्ध जाहे ती न जाणतां जर तूं प्रतिहारकर्म करशील तर तुझें मस्तक पडेल. (हें ऐकून) ते (सर्वजण) आपलें कर्म थांबवून स्तब्ध बसले.

उषस्ति चाक्रायण ठरल्याप्रमाणें यज्ञमंडपांत गेला व तो सामगायन करणाऱ्या मंडळींत शिरला. स्वतः चाक्रायणानें उद्गीथ विद्येचें—सामविद्येचें सांगोपांग अध्ययन केलें होतें. आपली विद्वत्ता दाखविण्यास त्याला संधि

हवी होती; परंतु तशी संधि मिळण्याचा संभव नाहीं असें पाहून चाक्रायणानें मुद्दाम प्रश्न उकरून काढण्यास सुरवात केली. सामगायनाच्या आरंभीच्या भागास प्रस्ताव असें म्हणतात; आणि हा प्रस्ताव गाणाऱ्या ऋत्विजाचें प्रस्तोता असें नांव असतें. चाक्रायणानें प्रथम प्रस्तोत्यावर शिस्त धरली. तो प्रस्तोत्याला म्हणाला कीं, प्रस्तावाची देवता कोणती हें लक्षांत न घेतां, तिचें ध्यान केल्यावांचून, जर तूं प्रस्ताव गाशील तर त्या देवतेचा कोप होऊन तुझा बुद्धिभ्रंश होईल. याप्रमाणेंच उद्गाता व प्रतिहर्ता या दोघांनाही चाक्रायणानें बजावून सांगितलें. हे तिघे ऋत्विज सामगायन करणारे असतात. प्रस्तुत यज्ञांतील या तिघांही ऋत्विजांना सामगायनाच्या-देवतांचें ज्ञान नव्हतें. त्यामुळें चाक्रायणानें वरीलप्रमाणें दम भरल्यावर बिचाऱ्या अज्ञानी ऋत्विजांची गाळणच उडाली; आणि आपलें कर्म बंद ठेवून ते स्वस्थ बसले. चाक्रायण हा विद्वान् सामगायन करणारा असल्यामुळें, त्याला या देवतांचें पूर्ण ज्ञान होतें. सामगायन करितांना देवतांचें ध्यान करणें अत्यंत अवश्य असतें, त्याशिवाय ज्ञानशून्य सामगायन दोषावह आहे, हें चाक्रायणाचें मत शास्त्रदृष्ट्या योग्यच होतें.

## दहाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत उषस्ति चाक्रायणाची कथा आली आहे. ही कथा अद्यापि पुरी व्हावयाची आहे. चाक्रायण कुरु देशांतील रहिवासी होता. टोळधाडीमुळें कुरु देशांत दुष्काळ पडला. हा दुष्काळ अत्यंत भयंकर व असह्य झाला. चाक्रायणासारख्या विद्वान् पुरुषाला अन्नाचीही भ्रांति पडली. तो इभ्यग्रामास जाऊन राहिला, तरी देखील त्याची अन्नान्नदशा संपली नाहीं. त्यानें तेथील इभ्याजवळचे उष्टे कुल्माष (उडीद किंवा हुलगे) मागून घेऊन खाल्ले. तो इभ्य जातीचा कोण होता याचें स्पष्टीकरण या खंडांत झालेलें नाहीं. इभ्य या शब्दावरून पाहता तो हत्तीच्या माहुताचें काम करणारा गजशाळेंतील एक नोकर असावा असें वाटतें. तें कसेंही असलें तरी, तो त्रैवर्णिकापैकीं द्विज नव्हता असें दिसतें. चाक्रायणाची बायको आटिकी

ही चांगली दूरदर्शी व कर्तव्यपरायण होती. म्हणूनच मिळालेलें अन्न तिनें दुसरे दिवसाकरितां राखून ठेविलें व आपल्या पतीला तें योग्य वेळीं खावयास दिलें. चाक्रायणानें मिळालेलें अन्न तिच्या स्वाधीन केलें त्यावेळीं जरी तिला खावयास मिळालें होतें तरी, दुष्काळांतील बुभुक्षितपणामुळें मिळालेलें अन्न तावडतोब खाऊन टाकण्याची इच्छा होणें अस्वाभाविक नव्हतें. तसेंच दुसरे दिवशीं पतीनें मागण्याच्या अगोदरच तें अन्न खाऊन टाकणेंही शक्य होतें;पण तसें तिनें केलें नाहीं. यावरून आटिकीचें आत्मसंयमन प्रशंसनीयच ठरतें. चाक्रायणानें दुसरे दिवशीं सकाळीं कुल्माप खाल्ले तेव्हां, आपण आदले दिवशीं इभ्याचे उष्टे कुल्माष जे मागून घेतले होते तेच हे आहेत हें तो पुरतेपणीं जाणून होता. तथापि ते शिळे व उष्टे कुल्माष खाऊनच ऋत्विजाचें काम करण्याच्या हेतूनें तो यज्ञमंडपांत गेला.

## पूर्वपक्ष

चाक्रायणानें हे उष्टे कुल्माष दोन वेळां खाल्ले आहेत. ते त्यानें कशाकरितां खाल्ले ? या प्रश्नाला बरेंच महत्त्व आलेलें दिसतें. 'सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात्' ( ब्र. सू. ३.४.२८ ) असें या विषयावर बादरायणाचार्यांचें सूत्र आहे. प्राणनाश होत असेल तर कोणाचेंही कसलेंही अन्न ग्रहण करावें अशी श्रुतीची अनुमति-अनुमोदन आहे; कारण, उपनिषदांमध्यें ही अनुमति स्पष्ट दिसून येते. यासूत्रांतील प्राण शब्दाला बरेंच महत्त्व आलें आहे. चाक्रायणानें उष्टे कुल्माष खाल्ले ते केवळ जिवंत रहाण्याकरितांच खाल्ले. जर त्यानें ते खाल्ले नसते तर तो खचित मेला असता. असें 'न वा अजीविष्यमिमानखादन्निति' ह्या त्याच्याच शब्दांवरून सिद्ध होतें. ( हें वाक्य या खंडाच्या चौथ्या मंत्रांत आहे. ) हे कुल्माष मीं खाल्ले नाहींत तर मी जगणार नाहीं, असें तो स्वतःच म्हणत आहे. त्यावरून जीव जाण्याचा प्रसंग असेल तरच कोणाचें कसलेंही अन्न खाण्यास हारकत नाहीं अशी ही श्रुतीनें सवलत दिली आहे. ज्याच्या हातून असें अभोज्य भोजन झालें असेल त्यानें, जर मीं तें अभोज्य अन्न खाल्लें नसतें

तर माझा जीवच जात होता, असें सप्रमाण ( पुरावा देऊन ) सिद्ध केलें पाहिजे, तरच त्याला ही श्रुतीनें दिलेली सवलत घेतां येईल, असें पुराणमताभिमानी पक्षाचें मत आहे.

## सिद्धान्त

ब्रह्मसूत्रांतील प्राणात्यये हें पद उपरिनिर्दिष्ट पूर्वपक्षीय मतास उत्तर देण्याला पुरेसें नाहीं. कारण, प्राचीन संस्कृत भाषेंत जीवंतपणा व सामर्थ्य असे प्राण शब्दाचे दोनही अर्थ मुख्यच आहेत. म्हणून प्राणाचा नाश म्हणजे प्रत्यक्ष मरण कीं सामर्थ्याचा नाश ? या दोन अर्थांपैकीं निश्चयपूर्वक कोणता अर्थ स्वीकारावा, या विषयीं विनिगमक प्रमाण सूत्रांत मिळत नाहीं. त्याकरितां पुनः चाक्रायणाच्या आख्यायिकेचाच विचार करावा लागतो. दुसरे दिवशीं सकाळीं चाक्रायणानें जे उष्टे कुल्माष खाल्ले ते मृत्यु टाळण्याकरितां खचित नव्हे तर, सामगायन करण्यास अंगांत शक्ति यावी याच हेतूनें ते खाल्ले आहेत व तसें त्यानें धडधडीत सांगितलें आहे. त्यावरून सामर्थ्याच्याच अर्थानें बादरायणाचार्यांनीं प्राण हा शब्द सूत्रांत घातला आहे, असें मान्य केल्यावांचून गत्यंतरच नाहीं. म्हणून सशक्तपणानें जगणें हाच अर्थ श्रुतीला व सूत्रकारांनाही अभिप्रेत आहे असें निर्विवाद सिद्ध होतें. ब्रह्मविद्येला वैदिक धर्मांत माणसें हवीं पण तीं आपलें कर्तव्य करण्यास समर्थ असतील अशींच हवीं आहेत; केवळ श्वासमात्रानें जगणारीं कशीं तरी जीवंत माणसें वैदिक धर्मांत ब्रह्मविद्येला नकों आहेत. 'क्षणमुज्ज्वलितं श्रेयो न तु धूमायितं चिरम्' हें महाभारतांतील तेजस्वी तत्त्व येथें चाक्रायणाच्या कथेच्या रूपानें अप्रत्यक्षपणें श्रुतीनें दर्शविलें आहे यांत शंका नाहीं. यज्ञ मंडपांत गेल्यावर चाक्रायणानें आपली विद्वत्ता दर्शविण्यास योग्य असा प्रसंग उपस्थित केला येथपर्यंत वर्णन करूनच हें खंड समाप्त झालें आहे.

### अथैकादशः खण्डः

**अथ हैनं यजमान उवाच भगवन्तं वा अहं विविदिषाणीत्युषस्तिरस्मि चाक्रायण इति होवाच ॥ १ ॥**

**अथ एनम् यजमानः उवाच ह । अहम् भगवन्तम् विविदिषाणि वै इति । चाक्रायणः उषस्तिः अस्मि इति उवाच ह ।**

नंतर त्याला यजमान (यज्ञ करणारा राजा) म्हणाला, आपणाला (आपण कोण हें) जाणण्यास मी इच्छितों. तो म्हणाला— मी चक्राचा पुत्र उषस्ति आहें.

पूर्वीच्या खंडात सुरू झालेली कथाच या खंडांत पुढे चालू आहे. चाक्रायणाने देवताविषयीं प्रश्न केल्याबरोबर त्या यज्ञातील सामगायन करणाऱ्या ऋत्विजांनीं आपलें काम थांवविलें. तेव्हां चाक्रायण हा कोणी तरी उद्गीथविद्यासंपन्न विद्वान् ऋषि असावा, असें यजमानानें ओळखलें; व नम्रतापूर्वक त्याची चौकशी केली. यामुळें चाक्रायणाचा हेतु सिद्धीस गेला व हवी होती ती संधि त्याला मिळाली.

**स होवाच भगवन्तं वा अहमेभि· सर्वैरार्त्विज्यैः पर्यैषिषं भगवतो वा अहमवित्त्यान्यानवृषि ॥ २ ॥**

**सः उवाच ह । अहम् भगवन्तम् वै एभिः सर्वैः आर्त्विज्यैः पर्यैषिषम् । अहम् भगवतः अवित्त्या अन्यान् अवृषि ।**

तो (यजमान) म्हणाला, मी तुम्हांलाच ह्या सर्व ऋत्विजकर्मांमध्यें नियुक्त करितों. मी तुमच्याविषयीच्या अज्ञानामुळें (किंवा अप्राप्तीमुळें), दुसऱ्यांना नेमिलें होतें.

उषस्ति ऋषीच्या विद्वतेची, यज्ञ करणाऱ्या राजाच्या मनावर चांगलीच छाप बसली. म्हणून त्याने चाक्रायणाची प्रार्थना केली कीं, आपली माहिती नसल्यामुळे, मिळतील ते ऋत्विज नेमून मीं यज्ञास प्रारंभ केला. आतां सुदैवानें आपला लाभ झाला आहे तर, हें सामगायनाचें काम मी आपल्याच स्वाधीन करितों. चाक्रायणाच्या विद्वत्तेची कीर्ति राजानें ऐकली होती. परंतु प्रत्यक्ष मूर्ति मात्र पाहिली नव्हती असें दिसतें.

**भगवाँ्स्त्वेव मे सर्वैरार्त्विज्यैरिति तथेत्यथ तर्ह्येत एव समतिसृष्टाः स्तुवतां यावत्त्वेभ्यो धनं दद्यास्तावन्मम दद्या इति तथेति ह यजमान उवाच ॥ ३ ॥**

**भगवान् एव तु मे सर्वैः आर्त्विज्यैः (भवतु) इति। तथा इति। अथ तर्हि एते एव समतिसृष्टाः स्तुवताम्। तु एभ्यः यावत् धनम् दद्याः तावत् मम दद्याः। इति। तथा इति यजमानः उवाच ह।**

(आतां) तुम्हीच माझीं सर्व ऋत्विजकर्में करणारे व्हा. (उषस्ति म्हणाला) ठीक आहे. तर मग हेच (ऋत्विज) माझ्या अनुमोदनानें सामगायन करूं देत. आणि त्यांना जेवढी दक्षिणा देशील तेवढीच मला द्यावी. ठीक आहे, असें यजमान म्हणाला.

**अथ हैनं प्रस्तोतोपससाद प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रस्तोष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥ ४ ॥**

**अथ एनम् प्रस्तोता उपससाद ह। प्रस्तोतः या देवता प्रस्तावम् अन्वायत्ता ताम् अविद्वान् प्रस्तोष्यसि चेत् मूर्धा ते विपतिष्यति इति भगवान् मा अवोचत्। कतमा सा देवता इति (अपृच्छत्)।**

नंतर त्या (उषस्ति) जवळ प्रस्तोता (ऋत्विज) आला (व म्हणाला), " हे प्रस्तोत्या! जी देवता प्रस्तावाशीं संबद्ध आहे ती न जाणतां जर तूं प्रस्ताव करशील तर तुझें मस्तक पडेल! " असें तुम्ही मला म्हणालां होतां, ती देवता कोणती ?

चाक्रायणानें ऋत्विजाची भूमिका स्वीकारल्यावर ज्या कारणावरून चाक्रायणानें प्रस्तोत्याच्या सामगायनास अडथळा केला होता, त्या कारणाचें स्पष्टीकरण विचारण्यास प्रस्तोत्यानें प्रारंभ केला. प्रस्तोता म्हणाला कीं, महाराज, प्रस्तावाच्या देवतेचें ज्ञान असल्याशिवाय प्रस्तावाचें गायन करूं नये असें आपण म्हणालां; तर प्रस्तावाची देवता कोणती, तें आपण

कृपा करून आम्हांला समजावून द्या.(पुढील ५ ते ९ मंत्रांत अशींच प्रश्नोत्तरें आहेत. )

**प्राण इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतानि प्राणमेवाभिसंविशन्ति प्राणमभ्युज्जिहते सैषा देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रास्तोष्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति ॥ ५ ॥**

प्राणः इति उवाच ह। इमानि सर्वाणि भूतानि ह वै प्राणम् एव अभिसंविशन्ति प्राणम् अभ्युज्जिहते ।.सा एषा देवता प्रस्तावम् अन्वायत्ता। ताम् अविद्वान् प्रास्तोष्यः चेत् मया तथा उक्तस्य ते मूर्धा व्यपतिष्यत् इति।

प्राण (ही देवता होय) असें (उषस्ति) म्हणाला. हीं सर्व भूतें (सृष्ट पदार्थ) प्राणांतच लीन होतात व प्राणापासून पुनः उत्पन्न होतात. ती ही प्राणदेवता प्रस्तावाशीं संबद्ध आहे. ती न जाणतां जर तूं प्रस्ताव गायिला असतास तर मीं पूर्वीं म्हटल्याप्रमाणें तुझें मस्तक पडलें असतें.

**अथ हैनमुद्गातोपससादोद्गातर्या देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥ ६ ॥**

अथ एनम् उद्गाता उपससाद ह। उद्गातः या देवता उद्गीथम् अन्वायत्ता ताम् अविद्वान् उद्गायसि चेत् ते मूर्धा विपतिष्यति इति भगवान् मा अवोचत्। सा देवता कतमा इति।

नंतर त्या (उषस्ति) जवळ उद्गाता (ऋत्विज) गेला (व म्हणाला), "हे उद्गात्या! जी देवता उद्गीथाशीं संबद्ध आहे, ती न जाणतां जर तूं उद्गीथ गायन करशील तर तुझें मस्तक पडेल", असें तुम्ही मला म्हणालां होतां, ती देवता कोणती?

**आदित्य इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्या-दित्यमुच्चैः सन्तं गायन्ति सैषा देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति॥७॥**

आदित्यः इति उवाच ह। इमानि सर्वाणि भूतानि ह वै उच्चैः सन्तम् आदित्यम् गायन्ति । सा एषा देवता उद्गीथम् अन्वायत्ता । ताम् अविद्वान् उदगास्यः चेत् मया तथा उक्तस्य ते मूर्धा व्यपतिष्यत् इति।

सूर्य (ही ती देवता होय) असें (उषस्ति) म्हणाला. हे सर्व सृष्ट पदार्थ उदय पावणाऱ्या (श्रेष्ठ असणाऱ्या) सूर्याचें गायन करितात. ती ही सूर्यदेवता उद्गीथाशीं संबद्ध आहे. ती न जाणतां जर तूं उद्गीथ गायन करितास तर मी तसें म्हटल्याप्रमाणें तुझें मस्तक पडलें असतें.

**अथ हैनं प्रतिहर्तोपससाद प्रतिहर्तर्या देवता प्रतिहार-मन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि मूर्धा ते विपतिष्य-तीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥८॥**

अथ एनम् प्रतिहर्ता उपससाद ह। प्रतिहर्तः या देवता प्रतिहारम् अन्वा-यत्ता ताम् अविद्वान् प्रतिहरिष्यसि चेत् मूर्धा ते विपतिष्यति इति भगवान् मा अवोचत्। कतमा सा देवता इति।

नंतर त्या (उषस्ती) जवळ प्रतिहर्ता (ऋत्विज) आला आणि म्हणाला, "हे प्रतिहर्त्या! जी देवता प्रतिहारकर्माशीं संबद्ध आहे ती न जाणतां जर तूं प्रतिहारकर्म करशील तर तुझें मस्तक पडेल," असें तुम्ही म्हणालां होतां ती देवता कोणती ?

**अन्नमिति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्यन्नमेव प्रतिहरमाणानि जीवन्ति सैषा देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रत्यहरिष्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति तथोक्तस्य मयेति ॥ ९ ॥**

**अन्नम् इति उवाच ह । इमानि सर्वाणि भूतानि वै अन्नम् प्रतिहरमाणानि एव जीवन्ति । सा एषा देवता प्रतिहारम् अन्वायत्ता । ताम् अविद्वान्प्रत्यहरिष्यः चेत् मया तथा उक्तस्य ते मूर्धा व्यपतिष्यत् इति ।**

(उषस्ति) म्हणाला, अन्न (ही ती देवता होय). हे सर्व सृष्ट पदार्थ अन्न ग्रहण करूनच जगतात. ती ही अन्नदेवता प्रतिहार-गायनाशीं संबद्ध आहे. ती न जाणतां जर तूं प्रतिहारकर्म केलें असतेंस तर मीं म्हटलें होतें तसें तुझें मस्तक पडलें असतें.(द्विरुक्ति खंडसमाप्तिदर्शक आहे).

## ११ व्या खंडाचा सारांश.

उपस्ति चाक्रायणाची आख्यायिका या खंडांत पुरी झाली आहे. चाक्रायणाची विद्वत्ता पाहून यजमानानें सामगायनाचा त्याला मुख्य ऋत्विज नेमिलें. त्यावेळीं तो म्हणाला, मी या ऋत्विजांमध्यें मुख्य ऋत्विजाचें काम केलें तरी, त्यांच्या इतकीच मला दक्षिणा द्यावी, ती कमी किंवा अधिक नसावी. या प्रसंगीं मुख्य ऋत्विज या नात्यानें चाक्रायणाला इतरांपेक्षां अधिक दक्षिणा मिळण्याचा संभव होता; परंतु चाक्रायणानें तसें न करण्याबद्दल यजमानाला बजावून सांगितलें आहे. यांत चाक्रायणाच्या मनाचा थोरपणाच व्यक्त होतो. दुष्काळानें पीडित झालेल्या या ब्राह्मणानें अधिक दाक्षिणेची अपेक्षा केली असती तर ती सहज पूर्ण झाली असती. पण असें करण्यानें व्यक्तिमाहात्म्याचा दोष पदरीं येऊन आपल्या तेजस्वितेची हानि होईल हें चाक्रायणासारख्या ज्ञानसंपन्न ऋषीला समजणें मुळींच दुर्घट नव्हतें. या सद्गुणाकरितां त्यानें जी त्यागवृत्ति दाखविली ती अत्यंत प्रशंसनीय होती.

सामगायनाचे तीन भाग असतात. त्यांतील प्रारंभींच्या भागास प्रस्ताव असें म्हणतात; आणि शेवटच्या भागास प्रतिहार असें नांव दिलें जातें; व उद्गीथ हा सामगायनाचा प्रधान भाग असतो. हे भाग गायन करणाऱ्या

ऋत्विजांना प्रस्तोता, प्रतिहर्ता, व उद्गाता अशीं नांवें दिलीं जातात. या तिघांही ऋत्विजांनीं चाक्रायणापासून तेथल्या तेथेंच या तीन भागांच्या देवतांचें ज्ञान संपादन केलें. प्रस्तावाची प्राणदेवता, प्रतिहाराची अन्न व उद्गीथाची आदित्य ही देवता आहे. त्या त्या भागाचें गायन करणारानें आपापल्या भागाच्या देवतेचें चिंतन करावें असें देवताध्यानपूर्वक केलेलें सामगायन सर्वांनाच कल्याणकारक होतें. येथें ही आख्यायिका पूर्ण झाली असून, हें अकरावें खंडही समाप्त झालें आहे.

अथ द्वादशः खण्डः

**अथातः शौव उद्गीथस्तद्ध बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेयः स्वाध्यायमुद्वव्राज ॥ १ ॥**

**अथ अतः शौवः उद्गीथः। दाल्भ्यः बकः मैत्रेयः ग्लावः वा तत् स्वाध्यायम् उद्वव्राज ह।**

आतां पुढें शौव (म्हणजे) श्वानाप्रमाणें होणारें गाणें उद्गीथ साम (सांगतात). दल्भ्याचा पुत्र बक किंवा मित्रेचा पुत्र ग्लाव त्या शौव उद्गीथसामाच्या अध्ययनाकरितां बाहेर गेला.

**तस्मै श्वा श्वेतः प्रादुर्बभूव तमन्ये श्वान उपसमेत्योचुरन्नं नो भगवानागायत्वशनायाम वा इति ॥२॥**

**तस्मै श्वेतः श्वा प्रादुर्बभूव। तम् अन्ये श्वानः उपसमेत्य ऊचुः भगवान् नः अन्नम् आगायतु अशनायाम वै इति।**

त्या ( बक किंवा ग्लाव ) ऋषीला तेथें एक पांढरा कुत्रा दिसला. त्याच्याकडे दुसरे कुत्रे तेथें आले आणि म्हणाले, "तुम्ही आमच्या अन्नाकरितां गायन करा; आम्ही बुभुक्षित आहों."

**तान्होवाचेहैव मा प्रातरुपसमीयातेति तद्ध बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेयः प्रतिपालयांचकार ॥ ३ ॥**

**( सः ) तान् उवाच ह। इह एव प्रातः मा उपसमीयात इति। तत् दाल्भ्यः बकः मैत्रेयः ग्लावः वा प्रतिपालयांचकार ह।**

तो पांढरा कुत्रा त्यांना म्हणाला, " येथेंच सकाळीं तुम्ही मजकडे या." तें दाल्भ्याचा पुत्र बक किंवा मित्रेचा पुत्र ग्लाब पहात (त्यावेळेची मार्ग प्रतीक्षा करीत ) राहिला.

**ते ह यथैवेदं बहिष्पवमानेन स्तोष्यमाणाः सꣳरब्धाः सर्पन्तीत्येवमाससृपुस्ते ह समुपविश्य हिंचक्रुः ॥ ४ ॥**

**यथा बहिष्पवमानेन इदम् एव स्तोष्यमाणाः संरब्धाः सर्पन्ति एवम् ते ससृपुः ह। ते समुपविश्य हिं चक्रुः ह।**

ज्याप्रमाणें बहिष्पवमान सामानें ह्या (अन्ना) चीच स्तुति करणारे ( ऋत्विज ) एकमेकांना धरून चालतात त्याप्रमाणें ते (कुत्रे) चालूं लागले आणि मग एकत्र बसून हिंकार (शब्द) करूं लागले.

**ओ ३ मदा ३ मों ३ पिबा ३ मों ३ देवो वरुणः प्रजापतिः सविता २ न्नमिहा २ हरदन्नपते ३ ऽ न्नमिहा २ हरा २ हरो ३ मिति ॥ ५ ॥**

**ॐ अदाम ॐ पिबाम ॐ वरुणः प्रजापतिः सविता-देवः इह अन्नम् आहरत। अन्नपते इह अन्नम् आहर आहर ॐ इति।**

आम्हीं खावें, आम्हीं प्यावें म्हणून वर्षण करणारा, पालन करणारा आणि उत्पन्न करणारा अशा देवानें (सूर्यानें) येथें ( या लोकीं) अन्न आणिलें आहे (उत्पन्न केलें आहे). हे अन्नाच्या स्वामी अशा देवा, येथें अन्न आण (उत्पन्न कर). ( द्विरुक्ति खण्ड समाप्तिदर्शक आहे ).

## बाराव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खण्डांतील कथा आलंकारिक भाषेंत असल्यामुळें आणि खण्डांतील मंत्र थोडे म्हणजे पांचच असल्यामुळें, त्यांचें स्वतंत्र विवरण लिहिलेलें नाहीं. त्या सर्वांचा या सारांशांतच विचार करावयाचा आहे. या खण्डांत शौव सामाविषयींची आख्यायिका आली आहे. श्वा या शब्दापासून शौव शब्द तयार झाला आहे. श्वा म्हणजे कुत्रा. कुत्र्यासारखें सामगायन असा शौव—साम याचा अर्थ होतो. ही शब्द योजना हीनार्थबोधक दिसते. तथापि पुढील इतिहास लक्षांत घेतल्यास या दोषाचें निराकरण करितां येईल. बकदाल्भ्य व मैत्रेय ग्लाव या दोघां ऋषींनीं ही शौव सामाची पद्धति प्रथम बसविली, किंवा या पद्धतीचा प्रथम शोध केला. दाल्भ्य व ग्लाव या दोघांनीं हें शौव साम तयार केलें कीं, यांपैकीं एकानेंच तें तयार केलें, हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. कारण या खण्डाच्या पहिल्या मंत्रांत ह्या दोघांचीं नावें आलीं आहेत; परंतु पुढें तिसऱ्या मंत्रांत 'प्रति पालयाञ्चकार असें एकवचनी क्रियापद आलें आहे, त्यावरून वरील संशय उपस्थित होतो. तें कसेंही असलें तरी, दाल्भ्य व ग्लाव. या दोघांही ऋषींनीं शौव सामाचा प्रथम शोध केला असें समजण्यास हरकत नाहीं. कदाचिन् तीं दोन नांवें एकाच व्यक्तीचीं ही असतील.

हे दोघे ऋषि अरण्यांत गेले असतां त्यांनीं एक शुभ्र रंगाचा कुत्रा पाहिला. त्याच्या जवळ येऊन इतर श्वानांनीं त्याची प्रार्थना केली कीं, आम्हांला अन्न खावयास मिळत नाहीं, करितां तूं अन्नाकरितां गायन कर म्हणजे तें आम्हांला मिळेल. तेव्हां प्रातःकाळीं माझ्याकडे या म्हणजे आपण अन्नाचें गायन करूं, असें त्या पांढऱ्या कुत्र्यानें सांगितल्यावर इतर श्वानांनीं ते कबूल केलें. ठरल्याप्रमाणें सकाळीं ते सर्व श्वान त्या पांढऱ्या श्वानाबरोबर हलके हलके संचार करीत सर्वांनीं मिळून परमेश्वराच्या प्रार्थनेचें स्तोत्र गाईलें. या सर्व प्रकारावर दाल्भ्य व ग्लाव यांनीं मुद्दाम पूर्ण

लक्ष ठेविलें होतें. या प्रकारावरूनच त्यांना शौव नामक सामगायनाचें ज्ञान झालें, असा या आख्यायिकेचा थोडक्यांत मथितार्थ आहे.

प्रस्तुत आख्यायिकेवरून बसविलेलें शौव साम म्हणजेच वृंदगायन होय. भरतादि संगीत शास्त्रवेत्त्यांनीं या वृंदगायनाचे–सामुदायिकगायनाचे नियम व मार्ग सविस्तर सांगितले आहेत. दाल्भ्य व ग्लाव या दोघां ऋषींनीं ही वृंदगायनाची पद्धति यज्ञामध्यें रूढ केली. यजमानासुद्धां सर्व ऋत्विजांनीं सामगायन करीत अगदीं एका ओळीनें यज्ञमण्डपांत फिरावयाचें, अशी ही पद्धति आहे. या कर्माला बहिष्पवमान असेंही म्हणतात. ही पद्धति श्वानांच्या सामुदायिक ओरडण्यावरून ( भुंकणें किंवा रडणें नव्हे ) वैदिक ऋषींनीं बसविली असावी असें सकृद्दर्शनीं वाटतें; परंतु थोडा विचार केल्यास एकमेकांशीं संभाषण करून परमेश्वराची सामुदायिक प्रार्थना करणारे खरेखुरे कुत्रेच होते काय ? असा प्रश्न मनांत उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं. शिवाय त्यांतील मुख्य श्वान पांढऱ्या रंगाचा होता असें श्रुतीनें मुद्दाम सांगितलें आहे. याचा अर्थ काय ? प्राचीन टीकाकारांनीं, कुत्र्याचें रूप धारण केलेले हे ऋषि होते, असा तर्क केला आहे; परंतु या ऋषींच्या कल्पनेवरून मुख्य कुत्र्याच्या पांढऱ्या रंगाचा योग्य असा खुलासा होत नाहीं. म्हणून आणखी एक ऐतिहासिक तर्क प्राचीन टीकाकारांच्या तर्काला जोडला तर मात्र उपपत्ति बरोबर बसते. तो तर्क असाः–दाल्भ्य व ग्लाव सामगायन करण्याचें विशेष अध्ययन करण्याच्या हेतूनें निरनिराळ्या देशांतून प्रवास करीत होते; त्यांना एके ठिकाणीं हें सामुदायिक गायन पहावयास सांपडलें. या गायनाचा मुख्य सूत्रधार युरोप खंडांतील माणसासारखा श्वेतवर्णी होता; त्याच्यापासून या दोघांनीं या वृंदगायनाच्या पद्धतीचें ज्ञान संपादन केलें; असा तर्क केल्यास ही आख्यायिका सुसंगत लागते. स्वकीयांना कल्पना येण्याकरितां केवळ साहश्य दर्शविणारें म्हणून 'शौव साम' असें या पद्धतीला त्यांनीं नांव दिलें, असें समजण्यास हरकत नाहीं. भारतीय संगीतात ग्रीक संगीताचें मिश्रण झालें होतें,

हा ऐतिहासिकांचा तर्क प्रस्तुत आख्यायिकेशीं कितपत जुळतो त्याचा इतिहास-संशोधकांनींच विचार केलेला बरा. सांप्रतकाळचें युरोपियन संगीत बऱ्याच अंशीं या शौवसामाप्रमाणें दिसतें. याप्रमाणें आलंकारिक पद्धतीनें शौव सामाचा इतिहास वर्णन करून हें खंड समाप्त केलें आहे.

**अथ त्रयोदशः खण्डः ।**

**अयं वाव लोको हाउकारो वायुर्हाइकारश्चन्द्रमा अथकारः । आत्मेहकारोऽग्निरीकारः ॥ १ ॥**

**अयम् वाव लोकः हाऊकारः वायुः हाइकारः चन्द्रमाः अथकारः आत्मा इहकारः अग्निः ईकारः ।**

हा (भू) लोक हाच हाउकार. हा स्तोभ (सामांतील नुसता स्वरात्मक शब्द) होय. वायु हाच हाइकार (शब्द). चन्द्र हाच अथ शब्द. आत्मा हाच इह शब्द. अग्नि हाच ई शब्द होय. (ह्या शब्दांनीं त्या त्या देवतांची उपासना होते).

प्रस्तुत मंत्रांत गाण्यांतील कांहीं शब्द आले आहेत. आलाप जोड गातांना कांहींतरी अक्षरोच्चार करण्याचा संप्रदाय अजूनही रूढ आहे. उद्गीथोपासनेमध्यें हीं अक्षरें नियमित केलीं आहेत. त्यांच्याबरोबर देवतांचाही नियम सांगितला आहे. अमुक देवतेचें गायन करावयाचें असल्यास अमुक अक्षरोच्चारानेंच आलाप घ्यावेत, असा या नियमाचा अभिप्राय आहे. अनेकाक्षरी शब्द असला तरी, अक्षरोच्चारापलीकडे त्या शब्दाला दुसरा अर्थ नाहीं, हें दर्शविण्याकरितांच अशा शब्दांना 'कार' हा शब्द जोडण्यांत आला आहे. जसें:-हाऊकार, ओंकार, हिंकार इत्यादि.

**आदित्य ऊकारो निहव एकारो विश्वेदेवा औहोयिकारः प्रजापतिर्हिंकारः प्राणः स्वरोऽन्नं या वाग्विराट् ॥ २ ॥**

**आदित्यः ऊकारः निहवः एकारः विश्वेदेवाः औहोयिकारः प्रजापतिः हिंकारः प्राणः स्वरः अन्नम् या विराट् वाक् ।**

आदित्य हाच ऊ शब्द, निहव म्हणजे आव्हान हाच ए शब्द, विश्वेदेव हाच औहोयि शब्द, प्रजापति हाच हिं शब्द, प्राण हाच स्वर शब्द, अन्न हाच या शब्द, विराट हाच वाक् शब्द होय. ( ह्या शब्दांनीं त्या त्या देवतांची उपासना म्हणजे गायन होतें. ह्या सर्व शब्दांना 'स्तोभ' असें म्हणतात.

**अनिरुक्तस्त्रयोदशः स्तोभः संचरो हुंकारः ॥ ३॥**

**अनिरुक्तः संचरः त्रयोदशः स्तोभः हुं कारः।**

ज्याचें निर्वचन केलेलें नाहीं आणि जो कोठेंही लावतां येतो असा तेरावा शब्द ( स्तोभ ) हुं हा होय.

**दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतामेवꣳ साम्नामुपनिषदं वेदोपनिषदं वेदेति ॥ ४ ॥**

**यः साम्नाम् एताम् उपनिषदम् एवम् वेद यः वाचः दोहः ( तम् )दोहम् अस्मै वाक् दुग्धे। (सः) अन्नवान् अन्नादः भवति।**

जो सामाची ही विद्या ह्याप्रमाणें जाणतो त्याला वाणीचें फल ( ज्ञान )वाणी देते. तो धनसंपन्न व उपभोक्ता होतो. (द्विरुक्ति समाप्ति-दर्शक आहे ).

## १३ व्या खण्डाचा सारांश.

हें खंड चार मंत्रांनींच पूर्ण झालें आहे. गायनाकरितां म्हणून साम-वेदांत प्रसिद्ध असलेले तेरा शब्द या मंत्रांत आले आहेत. त्यांच्या देवताही नियमित आहेत. वाटेल त्या देवतेकडे योजण्याजोगा हुंकार हा शब्द आहे. हा शब्द मात्र कोणत्याही देवतेचें गायन करितांना उपयोगांत आणण्यास हरकत नाहीं. इतर बारा शब्दांची गोष्ट मात्र तशी नाहीं. सांप्रतकाळीं रागांच्या वेळा जशा ठरलेल्या आहेत, त्यासारखाच हा देवताविषयक नियम आहे, याप्रमाणें उद्गीथ उपासनेंत उपयोजिल्या जाणाऱ्या शब्दांचें व

त्यांच्या देवतांचें प्रतिपादन करून व उद्गीथोपासनेच्या फलाचा निर्देश करून हें तेरावें खंड समाप्त झालें आहे.

## पहिल्या अध्यायाचा उपसंहार.

उद्गीथोपासनेचें सांगोपांग प्रतिपादन करणें हा या अध्यायाचा मुख्य विषय आहे. उद्गीथ नांवाचा एक प्रकार सामगायनामध्यें मुख्य मानला जातो. ॐकार शब्दाचा उच्चार करीत उद्गीथ गायन करावें, असें प्रथमच सांगितलें आहे. औपनिषद विद्येंतील उपासना मार्ग, ॐ हा मंत्र आणि आदित्य ही देवता या दोहोंवरच मुख्यत्वेंकरून अधिष्ठित झाला आहे. आदित्याबरोबरच चक्षुरिंद्रियांतील आत्मशक्तीचेंही वर्णन केलें जातें. चक्षुरिंद्रिय व आदित्यमंडल यांचा व्यष्टि–समष्टिसारखा संबंध वैदिक ऋषींना अभिप्रेत असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. औपनिषद विद्येच्या उपासनामार्गांत अनेकविध प्रतीकांचा उल्लेख येत असला तरी, परमेश्वराचें हें आदित्यरूप प्रतीक ( मूर्ति ) सर्व प्रतीकांत अत्यंत श्रेष्ठ आहे, असें औपनिषद विद्येनें ठरविलें आहे.

उद्गीथाचें महत्त्व कसें अतिशय आहे तें दर्शविण्याच्या हेतूनें दुसऱ्या खंडापासून देवासुरांच्या कलहाची एक आख्यायिका वर्णिली आहे. या आख्यायिकेवरून असें दिसतें कीं, प्राचीनकाळच्या लोकांनीं या सामगायनाच्या सामर्थ्यानें समाजांत एक मोठी क्रांति घडवून आणिली होती. नवीन मताच्या लोकांना देव व जुन्या मताच्या लोकांना असुर असें म्हणण्यांत येत होतें, असें बृहदारण्यकांत सुचविलें आहे. ( उ. नि. र. प्र. पृ. २४–२७ बृहदारण्यक १।३।१ ) देव आणि असुर हे वैदिक धर्मांतीलच असून यज्ञाचे उपासकच होते. असुर या शब्दाचे परस्परविरुद्ध सुष्ट व दुष्ट असे दोन अर्थ वैदिक वाङ्मयांत व संस्कृत वाङ्मयांत रूढ झाले आहेत. असुर शब्दाची व्युत्पत्ति पाहूं लागल्यास ती दोन्ही प्रकारांनीं केलेली आढळते. असु = प्राण, व र म्हणजे देणारे यावरून प्राणदान किंवा प्राणरक्षण करणारे अशा लोकांनाच असुर ही संज्ञा लावण्यांत येत होती. याच्या उलट

स्वतःच्या प्राणामध्यें रत असणारा तो असुर म्हणजे स्वार्थी किंवा विषय-लंपट, अशा रीतीनेंही असुर शब्दाचें स्पष्टीकरण केलें जातें. तथापि प्राचीन वैदिक वाङ्मयांत असुर हा शब्द अत्यंत महत्त्वाचा दर्शक म्हणून उप-योगांत आलेला आहे. सूर्याचें स्तवन करितांना सूर्याला वैदिक ऋषींनीं असुर हें विशेषण दिलें आहे. ( ऋग्वेद १. ३५. ७ ) उदयकालीं आपल्या किरणांच्या योगानें सर्व जीवांना प्राणसामर्थ्य देणारा, असा या विशेष-णाचा अर्थ आहे. यावरून उत्तरकालांत ज्याप्रमाणें असुर शब्द दुष्टांचा वाचक झाला, तसा तो प्राचीनकाळीं नव्हता असें सिद्ध होतें. म्हणून प्रस्तुत आख्यायिकेंतले असुर म्हणजे कोणी दुष्ट राक्षस होते असें समज-ण्याचें कारण नाहीं. जुने व नवे एवढाच भेद मुळांत उत्पन्न झाला होता, हें बृहदारण्यकाचें मत येथेंही स्वीकारणें अवश्य आहे. उद्गीथाच्या जोरावर देवांनीं असुरांना जिंकलें आणि आपला सामगायनयुक्त संगीत यज्ञधर्म अत्यंत लोकप्रिय केला, असें या आख्यायिकेचें तात्पर्य आहे.

उद्गीथ गायन करितांना एकाग्र चित्तानें देवतांचें ध्यान करणें अत्यंत अवश्य आहे. त्याकरितांच आधिदैविक व आध्यात्मिक देवतांचा विचार तिसऱ्या व चौथ्या खंडांत केला आहे. या देवतांच्या विचारांत देवतांचा मंत्रांशीं व ॐकाराशीं असलेला संबंध आलंकारिक कल्पनेनें वर्णन केला आहे. गायन करितांना परमेश्वराचें ध्यान अवश्य केलें पाहिजे म्हणजेच ती उपासना होते. संगीतामध्यें अनेक प्रकारच्या रसांचा प्रादुर्भाव होतो. उत्तर कालात शृंगारादि रसांना पोषक अशा निरनिराळ्या रागांची रचना कर-ण्यांत आली आहे; परंतु यज्ञांतील सामगायनांत शांत रसालाच प्राधान्य दिलें आहे. सामगायनांत इतर रसांचा संबंध आला तरी, तो शांत रसाचा अंगभूत म्हणून येईल. या विषयीं शिलक, चैकितायन, व प्रवाहण या तिघांचा संवाद फारच उद्बोधक आहे. चैकितायन दाल्भ्याच्या मतानें स्वर्ग म्हणजे वैषयिक अथवा इंद्रियजन्य सुख हेंच सामगायनाचें अधिष्ठान होय. रसाच्या दृष्टीनें या मताचा विचार केल्यास असें म्हणतां येईल कीं, साम-

गायनामध्यें श्रृंगारादि विषयांचा अंतर्भाव करण्यास हरकत नाहीं; परंतु चैकितायन दाल्भ्याचें हें मत खोडून काढून सामगायनांत ऐहिक व्यवहारालाच प्राधान्य द्यावें म्हणजे विद्याविषयक, सामाजिक, धार्मिक इत्यादि व्यवहारप्रधान विषयांना अनुकूल असे रस सामगायनांत असावेत, असें शालावत्यशिलकानें प्रतिपादन केलें. प्रवाहण जैवलीनें, शालावत्याचें मत देखील अपुरें आहे असें दाखवून, सृष्टीचें मूलतत्त्व ( परमात्मतत्त्व ) हेंच सामगायनाचें अधिष्ठान होय असें सिद्ध केलें. या संवादावरून सामगायनांत शांत रसालाच अग्रस्थान दिलें पाहिजे असें ठरतें.

दहाव्या व अकराव्या खंडामध्यें आलेली चाक्रायण उषस्तीची कथा फारच महत्त्वाची आहे. तसेंच शौवसामाच्या संशोधनाविषयींची बाराव्या खंडांतील कथा देखील अत्यंत अर्थपूर्ण आहे. या अध्यायांत सामगायनाचे निर्माते, संशोधक, प्रचारक, इत्यादि निमित्तानें अनेक ऋषींचीं नांवें आलीं आहेत, तीं ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत. त्यांतल्यात्यांत बक दाल्भ्य हा ऋषि सामगायनाचा मोठा संशोधक होता असें दिसतें. यानेंच नैमिशीय समाजांत ॐकारयुक्त सामगायनाचा प्रचार प्रथम सुरू केला. तसेंच शौवसामाचें संशोधन देखील दाल्भ्य ऋषीनेंच केलें आहे. त्यावरून सामसंगीताच्या इतिहासांत दाल्भ्याची योग्यता फार मोठी होती असें निःसंशय सिद्ध होईल. याप्रमाणें तात्त्विक व ऐतिहासिक दृष्ट्या सामगायनाचें विवेचन करून श्रुतीनें हा अध्याय समाप्त केला आहे.

---

# द्वितीयोऽध्यायः

**अथ प्रथमः खण्डः ।**

**समस्तस्य खलु साम्न उपासनꣳ साधु यत्खलु साधु तत्सामेत्याचक्षते यदसाधु तदसामेति ॥ १ ॥**

**समस्तस्य साम्नः उपासनम् साधु खलु । यत् साधु तत् साम इति आचक्षते खलु । यत् असाधु तत् असाम इति ( आचक्षते ) ।**

संपूर्ण सामाची उपासना शुभदायक असते. जें शुभ असतें त्याला साम असें म्हणतात. जें अशुभ असतें, त्याला असाम असें म्हणतात.

सामाचें इतर अंगांनीं येथपासून वर्णन सुरू झालें आहे. सामगायनाच्या सहाय्यानें देवांनीं असुरांवर जय मिळविला, अशी कथा मागील अध्यायांत आली आहे. यज्ञांत सामगायन सुरू झाल्यानंतर तें अत्यंत लोकप्रिय झालें. त्यामुळें साम शब्दाचा प्रचार देखील साधु म्हणजे चांगलें अशा अर्थानेंच होऊं लागला. साम म्हणजे चांगलें व असाम म्हणजे वाईट अशी रूढि पडली. ही शब्दयोजना सामगायनाच्या अतिशय लोकप्रियतेची निदर्शकच आहे.

**तदुताप्याहुः साम्नैनमुपागादिति साधुनैनमुपागादित्येव तदाहुरसाम्नैनमुपागादित्यसाधुनैनमुपागादित्येव तदाहुः ॥ २ ॥**

**तत् उत अपि आहुः । साधुना एनम् उपागात् इति तत् साम्ना एनम् उपागात् इति एव आहुः । असाधुना एनम् उपागात् इति तत् असाम्ना एनम् उपागात् इति एव आहुः ।**

त्या विषयीं असेंही म्हणतात, ( कोणी दुसऱ्याकडे ) चांगल्या रीतीनें गेला तर त्याला सामानें गेला असें म्हणतात, आणि वाईट रीतीनें गेला तर त्याला असामानें गेला असें म्हणतात.

**अथोताप्याहुः साम नो बतेति यत्साधु भवति साधु बतेत्येव तदाहुरसाम नो बतेति यदसाधु भवत्यसाधु बतेत्येव तदाहुः ॥ ३ ॥**

**अथ उत अपि आहुः । यत् साधु भवति नः साधु बत इति साम बत इति एव तत् आहुः । यत् असाधु भवति नः असाधु बत इति असाम बत इति एव तत् आहुः ।**

आणखी त्याविषयीं असें म्हणतात. जें चांगलें होतें तें आमचें चांगलें किंवा साम आहे असेंही म्हणतात; आणि जें वाईट होतें तें आमचें वाईट किंवा असाम आहे असेंही म्हणतात.

**स य एतदेवं विद्वान्साधु सामेत्युपास्तेऽभ्याशो ह यदेनꣳ साधवो धर्मा आ च गच्छेयुरुप च नमेयुः ॥ ४ ॥**

**यः सः एवम् विद्वान् एतत् साधु साम इति उपास्ते यत् एनम् साधवः धर्माः अभ्याशः आगच्छेयुः च उपनमेयुः च ह ।**

जो कोणी ह्याप्रमाणें जाणणारा हे साधु ( चांगलें किंवा शुभ ) व साम ( एकच आहे अशा बुद्धीनें ) त्याची उपासना करितो त्याला शुभ गुण लवकर प्राप्त होतात आणि स्वाधीन राहतात.

## पहिल्या खंडाचा सारांश.

सामाची लोकप्रियता दाखविण्याकरितां, त्याचा शाब्दिक प्रचार कसा झाला त्याचें वर्णन या खंडांत केलें आहे. साधु व असाधु म्हणजे शुभ व अशुभ किंवा चांगलें आणि वाईट हे साम व असाम या शब्दांचे अर्थ उदाहरणांसहित दर्शविले आहेत. चांगल्या प्रकारच्या सामाची उपासना करावी म्हणजे ईश्वरभक्तिपूर्वक शास्त्रशुद्ध अशा सामगायनाचें अध्ययन करावें, त्यायोगें मनुष्य चांगला धर्मनिष्ठ होतो, असें चांगल्या सामोपासनेचें फल सांगितलें आहे. संगीताचा अभ्यास करितांना मनोविकार वृद्धिंगत करणारे शृंगारासारखे रस शक्य तितके वर्ज्य करून गायनानें परमे-

श्वराला आळविण्याचाच हेतु ठेवावा; म्हणजे अशा गायनाच्या योगानें मनुष्याचें अंतःकरण सहिष्णु व धर्मशील होऊन सामर्थ्यसंपन्न होतें, असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

## अथ द्वितीयः खण्डः ।

**लोकेषु पञ्चविधꣳ सामोपासीत पृथिवी हिंकारः अग्निः प्रस्तावोऽन्तरिक्षमुद्गीथ आदित्यः प्रतिहारो द्यौर्निधनमित्यूर्ध्वेषु ॥ १ ॥**

**ऊर्ध्वेषु लोकेषु पञ्चविधम् साम उपासीत । पृथिवी हिंकारः अग्निः प्रस्तावः अन्तरिक्षम् उद्गीथः आदित्यः प्रतिहारः द्यौः निधनम् इति ।**

चढत्या लोकांविषयीं म्हणजे सृष्टीविषयीं पांच प्रकारच्या सामांची उपासना करावी. पृथ्वी हा हिंकार, अग्नी हा प्रस्ताव, अन्तरिक्ष हा उद्गीथ, आदित्य हा प्रतिहार, आणि द्यौः हें निधन म्हणजे विरामस्थान. ( अशा भावनेनें पंचविध सामोपासना करावी ).

प्रस्तुत मंत्रांत सामगायनाच्या पांच प्रकारांचीं नांवें आलीं आहेत. सामगायन करण्याचें काम तिघां ऋत्विजांकडे असतें. त्यांना प्रस्तोता, उद्गाता व प्रतिहर्ता असें म्हणतात. या तिघांत मिळून हे पांचही प्रकार गावयाचे आहेत. या पांच प्रकारांच्या पांच देवता सांगितल्या आहेत. त्यांचें चिंतन करीत या पंचविध सामाचें गायन करावें. गाण्याच्या प्रारंभीं आकारानें स्वर लावण्याची पद्धति सांप्रतकाळीं रूढ आहे. वैदिक कालांत ' हिम् ' या शब्दानें म्हणजेच हिंकारानें स्वर लावण्याची पद्धति रूढ होती. यालाच हिंकार असें म्हटलें आहे. तो तिघांही ऋत्विजांनीं म्हणावयाचा असतो.

**अथावृत्तेषु द्यौर्हिंकार आदित्यः प्रस्तावोऽन्तरिक्षमुद्गीथोऽग्निः प्रतिहारः पृथिवी निधनम् ॥ २ ॥**

**अथ आवृत्तेषु । द्यौः हिंकारः आदित्यः प्रस्तावः अन्तरिक्षम् उद्गीथः अग्निः प्रतिहारः पृथिवी निधनम् ।**

आतां उतरत्या सृष्टीविषयीं :– द्यौः हा हिंकार, आदित्य हा प्रस्ताव, अंतरिक्ष हा उद्गीथ, अग्नि हा प्रतिहार, आणि पृथ्वी हें विरामस्थान. ( अशा भावनेनें पंचविध सामाची उपासना करावी. )

पंचविध सामाच्या मागील मंत्रांत ज्या पांच देवता सांगितल्या आहेत. त्यांचेंच या मंत्रांत व्युत्क्रमानें वर्णन केलें आहे.

**कल्पन्ते हास्मै लोका ऊर्ध्वाश्चावृत्ताश्च य एतदेवं विद्वाँल्लोकेषु पञ्चविधं सामोपास्ते ॥ ३ ॥**

**यः एवम् विद्वान् लोकेषु एतत् पञ्चविधम् साम उपास्ते अस्मै ऊर्ध्वाः च आवृत्ताः च लोकाः कल्पन्ते ह ।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा, सृष्टिविषयक पांच प्रकारच्या सामांची उपासना करितो त्याला चढते व उतरते सर्व लोक प्राप्त होतात.

**अथ तृतीयः खण्डः ।**

**वृष्टौ पञ्चविधꣳ सामोपासीत पुरोवातो हिंकारो मेघो जायते स प्रस्तावो वर्षति स उद्गीथो विद्योतते स्तनयति स प्रतिहार उद्गृह्णाति तन्निधनम् ॥ १ ॥**

**वृष्टौ पञ्चविधम् साम उपासीत । पुरः वातः हिंकारः मेघः जायते सः प्रस्तावः वर्षति सः उद्गीथः विद्योतते स्तनयति सः प्रतिहारः उद्गृह्णाति तत् निधनम् ।**

वृष्टीविषयीं पांच प्रकारच्या सामांची उपासना करावी. प्रथम सुटणारा वारा हा हिंकार, मेघ येतो तो प्रस्ताव, पाऊस पडतो तो उद्गीथ, विजा चमकतात व गडगडाट होतो तो प्रतिहार, आणि वर ओढून घेणें ( वाफ होऊन वर जाणें ) हें विरामस्थान होय.

**वर्षति हास्मै वर्षयति ह य एतदेवं विद्वान्वृष्टौ पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् वृष्टौ एतत् पञ्चविधम् साम उपास्ते अस्मै वर्षति ह (सः) वर्षयति ह ।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा वृष्टीविषयीं ह्या पंचविध सामाची उपासना करितो, त्याच्याकरितां पर्जन्य पडतो आणि तो पर्जन्य ( नसेल तर ) पाडतो.

## तिसऱ्या खंडाचा सारांश.

मागील खंडाप्रमाणेंच या खंडांतदेखील पंचविध सामाचें वर्णन केलें आहे. येथें पर्जन्यवृष्टि संबंधीच्या देवता सांगितल्या आहेत. या देवतांचें चिंतन करीत भक्तिपूर्वक पंचविध सामाचें गायन केलें असतां, पर्जन्यवृष्टि होते, असें त्याचें फल सांगितलें आहे. अवर्षण झालें असतां, पर्जन्याकरितां रुद्राभिषेकासारखीं अनुष्ठानें करण्याची पद्धति आद्यापिही चालू आहे. जुन्या काळचे गवई लोक श्रीशंकराच्या देवालयांत पर्जन्यवृष्टीच्याच उद्देशानें गायनाचें अनुष्ठान करीत. या अनुष्ठानांत एकसारखें मल्हार रागाचेंच गायन करीत असत. या खंडांतील वर्णन वरील गायनाच्या अनुष्ठानाला आधारभूत आहे असें दिसतें.

### अथ चतुर्थः खण्डः ।

**सर्वास्वप्सु पञ्चविधꣳ सामोपासीत मेघो यत्संप्लवते स हिंकारो यद्वर्षति स प्रस्तावो याः प्राच्यः स्यन्दन्ते स उद्गीथो याः प्रतीच्यः स प्रतिहारः समुद्रो निधनम् ॥१॥**

**सर्वासु अप्सु पञ्चविधम् साम उपासीत । यत् मेघः संप्लवते सः हिंकारः यत् वर्षति सः प्रस्तावः याः प्राच्यः स्यन्दन्ते सः उद्गीथः याः प्रतीच्यः (स्यन्दन्ते) सः प्रतिहारः समुद्रः निधनम् ।**

सर्व जलांविषयीं पांच प्रकारच्या सामांची उपासना करावी. जो मेघ एकत्र होतो तो हिंकार, जो वर्षाव होतो तो प्रस्ताव, जें

पाणी पूर्वेकडे वाहतें तो उद्गीथ, जें पश्चिमेकडे वाहतें तो प्रतिहार आणि समुद्र हें विरामस्थान होय.

**न हाप्सु प्रैत्यप्सुमान्भवति य एतदेवं विद्वान्सर्वास्वप्सु पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् सर्वासु अप्सु एतत् पञ्चविधम् साम उपास्ते (सः) अप्सु न प्रैति ह अप्सुमान् भवति।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा ह्या सर्व जलविषयक पांच प्रकारच्या सामांची उपासना करितो तो पाण्यांत बुडत नाहीं आणि त्याला पाणी भरपूर मिळतें.

## चौथ्या खंडाचा सारांश.

सामगायनाच्या योगानें जलदेवतेची उपासना कशी करावयाची, तें पहिल्या मंत्रांत सांगितलें असून, दुसऱ्या मंत्रांत त्या उपासनेचें फल सांगितलें आहे. एवढाच विषय या खंडांत आला असल्यामुळें त्याचें स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नाहीं.

### अथ पञ्चमः खण्डः ।

**ऋतुषु पञ्चविधꣳ सामोपासीत वसन्तो हिंकारो ग्रीष्मः प्रस्तावो वर्षा उद्गीथः शरत्प्रतिहारो हेमन्तो निधनम् ॥ १ ॥**

**ऋतुषु पञ्चविधम् साम उपासीत। वसन्तः हिंकारः ग्रीष्मः प्रस्तावः वर्षा उद्गीथः शरत् प्रतिहारः हेमन्तः निधनम्।**

ऋतूंविषयीं पांच प्रकारच्या सामांची उपासना करावी. वसंत हा हिंकार, ग्रीष्म हा प्रस्ताव, वर्षाऋतु हा उद्गीथ, शरदृतु हा प्रतिहार व हेमंत हें विरामस्थान होय.

**कल्पन्ते हास्मा ऋतव ऋतुमान्भवति य एतदेवं विद्वानृतुषु पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् ऋतुषु एतत् पञ्चविधम् साम उपास्ते अस्मै ऋतवः कल्पन्ते ( सः ) ऋतुमान् भवति ।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा ऋतुविषयक ह्या पांच प्रकारच्या सामांची उपासना करितो, त्याला ऋतु समर्थ करितात आणि सर्व ऋतु त्याला अनुकूल ( उपभोग्य ) होतात.

## पांचव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत ऋतुसंबंधीं सामाचे दोनच मंत्र आले आहेत. सामाच्या वर्णनांत पांच ऋतूंचींच नावें आलीं आहेत. सहा ऋतूंची गणना रूढ होण्याचे अगोदर एका संवत्सरामध्यें पांचच ऋतु मानले जात होते, असें इतिहासज्ञांचें मत आहे. प्राचीन वैदिक कालांत पांच ऋतूंची गणना सुरू असली तरी, वैदिक कालाच्या उत्तरार्धांत सहा ऋतूंची गणना सुरू झाली होती. तैत्तिरीय संहितेंतील चौथ्या अष्टकाच्या चौथ्या प्रपाठकामध्यें दोन दोन महिन्यांचा एक एक ऋतु, अशीं बारा महिन्यांचीं व सहा ऋतूंचीं नावें सांगितलीं आहेत. तथापि पांच ऋतूंची जुनी पद्धति छांदोग्याचे वेळीं देखील चालू होती असें समजण्यास हरकत नाहीं. शिवाय ‘ पञ्च-पादं पितरं ’ या ऋचेंत पांच ऋतूंचाच उल्लेख आला आहे ( उ. नि. र. प्र. प्रश्नोपनिषद १०.११ पृ. १९–२० ). यावरून तैत्तिरीय संहितेंतील सहा ऋतूंची गणनापद्धति नवी असून ऋक्संहितेंतील पांच ऋतूंची पद्धति जुनी आहे असें ठरतें. ही जुनी पद्धति छान्दोग्यकारांना संमत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**अथ षष्ठः खण्डः ।**

**पशुषु पञ्चविधꣳ सामोपासीताजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनम् ॥ १ ॥**

**पशुषु पञ्चविधम् साम उपासीत। अजाः हिंकारः अवयः प्रस्तावः गावः उद्गीथः अश्वाः प्रतिहारः पुरुषः निधनम्।**

पशूंविषयीं पांच प्रकारच्या सामांची उपासना करावी. शेळ्या हा हिंकार, मेंढ्या हा प्रस्ताव, गायी हा उद्गीथ, घोडे हा प्रतिहार, आणि मनुष्य हें विरामस्थान होय.

**भवन्ति हास्य पशवः पशुमान्भवति य एतदेवं विद्वान्पशुषु पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् पशुषु एतत् पञ्चविधम् साम उपास्ते (सः) पशुमान् भवति अस्य पशवः भवन्तिः।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा पशुविषयक, ह्या पांच प्रकारच्या सामांची उपासना करितो तो पशुसंपन्न होतो आणि त्याला पशु वश असतात.

## सहाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडाच्या पहिल्या मंत्रांत शेळ्या, मेंढ्या, गाई, घोडे यांच्याबरोबर मनुष्यांचा देखील पशु म्हणूनच उल्लेख आला आहे. तो नरमेधाचा स्मारक असावा असा कित्येकांचा तर्क आहे. नरमेध कधीं काळीं सुरू असला तरी, वैदिक धर्माच्या प्रारंभापासूनच शिष्ट अशा वैदिक ऋषींनीं त्याचा निषेध केला आहे. तथापि तामसी स्वभावाचे लोक क्वचित् प्रसंगीं हें निषिद्ध कर्म करीत असावेत, असें जरासंधाच्या कथेवरून वाटतें. जरासंध नरमेध करीत होता, म्हणून भगवान श्रीकृष्णानें तेंच निमित्त पुढें करून जरासंधाबरोबर युद्ध उपस्थित केलें. नरमेधाकरितां पकडून ठेवलेल्या क्षत्रियांना तरी सोडावें, नाहींतर युद्धास तयार व्हावें, असें श्रीकृष्णाचें जरासंधास आव्हान होतें. ( महाभारत, सभापर्व अ. २२ श्लोक ८ ते २६ ). पुरुषसूक्तांत देखील ‘ अबध्नन्पुरुषं पशुम् ’ असा नरमेधाचा उल्लेख यज्ञाच्या रूपकांत आलेला आहे. या नरमेधाच्या कल्पनेमुळेंच मनु-

ष्याला यज्ञीय पशु असें कित्येक ठिकाणीं म्हटलें आहे. मात्र या मनुष्य-रूपी पशूंच्या प्रत्यक्ष वधाचा उलेख यज्ञांत कोठेंही आढळून येत नाहीं. या पचविध सामांत वरील रूढीला अनुसरूनच मनुष्याची यज्ञीय पशूंमध्यें गणना केली आहे.

**अथ सप्तमः खण्डः ।**

**प्राणेषु पञ्चविधं परोवरीयः सामोपासीत प्राणो हिंकारो वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रोत्रं प्रतिहारो मनो निधनं परोवरीयाꣳसि वा एतानि ॥ १ ॥**

**प्राणेषु पञ्चविधम् परोवरीयः साम उपासीत । प्राणः हिंकारः वाक् प्रस्तावः चक्षुः उद्गीथः श्रोत्रम् प्रतिहारः मनः निधनम् । एतानि परोवरीयांसि(सामानि) वै।**

प्राणांविषयीं ( इंद्रियांविषयीं ) पांच प्रकारच्या सांगोपांग सामांची उपासना करावी. प्राण हा हिंकार, वाणी हा प्रस्ताव, नेत्र हा उद्गीथ, कान हा प्रतिहार आणि मन हें विरामस्थान होय. हींच सांगोपांग सामें होत.

**परोवरीयो हास्य भवति परोवरीयसो ह लोकाञ्जयति य एतदेवं विद्वान्प्राणेषु पञ्चविधं परोवरीयः सामोपास्त इति तु पञ्चविधस्य ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् एतत् प्राणेषु पञ्चविधम् परोवरीयः साम उपास्ते अस्य परोवरीयः भवति ह ( सः ) परोवरीयसः लोकान् जयति । इति तु पञ्चविधस्य ( साम्नः उपासनम् )।**

जो ह्याप्रमाणें जाणणारा ह्या पांच प्रकारच्या सांगोपांग सामांची उपासना करितो, तो सर्वांगपूर्ण होतो आणि त्याला सर्व लोक प्राप्त होतात. ह्याप्रमाणें ही पांच प्रकारच्या सामांची उपासना आहे.

## सातव्या खंडाचा सारांश.

प्राण व इंद्रियें यांची सामगायनाच्या योगानें उपासना कशी करावी व, त्या उपासनेचें फल काय, एवढे दोनच विषय या खंडाच्या दोन मंत्रांत सांगितले आहेत.

### अथाष्टमः खण्डः ।

**अथ सप्तविधस्य वाचि सप्तविधꣳ सामोपासीत यत्किं च वाचो हुमिति स हिंकारो यत्प्रेति स प्रस्तावो यदेति स आदिः यदुदिति स उद्‌गीथो· यत्प्रतीति स प्रतिहारो यदुपेति स उपद्रवो यन्नीति तन्निधनम् ॥ १ ॥**

अथ सप्तविधस्य ( साम्नः उपासनम् ) । वाचि सप्तविधम् साम उपासीत यत् किम् च वाचः हुम् इति सः हिंकारः यत् प्र इति सः प्रस्तावः यत् आ इति सः आदिः यत् उत् इति सः उद्गीथः यत् प्रति इति सः प्रतिहारः यत् उप इति सः उपद्रवः यत् नि इति तत् निधनम् ।

आतां सात प्रकारच्या सामांची उपासना सांगतात. वाणीविषयीं सात प्रकारच्या सामांची उपासना करावी. वाणींत जो हुं असा शब्द असतो तो हिंकार, जो प्र असा शब्द असतो तो प्रस्ताव, जो आ असा शब्द असतो तो आदि ( ॐकार ), जो उत् असा शब्द असतो तो उद्गीथ, जो प्रति असा शब्द असतो तो प्रतिहार, जो उप असा शब्द असतो तो उपद्रव आणि जो नि असा शब्द असतो तें विरामस्थान होय.

**दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतदेवं विद्वान्वाचि सप्तविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

यः एवम् विद्वान् एतत् वाचि सप्तविधम् साम उपास्ते अस्मै वाक् यः वाचः दोहः ( तम् ) दोहम् दुग्धे । (सः) अन्नवान् अन्नादः भवति ।

जो ह्याप्रमाणें जाणणारा ह्या वाणीविषयक सात प्रकारच्या सामांची उपासना करितो त्याला वाणी, वाणीचें फळ देतें. तो संपत्तिवान् व उपभोगसामर्थ्यवान् होतो.

## आठव्या खंडाचा सारांश.

मागील खंडापर्यंत पंचविध सामाचें वर्णन झालें. या खंडापासून सप्तविध सामाचें वर्णन सुरू झालें आहे. यांत सामगायनांतील सात भागांचा उल्लेख केला आहे. हिंकार, प्रस्ताव, आदि, उद्गीथ, प्रतिहार, उपद्रव आणि विधन अशीं या सात विभागांची नावें आहेत. हे विभाग म्हणजे सामगायनाचे अवयवच होत. यांपैकी पांच अवयवांचा उल्लेख पंचविध सामांत झाला आहे. त्यांत आदि व उपद्रव हे दोन अवयव भरीस घालून सात प्रकार येथें वर्णिले आहेत. वैदिक वाङ्मयांतीलच शब्दांचा किंवा अक्षरांचा ते ते अवयव गातांना उपयोग करावा असा पहिल्या व दुसऱ्या मंत्रांत दिलेल्या शब्दांचा किंवा अक्षरांचा अभिप्राय आहे.

### अथ नवमः खण्डः ।

**अथ खल्वमुमादित्यꣳ सप्तविधꣳ सामोपासीत सर्वदा समस्तेन साम मां प्रति मां प्रतीति सर्वेण समस्तेन साम ॥ १ ॥**

**अथ खलु अमुम् आदित्यम् सप्तविधम् साम उपासीत । (सः) सर्वदा समस्तेन साम (इति उच्यते) । माम् प्रति माम् प्रति इति सर्वेण समस्तेन साम (वर्तते) ।**

तसेंच ह्या सूर्याची सात प्रकारच्या सामानें उपासना करावी. तो ( सूर्य ) नेहमीं संपूर्ण असतो म्हणून त्याला साम असें म्हणतात. तो माझ्या समोर आहे, माझ्या समोर आहे, असें सर्वांना वाटत असल्यामुळें तो सर्वांच्या साम ( समोर ) असतो.

सात प्रकारच्या सामगायनानें सूर्याची उपासना करावी, असें या मंत्रांत सांगितलें आहे. सूर्य हीच सामगायनाची मुख्य देवता समजावी. सर्वांचें

कल्याण करणारा म्हणून सूर्याला साम ही संज्ञा देतां येते. शिवाय हा सूर्य नेहमीं पूर्ण असून आपल्यासमोर आहे, असें जगांतील सर्व प्राण्यांना वाटतें. सर्वांना सम दिसणारा म्हणून सूर्य हा साम होय. असा साम शब्दाशीं सूर्याचा संबंध या मंत्रांत दाखविला आहे.

**तस्मिन्निमानि सर्वाणि भूतान्यन्वायत्तानीति विद्यात्तस्य यत्पुरोदयात्स हिंकारस्तदस्य पशवोऽन्वायत्तास्तस्मात्ते हिंकुर्वन्ति हिंकारभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ २ ॥**

**तस्मिन् इमानि सर्वाणि भूतानि अन्वायत्तानि इति विद्यात्। तस्य यत् उदयात् पुरा सः हिंकारः तत् अस्य पशवः अन्वायत्ताः।हि एतस्य साम्नः हिंकार-भाजिनः तस्मात् ते हिम् कुर्वन्ति।**

त्या सूर्याचे ठिकाणीं हीं सर्व भूतें ( प्राणिमात्र ) संबद्ध आहेत असें जाणावें. त्या सूर्याच्या उदयापूर्वीचा जो काळ, ( अरुणोदय ) तो हिंकार होय; त्याच्याशीं पशु संबद्ध असतात. ते ह्या सामरूपी सूर्याचा हिंकार धारण करणारे असल्यामुळें, हिं असा शब्द करि-तात.

**अथ यत्प्रथमोदिते स प्रस्तावस्तदस्य मनुष्या अन्वायत्ता-स्तस्मात्ते प्रस्तुतिकामाः प्रशंसाकामाः प्रस्तावभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ३ ॥**

**अथ यत् प्रथमोदिते ( रूपम् ) सः प्रस्तावः। अस्य तत् मनुष्याः अन्वा-यत्ताः। तस्मात् ते एतस्य साम्नः प्रस्तुतिकामाः प्रशंसाकामाः प्रस्तावभाजिनः ( भवन्ति ) हि।**

आतां जें ( सूर्याचें ) प्रथम उदयकालीं रूप असतें, तोच प्रस्ताव होय. सूर्याच्या त्या रूपाला मनुष्यें संबद्ध असतात, म्हणून तीं ह्या ( सूर्यरूपी ) सामाची स्तुति करणारीं, वर्णन करणारीं, व प्रस्ताव गाणारीं होतात.

**अथ यत्संगववेलायाꣳ स आदिस्तदस्य वयाꣳस्यन्वायत्तानि तस्मात्तान्यन्तरिक्षेऽनारम्बणान्यादायात्मानं परिपतन्त्यादिभाजीनि ह्येतस्य साम्नः ॥ ४ ॥**

**अथ यत् संगववेलायाम् ( रूपम् ) सः आदिः । अस्य तत् वयांसि अन्वायत्तानि । तस्मात् तानि अनारम्बणानि आत्मानम् आदाय अन्तरिक्षे परिपतन्ति एतस्य साम्नः आदिभाजीनि ( भवन्ति ) ह।**

आतां संगवकाळीं ( ४ ते ८ घटिका सकाळीं ) सूर्याचें रूप असतें तो आदि ( ॐकार ) होय. सूर्याच्या त्या रूपाला पक्षी संबद्ध असतात. म्हणून ते निराधार अंतराळीं होऊन आकाशांत उडतात. आणि ह्या ( सूर्यरूपी ) सामाचा आदि या नांवाचा भाग गाणारे होतात.

**अथ यत्संप्रति मध्यंदिने स उद्गीथस्तदस्य देवा अन्वायत्तास्तस्मात्ते सत्तमाः प्राजापत्यानामुद्गीथभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ५ ॥**

**अथ संप्रति यत् मध्यंदिने ( रूपम् ) सः उद्गीथः । अस्य तत् देवाः अन्वायत्ताः तस्मात् सत्तमाः ते एतस्य साम्नः प्राजापत्यानाम् उद्गीथभाजिनः ( भवन्ति ) हि।**

आतां आणखी जें मध्यान्हकाळीं ( सूर्याचें ) रूप असतें तो उद्गीथ होय. सूर्याच्या त्या रूपाला देव संबद्ध असतात. म्हणून श्रेष्ठ असे ते देव ह्या ( सूर्यरूपी ) सामाचे प्राजापत्य मंत्रांचें उद्गीथ गाणारे होतात.

**अथ यदूर्ध्वं मध्यंदिनात्प्रागपराह्णात्स प्रतिहारस्तदस्य गर्भा अन्वायत्तास्तस्मात्ते प्रतिहृता नावपद्यन्ते प्रतिहारभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ६ ॥**

अथ यत् मध्यंदिनात् ऊर्ध्वम् अपराह्णात् प्राक् ( रूपम् ) सः प्रतिहारः। अस्य तत् गर्भाः अन्वायत्ताः। तस्मात् ते प्रतिहृताः न अवपद्यन्ते। एतस्य साम्नः प्रतिहारभाजिनः ( भवन्ति ) हि।

आतां जें मध्यान्हानंतर पण अपराह्णकालाच्या पूर्वी ( सूर्याचें ) रूप असतें तो प्रतिहार होय. सूर्याच्या ह्या रूपाला गर्भ संबद्ध असतात, म्हणून नष्ट होत नाहींत व पतन पावत नाहींत. ते ह्या ( सूर्यरूपी ) सामाचे प्रतिहार गाणारे होतात.

**अथ यदूर्ध्वमपराह्णात्प्रागस्तमयात्सउपद्रवस्तदस्यारण्या अन्वायत्तास्तस्मात्ते पुरुषं दृष्ट्वा कक्षँ श्वभ्रमित्युपद्रवन्त्युपद्रवभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ७ ॥**

अथ यत् अपराह्णात् ऊर्ध्वम् अस्तमयात् प्राक् सः उपद्रवः । अस्य तत् आरण्याः अन्वायत्ताः। तस्मात् ते पुरुषम् दृष्ट्वा श्वभ्रम् कक्षम् इति उपद्रवन्ति। एतस्य साम्नः उपद्रवभाजिनः ( भवन्ति ) हि।

आतां जें अपराह्णानंतर पण सूर्यास्तापूर्वी ( सूर्याचें ) रूप असतें तो उपद्रव होय. सूर्याच्या त्या रूपाला वन्यपशु संबद्ध असतात. म्हणून ते मनुष्याला पाहून निर्भय अरण्यांत जातात. व ह्या ( सूर्यरूपी ) सामाचे उपद्रव गाणारे होतात.

**अथ यत्प्रथमास्तमिते तन्निधनं तदस्य पितरोऽन्वायत्तास्तस्मात्तान्निदधति निधनभाजिनो ह्येतस्य साम्न एवं खल्वमुमादित्यँ सप्तविधँ सामोपास्ते ॥ ८ ॥**

अथ यत् प्रथमास्तमिते ( रूपम् ) तत् निधनम्। अस्य तत् पितरः अन्वायत्ताः। तस्मात् तान् निदधति। एतस्य साम्नः निधनभाजिनः ( भवन्ति ) हि। एवम् खलु अमुम् आदित्यम् सप्तविधम् साम उपास्ते।

आतां जें ( सूर्याचें ) अस्तंगत होण्याच्या वेळचें रूप, तें निधन होय. ह्या रूपाला पितर संबद्ध असतात. म्हणून त्यांचें स्थापन

होतें आणि ते ह्या ( सूर्यरूपी ) सामाचें निधन गाणारे होतात. ह्याप्रमाणें ह्या आदित्याची सात प्रकारच्या सामरूपानें उपासना करावी.

## नवव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडात सामाच्या सात अवयवांचा सात प्रकारांनीं सूर्याशीं संबंध दाखविला आहे. असें सादृश्य दर्शवितांना अवयवांच्या नांवास जुळेल, अशा रीतीनें निरनिराळ्या काळांचें वर्णन केलें आहे. उषःकालीं पशु शब्द करूं लागतात, त्यावर हिंकाराची कल्पना करून अरुणोदयाचा काल हाच सूर्यरुपी सामाचा हिंकार मानला आहे. सूर्योदयाचे वेळीं पक्ष्यांचा किलकिलाट सुरू होतो, त्याला प्रस्ताव असें मानलें असून, सूर्योदयानंतरच्या कालांत सुरू होणाऱ्या मानवी व्यवहारास आदि या सामावयवाचें रूप दिलें आहे. देव मध्यान्हकालीं कार्यव्यापृत असतात म्हणून त्याला उद्गीथ ही संज्ञा दिली आहे. अपराण्ह कालाच्या पूर्वीं गर्भच्युति होत नाहीं, असें श्रुतीनें या खंडाच्या सहाव्या मंत्रांत म्हटलें आहे. प्रायः सामान्य लोकांची समजूत अशीच आहे. तथापि तज्ज्ञांनीं या विषयाची छाननी करावयास पाहिजे. प्रतिरुद्ध होणाऱ्या या गर्भांना प्रतिहार मानलें असून, सूर्यास्ताचे पूर्वीं गर्द झाडींत निघून जाणाऱ्या रानटी पशूंना उपद्रव असें म्हटलें आहे. सूर्यास्ताशीं संबद्ध असलेल्या पितरांना निधन अशी संज्ञा देऊन एकंदर सात अवयवांची जुळणी केली आहे.

### अथ दशमः खण्डः ।

**अथ खल्वात्मसंमितमतिमृत्यु सप्तविधꣳ सामोपासीत हिंकार इति त्र्यक्षरं प्रस्ताव इति त्र्यक्षरं तत्समम् ॥ १ ॥**

**अथ खलु आत्मसंमितम् अतिमृत्यु सप्तविधम् साम उपासीत । हिंकारः इति त्र्यक्षरं प्रस्तावः इति त्र्यक्षरम् तत् समम् ( भवति )।**

या नंतर स्वतः सामाच्या अवयवांनीं परिगणित अशा अति-मृत्यु नांवाच्या सात प्रकारच्या सामांची उपासना करावी. हिंकार हें तीन अक्षरी साम आणि प्रस्ताव हें तीन अक्षरी साम हीं दोन्हीं समान होतात.

**आदिरिति द्व्यक्षरं प्रतिहार इति चतुरक्षरं तत इहैकं तत्समम् ॥ २ ॥**

**आदिः इति द्व्यक्षरम् प्रतिहारः इति चतुरक्षरम् ततः इह एकम् (आह्रम्) तत् समम् ( भवति )।**

आदि हें दोन अक्षरी साम, व प्रतिहार हें चार अक्षरी साम आहे. त्यां ( दुसऱ्यां ) तून एक अक्षर ह्यां ( पहिल्यां ) त घ्यावें म्हणजे दोन्ही समान होतात.

**उद्गीथ इति त्र्यक्षरमुपद्रव इति चतुरक्षरं त्रिभिस्त्रिभिः समं भवत्यक्षरमतिशिष्यते त्र्यक्षरं तत्समम् ॥ ३ ॥**

**उद्गीथः इति त्र्यक्षरम् उपद्रवः इति चतुरक्षरम्। त्रिभिः त्रिभिः समम् भवति त्र्यक्षरम् अक्षरम् अतिशिष्यते तत् समम्।**

उद्गीथ हें तीन अक्षरी साम व उपद्रव हें चार अक्षरी साम आहे, तीन तीन अक्षरांनीं दोन्ही समान होऊन एक ( अक्षर ) तीन अक्षरी ' अक्षर ' शिल्लक उरतें, म्हणून तेंहि तत्समान होतें.

**निधनमिति त्र्यक्षरं तत्सममेव भवति तानि ह वा एतानि द्वाविंशतिरक्षराणि ॥ ४ ॥**

**निधनम् इति त्र्यक्षरम् तत् समम् एव भवति। तानि एतानि द्वाविंशतिः अक्षराणि ह वै ( भवन्ति )।**

निधन हें तीन अक्षरी साम आहे. तें सम म्हणजे तीन अक्षरींच आहे. तीं हीं बावीस अक्षरें होतात.

**एकविꣳशत्यादित्यमाप्नोत्येकविꣳशो वा इतोऽसावादित्यो द्वाविꣳशेन परमादित्याज्जयति तन्नाकं तद्विशोकम् ॥ ५ ॥**

एकविंशति ( साम ) आदित्यम् आप्नोति । इतः एकविंशः असौ आदित्यः वै । द्वाविंशेन आदित्यात् परम् जयति तत् नाकम् तत् विशोकम् ।

एकवीस अक्षरी साम आदित्याला पोंचतें. हा सूर्य येथून एकविसावा आहे बाविसाव्या अक्षरसामानें (उपासक) आदित्याहून पलीकडे जातो. तेंच नाक (स्वर्ग) व तेंच शोकरहित स्थान होय.

**आप्नोति हादित्यस्य जयं परो हास्यादित्यजयाज्जयो भवति य एतदेवं विद्वानात्मसंमितमतिमृत्यु सप्तविधꣳ सामोपास्ते सामोपास्ते ॥ ६ ॥**

यः एवम् विद्वान् एतत् आत्मसंमितम् अतिमृत्यु साम उपास्ते ( सः ) आदित्यस्य जयम् आप्नोति । अस्य जयः आदित्यजयात् परः भवति ह ।

जो असें जाणणारा ह्या आत्मसंमित अतिमृत्यु सामाची उपासना करितो, तो सूर्यलोकाला प्राप्त होतो. आणि त्याची गति सूर्यलोकाहून पलीकडे होते. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

## दहाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुन खंडांत वर्णन केलेल्या सामाला, आत्मसंमित किंवा अतिमृत्यु असें म्हटलें आहे. हें साम सप्तविध म्हणजे सात प्रकारचें असून, त्याच्या प्रत्येक अक्षराच्या अवयवाच्या गणनेवरून त्यांतील विभाग बसविले आहेत. गायनाकरितां लागणारे शब्द सोयीप्रमाणेंच घ्यावे लागतात; म्हणून ऱ्हस्वाचे दीर्घ व दीर्घाचे ऱ्हस्व स्वर करावे लागतात; इतकेंच नव्हे तर, कांहीं अधिक अक्षरेंही भरतीला घ्यावीं लागतात व असलेलीं कांहीं अक्षरें सोडावीं लागतात. तसलाच प्रकार या आत्मसंमित सामाच्या वर्णनांत दर्शविला आहे. आदि व प्रतिहार या शब्दांत त्र्यक्षरी भाग पाडण्याकरितां, प्रतिहार या

शब्दांतील एक अक्षर आदि या शब्दास जोडण्यास सांगितलें आहे. या सामोपासनेच्या योगानें मृत्यूचा परिहार होतो ह्मणूनच त्याला अतिमृत्यु असें नांव दिलें आहे.

अथ एकादशः खण्डः ।

**मनो हिंकारो वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रोत्रं प्रतिहारः प्राणो निधनमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतम् ॥ १ ॥**

**मनः हिंकारः वाक् प्रस्तावः चक्षुः उद्गीथः श्रोत्रम् प्रतिहारः प्राणः निधनम् एतत् गायत्रम् ( साम ) प्राणेषु प्रोतम् ।**

मन हा हिंकार, वाणी हा प्रस्ताव, नेत्र हा उद्गीथ, कर्ण हा प्रतिहार, आणि प्राण हें विरामस्थान होय. असें हें गायत्र नामक साम प्राणांमध्यें प्रतिष्ठित आहे.

**स एवमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतं वेद प्राणी भवति सर्व-मायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या महामनाः स्यात्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**यः एतत् गायत्रम् प्राणेषु प्रोतम् ( साम ) एवम् वेद सः प्राणी भवति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति। महामनाः स्यात् तत् व्रतम् ।**

जो हें गायत्र नामक प्राणामध्यें प्रतिष्टित असलेलें साम ह्या-प्रमाणें जाणतो, तो प्राणवान् ( सामर्थ्यवान् ) होतो; पूर्णायुषी होतो; तेजस्वीपणें जीवन चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. मनानें मोठें असावें, हें गायत्रसामव्रत होय.

## अकराव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडात वर्णन केलेल्या सामाचें गायत्र हें नामाभिधान असून, प्राण ही त्याची मुख्य देवता आहे. वाणी, मन, चक्षु इत्यादि इंद्रियांशीं

सामाच्या अवयवांचें ऐक्य पहिल्या मंत्रांत दाखविलें आहे. या प्रकारें साम-गायन करणाऱ्याची प्राणशक्ति वृद्धिंगत होते, असें या सामाचें फल दुसऱ्या मंत्रांत सांगितलें आहे. गाणाऱ्याच्या प्राणसामर्थ्याचें संरक्षण करणारें अशा अर्थानेंच या सामाला ' गायत्र ' असें अन्वर्थक नांव दिलें आहे.

**अथ द्वादशः खण्डः ।**

**अभिमन्थति स हिंकारो धूमो जायते स प्रस्तावो ज्वलति स उद्गीथोऽङ्गारा भवन्ति स प्रतिहार उपशाम्यति तन्निधनꣳ सꣳशामति तन्निधनमेतद्रथंतरमग्नौ प्रोतम् ॥ १ ॥**

**अभिमन्थति सः हिंकारः धूमः जायते सः प्रस्तावः ज्वलति सः उद्गीथः अङ्गाराः भवन्ति सः प्रतिहारः उपशाम्यति तत् निधनम् संशाम्यति तत् निध-नम् एतत् रथन्तरम् (साम) अग्नौ प्रोतम्।**

अग्निमंथन होतें हिंकार, धूर निघतो तो प्रस्ताव, जाळ निघतो तो उद्गीथ, निखारे होतात तो प्रतिहार, विझूं लागणें हें विरामस्थान, विझणें हें विरामस्थान होय. हें रथंतर साम अग्नी-मध्यें प्रतिष्ठित आहे.

**स य एवमेतद्रथंतरमग्नौ प्रोतं वेद ब्रह्मवर्चस्यन्नादो भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या न प्रत्यङ्ङग्निमाचामेन्न निष्ठीवेत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**यः एतत् रथंतरम् अग्नौ प्रोतम् ( साम )एवम् वेद सः ब्रह्मवर्चसी अन्नादः भवति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति। अग्निम् प्रत्यक् न आचामेत् न निष्ठीवेत् तत् व्रतम्।**

जो हें रथंतर नामक अग्नीमध्यें प्रतिष्ठित असलेलें साम, ह्या-प्रमाणें जाणतो, तो तेजस्वी, ज्ञानवान्, उपभोक्ता होतो; पूर्णा-युषी होतो; तेजस्वीपणें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें

मोठा व कीर्तीनें मोठा होतो. अग्नीच्या समोर खाऊं नये व थुंकूं नये हें व्रत असावें.

## बाराव्या खंडाचा सारांश.

पहिल्या मंत्रांत रथंतर सामाचें वर्णन असून दुसऱ्या मंत्रांत त्याचें फल सांगितलें आहे. अग्निमंथन, धूमोत्पत्ति, ज्वाला, इत्यादिकांशीं या पंचविध सामाच्या अवयवांचें ऐक्य दाखविलें आहे. या सामाची, अग्नि ही मुख्य देवता असून, अग्नीच्या रथंतर नांवावरूनच या सामाला ही संज्ञा प्राप्त झाली आहे.

**अथ त्रयोदशः खण्डः ।**

**उपमन्त्रयते स हिंकारो ज्ञपयते स प्रस्तावः स्त्रिया सह शेते स उद्गीथः प्रति स्त्रीं सह शेते स प्रतिहारः कालं गच्छति तन्निधनं पारं गच्छति तन्निधनमेतद्वामदेव्यं मिथुने प्रोतम् ॥ १ ॥**

**उपमन्त्रयते सः हिंकारः ज्ञपयते सः प्रस्तावः स्त्रिया सह शेते सः उद्गीथः स्त्रीम् प्रति शेते सः प्रतिहारः कालम् गच्छति तत् निधनम् पारम् गच्छति तत् निधनम्। एतत् वामदेव्यम् साम मिथुने प्रोतम्।**

( स्त्रीपुरुषांचा ) संकेत होतो तो हिंकार, आनंद होतो तो प्रस्ताव, स्त्रीसह शयन होतें तो उद्गीथ, स्त्रीसंयुक्त ( आलिंगनयुक्त ) शयन होतें तो प्रतिहार, यथाकालीं संभोग होतो तें विरामस्थान व रतिसमाप्ति होते तेंहि विरामस्थान होय. हें वामदेव्य साम मिथुनांत ( स्त्रीपुरुषांच्या जोडींत ) प्रतिष्ठित असतें.

**स य एवमेतद्वामदेव्यं मिथुने प्रोतं वेद मिथुनी भवति मिथुनान्मिथुनात्प्रजायते सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या न कांचन परिहरेत्तद्व्रतम् ।१**

यः एतत् वामदेव्यम् मिथुने प्रोतम् ( साम) एवम् वेद सः मिथुनी भवति मिथुनात् मिथुनात् प्रजायते सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति । कांचन न परिहरेत् तत् व्रतम्।

जो हें वामदेव्य नामक मिथुनाधिष्ठित साम ह्याप्रमाणें जाणतो, तो सजोड होतो; (त्याला स्त्री प्राप्त होते.) त्याला प्रत्येक संभोगापासून प्रजोत्पत्ति होते; तो पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा होतो व कीर्तीनें मोठा होतो. कोणाही स्त्रीचा त्याग करूं नये हें व्रत होय.

टीपः--या खंडांत स्त्रीपुरुषसमागमाचें वर्णन केलें आहे, त्याचें स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं.

**अथ चतुर्दशः खण्डः ।**

**उद्यन्हिंकार उदितः प्रस्तावो मध्यंदिन उद्गीथोऽपराह्णः प्रतिहारोऽस्तं यन्निधनमेतद्बृहदादित्ये प्रोतम् ॥ १ ॥**

उद्यन् हिंकारः उदितः प्रस्तावः मध्यंदिनः उद्गीथः अपराह्णः प्रतिहारः यत् अस्तम् ( तत् ) निधनम् एतत् बृहत् ( साम ) आदित्ये प्रोतम्।

( सूर्य ) अर्धोदित हा हिंकार, उदय पावलेला हा प्रस्ताव, मध्यान्ह हा उद्गीथ, अपराण्ह हा प्रतिहार व जो अस्त तें विरामस्थान होय. हें बृहत् साम सूर्यामध्यें प्रतिष्ठित असतें.

**स य एवमेतद्बृहदादित्ये प्रोतं वेद तेजस्व्यन्नादो भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या तपन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

यः एतत् आदित्ये प्रोतम् बृहत् ( साम ) एवम् वेद सः तेजस्वी अन्नादः भवति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति। तपन्तम् न निन्देत् तत् व्रतम्।

जो हें सूर्यामध्यें अधिष्ठित असलेलें बृहत् नामक साम ह्या-प्रमाणें जाणतो तो तेजस्वी व उपभोक्ता होतो; पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. प्रकाशमान सूर्याची निंदा करूं नये, हें व्रत असावें.

## चौदाव्या खंडाचा सारांश.

पहिल्या मंत्रांत सूर्या या पांच अवस्थांशीं पंचविध सामाचें ऐक्य दाखविलें असून, दुसऱ्या मंत्रांत त्याचे फल सांगितलें आहे. या बृहत्सामाची सूर्य ही मुख्य देवता आहे. सूर्य देवतेवरूनच या सामाला बृहत् हें नांव पडलें असावें. उन्हाचा त्रास झाला तरी देखील सूर्याची निन्दा मनानें अगर शब्दानें करावयाची नाहीं हेंच या सामगायनांतील व्रत आहे.

### अथ पञ्चदशः खण्डः ।

**अभ्राणि संप्लवन्ते स हिंकारो मेघो जायते स प्रस्तावो वर्षति स उद्गीथो विद्योतते स्तनयति स प्रतिहार उद्गृह्णाति तन्निधनमेतद्वैरूपं पर्जन्ये प्रोतम् ॥ १ ॥**

**अभ्राणि संप्लवन्ते सः हिंकारः मेघः जायते सः प्रस्तावः वर्षति सः उद्गीथः विद्योतते स्तनयति सः प्रतिहारः उद्गृह्णाति तत् निधनम् । एतत् वैरूपम् (साम) पर्जन्ये प्रोतम्।**

ढग फिरतात तो हिंकार, मेघ तयार होतात तो प्रस्ताव, वृष्टि होते तो उद्गीथ, वीज चमकते व गर्जना होते तो प्रतिहार, आणि ( वाफ होऊन ) वर जाते तें विरामस्थान होय. हे वैरूप नामक साम पर्जन्यांत अधिष्ठित असतें.

**स य एवमेतद्वैरूपं पर्जन्ये प्रोतं वेद विरूपाꣳश्च सुरूपाꣳश्च पशूनवरुन्धे सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या वर्षन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

यः एतत् वैरूपम् पर्जन्ये प्रोतम् (साम) एवम् वेद सः विरूपान् च सुरूपान् च पशून् अवरुन्धे। सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति। वर्षन्तम् न निन्देत् तत् व्रतम्।

जो हें वैरूप नामक पर्जन्यांत अधिष्ठित असलेलें साम ह्याप्रमाणें जाणतो, त्याला भिन्न वर्णाचे व एक वर्णाचे पशु प्राप्त होतात; तो पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. वर्षत असलेल्या पर्जन्याची निंदा करूं नये हें व्रत असावें.

टीपः—या खण्डांत वर्णन केलेल्या वैरूप सामाचें स्वरूप व फल मागील वर्णनासारखेंच आहे.

### अथ षोडशः खण्डः ।

**वसन्तो हिंकारो ग्रीष्मः प्रस्तावो वर्षा उद्गीथः शरत्प्रतिहारो हेमन्तो निधनमेतद्वैराजमृतुषु प्रोतम् ॥१॥**

वसन्तः हिंकारः ग्रीष्मः प्रस्तावः वर्षा उद्गीथः शरत् प्रतिहारः हेमन्तः निधनम् एतत् वैराजम् (साम) ऋतुषु प्रोतम्।

वसन्त हा हिंकार, ग्रीष्म हा प्रस्ताव वर्षाऋतु हा उद्गीथ शरदृतु हा प्रतिहार आणि हेमंतऋतु हें विरामस्थान होय. हें वैराज नामक साम, ऋतूंमध्यें अधिष्ठित असतें.

**स य एवमेतद्वैराजमृतुषु प्रोतं वेद विराजति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्यर्तून्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥**

यः एतत् वैराजम् ऋतुषु प्रोतम् ( साम ) वेद सः प्रजया पशुभिः ब्रह्मवर्चसेन विराजते सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति। ऋतून् न निन्देत् तत् व्रतम्।

जो हें वैराजनामक, ऋतूंत अधिष्ठित असलेलें साम ह्याप्रमाणें जाणतो, तो संतति, संपत्ती व तेजस्वी विद्या ह्यानीं शोभतो; पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. ऋतूची निंदा करूं नये हें व्रत असावें.

टीपः——विशेष शोभणारे अशा अर्थानेंच या सामाला वैराज हें नांव पडलें आहे. बाकीचें वर्णन पूर्वीसारखेंच आहे.

अथ सप्तदशः खण्डः ।

पृथिवी हिंकारोऽन्तरिक्षं प्रस्तावो द्यौरुद्गीथो दिशः प्रतिहारः समुद्रो निधनमेताः शक्कर्यो लोकेषु प्रोताः ॥१॥

पृथिवी हिंकारः अन्तरिक्षम् प्रस्तावः द्यौः उद्गीथः दिशः प्रतिहारः समुद्रः निधनम् एताः शक्कर्यः लोकेषु प्रोताः।

पृथ्वी हा हिंकार, वातावरण हा प्रस्ताव, नक्षत्रलोक हा उद्गीथ, दिशा हा प्रतिहार, व समुद्र हें विरामस्थान होय. हीं शक्करी नामक सामें, विश्वामध्यें अधिष्ठित असतात.

स य एवमेताः शक्कर्यो लोकेषु प्रोता वेद लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या लोकान्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २॥

यः एताः शक्कर्यः लोकेषु प्रोताः एवम् वेद सः लोकी भवति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति । लोकान् न निन्देत् तत् व्रतम् ।

जो हीं शक्वरी नामक, विश्वांत अधिष्ठित असलेलीं सामें ह्याप्रमाणें जाणतो, तो लोकवान् म्हणजे जगांत श्रेष्ठ होतो; पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. विश्वाची निंदा करूं नये हें व्रत असावें.

टीपः--शक्वरी हें सामाचें नांव असून हा शब्द नित्य बहुवचनी असतो. बाकी वर्णन पूर्वीप्रमाणेंच आहे.

अथाष्टादशः खण्डः ।

**अजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनमेता रेवत्यः पशुषु प्रोताः ॥१॥**

**अजाः हिंकारः अवयः प्रस्तावः गावः उद्गीथः अश्वाः प्रतिहारः पुरुषः निधनम् एताः रेवत्यः पशुषु प्रोताः ।**

शेळ्या हा हिंकार, मेंढ्या हा प्रस्ताव,गायी हा उद्गीथ,घोडे हा प्रतिहार आणि पुरुष हें विरामस्थान होय. हीं रेवती नामक सामें, पशूंमध्यें अधिष्ठित असतात.

**स य एवमेता रेवत्यः पशुषु प्रोता वेद पशुमान्भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या पशून्ननिन्देत्तद्व्रतम् ॥२॥**

**यः एताः रेवत्यः पशुषु प्रोताः एवम् वेद सः पशुमान् भवति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति । पशून् न निन्देत् तत् व्रतम् ।**

जो हीं रेवतीनामक, पशूंमध्यें अधिष्ठित असलेलीं सामें ह्याप्रमाणें जाणतो, तो पशूंनीं संपन्न होतो; पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. पशूंची निंदा करूं नये हें व्रत असावें.

टीपः—रेवती हा शब्द देखील नित्य बहुवचनीच आहे. वर्णन पूर्वीसारखेंच.

**अथैकोनविंशः खण्डः ।**

**लोम हिंकारस्त्वक्प्रस्तावो माꣳसमुद्गीथोऽस्थि प्रतिहारो मज्जा निधनमेतद्यज्ञायज्ञीयमङ्गेषु प्रोतम् ॥१॥**

**लोम हिंकारः त्वक् प्रस्तावः मांसम् उद्गीथः अस्थि प्रतिहारः मज्जा निधनम् एतत् यज्ञायज्ञीयम् अङ्गेषु प्रोतम्।**

केस हा हिंकार, त्वचा हा प्रस्ताव, मांस हा उद्गीथ, अस्थि हा प्रतिहार, मज्जा हें विरामस्थान होय. हें यज्ञायज्ञीय नामक साम शरीरांत अधिष्ठित असतें.

**स य एवमेतद्यज्ञायज्ञीयमङ्गेषु प्रोतं वेदाङ्गी भवति नाङ्गेन विहूर्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या संवत्सरं मज्ज्ञो नाश्नीयात्तद्व्रतं मज्ज्ञो नाश्नीयादिति वा ॥२॥**

**यः एतत् यज्ञायज्ञीयम् अङ्गेषु प्रोतम् ( साम ) एवम् वेद सः अङ्गी भवति अङ्गेन न विहूर्छति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति। संवत्सरम् मज्ज्ञः न अश्नीयात् तत् व्रतम् मज्ज्ञः न अश्नीयात् वा इति।**

जो हें यज्ञायज्ञीय नामक, शरीरांत अधिष्ठित असलेलें साम ह्याप्रमाणें जाणतो, तो शरीरवान् होतो म्हणजे शरीरानें विकल ( व्यंग ) होत नाहीं; पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनें मोठा होतो. वर्षभर मांस सेवन करूं नये किंवा ( कधींही ) मांस सेवन करूं नये हें व्रत असावें.

टीपः—एक वर्षभर मांसाहाराचा त्याग करणें किंवा कायमचा त्याग करणें हेंच या सामाचें व्रत सांगितलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. इतर वर्णन पूर्वीप्रमाणेंच आहे.

**अथ विंशः खण्डः ।**

**अग्निर्हिंकारो वायुः प्रस्ताव आदित्य उद्गीथो नक्षत्राणि प्रतिहारश्चन्द्रमा निधनमेतद्राजनं देवतासु प्रोतम् ॥१॥**

अग्निः हिंकारः वायुः प्रस्तावः आदित्यः उद्गीथः नक्षत्राणि प्रतिहारः चन्द्रमाः निधनम् एतत् राजनम् ( साम ) देवतासु प्रोतम् ।

अग्नि हा हिंकार, वायु हा प्रस्ताव, सूर्य हा उद्गीथ, नक्षत्रें हा प्रतिहार व चंद्र हें विरामस्थान होय. हें राजन नामक साम देवतांमध्यें अधिष्ठित असतें.

**स य एवमेतद्राजनं देवतासु प्रोतं वेदैतासामेव देवतानाꣳ सलोकताꣳ सार्ष्टिताꣳ सायुज्यं गच्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या ब्राह्मणान्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥**

यः एतत् राजनम् देवासु प्रोतम् ( साम ) एवम् वेद सः एतासाम् एव देवतानाम् सलोकताम् सार्ष्टिताम् सायुज्यम् गच्छति सर्वम् आयुः एति ज्योक् जीवति प्रजया पशुभिः महान् कीर्त्या महान् भवति । ब्राह्मणान् न निन्देत् तत् व्रतम् ।

जो हें राजन नामक देवतांमध्यें अधिष्ठित असलेलें साम ह्या प्रमाणें जाणतो, तो देवतांच्या स्थानाला, समान वैभवाला, एकरूपतेला जातो; पूर्णायुषी होतो; तेजस्वी रीतीनें जीवनक्रम चालवितो; संतति संपत्तीनें मोठा व कीर्तीनं मोठा होतो. ब्राह्मणांची निंदा करूं नये हें व्रत असावें.

टीपः—विद्वज्जनाची निंदा न करणें हें या सामाचें वैशिष्टय लक्षांत ठेवण्याजोगें आहे. बाकीचें वर्णन सारखेंच आहे.

**अथैकविंशः खण्डः ।**

**त्रयी विद्या हिंकारस्त्रय इमे लोकाः स प्रस्तावोऽग्निर्वायुरादित्यः स उद्गीथो नक्षत्राणि वयाꣳसि मरीचयः स**

**प्रतिहारः सर्पा गन्धर्वाः पितरस्तन्निधनमेतत्साम सर्वस्मिन्प्रोतम् ॥१॥**

**त्रयी विद्या हिंकारः इमे त्रयः लोकाः सः प्रस्तावः अग्निः वायुः आदित्यः सः उद्गीथः नक्षत्राणि वयांसि मरीचयः सः प्रतिहारः सर्पाः गन्धर्वाः पितरः तत् निधनम्। एतत् साम सर्वस्मिन् प्रोतम्।**

तीन वेद हा हिंकार, हे (भूः भुवः सुवः) तीन लोक हा प्रस्ताव, अग्नि वायु व आदित्य हा उद्गीथ, नक्षत्रें पक्षी व किरण हा प्रतिहार, सर्प गंधर्व आणि पितर हें विरामस्थान होय. हें साम सर्वत्र अधिष्ठित असतें.

**स य एवमेतत्साम सर्वस्मिन्प्रोतं वेद सर्वꣳ ह भवति॥२॥**

**यः एतत् सर्वास्मिन् प्रोतम् साम एवम् वेद सः सर्वम् भवति ह।**

जो हें सर्वत्र अधिष्ठित असलेलें साम ह्याप्रमाणें जाणतो, तो सर्वस्वरूप होतो.

पहिल्या व दुसऱ्या मंत्रांत सर्व जगाचें सामरूपानें वर्णन केलें आहे. पहिल्या मंत्रांत गंधर्वांबरोबर सर्पांचाही उल्लेख आला आहे. सूर्य, विद्युत इत्यादिकांप्रमाणेंच सर्व जगही सामगायनाची देवताच समजावी, सर्व विश्वाचें कल्याण व्हावें, आपल्या हातून सर्वांची सेवा घडावी, अशा विश्वरूप भक्तीनें सामगायन करावें असा श्रुतीचा उपदेश आहे.

**तदेष श्लोको यानि पञ्चधा त्रीणि त्रीणि तेभ्यो न ज्यायः परमन्यदस्ति ॥३॥**

**तत् एषः श्लोकः (भवति)। यानि पञ्चधा त्रीणि त्रीणि (सामानि उक्तानि) तेभ्यः परम् ज्यायः अन्यत् न अस्ति।**

त्या (सामा) विषयीं असा श्लोक आहे. जीं वर पांच प्रकारचीं तीनतीनीच्या सामुदायांचीं सामें सांगितलीं, त्यांहून अधिक श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं.

**यस्तद्वेद स वेद सर्वं सर्वा दिशो बलिमस्मै हरन्ति ॥**
**सर्वमस्मीत्युपासीत तद्व्रतं तद्व्रतम् ॥४॥**

**यः तत् ( साम ) वेद सः सर्वम् वेद । अस्मै सर्वाः दिशः बलिम् हरन्ति । सर्वम् अस्मि इति उपासीत तत् व्रतम् ।**

जो तें साम जाणतो तो सर्व जाणतो. सर्व दिशांकडून त्याचा सत्कार होतो. मी सर्व ( विश्व ) आहे, अशी उपासना करावी. तेंच व्रत असावें.

## एकविसाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडाचे चार मंत्र आहेत. पैकीं पहिल्या मंत्रांत ब्रम्हांडाचें सामरूपानें वर्णन केलें आहे. त्यांत तीन विषयांचा एक एक समुदाय करून त्याचें सामाच्या अवयवांशीं ऐक्य दाखविलें आहे. तीन वेद, पृथ्वी अंतरिक्ष व द्युलोक ( त्रैलोक्य ), अग्नि वायु आदित्य या तीन देवता, नक्षत्रें पक्षी व किरण हे तीन आकाश संचारी आणि सर्प गंधर्व व पितर या तिहींचा समुदाय असे पांच प्रकारचे समुदाय हे सामाचे पांच अवयव होत. हिंकार प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार, व निधन या सामाच्या पांच अवयवांशीं या पांच समुदायांचें ऐक्य केलें आहे. मानवी जीविताचा संबंध या पंचविभागात्मक जगाशीं येत असल्यानें, पचविध सामाचें गायन जगत्कल्याणाच्या भावनेला उत्तेजक होईल, असाच त्या गायनाचा वर्ताव असावा—असला पाहिजे, असें या वर्णनाचें तात्पर्य आहे. मंत्र ३ व ४ हे प्राचीन श्लोक प्रमाण म्हणून आले आहेत. त्यांपैकीं तिसऱ्या मंत्रांत ह्या पंचविध सामाचें श्रेष्ठत्व वर्णिलें असून चौथ्या मंत्रांत या विश्वभावनेचें स्वरूप स्पष्ट केलें आहे. यावरून सामगायनांत उदात्त व सात्विक अशा भावनेलाच श्रुतीनें अग्रस्थान दिलें आहे असें सिद्ध होतें.

### अथ द्वाविंशः खण्डः ।

**विनर्दि साम्नो वृणे पशव्यमित्यग्नेरुद्गीथोऽनिरुक्तः प्रजापतेर्निरुक्तः सोमस्य मृदु श्लक्ष्णं वायोः श्लक्ष्णं बलवदि-**

न्द्रस्य क्रौञ्चं बृहस्पतेरपध्वान्तं वरुणस्य तान्सर्वानेवोप-
सेवेत वारुणं त्वेव वर्जयेत् ॥१॥

साम्नः पशव्यम् विनर्दि ( गानम् ) इति अग्नेः उद्गीथः। अनिरुक्तः प्रजापतेः ( उद्गीथः)। निरुक्तः सोमस्य ( उद्गीथः )। मृदुश्लक्ष्णम् वायोः ( उद्गीथः )। बलवत् श्लक्ष्णम् इन्द्रस्य ( उद्गीथः ) । क्रौञ्चम् बृहस्पतेः ( उद्गीथः )। अपध्वान्तम् वरुणस्य ( उद्गीथः )। तान् वृणे इति सर्वान् उपसेवेत तु वारुणम् एव वर्जयेत्।

सामाचें पशूंच्या ध्वनीसारखें गायन हा अग्निदेवतेचा उद्गीथ, सामान्य ( अव्यक्त ) हा प्रजापतीचा उद्गीथ, स्पष्ट हा सोमाचा उद्गीथ, कोमल मधुर हा वायूचा उद्गीथ, जोरदार ( तीव्र ) मधुर हा इंद्राचा उद्गीथ, क्रौंच पक्ष्याच्या स्वरासारखा हा बृहस्पतीचा उद्गीथ, फुटक्या भांड्याच्या स्वरासारखा हा वरुणाचा उद्गीथ होय. ह्यांनीं मी स्वीकारतों ( प्रार्थितों ) अशा भावनेनें, सर्वांची उपासना करावी; परंतु ( फुटक्या स्वराचा ) वरुण देवतेचा उद्गीथ वर्ज्य करावा.

गायनाच्या स्वरूपाचें या मंत्रांत वर्णन केलें आहे. विनर्दि साम हा त्यांतील पहिला प्रकार आहे. विनर्दि सामाचें स्वरूप जोरदार आहे असें त्याच्या नांवावरूनच दिसून येतें. धृपद धमारासारख्या मर्दानी गाण्यांत हा प्रकार स्पष्ट दिसून येतो. या गाण्याला कलावंत गाणे किंवा गायकी असें म्हणतात. या प्रकारच्या गायकींत पशूंच्या ध्वनीचें अंशतः अनुकरण असतें म्हणूनच त्याला पशव्य असें या मंत्रांत ह्मटलें आहे. या गायनाची अग्नि ही देवता आहे. या कलावंत गाण्यांतच आलापजोडाच्या गायनाचा अन्तर्भाव होतो. या गायकींत, अक्षरांचा उच्चार अस्पष्ट करावयाचा असतो म्हणून, या गायनाला अनिरुक्त असें ह्मटलें असून प्रजापति ही त्याची देवता सांगितली आहे. बोलताना तराणे इत्यादि गाण्यांत शब्दोच्चार स्पष्ट होत असल्यामुळें त्यांचा निरुक्त ह्या संज्ञेत अंतर्भाव होईल.सोम ही त्याची

देवता सांगितली आहे. हे तीनही विभाग सांप्रतच्या कलावंत गाण्यांतच दिसून येतात. कोमल व बारीक आवाजानें गायिल्या जाणाऱ्या गाण्याला कवाली पद्धतीचें गाणें असें व्यावहारिक संगीताच्या भाषेंत ह्मणतात. वायु ही या गाण्याची देवता असून गोड पण जोरकस अशा गाण्याची इंद्र ही देवता आहे. फुटक्या भांड्याच्या आवाजासारख्या गाण्याची वरूण ही देवता असून, हें गाणें वर्ज्य करावयास सांगितलें आहे. असल्या अपस्वराचा अन्तर्भाव गायनांत कां करण्यांत आला, या प्रश्नाचें उत्तर इतकेंच कीं, एखादा कुशल गवई असल्या स्वराचा क्वचित् प्रसंगीं उपयोग करूं शकतो. असल्या प्रकारचा स्वर, संगीतशास्त्रकर्त्यांनीं च्युत स्वर म्हणून ग्रहण केला असावा असें वाटतें. सामान्यतः सामगायनामध्यें हा स्वर ग्रहण केला जाऊं नये, ह्मणजे तो निषिद्ध समजावा. या सर्व विवेचनावरून वैदिक सामांतील संगीत शास्त्रशुद्ध व उच्च प्रतीचें आहे असें सिद्ध होतें.

**अमृतत्वं देवेभ्य आगायानीत्यागायेत्स्वधां पितृभ्य आशां मनुष्येभ्यस्तृणोदकं पशुभ्यः स्वर्गं लोकं यजमानायान्नमात्मन आगायानीत्येतानि मनसा ध्यायन्नप्रमत्तः स्तुवीत ॥२॥**

**देवेभ्यः अमृतत्वम् पितृभ्यः स्वधाम् मनुष्येभ्यः आशाम् पशुभ्यः तृणोदकम् यजमानाय स्वर्गम् लोकम् आत्मने अन्नम् आगायानि इति आगायेत् । एतानि मनसा ध्यायन् अप्रमत्तः ( सन् ) स्तुवीत ।**

मी देवांकरितां अमृतत्व प्रार्थितों; पितरांकरितां स्वधा ( पूर्वक अर्पण केले जाणारें कव्य ), मनुष्यांकरितां इष्ट मनोरथ, पशूंकरितां गवत व पाणी, यजमानाकरितां स्वर्ग लोक आणि स्वतः करितां अन्न प्रार्थितों; अशी ( गायनपूर्वक ) प्रार्थना करावी. हीं सर्व फलें मनानें चिंतून सावध रीतीनें स्तवन करावें.

सर्व जगताच्या कल्याणाच्या उद्देशानें सामगायन करावें, असें एकविसाव्या खंडांत सांगितलें आहे. जगत्कल्याणाच्या कल्पनेचें स्पष्टीकरण

या मंत्रांत केलें आहे. देव, पितर, मनुष्य, पशु, यजमान आणि स्वतः आपण इतक्यांच्याकरितां परमेश्वराची कशी प्रार्थना करावी,तें येथें सांगितलें आहे. मनुष्य, पशु व यजमान या तीन वर्गांत सर्व प्राण्यांचा अंतर्भाव केला आहे. या तिघांच्या स्वास्थ्यावरच व्यक्तीचें व समाजाचें स्वास्थ्य अवलंबून असतें. यज्ञयाग करणारा असा यजमान शब्दाचा अर्थ आहे. यज्ञ हा तत्कालीन समाजधर्मांतील मुख्य भाग असल्यामुळें समाजधर्माचें आचरण करणारा–पुढारी असा यजमान शब्दाचा अर्थ होतो. मानवी व्यवहारांत पशूंचा उपयोग किती आहे, तें निराळें सांगावयास नको. देवांची उपासना हा समाजधर्मांतील एक भाग असून, पितरांची उपासना हा व्यक्तिधर्मांतील भाग आहे. उपनिषदांच्या काळांत यज्ञ व उपासना यांत भेद पडूं लागला होता. हे दोनही मार्ग तत्त्वतः एक असले तरी स्वरूपतः ते भिन्न आहेत, असें शास्त्रालाही मान्य करावें लागत होतें. म्हणूनच ‘ जुहोति व यजते ’ असा त्याचा पृथक् निर्देश उपनिषदांतून आढळतो. ( उ. नि. र. प्र. बृहदारण्यक १. ४. १६ पृ. ९७ ते १०१; आणि ३. ८. १० पृ.४०४). त्या प्रमाणेंच येथें देव, पितर व यजमान यांचा वेगवेगळा उल्लेख केला आहे. देवांना अमृत प्राशन करण्यास मिळावें म्हणून सामगायन करण्यास सांगितलें आहे. मनुष्यांनीं केलेल्या उपासनेच्या योगानें किंवा यज्ञयागांच्या योगानें देव तृप्त होतात असें बृहदारण्यकाच्या पहिल्या अध्यायांत म्हटलें आहे. मनुष्याचें सत्कर्माचरण हेंच देवांचें अमृतपान होय. तरुण पिढीला चांगल्या प्रकारचें शिक्षण देऊन, तिला सन्मार्गास लावणें यांतच पितरांची तृप्ति होते असें त्याच ठिकाणीं बृहदारण्यकांत सांगितलें आहे. ( टीपः—बृहदारण्यकाचे आध्यायादिकांचे अंक वर दिलेच आहेत. त्यांत हे विषय आलेले आहेत ) देव व पितर या शब्दांचे अर्थ अनेक प्रकारांनीं घेतां येतात. क्षात्रधर्मानें समाजकार्य करणारे समाजाचे पुढारी म्हणजे देव असा अर्थ उपनिषदांत कांहीं ठिकाणीं अभिप्रेत दिसतो. क्षात्रधर्माची कल्पना सोडून दिली तरी, ज्ञानसंपन्न व सामर्थ्यसंपन्न अशा पुढा-

त्यानां देखील देव ही संज्ञा लागू केल्यास अमृत प्राशनाची अलंकारिक कल्पना करावी लागत नाहीं. ज्ञानविज्ञानसंपन्न व कर्तृत्वशाली अशा भूदेवांना अमृतत्वाची म्हणजे ब्रह्मपदाची प्राप्ति व्हावी या उद्देशानें श्रुतीनें हें सामगायन करण्यास सांगितलें आहे, असा अर्थ कांहीं टीकाकारांनीं सुचविला आहे, तोही सयुक्तिक व शास्त्रशुद्ध आहे. पितर म्हणजे आपलें थोर पूर्वज यांचा संतोष आपल्या कुलपरंपरेच्या उत्कर्षानेंच होत असतो. व्यावहारिक व पारमार्थिक दृष्ट्या म्हणजेच धार्मिक दृष्टीनें होणाऱ्या वंशपरंपरेच्या उत्कर्षांतच पितरांची खरी तृप्ति होत असते. हाच स्वधा शब्दाचा तात्त्विक अर्थ होय. आशा म्हणजे महत्त्वाकांक्षा. बहुजन समाजांत योग्य महत्त्वाकांक्षेची जागृति झाली तरच समाजांत चैतन्य उत्पन्न होतें. या महत्त्वाकांक्षेचाच आशा या शब्दानें या मंत्रांत उल्लेख केला आहे. कार्यकर्त्या पुढाऱ्याला उत्तम सुख व स्वतःला अवश्य तें अन्न—संपत्ति इतक्या गोष्टी प्रार्थनेंत समाविष्ट केल्या आहेत. यांत पशूंचें स्वास्थ्य देखील वगळलेलें नाहीं. या सर्व गोष्टी मिळूनच सार्वजनिक हिताची बुद्धि(कल्पना) पूर्ण होते. यावरून सार्वजनिक हिताच्या उद्देशालाच या सामगायनांत श्रुतीनें प्राधान्य दिलें आहे असें निःसंशय सिद्ध होतें. सर्वांगपरिपूर्ण अशा सार्वजनिक हितालाच गीतेनें सर्वभूतहित असें नांव दिलें आहे.

**सर्वे स्वरा इन्द्रस्यात्मानः सर्व ऊष्माणः प्रजापतेरात्मानः सर्वे स्पर्शा मृत्योरात्मानस्तं यदि स्वरेषूपालभेतेन्द्रꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रतिवक्ष्यतीत्येनं ब्रूयात् ॥ ३ ॥**

**सर्वे स्वराः इन्द्रस्य आत्मानः । सर्वे ऊष्माणः प्रजापतेः आत्मानः । सर्वे स्पर्शाः मृत्योः आत्मानः (सन्ति)। तम् (गायन्तम्) यदि स्वरेषु उपालभेत इन्द्रम् शरणम् प्रपन्नः अभूवम् सः त्वा प्रतिवक्ष्यति इति एनम् ब्रूयात्।**

सर्व स्वर ( अकारादि ) हे इंद्राचे अवयव, सर्व ऊष्म ( श ष स ह ) वर्ण हे प्रजापतीचे अवयव, सर्व ( ककारादि ) व्यंजनें हीं मृत्यूचे अवयव होत. गायकाला जर कोणी स्वरादिकाविषयीं दोष

देईल तर, मी इंद्राला शरण गेलों ( इंद्राचा उपासक ) आहें, असें तो तुला उत्तर देईल, असें त्याला सांगावें.

अवयव हा शब्द येथें अंश या अर्थानें स्वीकारण्यास हरकत नाहीं. सामगायन करणाऱ्यानें उच्चारविषयक शास्त्रार्थांच्या भानगडींत फारसें पडूं नये असा श्रुतीचा अभिप्राय आहे. गायनामध्यें उच्चारांपेक्षां षड्जादि स्वरांनाच अधिक महत्व असतें. शिवाय आलापाकरितां शब्दाच्या उच्चारांत बराच बदलही करावा लागतो. वैदिक वाङ्मयांतील वर्णोच्चाराविषयीं शास्त्र कारांनीं अत्यंत सूक्ष्म विचार केला आहे व तसाच विचार जवळ जवळ संस्कृत वाङ्मयांतही आहे; परंतु उच्चाराच्या शास्त्रार्थांचे नियम सामगायन करणारांनीं पाळलेच पाहिजेत असें नाहीं. या मंत्रांत स्वर ऊष्म व स्पर्श या वर्णांच्या तीन संज्ञा आल्या आहेत. उच्चाराशींच त्यांचा विशेष संबंध येतो. या संज्ञांच्या बरोबरच वर्णांचे आभ्यंतर प्रयत्न व बाह्य प्रयत्न इत्यादिकांविषयीं प्रश्न उपस्थित होतो. पण अशा बाबतींत जर कोणा शास्त्रज्ञांनीं सामगायकाला नडविलें तर, तुझ्या शंकेचें समाधान मी ज्याची उपासना करीत आहे तो परमेश्वरच करील, असें त्यानें खुशाल उत्तर द्यावें. सामगायकानें उच्चाराकडे विशेष लक्ष देऊं नये, असें जरी श्रुतीनें सांगितलें असलें तथापि, गाइल्या जाणाऱ्या स्तोत्राची देवता, त्यांतील अर्थ, गायनाचा हेतु इत्यादि विषयांकडे सामगायन करणाऱ्याचें पूर्ण लक्ष असलें पाहिजे असें मागें श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे.

**अथ यद्येनमूष्मसूपालभेत प्रजापतिँ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति पेक्ष्यतीत्येनं ब्रूयादथ यद्येनँ स्पर्शेषूपालभेत मृत्युँ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति धक्ष्यतीत्येनं ब्रूयात् ॥४॥**

**अथ यदि एनम् ऊष्मसु उपालभेत प्रजापतिम् शरणम् प्रपन्नः अभूवम् सः त्वा प्रति पक्ष्यति इति एनम् ब्रूयात् । अथ यदि एनम् स्पर्शेषु उपालभेत मृत्युम् शरणम् प्रपन्नः अभूवम् सः त्वा प्रति धक्ष्यति इति एनम् ब्रुयात्।**

तसेंच जर त्या गायकाला ऊष्मवर्णांविषयीं कोणीं दोष दिला तर, मी प्रजापतीला शरण गेलों आहें, तो तुला चूर्ण करील ( शिक्षा करील ) असें त्याला म्हणावें. तसेंच जर त्या गायकाला व्यंजनांविषयीं कोणी दोष देईल तर, मी मृत्यूला शरण गेलों आहें तो तुला भस्म करील, असें त्याला म्हणावें.

प्रस्तुत मंत्रात ऊष्म व स्पर्श वर्णांच्या उच्चारांबद्दल गाणाऱ्याची कोणी अडवणूक करील तर त्याला देवतांपासून शिक्षा भोगावी लागेल असें म्हणावें याविषयीं वर्णन आलें आहें.

**सर्वे स्वरा घोषवन्तो बलवन्तो वक्तव्या इन्द्रे बलं ददानीति सर्व ऊष्माणोऽग्रस्ता अनिरस्ता विवृता वक्तव्याः प्रजापतेरात्मानं परिददानीति सर्वे स्पर्शा लेशेनानभिनिहिता वक्तव्या मृत्योरात्मानं परिहराणीति ॥५॥**

**इन्द्रे बलम् ददानि इति सर्वे स्वराः घोषवन्तः बलवन्तः वक्तव्याः। प्रजापतेः आत्मानम् परिददानि इति सर्वे ऊष्माणः अग्रस्ताः अनिरस्ताः विवृताः वक्तव्याः। मृत्योः आत्मानम् परिहराणि इति सर्वे स्पर्शाः लेशेन अनभिनिहिताः वक्तव्याः।**

मी इंद्राचे ठिकाणीं बल उत्पन्न करीत आहें अशा भावनेनें सर्व स्वर स्पष्ट व जोरदार ह्मणावे. मी प्रजापतीचे ठिकाणीं सामर्थ्य उत्पन्न करीत आहें अशा भावनेनें सर्व ऊष्म वर्ण, आंत ओढल्यासारखे नव्हेत, फेकून दिल्यासारखे नव्हेत, अशा मोकळ्या आवाजानें उच्चारावे. मी मृत्युचें स्वरूप ( उग्रत्व ) दूर करीत आहें अशा भावनेनें सर्व व्यंजनें संयोगानें एकत्र न झालेलीं ( वेगवेगळीं ) उच्चारावीं.

सामगायकानें उच्चारांच्या शास्त्रार्थांत शिरूं नये असें म्हटल्यानें शुद्ध उच्चार करूं नये अशी गैरसमजूत होईल म्हणून, श्रुतीनें येथें उच्चारांचें

स्पष्टीकरण केलें आहे. स्वर, ऊष्म, व स्पर्श या तिहींमध्यें सर्व वर्णांचा समावेश होतो. म्हणून वर्णांचे तीन प्रकारें वर्गीकरण छांदोग्याच्या काळांत केलें जात होतें, असें समजण्यांस मुळींच हरकत नाहीं. पाणिनि ऋषीनें अच् (स्वर) व हल् (व्यंजनें) असे वर्णांचे मुख्य दोनच वर्ग करून, त्यांचे अनेक पोटभेद सांगितले आहेत. हे भेद मुख्यत्वेंकरून, स्थान व प्रयत्न यांवरुनच केले आहेत. वर्णांचें हें विस्तृत विवेचन येथें अभिप्रेत नाहीं. तथापि पाणिनीय व्याकरणात स्वीकारलेल्या मुख्य मुख्य संज्ञा फार प्राचीन काळापासून भाषाशास्त्रांत रूढ झाल्या होत्या, येवढेंच या तीनही मंत्रांतील वर्णनावरून दिसून येतें.

टीप––या खंडांत मंत्र पांचच आले आहेत. त्यांचें विवरण त्या त्या मंत्राखालीं सविस्तर केलें असल्यानें निराळा सारांश लिहिला नाहीं.

अथ त्रयोविंशः खण्डः ।

**त्रयो धर्मस्कन्धा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यन्तमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्मसꣳस्थोऽमृतत्त्वमेति ॥ १ ॥**

धर्म स्कन्धाः त्रयः ( सन्ति )। यज्ञः अध्ययनम् दानम् इति प्रथमः। तपः एव द्वितीयः। आचार्यकुलवासी (वा)आचायकुले आत्मानम् अत्यन्तम् अवसादयन् ब्रह्मचारी तृतीयः। एते सर्वे पुण्यलोकाः भवन्ति। ब्रह्मसंस्थः अमृतत्वम् एति।

धर्माचे भाग तीन आहेत. यज्ञ ( उपासना ), अध्ययन ( ज्ञानार्जन ) आणि दान ( परोपकार ) हा पहिला भाग; तपश्चर्या हाच दुसरा भाग; व गुरुगृहीं ( समावर्तनापर्यंत ) राहणारा ब्रह्मचारी किंवा यावज्जीव स्वतःला गुरुगृहीं झिजविणारा (नैष्ठिक) ब्रह्मचारी हा तिसरा भाग होय. हे सर्व पुण्यवान् असतात ( पवित्र लोकीं जातात. ) ( यांपैकीं ) जो ब्रह्मज्ञानसंपन्न असतो तो मोक्षाला जातो.

संन्यासमार्गीयाच्या सांप्रदायिक ओढाताणीमुळें या मंत्रास फारच महत्त्व आलें आहे. या मंत्रांत धर्माचे तीनच स्कंध सांगितले आहेत. वैदिक धर्मांतील प्रत्येक मनुष्याचा आयुष्यक्रम धर्ममयच असला पाहिजे असा श्रुतीचा कटाक्ष आहे. प्रस्तुत मंत्रांतील धर्म शब्द मुख्यत्वेंकरून व्यक्तिधर्माचा बोधक आहे असें त्याच्या स्कंधांच्या—विभागांच्या स्वरुपावरून सहज दिसून येतें. आश्रमधर्मांना येथें स्कंध असें म्हटलें आहे. यज्ञदान व अध्ययन हें गृहस्थाश्रमाचें विशेष स्वरूप म्हणून सांगितलें आहे. हीं यज्ञदानादिक कर्मे समाजाकडून करविण्यास सहाय्य करणें हा ब्राह्मणांचा वर्णधर्म म्हणून सांगितला आहे. हीं कर्मे सकाम केल्यास ब्राह्मणाच्या निर्वाहास उपयोगीं पडतात म्हणून त्यांना स्मृतिकारांनीं वृत्ति अशी संज्ञा दिली आहे. या वृत्तिरूप कर्मांचा देखील गृहस्थधर्मांतच अंतर्भाव होतो. ज्ञानी मनुष्य हींच कर्मे निष्काम बुद्धीनें करून आत्मकल्याण व लोककल्याण ( लोकसंग्रह ) साधतो. नुसत्या स्वार्थलंपटपणामुळें होणारी कर्मप्रवृत्ति लोकांत कायम ठेवणें हा ज्ञानी मनुष्याचा हेतु नसतो. व ज्ञानी मनुष्याच्या स्वधर्माचरणाचा तो परिणामही नव्हे. लोकांत कर्तव्याचरणाची संवय उत्पन्न करावी, म्हणजे कर्तव्याचरणाच्या योगानें समाजांत सद्गुणांचा परिपोष होतो, व स्वार्थपरायणता व तज्जन्य दुर्गुण कमी होतात, हाच लोकसंग्रहाचा किंवा ब्रह्मज्ञानी मनुष्याच्या स्वधर्माचरणाचा हेतु व परिणाम होय. यालाच गीतेनें लोकसंग्रह असें म्हटलें आहे; आणि या लोकसंग्रहाच्या उद्देशानेंच 'यद्यदाचरति श्रेष्ठः' हा नियम गीतेनें सांगितला आहे. या गृहस्थधर्मालाच श्रुतीनें प्रथमः असें विशेषण दिलें आहे. तें संख्याबोधक किंवा अनुक्रमबोधक नसून, या मंत्रांतील परिगणनाचें निदर्शक आहे; किंवा तें गृहस्थाश्रमाच्या श्रेष्ठत्वाचें बोधक आहे, असेंही समजण्यास हरकत नाहीं. कारण श्रुतिस्मृतींनीं गृहस्थाश्रमाचें श्रेष्ठत्व मान्य केलें आहे.

तप हा दुसरा स्कंध सांगितला आहे. तो वानप्रस्थाश्रमाचा वाचक आहे असें समजावें. वानप्रस्थधर्मानें राहणाऱ्या विद्वान लोकांना ऋषि असें

म्हणत असत. वानप्रस्थ किंवा वनी हे शब्द उत्तरकालांत रूढ झाले आहेत. वामदेवादिकांचा ऋषि शब्दानेंच उल्लेख आला आहे. ऋषि हे प्रायः उर्ध्वरेतस् म्हणजे ब्रह्मचारी असतात. वानप्रस्थाला देखील ब्रह्मचर्य पाळावें लागत असल्यामुळें, त्यांचा देखील ऊर्ध्वरेतस् अशा ऋषींमध्यें समावेश करण्यास हरकत नाहीं. ' अष्टाशीतिसहस्राणामृषीणामूर्ध्वरेतसाम् । उत्तरेणार्यम्णः पन्थास्तेऽमृतत्त्वं हि भेजिरे ॥ ' असें स्मृतिवाक्य श्रीमत् शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत उध्दृत केलें आहे. अठ्यांशीं हजार उर्ध्वरेतस् असे जे ऋषि आहेत, ते सूर्याच्या उत्तरमार्गानें अमृतत्त्व—मोक्ष पावले. असा या वाक्याचा अर्थ आहे. त्यावरून वानप्रस्थांचा ऋषींमध्यें अंतर्भाव करण्यास हरकत नाहीं. ब्रह्मचर्य हा तिसरा विभाग सांगितला आहे व याच विभागांत नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचाही समावेश केला आहे. जो मनुष्य स्वतः अविवाहित राहून जन्मभर विद्यार्जन व गुरुसेवा करीत राहातो तो नैष्ठिक ब्रह्मचारी होय, असें या मंत्रांतच सांगितलें आहे. तत्परतेनें स्वधर्माचरण करणारा मनुष्य या तिहींपैकीं कोणत्याही आश्रमांत असला तरी तो पुण्यशीलच समजावा. कारण या तीनही आश्रमांचे धर्म पुण्यकारकच आहेत. मंत्रात पुण्यलोक असा शब्द आला आहे तो स्वरूपबोधक असून हे सर्व आश्रमधर्म पुण्यकारक आहेत असें दर्शविण्याकरितांच ' सर्वे एते पुण्यलोका भवन्ति ' हें वाक्य श्रुतीनें मंत्रांत घातलें आहे.

जाबालोपनिषद्, मनुस्मृति इत्यादि ग्रंथांत चतुर्थाश्रम सांगितला आहे परंतु या मंत्रांत चतुर्थाश्रमाचा उल्लेख देखील नाहीं. इतकेंच काय, धर्मस्कंध तीनच आहेत असा त्रयः या शब्दाचा उल्लेख करून, संन्यास हा स्वतंत्र चौथा स्कंध नव्हे, असेंही श्रुतीनें सुचाविलें आहे. तथापि या धर्मस्कंधांत चतुर्थाश्रमाचा अंतर्भाव करावयाचाच झाला तर तपः या शब्दानें दर्शविलेल्या वैखानसांच्या—वानप्रस्थांच्या आश्रमाबरोबर करितां येईल. व भाष्यकार श्रीमत् शंकराचार्य यांनीं परिव्राजकांचा वानप्रस्थांबरोबर समावेश केलाही आहे. परंतु शारीरभाष्य लिहिणाऱ्या श्रीमत् शंकराचार्यांनीं तपः

शब्दानें वैखानसांच्या बरोबर परिव्राजकांचें ग्रहण करितां यावयाचें नाहीं असें जोरानें प्रतिपादन केलें आहे. प्रस्तुत मंत्रांतील तप हा शब्द वानप्रस्थांचें वैशिष्ट्य दाखवितो, त्यांत परिव्राजकांचा समावेश करणें सर्वथैव अयोग्य होय, असें शारीरभाष्यकारांचें म्हणणें आहे. ( ब्र. सू. अ. ३ पाद ४ सूत्र १९ यावरील भाष्य पहा ).परंतु छांदोग्य ५।१०।१ व बृहदारण्यक ६।२।१५ अशा दोनही ठिकाणच्या मंत्रांवर उपनिषद्भाष्य लिहितांना, उपनिषद्भाष्य-कारांनीं तप या शब्दानें वैखानस व परिव्राजक या दोघांचेंही ग्रहण केलें आहे. ह्यावरून तप शब्दांत वानप्रस्थाश्रमाबरोबरच संन्यासाश्रमाचें ग्रहण करण्यास शारीरभाष्यकार अनुमोदन देत नाहींत, पण उपनिषद् भाष्यकार मात्र अनुमोदन देतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. छांदोग्य, बृहदारण्यक इत्यादि उपनिषदांतील तप या शब्दावरून परिव्राजकांचें ग्रहण केलें तरी ते पूर्ण ज्ञानी असे संन्यासी नव्हत; अज्ञानी साधकदशेंत असलेल्या अशाच परिव्राजकांचें तप शब्दानें ग्रहण करितां येईल; कारण ज्ञानसंपन्न विद्वान अशा संन्यासी लोकांचा, तपाशीं संबंध येऊं शकत नाहीं, अशी एक कोटी या तप शब्दाच्या अर्थाविषयीं केली जाते. परंतु श्रुतीच्या अभिप्रायाशीं ही कोटी विरुद्ध आहे. कारण मुण्डकोपनिषदांत तपश्चर्या करणारे व भिक्षाचरण करणारे विद्वान ज्ञानी पुरुष मोक्षाला जातात असें स्पष्ट सांगितलें आहे. ( उ. नि. र. प्र. मुण्डक १।२।११ पृ. ३३ ) त्यावरून ज्ञानवान् संन्यासी पुरुषाचा तपाशीं संबंध येऊं शकत नाहीं हें म्हणणें फोल ठरतें. तप शब्दानें परिव्राजकाचें ग्रहण करितां आल्यास ब्रह्म-संस्थ हा शब्द आश्रमवाचक ठरविण्यास अडचण पडेल म्हणूनच, तप शब्दाच्या अर्थांतून ज्ञानवान् संन्यासी बाजूला काढण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. ब्रह्मसंस्थ म्हणजे ज्ञानवान् संन्यासी असा अर्थ करून,संन्यास-मार्गीयांनी हें शेवटचें वाक्य मागील प्रकरणापासून अगदींच अलग केलें आहे. अशा रीतीनें वाक्यभेद करून संन्यासमार्ग सिद्ध करण्याचा केलेला प्रयत्न अगदींच निष्फळ झाला आहे. श्रुतीला जर असा मायावादी परम-

हंस परिव्राजकच तेवढा अभिप्रेत असता, तर त्या मार्गाचा स्पष्ट शब्दानें धर्म-स्कंध म्हणून स्वतत्र निर्देश करण्यास कोणतीच हरकत नव्हती. वैदिक कालात वानप्रस्थ हा आश्रम मुख्य मानला जात असून चौथा संन्यास आश्रम हा वानप्रस्थाश्रमाचाच पोटभेद मानला जात होता. शिखा-सूत्राचा त्याग करणाऱ्या मुंडी अशा यतीपेक्षां ऋषींची योग्यता उपनिषदांत अधिक समजली जात होती. म्हणून वैदिक ब्रह्मविद्येच्या दृष्टीनें संन्यासा-श्रमास फारसें महत्वच नव्हतें. याकरितांच मुख्य धर्म म्हणजे धर्मस्कंध श्रुतीनें तीनच सांगितले आहेत. या तिहींपैकीं मनुष्य कोणत्याही आश्रमांत असला तरी तो योग्य प्रयत्नानें ब्रह्मसंस्थ होऊं शकतो. ब्रह्मसंस्थतेलाच गीतेनें ब्राह्मीस्थिति असें म्हटलें आहे. जनकादि गृहस्थाश्रमांतच ब्रह्मसंस्थ झाले. विद्यार्थीदशेंत असलेला तरुण ब्रह्मचारी नचिकेत हा ब्रह्मचर्या-श्रमांतच ब्रह्मसंस्थ ( ब्रह्मप्राप्त ) झाला. अंगिरस, पिप्पलाद, याज्ञवल्क्य, वामदेव इत्यादि ऋषि ब्रह्मसंस्थ झाले असल्याचें उपनिषदांतूनच सांगितले आहे. हे सर्व ऋषि शिखासूत्रांचा त्याग करून मुंड विवर्णवास असे झालेले नव्हते. तसे असते तर श्रुतीनें त्यांना ऋषि ही संज्ञाच दिली नसती. ऋषि व यति यांमधील भेद मुण्डकोपनिषदामध्यें स्पष्ट आला आहे. ( मुण्डक ३.२.५।६ उ. नि. र. प्र. पृष्ठ १०३ ते १०५ ) त्यावरुन ब्रह्मसंस्थ हा शब्द स्वतंत्र आश्रमवाचक नसून, तो ब्राह्मीस्थितीचा वाचक आहे, असें निर्विवाद सिद्ध होतें.

ज्ञान व कर्म यांचा तमःप्रकाशवत् विरोध असल्यामुळें कोणत्याही आश्रमधर्माचें आचरण करीत असता मनुष्याला ब्रह्मसंस्थ होतां येणें शक्य नाहीं, ब्रह्मज्ञान झाल्यावर सर्व प्रकारची भेदबुद्धि नष्ट होते आणि भेदबुद्धी-शिवाय तर कर्म होऊं शकत नाहीं, म्हणून ज्ञानी मनुष्याचे हातून कर्म घडणें अशक्य आहे; स्वप्नांतून जागा झालेल्या मनुष्याला जागेपणीं पुन्हां त्या स्वप्नांतील व्यवहार करितां येणें जसें अशक्य आहे, तद्वतच ब्रह्म-ज्ञानी मनुष्याचे हातून आश्रमधर्माचें आचरण घडणें शक्य नाहीं; अशा

प्रकारचा कोटिक्रम संन्यासमार्गीयांकडून नेहमींच केला जातो. परंतु तो मुळींच टिकण्यासारखा नाहीं. हा कोटिक्रम मायावादाच्या विचारसरणींत संभवतो. परंतु दशोपनिषदांच्या विचारसरणींत मायावाद येत नसल्या-मुळें ज्ञान व कर्म यांतील तमःप्रकाशवत् विरोधाची मूळ कल्पनाच श्रुतीनें ग्राह्य मानलेली नाहीं. म्हणून वरील प्रकारचा कोटिक्रम औपनिषद् विद्येच्या दृष्टीनें त्याज्यच ठरतो. ब्रह्मज्ञान झाल्यावर सर्व सृष्टपदार्थ नाशिवंत आहेत हें समजून येतें. पण रज्जूचें ज्ञान झाल्याबरोबर सर्पकल्पना जशी नाहींशी होते, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान झाल्याबरोबर जगताचें भान नाहींसें होतें असें वैदिक ब्रह्मविद्येंत मानलें जात नाहीं. सुवर्णाचें ज्ञान झालें तरी अलं-काराची कल्पना व्यवहारामध्यें असूं शकते, त्याप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कारा-नंतरही व्यावहारिक सत्तेनें जगत्भान असूं शकतें असा वैदिक ब्रह्मविद्येचा सिद्धांत आहे. या सिद्धांताची प्रतिपादक अशीं स्पष्ट श्रुतिवचनें दशोप-निषदांमध्यें अनेक ठिकाणीं आलीं आहेत. याप्रमाणें ज्ञानकर्माच्या विरोधा-विषयींची मायावादी कल्पना त्याज्य ठरल्यावर इतर मुद्यांचा विचार कर-ण्याची आवश्यकताच उरत नाहीं. ज्ञानाचा विरोध असेल तर तो सकाम कर्माशीं आहे, निष्काम कर्तव्याचरणाशीं नाहीं. वर्णाश्रमधर्मानें विहित अशा कर्तव्याचें निष्कामबुद्धीनें आचरण केलें तर तें कर्म साधकदशेंत ज्ञान-परिपाकाला व सिद्धावस्थेंत लोकसंग्रहाला उपयोगीं पडत असल्यामुळें निष्कामकर्म ज्ञानाला अनुकूल किंवा पोषक आहे असेंच निःसंशय ठरतें. आणि म्हणूनच कोणत्याही आश्रमांत कर्मयोगमार्गानें मनुष्याला ब्रह्मसंस्थ होतां येतें; व अशा ब्रह्मसंस्थ मनुष्याला अमृतत्त्वाची प्राप्ति होते, असें श्रुतीनें या मंत्रांत स्पष्ट सांगितलें आहे.

**प्रजापतिर्लोकानभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्यस्त्रयी विद्या संप्रास्रवत्तामभ्यतपत्तस्या अभितप्ताया एतान्यक्षराणि संप्रास्रवन्त भूर्भुवः स्वरिति ॥ २ ॥**

**प्रजापतिः लोकान् अभ्यतपत्। तेभ्यः आभितप्तेभ्यः त्रयी विद्या संप्रास्रवत्। ताम् अभ्यतपत्। तस्याः आभितप्तायाः भूः भुवः स्वः इति एतानि अक्षराणि संप्रास्रवन्त।**

प्रजापतीनें लोकांविषयीं विचार केला. तो विचार केल्यावरून तीन वेदांची विद्या निघाली ( सारभूत वाटली ) त्या वेदविद्येचा विचार केल्यावरून भूः भुवः स्वः अशीं हीं तीन अक्षरें (व्याहृति) निघालीं.

प्रस्तुत मंत्रांत व्याहृतींची उत्पत्ति सांगितली आहे. तैत्तिरीयोपनिषदांतील शीक्षाध्यायामध्यें व्याहृतींचा सविस्तर विचार करण्यांत आला आहे. या मंत्रांत प्रजापतीनें लोकांना तप्त केलें व त्यापासून वेदविद्या व व्याहृति उत्पन्न झाल्या असें सांगितलें आहे. वेदविद्या ज्या तपापासून किंवा तापापासून उत्पन्न झाल्या तो ताप विचारस्वरूपच असला पाहिजे हें उघड आहे. म्हणून परमेश्वरानें लोकांविषयीं—जगताविषयीं विचार करून जगत्कल्याणाकरितांच वेदविद्या व व्याहृति उत्पन्न केल्या. त्यांत वेद हे सर्वांच्या ज्ञानाकरितां असून व्याहृति या ईश्वरोपासनेकरितां आहेत.

**तान्यभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्य ॐकारः संप्रास्रवत्तद्यथा शङ्कुना सर्वाणि पर्णानि संतृण्णान्येवमोंकारेण सर्वा वाक्संतृण्णोंकार एवेदꣳ सर्वमोंकार एवेदꣳ सर्वम् ॥ ३ ॥**

**तानि अभ्यतपत् तेभ्यः अभितप्तेभ्यः ॐकारः संप्रास्रवत् । तत् यथा शङ्कुना सर्वाणि पर्णानि संतृण्णानि एवम् ॐकारेण सर्वा वाक् संतृण्णा । इदम् सर्वम् ॐकारः एव। ॐकारः एव इदम् सर्वम् ।**

( त्यानें ) त्या व्याहृति अक्षरांचा विचार केला. त्यांचा विचार केल्यावरून ॐ हें अक्षर निघालें ( सारभूत ठरलें ). ज्याप्रमाणें बारीक काडीनें सर्व पानें ओवलेलीं असतात त्याप्रमाणें ॐकारानें सर्व वाणी ओवलेली आहे ( सर्व वाणीला ॐकार हाच आधार

आहे). हें सर्व ॐकार रूपच आहे. (द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.)

व्याहृतीनंतर परमेश्वरानें त्या व्याहृतीपासूनच ॐकार उत्पन्न केला असें येथें सांगितलें आहे. त्याचा अर्थ असा कीं, परमेश्वरानें त्रयी विद्या व व्याहृति यांचा विचार करून ॐकार हें त्यांचें संक्षिप्त रूप उत्पन्न केलें म्हणून सर्व वैदिक वाङ्मय या ॐकारावरच अधिष्ठित आहे असें समजावें.

**अथ चतुर्विंशः खण्डः ।**

**ब्रह्मवादिनो वदन्ति यद्वसूनां प्रातःसवनꣳ रुद्राणां माध्यंदिनꣳ सवनमादित्यानां च विश्वेषां च देवानां तृतीयसवनम् ॥ १ ॥**

**ब्रह्मवादिनः वदन्ति यत् वसूनाम् प्रातःसवनम् रुद्राणाम् माध्यदिनम् सवनम् आदित्यानाम् च विश्वेषाम् देवानाम् च तृतीयसवनम् ।**

वेदवेत्ते ऋषि सांगतात कीं, वसुदेवतांचा प्रातःसवनविधि, रुद्रदेवतांचा माध्यंदिन सवनविधि आणि आदित्य व विश्वेदेव ह्या देवतांचा तृतीय सवनविधि असतो.

**क्व तर्हि यजमानस्य लोक इति स यस्तं न विद्यात्कथं कुर्यादथ विद्वान्कुर्यात् ॥ २ ॥**

**तर्हि यजमानस्य लोकः क्व इति। यः तम् न विद्यात् सः कथम् कुर्यात्। अथ विद्वान् कुर्यात् ।**

असें आहे तर, यजन करणाराचें स्थान कोणतें ? (असा प्रश्न उत्पन्न होतो). ज्याला तें कळणार नाहीं तो (यजन) कसें करील ? म्हणून तें जाणणारानें (ज्ञानपूर्वक) यजन करावें.

सवनविधीचें स्वरूप श्रुतीला पुढें सांगावयाचें आहे. पहिल्या मंत्रांत फक्त त्यांच्या देवता सांगितल्या आहेत. जें कर्म करावयाचें त्याचें तात्त्विक

व व्यावहारिक ज्ञान कर्त्याला असलेंच पाहिजे. हा नियम यज्ञादि क्रियांनाही लागू होतो. द्रव्य, देवता, मंत्र, त्यांचा अर्थ, व कर्माचे तात्कालिक परिणाम इत्यादि गोष्टी कर्माच्या व्यावहारिक ज्ञानांत समाविष्ट होत असून कर्माचा मूळ उद्देश, त्याची परंपरा त्याचे समाजावर होणारे परिणाम, स्वतःवर होणारे भविष्यत् कालीन परिणाम इत्यादि गोष्टी कर्माच्या तात्त्विक ज्ञानांत अन्तर्भूत होतात. याप्रमाणें कर्माचें सांगोपांग ज्ञान ज्याला असेल तोच यथासांग कर्म करूं शकतो.

**पुरा प्रातरनुवाकस्योपाकरणाज्जघनेन गार्हपत्यस्योदङ्मुख उपविश्य स वासवꣳ सामाभिगायति ॥ ३ ॥**

**सः प्रातरनुवाकस्य उपाकरणात् पुरा गार्हपत्यस्य जघनेन उदङ्मुखः उपविश्य वासवम् साम अभिगायति ।**

त्या यजनकर्त्यानें प्रातःसवनाचीं स्तोत्रें सुरू करण्यापूर्वी गार्हपत्य अग्नीच्या मागें उत्तराभिमुख बसून वसु देवतांसंबंधी साम गायन करावें.

टीपः——या मंत्रांत प्रातःसवन विधीचें स्वरूप सांगितलें आहे.

**लो ३ कद्वारमपावा ३ र्णू ३ ३ पश्येम त्वा वयꣳरा ३ ३ ३ ३ ३ हु ३ म् आ ३ ३ ज्या ३ यो ३ आ ३ २ १ १ १ इति ॥ ४ ॥**

**लोकद्वारम् अपावार्णु वयम् राज्याय हुम् आ त्वा पश्येम इति ।**

हे ( सूर्या ), प्रकाशाचें द्वार उघड ( म्हणजे ) आम्ही स्वातंत्र्याकरितां तुला पहावें. ( तुझें प्रकाशमय दर्शन आम्हाला होवो ). ( हुं आ ओ आ हीं सामगायनांतील स्तोभाक्षरें आहेत. )

**अथ जुहोति नमोऽग्नये पृथिवीक्षिते लोकक्षिते लोकं मे यजमानाय विन्दैष वै यजमानस्य लोक एतास्मि ॥५॥**

**अत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहापजहि परिघमित्यु-
क्त्वोत्तिष्ठति तस्मै वसवः प्रातःसवनꣳ संप्रयच्छन्ति ॥६॥**

**अथ जुहोति । पृथिवीक्षिते लोकक्षिते अग्नये नमः । यजमानाय मे लोकम् विन्द । एषः वै यजमानः (अहम्) अत्र आयुषः परस्तात् यजमानस्य लोके एतास्मि । परिघम् अपजहि । स्वाहा । इति उक्त्वा उत्तिष्ठति । वसवः तस्मै प्रातःसवनम् संप्रयच्छन्ति ।**

नंतर हवन करावें. पृथ्वीनिवासी आणि लोकनिवासी अग्नीला नमस्कार(असो).यजन करणाऱ्या मला लोक(योग्य स्थान)प्राप्त करून दे. हा यजन करणारा मी येथील आयुष्यानंतर (मृत्यु पावल्यावर) यज्ञकर्त्याच्या लोकाला जाईन. (तेथील) प्रतिबंध दूर कर. आहुति देतो. असा मंत्र ह्मणून उठावें. वसुदेवता त्याला प्रातः सवन ( भूलोक ) देतात.

**पुरा माध्यंदिनस्य सवनस्योपाकरणाज्जघनेनाग्नीध्री-
यस्योदङ्मुख उपविश्य स रौद्रꣳ सामाभिगायति ॥७॥**

**सः माध्यंदिनस्य सवनस्य उपाकरणात् पुरा आग्नीध्रीयस्य जघनेन उदङ्मुखः उपविश्य रौद्रम् साम अभिगायति ।**

त्या ( यजनकर्त्यानें ) माध्यंदिन सवन सुरू करण्यापूर्वी अग्नीध्र ऋत्विजाचें स्थान अशा दक्षिणाग्नीच्या मागें उत्तराभिमुख बसून रुद्रदेवतांचें साम गायन करावें.

**लो ३ कद्वारमपावा ३ र्णू ३३ पश्येम त्वा वयं वैरा
३३३३३ हु ३ म् आ ३३ ज्या ३ यो ३ आ ३२१११
इति ॥८॥**

**लोकद्वारम् अपावार्णु वयम् वैराज्याय हुम् आ त्वा पश्येम इति ।**

हे सूर्या, प्रकाशाचें द्वार उघड ( म्हणजे ) आम्ही अंतरिक्षा-( भुवर्लोका ) करितां तुला पहावें. (तुझें प्रकाशमय दर्शन

आम्हांला होवो ). ( हुं आ ओ आ हे सामगायनांतील निरर्थक स्वर आहेत. )

अथ जुहोति नमो वायवेऽन्तरिक्षक्षिते लोकक्षिते लोकं मे यजमानाय विन्दैष वै यजमानस्य लोके एतास्मि ॥ ९ ॥

अत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहापजहि परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति तस्मै रुद्रा माध्यंदिनꣳ सवनꣳ संप्रयच्छन्ति ॥ १० ॥

अथ जुहोति । अन्तरिक्षक्षिते लोकक्षिते वायवे नमः । यजमानाय मे लोकम् विन्द । एषः वै यजमानः ( अहम् ) अत्र आयुषः परस्तात् यजमानस्य लोकम् एतास्मि । परिघम् अपजहि । स्वाहा । इति उक्त्वा उत्तिष्ठति । रुद्राः तस्मै माध्यंदिनम् सवनम् संप्रयच्छन्ति ।

नंतर हवन करावें. अन्तरिक्षनिवासी आणि भूलोकनिवासी वायूला नमस्कार (असो). यजन करणाऱ्या मला, भुवर्लोक प्राप्त करून दे. हा यजन करणारा मी येथील आयुष्य संपल्यावर यजन करणाऱ्याच्या लोकाला जाईन, (तेथील) प्रति बंध दूर कर. आहुति देतों. असा मंत्र म्हणून उठावें. रुद्रदेवता त्याला माध्यंदिन सवन (भुवर्लोक) देतात.

पुरा तृतीयसवनस्योपाकरणाज्जघनेनाहवनीयस्योदङ्मुख उपविश्य स आदित्यꣳ स वैश्वदेवꣳ सामाभिगायति ॥ ११ ॥

सः तृतीयसवनस्य उपाकरणात् पुरा आवहनीयस्य जघनेन उदङ्मुखः उपविश्य सः आदित्यम् वैश्वदेवम् साम अभिगायति ।

त्या यजनकर्त्यानें तृतीय सवन सुरू करण्यापूर्वी आहवनीय अग्नीच्या मागें उत्तराभिमुख बसून आदित्य व वैश्वदेवाचें साम गायन करावें.

**लो ३ कद्वारमपावा ३ र्णू ३३ पश्येम त्वा वय९ स्वारा ३३३३३ हु ३ म् आ ३३ ज्या ३ यो ३ आ ३२१११ इति ॥ १२ ॥**

लोकद्वारम् अपावार्णु वयम् स्वाराज्याय हुम् आ त्वा पश्येम इति ।

हे सूर्या, प्रकाशाचें द्वार उघड (म्हणजे) आम्ही स्वाराज्य (स्वर्लोका) करितां तुला पहावें (तुझें प्रकाशमय दर्शन आम्हांला होवो). (हुं आ ओ आ हे सामगायनांतील निरर्थक स्वर आहेत.)

**आदित्यमथ वैश्वदेवं लो ३ कद्वारमपावा ३ र्णू ३३ पश्येम त्वा वय९ साम्रा ३३३३३ हु ३ म् आ ३३ ज्या ३ यो ३ आ ३२१११ इति ॥ १३ ॥**

अथ आदित्यम् वैश्वदेवम् । लोकद्वारम् अपावार्णु वयम् साम्राज्याय हुम् आ त्वा पश्येम इति ।

नंतर वैश्वदेवरूपी सूर्याची (प्रार्थना करावी) हे वैश्वदेवरूप सूर्या, प्रकाशाचें द्वार उघड (म्हणजे) आम्ही साम्राज्य (भूः भुवः स्वः तीन्ही लोकां) करितां तुला पहावें.(तुझें प्रकाशमय दर्शन आम्हाला होवो). (हुं आ ओ आ हें सामगायनांतील निरर्थक स्वर आहेत.)

**अथ जुहोति नम आदित्येभ्यश्च विश्वेभ्यश्च देवेभ्यो दिविक्षिद्भ्यो लोकक्षिद्भ्यो लोकं मे यजमानाय विन्दत ॥ १४ ॥**

**एष वै यजमानस्य लोक एतास्म्यत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहापहत परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति ॥ १५ ॥**

अथ जुहोति । आदित्येभ्यः च विश्वेभ्यः च देवेभ्यः दिविक्षिद्भ्यः लोकक्षिद्भ्यः नमः । यजमानाय मे लोकम् विन्दत । एषः वै यजमानः (अहम्) अत्र आयुषः परस्तात् यजमानस्य लोके एतास्मि । परिघम् अपहत । स्वाहा । इति उक्त्वा उत्तिष्ठति ।

नंतर हवन करावें. पृथ्वीनिवासी व आकाशनिवासी आदित्य व विश्वेदेव यांना नमस्कार (असो). यजन करणाऱ्या मला स्वर्लोक प्राप्त करून दे. हा यजन करणारा मी येथील आयुष्यानंतर (मृत्युपावल्यावर) यजन कर्त्यांच्या लोकाला जाईन. (तेथील) प्रतिबंध दूर कर. आहुति देतों. असा मंत्र म्हणून उठावें.

**तस्मा आदित्याश्च विश्वे च देवास्तृतीयसवनꣳ संप्रयच्छन्त्येष ह वै यज्ञस्य मात्रां वेद य एवं वेद य एवं वेद ॥ १६ ॥**

**आदित्यः च विश्वे देवाः च तस्मै तृतीयम् सवनम् संप्रयच्छन्ति । यः एवम् वेद एषः ह वै यज्ञस्य मात्राम् वेद ।**

आदित्य व विश्वेदेव त्याला तृतीय सवन ( स्वर्लोक ) देतात. जो ह्याप्रमाणें जाणतो तोच यज्ञाचें तात्विक स्वरूप जाणतो. ( द्विरुक्ति समाप्तदर्शक आहे ).

मंत्र ४ ते १६ अखेरपर्यंत सामगायन, वसु रुद्र व आदित्य यांच्या प्रार्थना व आहुतींचे मंत्र असे विषय आले आहेत. प्रार्थनामंत्रांत प्रकाश व स्वातंत्र्य यांची मागणी असून, स्वराज्य व साम्राज्य या शब्दांनीं सत्ता मिळण्याविषयीं प्रार्थना केली आहे. सकाम वृत्तीच्या स्वार्थपरायण मनुष्याला सत्ता ही मुख्यत्वेंकरून स्वतःच्या विषयोपभोगाकरितां हवीशी वाटते. चैनबाज मनुष्याच्या किंवा समाजाच्या हातांत सत्ता गेली म्हणजे त्या सत्तेचा केवळ चैनबाजीकडेच उपयोग होतो. आणि हातीं असलेल्या सत्तेनें या चैनबाजीच्या—विषयोपभोगाच्या पूर्ततेकरितां इतरांचें स्वातंत्र्य, धन इत्यादिकांचा अपहार केला जातो. या अनेक दोषांमुळें ज्ञानी मनुष्यानें सत्तेचा अंगिकारच करूं नये असें कित्येकांना वाटतें पण तें बरोबर नाहीं. कारण सत्ता ही केवळ दुष्कर्मालाच उपयोगीं पडते असें नाहीं. सत्कर्माला देखील तिचा चांगला उपयोग होतो. किंबहुना सत्तावान् ज्ञानी मनुष्य जितकें लोक-

कल्याण करूं शकतो, तितकें तें इतरांच्या हातून होणें शक्य नसतें. श्रीमदाचार्य आद्य शंकराचार्यांना देखील धर्मसंस्थापनेकरितां किंवा धर्मसंरक्षणाकरितां राजसत्तेचें सहाय्य घ्यावेंच लागलें आहे. म्हणून सत्ता किंवा स्वातंत्र्य स्वरूपतः सदोष नसल्यामुळें ज्ञानी मनुष्याकडून त्याचा दुरुपयोग केला जात नाहीं. याकरितांच औपनिषद् श्रुतीनें स्वातंत्र्य, सत्ता इत्यादि हेतु सद्धेतु म्हणूनच स्वीकारले आहेत. त्यांचा ज्ञानी मनुष्यानें अंगिकार करून लोकसंग्रहाचे कामीं उपयोग करावा; असा हें सवनकर्मांचें अनुष्ठान वर्णन करण्यांत श्रुतीचा अभिप्राय आहे.

## दुसऱ्या अध्यायाचा उपसंहार.

छांदोग्याच्या दुसऱ्या अध्यायांत सामगायनाचें सामान्य वर्णन झालें आहे. उपनिषद् कालांत सामगायन फारच लोकप्रिय झालें होतें. त्यामुळेंच साम हा शब्द चांगुलपणाचा वाचक झाला होता. मराठी भाषेंत संगीत हा शब्द देखील चांगला अशा अर्थानें क्वचित् उपयोगांत आल्याचें आढळून येतें. असाच प्रकार साम शब्दाच्या अर्थासंबंधीं प्राचीन काळीं झाला होता.

यज्ञांतील सामगायनांत गाण्याच्या साथीला उपयोगीं पडणाऱ्या वाद्यांचा उल्लेख या अध्यायांत झालेला नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. गवई लोक ज्याप्रमाणें दोन्हीकडे दोन साथीदार घेऊन गावयास बसतात, तसाच सामगायनाचाही प्रकार आहे. प्रस्तोता व प्रतिहर्ता हीं दोघा साथीदारांचीं नांवें असून उद्गाता हें मुख्य गयकाचें नांव आहे. साथीदारांनीं कोणत्या भागाचें गायन करावयाचें व उद्गात्यानें कोणते भाग गावयाचे हें ठरलेलें आहे. ऋचा हीं सामगायनाचीं पद्ये होत. निरनिराळ्या छंदांतील ऋचा सामगायनांत वेगवेगळ्या पद्धतीनें गाइल्या जातात.

सामगायनाच्या सामान्य पद्धतींत पांच प्रकार मुख्य असतात. म्हणूनच या पद्धतीला पंचविध साम असें येथें म्हटलें आहे. सांप्रतकालच्या कलावंत गायकींमध्यें देखील स्थूलमानानें पांच प्रकार असतात. अस्थायी, अंतरा, आलाप, बोलतान व शुद्ध तान हेच ते पांच प्रकार होत. सामगाय-

नांतील पांच प्रकार कांहीं अंशीं असेच आहेत. हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार व निधन अशीं सामांतील पांच विभागाचीं नांवें आहेत. हिंकार हा प्रारंभीं लावावयाचा स्वर आहे. तो प्रस्तोत्यानें लावावा असें कित्येक म्हणतात. परंतु हिंकार हा स्वर तिघांनींही धरावा हेंच मत विशेष रूढ दिसतें. प्रस्ताव हा विभाग प्रस्तोत्यानें गावयाचा आहे. सामगायनाच्या प्रारंभींचा हा विभाग आहे. उद्गीथ व निधन हे दोन विभाग अनुक्रमें मध्य व अंत्य असून ते दोन्हीही उद्गात्यानेंच गावयाचे असतात. याविषयीं देखील निधन हा शेवटचा भाग तिघांनीं मिळून गावा असें कित्येकांचें मत आहे. प्रतिहार हा विभाग प्रतिहर्त्यानें गावयाचा असतो. याप्रमाणें तीन ऋत्विजांनीं गाइलें जाणारें पंचविध साम आहे. या सामाच्या देवता अनेक सांगितल्या आहेत. सामाच्या या आधिदैविक वर्णनांत आदित्य देवतेला प्राधान्य येणें साहजिकच आहे. कारण आदित्य हाच सर्व देवांचा अधिपति म्हणजे देवाधिदेव आहे. आदित्याप्रमाणेंच आध्यात्मिक सामामध्यें प्राणदेवतेला प्राधान्य आहे. प्राण हाच अवयवशक्तीचा व इंद्रियशक्तीचा राजा आहे. या दोन प्रधान देवतांना अनुलक्षून सामगायनाचें वर्णन केलें आहे. इतर अनेक देवतांचीं स्तोत्रें सामांमध्यें गाइलीं जात असलीं तरी, आदित्य व प्राण या दोन देवतांचीं सामेंच औपनिषद विद्येला विशेष महत्त्वाचीं वाटतात यात शंका नाहीं.

आदि व उपद्रव या नांवाचे आणखी दोन विभाग या पंचविध सामामध्यें समाविष्ट केले म्हणजे तें सप्तविध साम होतें. या सामाचे सात प्रकार असले तरी त्यांची विभागणी तिघा ऋत्विजांतच व्हावयाची असते. पंचविध व सप्तविध अशा सामगायनांचीं अनेक फलें सांगितलीं आहेत. तीं त्यांच्या त्यांच्या देवतांना व स्तोत्रांच्या अर्थांना अनुरूप अशींच आहेत. नंतर अकराव्या खंडापासून सामांच्या बरोबर व्रतेंही सांगितली आहेत. त्यांपैकीं कांहीं आचारस्वरूप असून बरींचशीं व्रतें नैतिक सद्गुणात्मक आहेत. त्यांवरून सामगायन करणाऱ्यांनीं आपले आचार व शील उत्कृष्ट राखलें

पाहिजे असें सिद्ध होतें. रथंतर, शक्करी, रेवती, गायत्र इत्यादि नांवें निरनिराळया सामांचीं वैशिष्ट्यें दर्शविणारीं आहेत. खंड एकवीस व बावीस यांतील जागतिक साम, त्याचें फल, सर्वभूतहिताविषयीं प्रार्थना इत्यादि विषय अत्यंत महत्वाचे आहेत. त्यांवरून ब्रह्मविद्येनें सामगायनाचा विचार केला आहे तो अशा उदात्त तत्त्वाकरितांच होय असें लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. शुद्ध व सात्विक संगीताच्या योगानें भावना शुद्ध होऊन अंतःकरण सहनशील व उदार होतें. ही भावनाशुद्धि उपासनेला अत्यंत अवश्य असल्यामुळेंच ब्रह्मविद्येनें साम संगीताचा इतका सविस्तर विचार केला आहे. तेविसाव्या खंडांत धर्मस्कंध व ब्राह्मी स्थितीचें वर्णन केलें आहे. गार्हस्थ्य, वानप्रस्थ व ब्रह्मचर्य यांपैकी कोणत्याही धर्माचें निष्काम आचरण केल्यास मनुष्य ब्रह्मसंस्थ ( ज्ञानी ) होऊन अमृतत्व पावतो, असें या खंडांत श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे. भगवद्गीतेच्या अठराव्या अध्यायांत श्लोक एके· चाळीस ते चव्वेचाळीसपर्यंत वर्णधर्मांचें वर्णन केलें आहे. ईश्वरोपासनाबुद्धिपूर्वक (आपापल्या) वर्णधर्मांची कर्तव्यें आचरण केल्यास मनुष्याला अमृतत्त्वाची प्राप्ति होते असें पुढील पंचेचाळीस व शेहेचाळीस या दोन श्लोकांत सांगून कर्मयोगातील मध्यवर्ती सिद्धान्त स्पष्ट केला आहे. ( गीता अ. १८ श्लोक ४१ ते ४६ र. दीपिका पृष्ठ ४०४ ते ४०९ ). त्याप्रमाणेंच येथें आश्रम-धर्मांचें वर्णन करून कर्मयोगाच्या सिद्धान्ताचेंच प्रतिपादन करण्यांत आलें आहे. गीता व छांदोग्य यांतील या दोनही प्रकरणांचा तुलनात्मक अभ्यास केल्यास मोक्षदायक अशा कर्मयोगाचेंच प्रतिपादन या दोनही ग्रंथात झालें आहे अशी कोणाचीही सहज खात्री पटेल.

पुढें वेद, व्याहृति व ॐकार यांची उत्पत्ति सांगून शेवटीं सवनकर्मांच्या अनुष्ठानाचें वर्णन केलें आहे. श्रेयस्काम मनुष्यानें ज्ञानार्जनाबरोबर कर्तव्याचरण व उपासना या दोहोंचेंही अनुष्ठान केलें पाहिजे, असा या वर्णनांतील श्रुतीचा अभिप्राय आहे. याप्रमाणें कर्म उपासना व ज्ञान या तीनही तत्त्वांचा मेळ घालून या तीन तत्त्वांनीं बनणारा कर्मयोग हाच

मोक्षप्राप्तीचा श्रेष्ठ मार्ग होय असें शेवटीं दाखवून श्रुतीनें हा अध्याय समाप्त केला आहे.

---

# तृतीयोऽध्यायः ।

## अथ प्रथमः खण्डः ।

**असौ वा आदित्यो देवमधु तस्य द्यौरेव तिरश्चीन-वꣳशोऽन्तरिक्षमपूपो मरीचयः पुत्राः ॥ १ ॥**

**असौ आदित्यः वै देवमधु । द्यौः एव तस्य तिरश्चीनवंशः अन्तरिक्षम् अपूपः मरीचयः पुत्राः ।**

हा सूर्यच देवांचा मध (देवांना आवडणारा रस) होय. द्युलोक ही त्याची तिरकस खांदी, अंतरिक्ष हेंच पोळें आणि किरण हे त्यांतील सूक्ष्म प्राणी होत.

प्रस्तुत मंत्रापासून तिसऱ्या अध्यायास प्रारंभ होत आहे. उपासना-विधीचा विषयच पुढें चालू आहे. सूर्य, द्युलोक, अंतरिक्ष व किरण यांवर मधाच्या पोळ्याचें रूपक केलें आहे. आदित्य हा सर्व देवतांना आनंद व जीवन देणारा असल्यानें त्यालाच 'मध असें म्हटलें आहे. आदित्य हेंच आधिदैविक विचारांचें उगमस्थान होय, असा या मंत्रांतील अभिप्राय आहे.

**तस्य ये प्राञ्चो रश्मयस्ता एवास्य प्राच्यो मधुनाड्यः । ऋच एव मधुकृत ऋग्वेद एव पुष्पं ता अमृता आपस्ता वा एता ऋचः ॥ २ ॥**

**तस्य ये प्राञ्चः रश्मयः ताः एव अस्य प्राच्यः मधुनाड्यः । ऋचः एव मधुकृतः । ऋग्वेदः एव पुष्पम् । ताः एताः ऋचः ताः अमृताः आपः वै ।**

त्या सूर्याचे जे पूर्वेकडील किरण तींच ह्या पोळ्यांचीं पूर्व बाजूचीं मधाचीं घरें होत; ऋचा हेच भ्रमर (मधमाशा) होत; ऋग्वेद हेंच पुष्प होय. त्या ह्या ऋग्वेदऋचा हाच (मधाचा) गोड रस होय.

**एतमृग्वेदमभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽजायत ॥ ३ ॥**

**एतम् ऋग्वेदम् ( ऋचः भ्रमराः ) अभ्यतपन्। तस्य अभितप्तस्य यशः तेजः इन्द्रियम् वीर्यम् अन्नाद्यम् रसः अजायत।**

त्या ऋग्वेदाला ते ऋचारूप भ्रमर संशोधित करिते झाले, म्हणजे मधुरस शोधून घेते झाले. त्या शोधित मधुरसाचा कर्मसिद्धि, सामर्थ्य, इंद्रियसौष्ठव, पराक्रम, उपभोगशक्ती (ह्या स्वरूपांचा) मध बनला.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य रोहितꣳ रूपम् ॥ ४ ॥**

**तत् व्यक्षरत्। तत् आदित्यम् आभितः अश्रयत्। यत् आदित्यस्य रोहितम् रूपम् तत् वै एतत्।**

तो मध वाहूं लागला. तो सूर्याच्या बाजूला मिळाला. जें सूर्याचें तांबडें रूप तेंच हें होय.

## पहिल्या खण्डाचा सारांश.

प्रस्तुत खंडाचे चार मंत्र आहेत. त्यांतील पहिल्या मंत्रांत रूपकाची सामान्य कल्पना दिली आहे. मधमाशा आपल्या मधाचें पोळें झाडावरील एखाद्या वांकड्या तिकड्या डहाळीवर चिकटवितात, तें मनुष्याच्या हातीं सहसा लागूं नये असा त्यांचा उद्देश असावा. पुढील तीन मंत्रांत पूर्वेच्या बाजूचें वर्णन आलें आहे. ऋचारूप भ्रमरांनीं ऋग्वेदरूपी फुलांतील मधुरस ओढून घेतला. ह्या तिसऱ्या मंत्रांतील वर्णनांत वैदिक वाङ्मयांतून ऋग्वेदाची निवड कशी झाली, हें दर्शविण्याचा उद्देश असावा. चौथ्या मंत्रांत फलश्रुति सांगून हें खंड समाप्त केलें आहे.

### अथ द्वितीयः खण्डः ।

**अथ येऽस्य दक्षिणा रश्मयस्ता एवास्य दक्षिणा मधुनाड्यो यजूꣳष्येव मधुकृतो यजुर्वेद एव पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥**

अथ ये अस्य दक्षिणाः रश्मयः ताः एव अस्य दक्षिणाः मधुनाड्यः। यजूंषि एव मधुकृतः यजुर्वेदः एव पुष्पम्। ताः अमृताः आपः।

तसेंच जे ह्या सूर्याचे दक्षिणेकडील किरण, तींच ह्या पोळ्यांचीं दक्षिणबाजूचीं मधाचीं घरें होत. यजु म्हणजे गद्य मंत्र हेच भ्रमर, यजुर्वेद हेंच पुष्प, आणि गद्य मंत्र हाच मधुरस होय.

**तानि वा एतानि यजूꣳष्येतं यजुर्वेदमभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽजायत ॥२॥**

तानि वै एतानि यजूंषि एतम् यजुर्वेदम् अभ्यतपन्। तस्य अभितप्तस्य यशः तेजः इन्द्रियम् वीर्यम् अन्नाद्यम् रसः अजायत।

ते हे यजुर्वेदाचे गद्य मंत्र त्या यजुर्वेदाला संशोधित करिते झाले. त्या शोधित मधुरसाचा कर्मसिद्धि, सामर्थ्य,इंद्रियसौष्टव, पराक्रम, उपभोगशक्ति ( ह्या स्वरूपाचा ) मध बनला.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य शुक्लꣳ रूपम् ॥ ३ ॥**

तत् व्यक्षरत्। तत् आदित्यम् अभितः अश्रयत्। यत् आदित्यस्य शुक्लम् रूपम् तत् वै एतत्।

तो मध वाहूं लागला. तो सूर्याच्या बाजूला मिळाला. जें सूर्याचें शुभ्र रूप तेंच हें होय.

टीपः—मागील खंडाप्रमाणेंच या खंडाच्या तीनही मंत्रांत यजुर्वेद व सूर्य यांचें रूपकात्मक वर्णन आलें आहे.

## अथ तृतीयः खण्डः ।

**अथ येऽस्य प्रत्यञ्चो रश्मयस्ता एवास्य प्रतीच्यो मधुनाड्यः सामान्येव मधुकृतः सामवेद एव पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥**

**अथ ये अस्य प्रत्यञ्चः रश्मयः ताः एव अस्य प्रतीच्यः मधुनाड्यः। सामानि एव मधुकृतः । सामवेदः एव पुष्पम् । ताः अमृताः आपः ।**

जे या सूर्याचे पश्चिमेकडील किरण तींच या मोहळांतील पश्चिमेचीं मधाचीं घरें होत. सामें हेच भ्रमर होत. सामवेद हें फूल असून, त्या सामवेदांतील ऋचा हाच ( मधाचा ) गोड रस होय.

**तानि वा एतानि सामान्येतꣳ सामवेदमभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽजायत ॥ २ ॥**

**तानि वै एतानि सामानि एतम् सामवेदम् अभ्यतपन् । तस्य अभितप्तस्य यशः तेजः इन्द्रियम् वीर्यम् अन्नाद्यम् रसः अजायत ।**

तीं हीं सामें या सामवेदाला तप्त करितीं झालीं ( संशोधित करितीं झालीं ). त्या संशोधित स्वरूपापासून सिद्धि, पराक्रम, इन्द्रियसौष्टव, सामर्थ्य व उपभोगशक्ति ( या स्वरूपाचा ) रस उत्पन्न झाला.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य कृष्णꣳ रूपम् ॥ ३ ॥**

**तत् व्यक्षरत् । तत् आदित्यम् अभितः अश्रयत् । यत् आदित्यस्य कृष्णम् रूपम् तत् वै एतत् ।**

तो रस वाहूं लागला. तो सूर्याच्या बाजूला मिळाला; जें सूर्यांतील कृष्णरूप तेंच हें होय.

टीपः—सूर्याचे पश्चिमेकडील किरण, ऋचा सामवेद व त्यापासून होणारी फलप्राप्ति ह्यांचें मध व पोळें या रूपकानें पूर्वीसारखेंच वर्णन केलें आहे.

अथ चतुर्थः खण्डः ।

**अथ येऽस्योदञ्चो रश्मयस्ता एवास्योदीच्यो मधुनाड्यो ऽथर्वाङ्गिरस एव मधुकृत इतिहासपुराणं पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥**

**अथ ये अस्य उदञ्चः रश्मयः ताः एव अस्य उदीच्यः मधुनाड्यः। अथर्वाङ्गिरसः एव मधुकृतः। इतिहासपुराणम् पुष्पम् । ताः अमृताः आपः (सन्ति)।**

जे या सूर्याचे उत्तरेकडील किरण तींच या मोहळांतील उतरेचीं घरें होत. अथर्वाङ्गिरस (मंत्र) हेच भ्रमर असून, इतिहास व पुराणें ही पुष्पें होत. (त्या इतिहास-पुराणांतील तत्वें) हाच मधुरस होय.

**ते वा एतेऽथर्वाङ्गिरस एतदितिहासपुराणमभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽजायत ॥ २ ॥**

**ते वै एते अथर्वाङ्गिरसः एतत् इतिहास-पुराणम् अभ्यतपन्। तस्य अभितप्तस्य यशः तेजः इन्द्रियम् वीर्यम् अन्नाद्यम् रसः अजायत।**

त्या अथर्वांगिरसानीं या इतिहासपुराणांचें संशोधन केलें (त्यांतील विषय निवडून काढले). त्या संशोधित स्वरूपापासून सिद्धि, तेज, इन्द्रियसौष्ठव सामर्थ्य व उपभोगशक्ति (या स्वरूपाचा) रस उत्पन्न झाला.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य परं कृष्णꣳ रूपम् ॥ ३ ॥**

**तत् व्यक्षरत् तत् आदित्यम् अभितः अश्रयत्। यत् एतत् आदित्यस्य परम् कृष्णम् रूपम् एतत् वै तत् ( अस्ति )।**

तो रस वाहूं लागला. तो सूर्याच्या बाजूला मिळाला. जें हें सूर्याचें अतिशय काळें स्वरूप आहे, हाच तो रस होय.

## चौथ्या खंडाचा सारांश.

विषय व रूपकें या खंडांत पूर्वीसारखींच आहेत. अथर्वाङ्गिरस या पदावरून मंत्र किंवा अथर्ववेदाचे प्रणेते ऋषि या दोहोंचेंहि ग्रहण करण्यास हरकत नाहीं. इतिहास व पुराण हे दोन विषय वेगवेगळे आहेत, ही गोष्ट बृहदारण्यकांत स्पष्ट आली आहे. ( उ. नि. र. प्र. बृ. अ. २ ब्रा. ४ मं. १० पृ. ७४ ते ७६ आणि अ. ४ ब्रा. १ मं. २ पृ. ४६० ते ४६२). इतिहासपुराण हाच अथर्ववेदाचा मुख्य भाग असून त्यांतील निवडक विषय अथर्वांगिरस मंत्रांत आलेले असावेत. बाकीचें वर्णन पूर्वीसारखेंच आहे.

### अथ पञ्चमः खण्डः ।

**अथ येऽस्योर्ध्वा रश्मयस्ता एवास्योर्ध्वा मधुनाड्यो गुह्या एवादेशा मधुकृतो ब्रह्मैव पुष्पं ता अमृता आपः ॥१॥**

**अथ ये अस्य ऊर्ध्वाः रश्मयः ताः एव अस्य ऊर्ध्वाः मधुनाड्यः । गुह्याः आदेशाः एव मधुकृतः । ब्रह्म एव पुष्पम् । ताः अमृताः आपः ( सन्ति ) ।**

जे या सूर्याचे ऊर्ध्व ( वरचे ) किरण आहेत, तींच या पोळयाच्या वरच्या भागाकडील मधाचीं घरें होत. गूढ आज्ञा हेच भ्रमर असून, ॐकार ( वाच्य ब्रह्म ) हेंच पुष्प होय. ( ॐकाराचें तत्त्व ) हाच मधुर रस होय.

**ते वा एते गुह्या आदेशा एतद्ब्रह्माभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽजायत ॥ २ ॥**

**ते वै एते गुह्याः आदेशाः एतत् ब्रह्म अभ्यतपन् । तस्य अभितप्तस्य यशः तेजः इन्द्रियम् वीर्यम् अन्नाद्यम् रसः अजायत ।**

ते गुह्य आदेश ( आज्ञा ) या (ॐकाररूप) ब्रह्माचें संशोधन करिते झाले. या संशोधित तत्त्वापासून सिद्धि, तेज, इन्द्रियसौष्ठव, सामर्थ्य व उपभोगशक्ति ( या स्वरूपाचा ) रस उत्पन्न झाला.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य मध्ये क्षोभत इव ॥ ३ ॥**

तत् व्यक्षरत् । तत् आदित्यम् अभितः अश्रयत् । यत् एतत् आदित्यस्य मध्ये क्षोभते इव एतत् वै तत् ( अस्ति ) ।

तो रस वाहूं लागला. तो सूर्याच्या बाजूला मिळाला. जें हें आदित्यमंडलाच्या मध्यभागीं क्षोभयुक्त तळपणारें असें तेज आहे, ह्राच तो रस होय.

**ते वा एते रसानाꣳ रसा वेदा हि रसास्तेषामेते रसा-स्तानि वा एतान्यमृतानाममृतानि वेदा ह्यमृतास्तेषामे-तान्यमृतानि ॥ ४ ॥**

ते एते वै रसानाम् रसाः । हि वेदाः रसाः तेषाम् एते रसा । तानि एतानि वै अमृतानि । हि वेदाः अमृताः तेषाम् एतानि अमृतानि ।

ते हे मंत्रच रसांचे रस होत. कारण वेद हे रस असून त्यांचे हे सारभूत रस आहेत. तीं हीं ( सूर्याचीं रूपेंच ) अमृतें होत. कारण वेद हे अमृतरूप ( अक्षय ) असून,त्यांचीं हीं रूपेंही अमृतें आहेत.

### अथ षष्ठः खण्डः

**तद्यत्प्रथमममृतं तद्वसव उपजीवन्त्यग्निना मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥ १ ॥**

तत् यत् प्रथमम् अमृतम् तत् वसवः अग्निना मुखेन उपजीवन्ति । देवाः न अश्नन्ति न पिबन्ति एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यन्ति वै ।

तें जें पाहिलें अमृत ( रोहितरूप ), तें वसुदेवता अग्निरूप मुखानें ग्रहण करितात. देव ( प्रत्यक्ष ) खात नाहींत व पीत नाहींत. हें अमृत पाहूनच संतुष्ट होतात.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यान्ति ॥२॥**

ते एतत् एव रूपम् अभिसंविशन्ति एतस्मात् रूपात् उद्यान्ति ।

ते ( वसुदेव ) ह्याच लोहित रूपांत प्रवेश करितात व ह्याच रूपांतून प्रगट होतात.

**स य एतदेवममृतं वेद वसूनामेवैको भूत्वाग्निनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

यः एतत् अमृतम् एवम् वेद सः वसूनाम् एव एकः भूत्वा अग्निना मुखेन एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यति । सः एतत् एव रूपम् अभिसंविशति एतस्मात् रूपात् उदेति ।

जो हें अमृत ह्या प्रमाणें जाणतो तो वसुदेवतांपैकींच एक होऊन अग्निरूपी मुखानें हें अमृत पाहूनच तृप्त होतो. तो ह्याच रूपांत प्रवेश करितो ( आणि ) ह्याच रूपांतून प्रगट होतो.

**स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता वसूनामेव तावदाधिपत्यं स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

सः यावत् आदित्यः पुरस्तात् उदेता पश्चात् अस्तम् एता तावत् वसूनाम् आधिपत्यम् स्वाराज्यम् पर्येता एव ।

तो जोंपर्यंत सूर्य पूर्वेस उदय पावत आहे ( आणि ) पश्चिमेस अस्ताला जात आहे तोंपर्यंत वसुदेवतांमध्यें प्रमुखता आणि ( त्या देवतांचें ) स्वर्गांतील वैभव निश्चयानें प्राप्त करून घेतो.

## सहाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडाचे चार मंत्र आहेत. पूर्वीच्या विषयाला अनुलक्षूनच यांत वर्णन आलें आहे. एकंदर मुख्य देवता तेहतीस असून, त्यापैकीं आठ वसु नावाचे देव आहेत. या वसु देवांचा सूर्याच्या आरक्त बिंबाशीं संबंध आहे. असा या वर्णनाचा अभिप्राय आहे.

**अथ सप्तमः खण्डः ।**

**अथ यद्द्वितीयममृतं तद्रुद्रा उपजीवन्तीन्द्रेण मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥**

**अथ यत् द्वितीयम् अमृतम् तत् रुद्राः इन्द्रेण मुखेन उपजीवन्ति । देवाः न अश्नन्ति न पिबन्ति वै एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यन्ति ।**

जें दुसरें अमृत आहे तें,रुद्रदेवता इन्द्ररूपी ( विद्युद्रूपी ) मुखानें ग्रहण करितात. देव प्रत्यक्ष खातही नाहींत व पीतही नाहींत. हें ( सूर्यबिंबांतील शुक्ल स्वरूप ) अमृत पाहूनच तृप्त होतात.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥ २ ॥**

**ते एतत् एव रूपम् अभिसंविशन्ति एतस्मात् रूपात् उद्यन्ति ।**

ते ( रुद्र देव ) ह्या ( शुक्ल ) रूपांत प्रविष्ट होतात व त्याच रूपांतून प्रगट होतात.

**स य एतदेवममृतं वेद रुद्राणामेवैको भूत्वेन्द्रेणैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

**यः एतत् अमृतम् एवम् वेद सः रुद्राणाम् एव एकः भूत्वा इन्द्रेण मुखेन एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यति । सः एतत् एव रूपम् अभिसंविशति एतस्मात् रूपात् उदेति ।**

जो हें अमृत ह्याप्रमाणें जाणतो तो रुद्रदेवतांपैकींच एक होऊन इन्द्ररूपी मुखानें हें अमृत पाहूनच तृप्त होतो. तो ह्याच रूपांत प्रवेश करितो ( आणि ) त्याच रूपांतून प्रगट होतो.

**स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता द्विस्तावद्दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता रुद्राणामेव तावदाधिपत्यँ स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**सः यावत् आदित्यः पुरस्तात् उदेता पश्चात् अस्तम् एता तावत् द्विः दक्षिणतः उदेता उत्तरतः अस्तम् एता तावत् एव रुद्राणाम् आधिपत्यम् स्वाराज्यम् पर्येता ।**

तो जोंपर्यंत सूर्य पूर्वेस उदय पावत आहे ( आणि ) पश्चिमेस अस्ताला जात आहे, त्याहून दुप्पट काल दक्षिणेस उदय पावतो व उत्तरेस अस्ताला जातो,तोंपर्यंत रुद्र देवांमध्यें प्रमुखता आणि ( त्या देवतांचें ) स्वर्गांतील वैभव प्राप्त करून घेतो.

**अथाष्टमः खण्डः ।**

**अथ यत्तृतीयममृतं तदादित्या उपजीवन्ति वरुणेन मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥**

**अथ यत् तृतीयम् अमृतम् तत् आदित्याः वरुणेन मुखेन उपजीवन्ति । देवाः न अश्नन्ति न पिबन्ति वै । एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यन्ति ।**

आतां जें तिसरें अमृत आहे,तें आदित्य देवता वरुणरूपी मुखानें ग्रहण करितात. देव प्रत्यक्ष खातही नाहींत व पीतही नाहींत. सूर्यबिंबातील हें ( कृष्णस्वरूप ) अमृत पाहूनच तृप्त होतात.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥ २ ॥**

**ते एतत् एव रूपम् अभिसंविशन्ति एतस्मात् रूपात् उद्यन्ति ।**

ते ( आदित्यदेव ) ह्या स्वरूपांत प्रविष्ट होतात व ह्याच स्वरूपांतून प्रगट होतात.

स य एतदेवममृतं वेदादित्यानामेवैको भूत्वा वरुणेनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥

यः एतत् अमृतम् एवम् वेद सः आदित्यानाम् एव एकः भूत्वा वरुणेन मुखेन एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यति । सः एतत् एव रूपम् अभिसंविशति एतस्मात् रूपात् उदेति ।

जो हें अमृत ह्याप्रमाणें जाणतो, तो आदित्य देवतांपैकींच एक होऊन, वरुणरूपी मुखानें हें अमृत पाहूनच तृप्त होतो. तो ह्याच रूपांत प्रवेश करितो ( आणि ) ह्याच रूपांतून प्रगट होतो.

स यावदादित्यो दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता द्विस्तावत्पश्चादुदेता पुरस्तादस्तमेतादित्यानामेव तावदाधिपत्यं स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥

सः यावत् आदित्यः दक्षिणतः उदेता उत्तरतः अस्तम् एता तावत् द्विः पश्चात् उदेता पुरस्तात् अस्तम् एता। आदित्यानाम् एव आधिपत्यम् स्वाराज्यम् पर्येता ।

तो जोंपर्यंत सूर्य ( पूर्वेस उदय पावत आहे आणि पश्चिमेस अस्ताला जात आहे त्याहून दुप्पट काळ ) दक्षिणेस उदय पावतो व उत्तरेस अस्ताला जातो, त्याहूनही दुप्पटकाळ पश्चिमेस उदय पावतो व पूर्वेस अस्त पावतो तोंपर्यंत तो आदित्य देवांमध्यें प्रमुखता आणि ( त्या देवतांचें ) स्वर्गांतील वैभव प्राप्त करून घेतो.

अथ नवमः खण्डः ।

अथ यच्चतुर्थममृतं तन्मरुत उपजीवन्ति सोमेन मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥

अथ यत् चतुर्थम् अमृतम् तत् मरुतः सोमेन मुखेन उपजीवन्ति । देवाः न अश्नन्ति न पिबन्ति वै एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यन्ति ।

जें चौथें अमृत आहे, तें मरुत देवता सोमरूपी मुखानें ग्रहण करितात. देव प्रत्यक्ष खातही नाहींत व पीतही नाहींत. सूर्यबिंबांतील हें ( अतिकृष्णरूप ) अमृत पाहूनच तृप्त होतात.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥ २ ॥**

ते एतद् एव रूपम् अभिसंविशन्ति एतस्मात् रूपात् उद्यन्ति ।

ते ( मरुत देव ) ह्या स्वरूपांत प्रविष्ट होतात व ह्याच स्वरूपांतून प्रगट होतात.

**स य एतदेवममृतं वेद मरुतामेवैको भूत्वा सोमेनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

यः एतद् अमृतम् एवम् वेद सः मरुताम् एव एकः भूत्वा सोमेन मुखेन एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यति । सः एतत् एव रूपम् अभिसंविशति एतस्मात् रूपात् उदेति ।

जो हें अमृत ह्याप्रमाणें जाणतो. तो मरुतांच्यापैकीं एक होऊन सोमरूपी मुखानें हें अमृत पाहूनच तृप्त होतो. तो ह्याच रूपांत प्रवेश करितो ( आणि ) ह्याच रूपांतून प्रगट होतो.

**स यावदादित्यः पश्चादुदेता पुरस्तादस्तमेता द्विस्तावदुत्तरत उदेता दक्षिणतोऽस्तमेता मरुतामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

सः यावत् आदित्यः पश्चात् उदेता पुरस्तात् अस्तम् एता तावत् द्विः उत्तरतः उदेता दक्षिणतः अस्तम् एता तावत् मरुताम् एव आधिपत्यम् स्वाराज्यम् पर्येता ।

तो जोंपर्यंत सूर्य पश्चिमेस उदय पावत आहे ( आणि ) पूर्वेस अस्ताला जात आहे, त्याहून दुप्पट काळ उत्तरेस उदय पावतो व

दक्षिणेस अस्ताला जातो तोंपर्यंत मरुत देवांमध्यें प्रमुखना आणि ( त्या देवतांचें ) स्वर्गांतील वैभव प्राप्त करून घेतो.

### अथ दशमः खण्डः ।

**अथ यत्पञ्चमममृतं तत्साध्या उपजीवन्ति ब्रह्मणा मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति॥१॥**

**अथ यत् पंचमम् अमृतम् तत् साध्याः ब्रह्मणा मुखेन उपजीवन्ति । देवाः न अश्नन्ति न पिबन्ति वै एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यन्ति ।**

जें पांचवें अमृत आहे तें साध्य देव ब्रह्मरूपी मुखानें ग्रहण करितात. देव प्रत्यक्ष खातही नाहींत व पीतही नाहींत. ( सूर्य-बिंबांतील ) हें अमृत पाहूनच तृप्त होतात.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥ २ ॥**

**ते एतत् एव रूपम् अभिसंविशन्ति एतस्मात् रूपात् उद्यन्ति ।**

ते ( साध्य देव ) ह्या स्वरूपांत प्रविष्ट होतात. व ह्याच स्वरूपांतून प्रगट होतात.

**स य एतदेवममृतं वेद साध्यानामेवैको भूत्वा ब्रह्मणैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

**यः एतत् अमृतम् एवम् वेद सः साध्यानाम् एव एकः भूत्वा ब्रह्मणा मुखेन एतत् अमृतम् दृष्ट्वा एव तृप्यति सः एतत् एव रूपम् अभिसंविशति एतस्मात् रूपात् उदेति ।**

जो हें अमृत ह्याप्रमाणें जाणतो तो साध्य देवांपैकींच एक होऊन ब्रह्मरूपी मुखानें हें अमृत पाहूनच तृप्त होतो. तो ह्याच रूपांत प्रवेश करितो ( आणि ) ह्याच रूपांतून प्रगट होतो.

**स यावदादित्य उत्तरत उदेता दक्षिणतोऽस्तमेता द्विस्तावदूर्ध्वं उदेतार्वागस्तमेता साध्यानामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**सः यावत् आदित्यः उत्तरतः उदेता दक्षिणतः अस्तम् एता तावत् द्विः ऊर्ध्वम् उदेता अर्वाक् अस्तम् एता तावत् साध्यानाम् आधिपत्यम् स्वाराज्यम् पर्येता ।**

तो जोंपर्यंत सूर्य उत्तरेस उदय पावत आहे ( आणि ) दक्षिणेस अस्ताला जात आहे, त्याहून दुप्पट काळ उर्ध्व दिशेस उदय पावतो व अधर दिशेस अस्ताला जातो. तोपर्यंत साध्य देवांमध्यें प्रमुखता आणि ( त्या देवतांचें ) स्वर्गातील वैभव प्राप्त करून घेतो.

**अथैकादशः खण्डः ।**

**अथ तत ऊर्ध्वं उदेत्य नैवोदेता नास्तमेतैकल एव मध्ये स्थाता तदेष श्लोकः ॥ १ ॥**

**अथ ततः ऊर्ध्वः न एव उदेता उदेत्य न अस्तम् एता एकलः एव मध्ये स्थाता । तत् एषः श्लोकः ।**

त्यानंतर त्याहून वर ( असणारा देव ) उदय पावत नाहीं ( किंवा ) उदय पावून अस्तालाही जात नाहीं; एकस्वरूपच मध्यवर्ती असतो. त्याविषयीं हा ( पुढील )श्लोक ( प्राचीन मंत्र ) आहे.

**न वै तत्र न निम्लोच नोदियाय कदाचन । देवास्तेनाहꣳ सत्येन मा विराधिषि ब्रह्मणेति ॥ २ ॥**

**तत्र ( आदित्यः ) न वै । कदाचन निम्लोचः न उदियाय न । ( हे ) देवाः तेन सत्येन ब्रह्मणा अहम् मा विराधिषि इति ।**

( तो श्लोक असा):—तेथें सूर्यबिंब ( आकार) नाहीं ( अर्थात् ) कधींही अस्त नाहीं व उदय पावलेलाही नाहीं. हे देवांनो, त्या सत्यस्वरूप ब्रह्माशीं मीं विरोधी न व्हावें. ( माझा विरोध नसो. )

**न ह वा अस्मा उदेति न निम्लोचति सकृद्दिवा हैवास्मै भवति य एतामेवं ब्रह्मोपनिषदं वेद ॥ ३ ॥**

यः एताम् ब्रह्मोपनिषदम् एवम् वेद अस्मै न वै उदेति न निम्लोचति ह। अस्मै सकृत् दिवा एव भवति ह ।

जो हें ब्रह्मसंबंधीं रहस्यज्ञान ह्याप्रमाणें जाणतो, त्याला उदयही नसतो व अस्तही नसतो. त्याला नेहमीं प्रकाशच असतो.

**तद्धैतद्ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः प्रजाभ्यस्तद्धैतदुद्दालकायारुणये ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रोवाच ॥ ४ ॥**

तत् एतत् ब्रह्मा प्रजापतये प्रजापतिः मनवे मनुः प्रजाभ्यः उवाच ह। तत् एतत् ब्रह्म पिता ( अरुणः ) आरुणये ज्येष्ठाय पुत्राय उद्दालकाय प्रोवाच ।

हें ज्ञान ब्रह्मदेवानें प्रजापतीला, प्रजापतीनें मनूला व मनूनें लोकांना सांगितलें. तेंच हें ज्ञान बापानें (अरुणानें) आपला ज्येष्ठ पुत्र आरुणि उद्दालक याला विशद करून सांगितलें.

**इदं वाव तज्ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रब्रूयात्प्रणाय्याय वान्तेवासिने ॥ ५ ॥**

तत् वाव इदम् ब्रह्म पिता ज्येष्ठाय पुत्राय प्रणाय्याय अन्तेवासिने वा प्रब्रूयात् ।

तेंच हें ज्ञान पित्यानें ज्येष्ठ पुत्राला किंवा योग्य शिष्याला सांगावें.

**नान्यस्मै कस्मैचन यद्यप्यस्मा इमामद्भिः परिगृहीतां धनस्य पूर्णां दद्यादेतदेव ततो भूय इत्येतदेव ततो भूय इति ॥ ६ ॥**

यदि अपि अस्मै अद्भिः परिगृहीताम् धनस्य पूर्णाम् इमाम् दद्यात् अन्यस्मै कस्मैचन न ( प्रब्रूयात् )। ततः एतत् एव भूयः इति । २

जरी ( दुसऱ्याकोणीं ) त्याला समुद्रवलयांकित व संपत्तीनें भर-
लेली ही ( पृथ्वी ) दिली तरी दुसऱ्या कोणाला हें ( ज्ञान ) सांगूं
नये. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

## १ ते ११ खंडांचा सारांश.

प्रस्तुत खंडाच्या शेवटीं पहिल्या खंडापासून सुरू झालेलें विवेचन पूर्ण झालें आहे. किंबहुना, विद्येची परंपरा, उपदेशाविषयींचे नियम इत्यादि गोष्टींवरून येथें अध्याय समाप्त झाला असावा असें वाटतें. कदाचित् असाही तर्क करितां येईल कीं, छान्दोग्याच्या ग्रन्थरचनेच्या वेळीं हा अकरा खंडांचा एक अध्याय या तिसऱ्या अध्यायांत प्रकरण बनवून समाविष्ट केला असावा.

अकरा खंडांच्या या प्रकारणांत आलेला विषय मुख्यत्त्वेंकरून आधिदैविक स्वरूपाचा आहे. म्हणून या विवेचनाला आधिदैविक विद्या असें समजण्यास हरकत नाहीं. वसु, रुद्र, आदित्य व साध्य इतक्या देवतांचें वर्णन या प्रकरणांत आलें असून या सर्व देवतांचें आदित्यमंडल हेंच अधिष्ठान आहे. वसु, रुद्र, आदित्य व साध्य ह्या गणदेवता—समुदायात्मक देवता आहेत. सूर्य हा सर्व देवतांचा चालक असून, या देवांना सूर्यापासूनच सामर्थ्याचा पुरवठा होतो. वसु, रुद्र व आदित्य या तीनही गण-देवतांचें स्वरूप बृहदारण्यकांत सांगितले आहे. ( उ. नि. र. प्र. बृ. अध्या. ३ ब्रा. ९ मं. ४ ते ६ पृ. ४१५–४१७ ). परंतु तेथें साध्य देवांचा उल्लेख नाहीं. कृषिकर्मादिकांमध्यें ज्या देवता उपासिल्या जातात तेच साध्य देव होत, असें कित्येकांचें मत आहे. या सर्व गणदेवतांचें जीवन सूर्यापासून मिळणाऱ्या अमृतावर असतें. देवतांमध्यें असणाऱ्या शक्ति, तेज, ज्ञान इत्यादिकांचें सूर्य हेंच उगमस्थान होय. म्हणून सूर्यमंडलांतील देवाधिदेव सूर्य नारायण हेंच आधिदैव शास्त्राचें मुख्य अधिष्ठान आहे असें ठरतें. पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण, ऊर्ध्व आणि अधर या सर्व दिशांकडे

सूर्याचे उदयही होतात व अस्तही होतात, असें या प्रकारणांत सांगितलें आहे. सर्व दिशांनीं होणाऱ्या अस्तोदयांच्या वर्णनाचा विचार युक्तिवादाच्या दृष्टीनें करावयाचा झाल्यास, सूर्याच्या प्रदक्षिणेची उत्तर ध्रुवाकडील कल्पना स्वीकारावयास पाहिजे. त्या प्रदेशांत सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरतो, असेंच दिसतें. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते असें मत पूर्वी केव्हां तरी एकदां प्रचलित असावें असेंही मानण्यास जागा आहे. ध्रुव प्रदेशांतील पृथ्वी-भोंवतींची सूर्याची प्रदक्षिणा लक्षांत घेतल्यास सर्व दिशांनीं होणारे सूर्याचे उदयास्त सयुक्तिक वाटतात. कारण तेथें सूर्य क्षितिजाजवळून फिरत असतां वरचेवर क्षितिजाच्या खालीं जाऊन पुनः वर येणें साहजिक आहे. यावरून ह्या प्रकरणांतील वर्णन युक्तिशून्य आहे असें वाटण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. ज्ञानविज्ञान, तेजस्विता, सामर्थ्य, यशस्वी कर्तृत्व, वैभव इत्यादि गुण मनुष्याला या विद्येच्या योगानें प्राप्त होतात असें प्रस्तुत प्रकरणांत श्रुतीनें सांगितलेलें फल आधिदैविक विद्येस योग्य असेंच आहे. ही आधिदैविक विद्या ज्येष्ठ पुत्र किंवा प्रिय शिष्य यांनाच शिकवावी, म्हणजे योग्य अधिकारी असेल तर त्यालाच ती द्यावी, इतरांना देऊं नये, असें अकराव्या खंडाच्या शेवटीं सांगितलें आहे. विद्येविषयीं खरी आतुरता ज्याच्या अंतःकरणांत असेल तोच अधि-कारी होऊं शकतो. ज्याच्या अंतःकरणांत ज्ञानलालसा नसते अशा मनु-ष्यास विद्या शिकविल्यानें विद्येची हानि मात्र होते. अशा अनधिकाऱ्यानें मोबदल्यादाखल कितीही संपत्ति दिली तरी त्याला ही विद्या शिकवूं नये, असें श्रुतीनें शेवटीं बजावून सांगितलें आहे.

**अथ द्वादशः खण्डः ।**

**गायत्री वा इद॒ँ सर्वं भूतं यदिदं किंच वाग्वै गायत्री वाग्वा इद॒ँ सर्वं भूतं गायति च त्रायते च ॥१॥**

**यत् किम् च इदम् भूतम् इदम् सर्वम् गायत्री वै । वाक् वै गायत्री। इदम् सर्वम् भूतम् वाक् वै । गायति च त्रायते च ।**

जें कांहीं हें सृष्टपदार्थमात्र आहे, तें सर्व गायत्रीच आहे. वाणी हीच गायत्री होय. हें सर्व सृष्टपदार्थजात वाणीमय ( नामरूपात्मक ) आहे. वाणी ही सर्वांचें वर्णन करणारी व तारण करणारी आहे ( म्हणून तिला गायत्री म्हणतात. )

प्रस्तुत मंत्रांत गायत्री शब्दाचा अर्थ दर्शविला आहे. गायन्त त्रायते– ( गाणाऱ्याला तारिते ) हा गायत्री शब्दाचा प्रसिद्ध अर्थ आहे. परंतु येथें स्वतःच गाणारी व जगताला तारणारी म्हणून गायत्री असा गायत्री शब्दाचा अर्थ दर्शविला आहे. वाणी हें गायत्रीचें स्वरूप आहे या कल्पनेस वरील अर्थ जुळण्यासारखाच आहे. शब्द व पदार्थ यांचा संबंध व्यापक असून कायमचा आहे. पदार्थाचें ज्ञान होतें तेव्हां त्याला कांहींतरी नामाभिधान द्यावेंच लागतें. किंबहुना, असें निश्चित नामकरण करणें हा पदार्थज्ञानांतील एक महत्त्वाचा भागच आहे असें म्हटलें तरी चालेल. म्हणून या शब्दाच्या– संज्ञेच्या द्वारें वाणीचा सर्व पदार्थांशीं संबंध येतो. त्यावरून वाक्रूपी गायत्री सर्वव्यापी ठरते.

**या वै सा गायत्रीयं वाव सा येयं पृथिव्यस्या ँ हीद ँ सर्वं भूतं प्रतिष्ठितमेतामेव नातिशीयते ॥ २ ॥**

**या वै सा गायत्री या इयम् पृथिवी इयम् वाव सा। हि अस्याम् इदम् सर्वम् भूतम् प्रतिष्ठितम् एताम् एव न अतिशीयते।**

जी ती गायत्री ( आणि ) जी ही पृथ्वी तीच ती होय ( पृथ्वी व गायत्री एकच आहे ). कारण ह्या ( पृथ्वी ) वरच सर्व पदार्थजात अधिष्ठित आहे. हिच्यापलीकडे कोणताही पदार्थ जाऊं शकत नाहीं.

**या वै सा पृथिवीयं वाव सा यदिदमस्मिन्पुरुषे शरीरमस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता एतदेव नातिशीयन्ते ॥ ३ ॥**

**या वै पृथिवी इदम् वाव सा यत् इदम् शरीरम् । हि अस्मिन् पुरुषे इमे प्राणाः प्रतिष्ठिताः न अतिशीयन्ते । ( तत् ) एतत् एव सा ।**

जी ही पृथ्वी तीच हें जें शरीर ( पृथ्वी व शरीर एकरूपच ) आहे. कारण ह्या देहांत हे प्राण प्रतिष्ठित झालेले त्याला सोडून राहूं शकत नाहींत. म्हणून हें शरीर हीच पृथ्वी होय.

प्राण्याचें स्थूल शरीर मुख्यत्वेंकरून पृथ्वीपासूनच बनलें असल्यामुळें, त्याला पार्थिव असें म्हणतात. जड पदार्थ ज्याप्रमाणें पृथ्वीला सोडून राहूं शकत नाहींत त्याप्रमाणेंच हे प्राण ( इन्द्रियें ) शरीराला सोडून राहूं शकत नाहींत. गायत्री ही पृथ्वीच्या रूपानें जशी सर्व पदार्थांचा अधार आहे त्याप्रमाणेंच ती पार्थिव शरीराच्या रूपानें प्राणांनाही आधारभूत असते.

**यद्वै तत्पुरुषे शरीरमिदं वाव तद्यदिदमस्मिन्नन्तःपुरुषे हृदयमस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता एतदेव नातिशीयन्ते ॥४॥**

**यत् इदम् अस्मिन् अन्तःपुरुषे हृदयम् इदम् वाव तत् यत् तत्पुरुषे शरीरम् वै । हि इमे प्राणाः अस्मिन् प्रतिष्ठिताः एतत् एव न अतिशीयन्ते ।**

जें ह्या शरीरामध्यें हृदय आहे तेंच हें ( शरीर ) होय कीं, जे त्या पुरुषाचे ठिकाणीं शरीर आहे.(शरीर व हृदय एकरूपच आहे.) कारण त्या हृदयांत प्रतिष्ठित असलेले, हे प्राण त्याला सोडून राहूं शकत नाहींत.

ज्याप्रमाणें हृदय हें शरीराचें मूळ ( प्रधान भाग ) आहे तद्वतच तें इंद्रियशक्तींचेंही अधिष्ठान असतें. या मंत्रांतील हृदय शब्दानें शिरःपिण्डच घ्यावयास पाहिजे. कारण, ज्ञानेन्द्रियांचा संबंध मुख्यत्वेंकरून या शिरः-पिण्डाशींच येतो.

**सैषा चतुष्पदा षड्विधा गायत्री तदेतदृचा भ्यनूक्तम् ॥५॥**

**सा एषा चतुष्पदा षड्विधा गायत्री । तत् एतत् ऋचा अभ्यनूक्तम् ।**

ती ही चार पाद ( विभाग ) असलेली व सहा प्रकारची ( वाणी, सृष्टि, पृथ्वी, शरीर, हृदय व प्राण ) गायत्री आहे. तें हें ( गायत्रीचें स्वरूप ) श्लोकानें वर्णिलेलें आहे.

**तावानस्य महिमा ततो ज्यायाꣳश्च पूरुषः । पादोऽस्य सर्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवीति ॥ ६ ॥**

**अस्य तावान् महिमा।पुरुषः ततः ज्यायान् च । सर्वा भूतानि अस्य पादः। अस्य अमृतम् त्रिपात् दिवि ।**

ह्या ( गायत्री रूप पुरुषा ) चा तेवढा ( वर सांगितलेला भूतापासून प्राणापर्यंत, पिण्ड ब्रह्माण्डरूप ) मोठेपणा ( विस्तार ) आहे. पुरुष ( परमेश्वर ) त्याहूनही मोठा आहे. ( कारण ) सर्व भूतसृष्टि हा त्याचा एक पाद म्हणजे चतुर्थांश असून, त्याचे अमृत स्वरूप तीन पाद म्हणजे तीन चतुर्थांश द्युलोकांत म्हणजे प्रकाशमय लोकांत आहेत. अशी ती ऋचा ( श्लोक ) आहे.

**यद्वै तद्ब्रह्मेतीदं वाव तद्योऽयं बहिर्धा पुरुषादाकाशो यो वै स बहिर्धा पुरुषादाकाशः ॥ ७ ॥**

**यत् वै ब्रह्म तत् यः अयम् पुरुषात् बहिर्धा आकाशः इति । इदम् वाव यः वै सः पुरुषात् बहिर्धा आकाशः ।**

जें ब्रह्म तेंच जें हें पुरुषाहून बाहेर ( व्यापक ) आकाश आहे, तेंच हें होय ( ब्रह्म व महदाकाश एकरूप आहे ). जें हें पुरुषाहून मोठें ( व्यापक ) आकाश आहे, तेंच हें होय.

**अयं वाव स योऽयमन्तःपुरुष आकाशो यो वै सोऽन्तःपुरुष आकाशः ॥ ८ ॥**

**यः अन्तःपुरुषे आकाशः अयम् वाव सः। यः अन्तःपुरुषे आकाशः सः वै ।**

जें शरीरांमध्यें आकाश आहे तेंच हा ( पुरुष ) होय. ( शरीरांतील आकाश व महदाकाश एकरूपच आहे. ) जें हें शरीरांमध्यें आकाश आहे तोच ( पुरुष ) होय.

**अयं वाव स योऽयमन्तर्हृदय आकशस्तदेतत्पूर्णमप्रवर्ति पूर्णामप्रवर्तिनी॰ श्रियं लभते य एवं वेद ॥ ९ ॥**

**यः अयम् अन्तर्हृदये आकाशः अयम् वाव सः । तत् एतत् पूर्णम् अप्रवर्ति । यः एवम् वेद ( सः ) पूर्णाम् अप्रवर्तिनीम् श्रियम् लभते ।**

जें हें हृदयाच्या अंतर्भागीं आकाश आहे, तेंच तो ( पुरुष ) आहे. तें हें पूर्ण ( निरवयव, सर्वव्यापक ) व निश्चल आहे. जो असें जाणतो, त्याला पूर्ण व निश्चल संपत्ति प्राप्त होते.

आकाश हें सृष्टींतील पहिलें कार्य आहे, म्हणून त्याला कित्येक ठिकाणीं कार्यरूप ब्रह्म असेंही म्हणतात; व त्याच अभिप्रायानें या मंत्रांतही त्याला ब्रह्म असें म्हटलें आहे. बाह्य आकाश व हृदयांतील आकाश यांच्या उपाधि भिन्न असल्या तरी, तत्वतः तीं एकच आहेत. या आकाशस्वरूपाला पूर्ण व अप्रवर्ति अशीं विशेषणें दिलीं आहेत. सर्वव्यापी व निश्चल असा त्या विशेषणांचा अर्थ आहे. बृहदारण्यकाच्या दुसऱ्या अध्यायांतील गार्ग्य व अजातशत्रु यांच्या संवादांत अजातशत्रूनें आकाशाला हींच विशेषणें दिलीं आहेत. ( उ. र. प्र. बृ. अ. २ ब्रा. १ मं. ५ पृ. ७ व ८ ). या आकाशस्वरूपाचें व गायत्रीचें ज्ञान संपादन केलें असतां मनुष्याला पूर्ण व स्थिर संपत्ति प्राप्त होते. श्रुतीनें सांगितलेली ही फलश्रुति आकाशाच्या पूर्ण व अप्रवर्ति या विशेषणांच्या अर्थाला योग्य अशीच आहे.

## अथ त्रयोदशः खण्डः ।

**तस्य ह वा एतस्य हृदयस्य पञ्च देवसुषयः स योऽस्य प्राङ् सुषिः स प्राणस्तच्चक्षुः स आदित्यस्तदेतत्तेजोऽन्नाद्यमित्युपासीत तेजस्व्यन्नादो भवति य एवं वेद ॥ १ ॥**

तस्य एतस्य हृदयस्य पञ्च देवसुषयः ह वै। यः अस्यै प्राङ् सुषिः सः प्राणः तत् चक्षुः सः आदित्यः। तत् एतत् तेजः अन्नाद्यम् इति उपासीत। यः एवम् वेद सः तेजस्वी अन्नादः भवति।

त्या ह्या हृदयाचीं पांच शक्तिरूप द्वारें आहेत. त्याचें जें पूर्व (पुढील) द्वार तोच प्राण, तोच चक्षु, आणि तोच आदित्य होय. (प्राण, डोळे, व सूर्य तत्त्वतः एकरूप आहेत). त्या ह्या देवतात्रयाची तेज व उपभोगसामर्थ्य ह्या भावनेनें उपासना करावी. जो ह्याप्रमाणें जाणतो तो तेजस्वी व उपभोगसामर्थ्यवान् होतो.

> अथ योऽस्य दक्षिणः सुषिः स व्यानस्तच्छ्रोत्र ँ स चन्द्रमास्तदेतच्छ्रीश्च यशश्चेत्युपासीत श्रीमान्यशस्वी भवति य एवं वेद ॥ २ ॥

अथ यः अस्य दक्षिणः सुषिः सः व्यानः तत् श्रोत्रम् सः चन्द्रमाः। तत् एतत् श्रीः च यशः च इति उपासीत। यः एवम् वेद सः श्रीमान् यशस्वी भवति।

आतां जें ह्या हृदयाचें उजवीकडील द्वार तोच व्यान, तेंच श्रोत्रेंद्रिय व तोच चंद्र होय. त्या ह्या देवतात्रयाची संपत्ति आणि यश ह्या भावनेनें उपासना करावी. जो ह्याप्रमाणें जाणतो तो श्रीमान् व यशस्वी होतो.

> अथ योऽस्य प्रत्युङ् सुषिः सोऽपानः सा वाक्सोऽग्निस्तदेतद्ब्रह्मवर्चसमन्नाद्यमित्युपासीत ब्रह्मवर्चस्यन्नादो भवति य एवं वेद ॥ ३ ॥

अथ यः अस्य प्रत्यङ् सुषिः सः अपानः सा वाक् सः अग्निः। तत् एतत् ब्रह्मवर्चसम् अन्नाद्यम् इति उपासीत। यः एवम् वेद सः ब्रह्मवर्चसी अन्नादः भवति।

आतां जें ह्या हृदयाचें मागील बाजूचें द्वार असतें तोच अपान, तीच वाणी व तोच अग्नि होय. त्या ह्या देवतात्रयाची ज्ञान व सामर्थ्य ह्या भावनेनें उपासना करावी. जो ह्याप्रमाणें जाणतो तो ज्ञानी व सामर्थ्यवान् होतो.

**अथ योऽस्योदङ् सुषिः स समानस्तन्मनः स पर्जन्यस्तदेतत्कीर्तिश्च व्युष्टिश्चेत्युपासीत कीर्तिमान्व्युष्टिमान्भवति य एवं वेद ॥ ४ ॥**

**अथ यः अस्य उदङ् सुषिः सः समानः तत् मनः सः पर्जन्यः । तत् एतत् कीर्तिः च व्युष्टिः च इति उपासीत । यः एवम् वेद सः कीर्तिमान् व्युष्टिमान् भवति ।**

आतां जें ह्या हृदयाचें डावीकडील द्वार असतें तोच समानवायु, तेंच मन व तोच पर्जन्य होय. त्या ह्या देवतात्रयाची कीर्ति व कांति या भावनेनें उपासना करावी. जो ह्याप्रमाणें जाणतो तो कीर्तिमान् व कांतिमान् होतो.

**अथ योऽस्योर्ध्वः सुषिः स उदानः स वायुः स आकाशस्तदेतदोजश्च महश्चेत्युपासीतौजस्वी महस्वान्भवति य एवं वेद ॥ ५ ॥**

**अथ यः अस्य ऊर्ध्वः सुषिः सः उदानः सः वायुः सः आकाशः । तत् एतत् ओजः च महः च इति उपासीत । यः एवम् वेद सः ओजस्वी महस्वान् भवति ।**

आतां जें हृदयाचें वरील द्वार असतें तोच उदान, तोच वायु व तेंच आकाश होय. त्या ह्या देवतात्रयाची बल व महत्व या भावनेनें उपासना करावी जो ह्याप्रमाणें जाणतो तो बलवान् व महान् होतो.

ते वा एते पञ्च ब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य द्वारपाः स य एतानेवं पञ्च ब्रह्मपुरुषान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वेदास्य कुले वीरो जायते प्रतिपद्यते स्वर्गं लोकं य एतानेवं पञ्च ब्रह्मपुरुषान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वेद ॥ ६ ॥

ते एते पञ्च ब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य द्वारः वै । यः एतान् पञ्च ब्रह्मपुरुषान् स्वर्गस्य लोकस्य द्वारपान् एवम् वेद अस्य कुले वीरः जायते । यः एतान् पञ्च ब्रह्मपुरुषान् स्वर्गस्य लोकस्य द्वारपान् एवम् वेद सः स्वर्गम् लोकम् प्रतिपद्यते ।

ते हे पांच ब्रह्मशक्तिरूप देव स्वर्ग लोकाचे ( उत्तम ऐश्वर्याचे ) द्वारपाल आहेत. जो ह्या स्वर्गलोकाचे द्वारपाल असणाऱ्या पांच ब्रह्मशक्तिरूप देवांना ह्याप्रमाणें जाणतो, त्याच्या कुलांत वीरपुरुष उत्पन्न होतो. जो ह्या पांच ब्रह्मशक्तिरूप देवांना, स्वर्गाच्या द्वारपालांना ह्याप्रमाणें जाणतो तो स्वर्गलोकाला पावतो.

अथ यदतः परो दिवो ज्योतिर्दीप्यते विश्वतः पृष्ठेषु सर्वतः पृष्ठेष्वनुत्तमेषूत्तमेषु लोकेष्विदं वाव तद्यदिदमस्मिन्नन्तःपुरुषे ज्योतिः ॥ ७ ॥

अथ यत् अतः दिवः परः विश्वतः पृष्ठेषु सर्वतः पृष्ठेषु अनुत्तमेषु उत्तमेषु लोकेषु ज्योतिः दीप्यते यत् इदम् अन्तःपुरुषे ज्योतिः इदम् वाव तत् ।

आतां जें तेज ह्या पृथ्वीच्या व द्युलोकाच्या पलीकडे, सर्व पदार्थांच्यावर व सर्व सृष्टीच्यावर आणि उच्च व नीच ( वरच्या व खालच्या ) सर्व लोकांमध्यें प्रकाशित आहे आणि जें अंतरात्म्यामध्यें तेज आहे तेंच हें होय. ( हें सर्व तेज एकरूपच आहे ).

तस्यैषा दृष्टिर्यत्रैतदस्मिञ्छरीरे संस्पर्शेनोष्णिमानं विजानाति तस्यैषा श्रुतिर्यत्रैतत्कर्णावपिगृह्य निनदमिव

नदथुरिवाग्नेरिव ज्वलत उपशृणोति तदेतद्दृष्टं च श्रुतं चेत्युपासीत चक्षुष्यः श्रुतो भवति य एवं वेद य एवं वेद ॥ ८ ॥

यत्र एतत् अस्मिन् शरीरे संस्पर्शेन उष्णिमानम् विजानाति एषा तस्य दृष्टिः । यत् एतत् कर्णौ अपिगृह्य निनदम् इव ज्वलतः अग्नेः नदथुः इव उपशृणोति एषा तस्य श्रुतिः । तत् एतत् दृष्टम् च श्रुतम् च इति उपासीत । यः एवम् वेद सः चक्षुष्यः श्रुतः भवति ।

जें ह्या शरीरांत स्पर्शानें उष्णतारूपानें समजतें, तें ह्याचें दर्शन होय; आणि जें हें कान बंद केले असतां नादासारखें किंवा धडधडणाऱ्या अग्नीच्या ध्वनीसारखें भासतें तेंच त्याचें श्रवण होय. तें हें तेज दृष्ट ( दर्शनग्राह्य ) व श्रुत ( श्रवणग्राह्य ) आहे अशा भावनेनें त्याची उपासना करावी. जो ह्याप्रमाणें जाणतो तो चांगल्या दृष्टीनें संपन्न व चांगल्या कानांनीं संपन्न होतो.( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे )

## तेराव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत दोन प्रकारचे विषय आलेले आहेत. एक हृदयाचीं ज्ञानवाहक द्वारें व दुसरें पिण्डब्रह्माडांत व्यापून राहिलेलें तेज. पहिला विषय मंत्र १ ते ६ यांत आलेला असून, ७ व ८ या मंत्रांमध्यें दुसऱ्या विषयाचें वर्णन आलेलें आहे. चक्षु, श्रोत्र, मन व वाणी हीं द्वारें–इन्द्रियें मुख्यत्वेंकरून ज्ञानवाहकच आहेत. या इन्द्रियांप्रमाणेंच पंच प्राणांतील उदानसामर्थ्याचा संबंध या हृदयाशीं येतो असें येथें स्पष्ट सांगितलें आहे. या प्रकरणांत शिरःपिण्ड असाच हृदय शब्दाचा अर्थ समजावयास पाहिजे. उरःस्थलांतील पिण्ड व मस्तकांतील पिण्ड अशा दोनही अर्थांनीं हृदय शब्द निरनिराळ्या ठिकाणीं येतो. पूर्वापर संदर्भावरूनच त्याचा अर्थ निश्चित करावयास पाहिजे. प्रस्तुत प्रकरणांतील हृदय शब्दाचा अर्थ शिरः-

पिण्ड असाच निश्चित करावा लागतो. कारण चक्षु, श्रोत्र इत्यादि द्वारें हृत्पिंडाचीं आहेत असें म्हणतां येणार नाहीं. चक्षु, श्रोत्र, मन व वाणी यांच्या क्रिया ज्ञानतंतूंवरच अवलंबून असतात. आणि मेंदू किंवा शिरःपिण्ड हेंच ज्ञानतंतूंचें मूळ असल्यानें, त्या शिरःपिण्डाशीं ज्ञानतंतूंच्या योगानें चक्षुरादि इन्द्रियें जोडलीं जातात. या ज्ञानतंतूंच्या मार्गांना देवसुषि असें पहिल्या मंत्रांत म्हटलें आहे.

उदानाचा अन्तःकरणाशीं कसा निकट संबंध आहे, तें प्रश्नोपनिषदांत सविस्तर सांगितलें आहे. ( उ. नि. र. प्र. प्रश्नोप. प्र. ३ मंत्र ९ व १० पृ० ५४ ते ५६; प्र. ४ मं. ४ व ५ पृ. ६८ ते ७२ ). या देवसुषींचें सम्यक् ज्ञान संपादन करून, त्या त्या देवतांची उपासना केल्यास मनुष्य सामर्थ्यसंपन्न व ब्रह्मवर्चस्वी होतो, असें सहाव्या मंत्रात सांगितलेलें फल सोपपत्तिक व बुद्धिग्राह्य आहे. ज्ञानविज्ञान, सामर्थ्य, संपत्ति इत्यादि गोष्टी कर्मयोगांत मुमुक्षूला देखील अत्यंत उपयोगी पडतात. सातव्या व आठव्या मंत्रांत सर्वव्यापी तेजाचें वर्णन केलें असून, तें जरी अदृश्य असलें तथापि, शास्त्रीय दृष्ट्या आढळून येणारी किंवा स्थूलमानानें मानवी शरीरांत स्पर्शावरून उमजणारी उष्णता हें त्या तेजाचेंच निदर्शक चिन्ह आहे. हीं चिन्हें शास्त्रीयदृष्ट्या जरी फारशीं महत्त्वाचीं नसलीं तरी, अशा स्थूल किंवा सूक्ष्म खुणांवरून ते सर्वव्यापी तेजोमय तत्त्व पूर्ण बुद्धिग्राह्य आहे, असा तीं चिन्हें दर्शविण्यांत श्रुतीचा अभिप्राय आहे. आधुनिक शास्त्रीय साधनांनीं पाहिल्यास हा उष्मा-उष्णता सर्वत्र आहे असें सिद्ध होतें. परंतु स्थूलबुद्धीच्या मनुष्याला या सर्वव्यापी उष्णतेचें ज्ञान सहजासहजीं होत नाहीं, म्हणून श्रुतीनें या ढोबळ खुणा दिल्या असाव्यात असें समजण्यास हरकत नाहीं. ब्रह्मांडांत व्यापक असलेलें हेंच तेज मनुष्याच्या हृदयांतही वास करितें; व त्या तेजाचा मनुष्याला इंद्रियसामर्थ्याच्या रूपानें व्यवहारांत व परमार्थांत उपयोग होतो. यावरून या खंडांत दोन प्रकारचे निरनिराळे विषय आले आहेत असें जरी दिसलें तथापि, ते एक-

मेकांशीं विसंगत नसून एकमेकांला पूरकच आहेत यांत शंका नाहीं. अशा या सर्वव्यापी तेजाची ज्ञानपूर्वक उपासना केल्यानेंच मनुष्य ब्रह्मवर्चस्वी व अमृतत्त्वाचा अधिकारी होतो, असें श्रुतीनेंच शेवटीं युक्तिसिद्ध फल सांगितलें आहे.

## अथ चतुर्दशः खण्डः ।

**सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीत । अथ खलु क्रतुमयः पुरुषो यथाक्रतुरस्मिँल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति स क्रतुं कुर्वीत ॥ १ ॥**

**तज्जलान् इदम् सर्वम् ब्रह्म खलु इति शान्तः उपासीत । अथ पुरुषः क्रतुमयः । पुरुषः अस्मिन् लोके यथाक्रतुः भवति तथा इतः प्रेत्य भवति । सः क्रतुम् कुर्वीत ।**

( तत्+ज+ल+अन् ) त्याच्यापासून उत्पन्न होणारें, त्यांतच लय पावणारें व त्यानेंच चालणारें हें सर्व विश्व ब्रह्म ( आदितत्त्व-रूप तेज ) आहे अशा भावनेनें ,शांत चित्तानें ( विश्वाची )उपासना करावी. आतां पुरुष ( जीव ) उपासनामय आहे. पुरुष ह्या लोकीं जशी उपासना करणारा असतो,तसाच येथून गेल्यावर (मरणोत्तर) होतो. ( म्हणून ) त्यानें उपासना ( उपासनामय कर्मे ) करावीं.

मागील खडांत पिण्डब्रह्माण्डास व्यापून राहिलेल्या तेजोमय तत्त्वाचें विवेचन झालें आहे. हें तेजोमय तत्त्व ब्रह्मस्वरूप असून त्यापासूनच सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे. या तत्त्वाला तेज असें नांव दिलें असलें आणि तें तेज ओळखण्याच्या खुणा म्हणून उष्णता, ध्वनि इत्यादिकांचा निर्देश केला असला तरी, तेवढ्यावरून तें जडस्वरूप आहे असें समजूं नये. हें सर्वव्यापी तेज जड पदार्थांत देखील व्यापून असल्यामुळें त्याचा जड धर्मांनीं श्रुतीनें उल्लेख केला आहे. परंतु त्या तेजाचें मूळस्वरूप जडाच्या पलीकडील शुद्ध चैतन्यात्मक आहे, म्हणून तेंच ब्रह्म होय, असा येथें श्रुतीचा

अभिप्राय आहे. तेज हा शब्द जसा भौतिक तेजाला लागू करण्यांत येतो, तसा तो चैतन्यालाही लावण्यांत येतो.

या मंत्रांत ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' असें वाक्य आलें आहे. शास्त्रदृष्टया तें फार महत्त्वाचें आहे. वैदिक ब्रह्मविद्येंत जीं प्रसिद्ध महावाक्यें आहेत त्यांपैकींच हें एक असून, हें सर्व विश्व ब्रह्म आहे, असा त्या वाक्याचा अर्थ आहे. या विश्वरूप ब्रह्माची शान्त चित्तानें उपासना करावी, असें येथें सांगितलें आहे. मात्र विश्वाचें बाह्यस्वरूप अगदीं विसरून जावें किंवा उपासनेचा संबंध या विश्वाच्या बाह्यस्वरूपाशीं येऊं देऊं नये, असें येथें मुळींच सांगितलेलें नाहीं. उलट ' तज्जलानिति ' या पदावरून विश्वाच्या बाह्य स्वरूपाशींच मुख्यत्वें करून उपासनेचा संबंध येतो असें सिद्ध होतें. सर्व जग ब्रह्म आहे असें नुसतें म्हटलें किंवा मानिलें तरी देखील जग किंवा त्याचें बाह्यस्वरूप अदृश्य होतें किंवा नाहींसें होतें असें मुळींच नाहीं. सृष्टीचें नामरूप, सृष्ट पदार्थांचे गुणधर्म व तज्जन्य व्यवहार या गोष्टी जशाच्या तशाच असतात. मग या जगाची ब्रह्मरूपानें उपासना कशी करावयाची ? असा प्रश्न येथें साहजिकच उत्पन्न होतो. त्याचें उत्तर श्रुतीनें असें दिलें आहे कीं, हें विश्व, तत्+ज=त्या ( ब्रह्मा )पासून जन्म पावणारे उत्पन्न होणारें; तत्+ल = त्या ( ब्रह्मा )चे ठिकाणीं लय पावणारें; तत्+ अन् = त्या ( ब्रह्मा )वरच जगणारें असें आहे. अर्थात ब्रह्मतत्त्व हेंच या विश्वाचें घटक कारण आहे असें ओळखून त्या विश्वाची उपासना केली असतां ती विश्वरूप ब्रह्मोपासना होते.

विश्वोपासनेच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण श्रुतीनें क्रतु या शब्दानें केलें आहे. क्रतु या शब्दाचे अनेक अर्थ होतात. यज्ञयागांतील एक प्रकारचा यज्ञ असा क्रतु शब्दाचा अर्थ प्रसिद्ध आहे. परंतु या मंत्रांत शेवटीं जो सामान्य नियम दिला आहे, त्यावरून कर्म हाच क्रतु शब्दाचा अर्थ येथें विवक्षित आहे असें निःसंशय सिद्ध होतें. ' पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन ' हा सामान्य नियम बृहदारण्यकांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. बृ. अ.

३ ब्रा. २ मंत्र १३ पृ. ३४१ ते ३५० ). त्या नियमासारखाच या मंत्रांतील नियम आहे. मात्र येथें कर्म शब्दाचे ऐवजीं क्रतु हा शब्द आहे. मनुष्याचा या जन्मीं जशा प्रकारचा क्रतु ( कर्म ) असेल तशा प्रकारचें फल त्याला परलोकीं मिळतें, असा या सामान्य नियमाचा अर्थ आहे. म्हणून क्रतु हा शब्द येथें कर्मवाचकच घ्यावा लागतो. मनुष्यानें विश्वाची उपासना कशी करावयाची तें समजण्याकरितांच वैदिक धर्मात वैदिक ऋषींनीं वर्णाश्रमसंस्था स्थापन केली आहे. मागील अध्यायांत तीन धर्मस्कंधांचें-आश्रमांचें वर्णन करून असा आश्रमधर्म हाच अमृतत्त्वाचा मार्ग कसा होऊं शकतो, तें स्पष्ट सांगितलें आहे. याप्रमाणेंच ईशावास्य उपनिषदांत वर्णधर्माचें विवेचन आलें आहे. ( उ. नि. र. प्र. ईश. मं. १ व २ पृ. १ ते १२) शिवाय बृहदारण्यकांतील पहिल्या अध्यायाच्या चवथ्या ब्राह्मणांत वर्णधर्माचें स्पष्ट व सविस्तर विवेचन आलें असून, वर्णधर्माचा आत्मोपासनेशीं संबंध जोडून दाखविण्यांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. बृ. अ. १ ब्रा. ४ मंत्र १५ पृ. ९२ ते ९६ ). यावरून क्रतु शब्दानें वर्णाश्रमविहित कर्मच येथें विवक्षित असलें पाहिजे हें उघड आहे. हें कर्म ( क्रतु ) ब्रह्मोपासनेच्या बुद्धीनें मनुष्यानें करावें म्हणजे याच मार्गानें त्याला मोक्षप्राप्ति होते असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

**मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसंकल्प आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तो ऽवाक्यनादरः ॥ २ ॥**

**( सः ) मनोमयः प्राणशरीरः भारूपः सत्यसंकल्पः आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः इदम् सर्वम् अभ्यात्तः अवाकी अनादरः ।**

तो ( तेजोमय पुरुष-परमात्मा ) मनोरूप, प्राणशक्ति हेंच ज्यांचें शरीर आहे असा, तेजोरूप, सत्यसंकल्प, आकाशाप्रमाणें ज्याचें स्वरूप व्यापक आहे असा, सर्व कर्मशक्तीचें अधिष्ठान, सर्व

इच्छाशक्तीचें अधिष्ठान, सर्व घ्राणशक्तींचें अधिष्ठान, सर्व रसशक्तींचें अधिष्ठान असा, हें सर्व विश्व ज्यानें व्यापिलें आहे, ज्याला वाणी ( इत्यादि इंद्रियें ) नाहींत आणि ज्याला कोणाची अपेक्षा नाहीं, असा आहे.

मागील मंत्रांत उल्लेखिलेल्या ब्रह्मस्वरूपाचें स्पष्टीकरण व्यापक रूपानें या मंत्रांत केलें आहे. मन या शब्दानें अंतःकरणाला मूलाधारभूत असलेला जो चिदंश किंवा जीवात्मा तोच येथें मनोमय या पदांत अभिप्रेत आहे. शरीर या पदानें त्याचें कार्यक्षम स्वरूप दर्शविलें आहे. म्हणजे प्राणशक्ति हेंच ज्याच्या क्रियेचें अधिष्ठान आहे, असा प्राणशरीर या पदाचा अर्थ समजावा. मनोमय व प्राणशरीर हीं दोनही पदें आत्म्याच्या व्यष्टिरूपाला किंवा क्षेत्रज्ञस्वरूपाला अनुलक्षून आलीं आहेत. पुढील विशेषणें आत्म्याच्या समष्टि स्वरूपाला म्हणजेच परमात्मस्वरूपाला अनुलक्षून आलीं आहेत असें समजावें. 'भा' हा शब्द आधिभौतिक व आध्यात्मिक अशा दोनही प्रकारच्या तेजांना लागू पडतो. भारूप म्हणजे तेजोरूप असा अर्थ आहे. तेज शब्दाच्या अर्थाची फोड मागील खंडाच्या सारांशांत झालीच आहे. संकल्प म्हणजे हेतु किंवा इच्छा. परमात्म्यालादेखील संकल्प असतात, पण ते मानवी संकल्पासारखे अज्ञानमय, स्वार्थी, संकुचित इत्यादि प्रकारचे नसून ज्ञानमय, जगत्कल्याणपर आणि शुद्ध स्वरूपाचे असतात असें दर्शविण्याकरितांच संकल्प या शब्दाला सत्य हें विशेषण जोडलें आहे. आकाश हें त्याचें बाह्यस्वरूप आहे असा 'आकाशात्मा' या शब्दाचा अर्थ केला तरी हरकत नाहीं. कारण आत्मतत्त्वापासून आकाश हें प्रथम उत्पन्न झालें असल्यामुळें तें त्याचें बाह्यस्वरूप होय असें म्हणण्यांत कोणताही प्रत्यवाय नाहीं. ( उ. नि. र. प्र. तैत्ति. आनंदवल्ली अ. १ मं. २ पृ. ६ ते ८ ). कर्तृत्वशक्तीचा उगम आत्मतत्त्वांतूनच होतो त्याप्रमाणें इच्छाशक्ति देखील त्या तत्त्वांतूनच प्रगट होते. तसेंच सर्व प्रकारच्या इंद्रियशक्तींचें आत्मतत्त्व हेंच उगमस्थान आहे, अशा

अभिप्रायानेंच सर्वकर्मा इत्यादि चार विशेषणें आलीं आहेत. सर्व शक्तींचें व सर्व जगताचें मूळ अधिष्ठान असा हा जो परमात्मा तो सर्वव्यापी व स्वयंप्रकाश असून सर्वांचें धारणपोषण करणारा आहे. हें त्या परमात्म्याचें स्वरूप ओळखून मनुष्यानें विश्वोपासना करावी असा या मंत्रांतील अभिप्राय आहे.

**एष म आत्मान्तर्हृदयेऽणीयान्व्रीहेर्वा यवाद्वा सर्षपाद्वा श्यामाकाद्वा श्यामाकतण्डुलाद्वैष म आत्मान्तर्हृदये ज्यायान्पृथिव्या ज्यायानन्तरिक्षाज्ज्यायान्दिवो ज्यायानेभ्यो लोकेभ्यः ॥ ३ ॥**

**एषः मे अन्तर्हृदये आत्मा व्रीहेः वा यवात् वा सर्षपात् वा श्यामाकात् वा श्यामाकतण्डुलात् वा अणीयान् । एषः मे अन्तर्हृदये आत्मा पृथिव्याः ज्यायान् अन्तरिक्षात् ज्यायान् दिवः ज्यायान् एभ्यः लोकेभ्यः ज्यायान् ।**

हा माझ्या हृदयांत असणारा आत्मा, तांदुळाहून, जवाहून, मोहरीहून, साव्याहून किंवा साव्याच्या तांदुळाहून सूक्ष्म आहे. हा माझ्या हृदयांतील आत्मा पृथ्वीहून, अंतरिक्षलोकाहून, द्युलोकाहून किंवा ह्या सर्व लोकांहून मोठा आहे. ( आत्मा सूक्ष्माहून सूक्ष्म व व्यापकाहून व्यापक आहे. )

प्रस्तुत मंत्रांत आत्म्याचें अतिसूक्ष्मत्व व अतिमहत्त्व वर्णन केलें आहे. ‘ अणोरणियान् महतो महीयान् ’ या वाक्यासारखेंच हें वर्णन आहे. अतिसूक्ष्मत्त्व दर्शविण्याकरितां तांदूळ, मोहरी इत्यादिकांचा उल्लेख सकृत्दर्शनीं अंमळ चमत्कारिक वाटेल; परंतु थोड्याशा विचाराअंतीं त्या पदार्थांचा निर्देश गौण आहे असें समजून येईल. फार झालें तर, तत्कालीन व्यवहारांतील परिमाणकल्पना बऱ्याच ढोबळ होत्या असें म्हणतां येईल. परंतु परिमाणाचें विवेचन मुख्य नाहीं. आत्म्याचें अतिसूक्ष्मत्व सांगण्याचा अभिप्राय आहे तो वरील उदाहरणानीं सिद्ध होतो.

**सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः सर्वमिदमभ्यत्तोऽवाक्यनादर एष म आत्मान्तर्हृदय एतद्ब्रह्मैतमितः प्रेत्याभिसंभवितास्मीति यस्य स्यादद्धा न विचिकित्सास्तीति ह स्माह शाण्डिल्यः शाण्डिल्यः ॥ ४ ॥**

**एषः मे अन्तर्हृदये आत्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः इदम् सर्वम् अभ्यात्तः अवाकी अनादरः । एतत् ब्रह्म । इतः प्रेत्य एतम् अभिसंभवितास्मि इति यस्य अद्धा स्यात् विचिकित्सा न अस्ति । इति ह शाण्डिल्यः आह स्म।**

हा माझ्या हृदयांतील आत्मा सर्व कर्मांचें, इच्छांचें, गंधांचें, रसांचें अधिष्ठान असून, हें सर्व शरीर व्यापून राहिला आहे. त्याला वाणी इत्यादि इंद्रियें नाहींत व तो कोणावर अवलंबून नाहीं.हेंच ( पिंड—ब्रह्मांड—व्यापी आत्मतत्त्व ) ब्रह्म होय. येथून गेल्यावर ( मरणोत्तर ) मी त्या ब्रह्माला मिळून जाईन अशी ज्यांची खात्री आहे, संशय नाहीं, ( तो ब्रह्मरूप होतो ) असें शाण्डिल्य ऋषीनें सांगितलें आहे. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.)

तैत्तिरीय उपनिषदांतील शीक्षाध्यायाच्या ११ व्या अनुवाकांत त्रिशंकु ऋषीचें अनुभववाक्य आलें आहे, तसेंच ह्या मंत्रांतील हें शाण्डिल्य ऋषीचें अनुभववाक्य आहे. पिण्डब्रह्माण्डांत व्यापून असलेलें आत्मतत्त्व हेंच ब्रह्म होय असा श्रुतीनें अनेक ठिकाणीं युक्तिवादानें सिद्ध केलेला सिद्धांत शाण्डिल्यानें येथें अनुभवाच्या रूपानें नमूद केला आहे. या मंत्रांतील पहिलीं चार विशेषणें मागील मंत्रांत आलींच आहेत. मंत्र १ व २ यांत सांगितलेल्या ज्ञानपूर्वक विश्वोपासनेचें फल निःसंशयपणें शाण्डिल्य ऋषीच्या अनुभवास आलें आहे. त्यावरून ब्रह्मज्ञानपूर्वक केलेलें उपासनामय कर्म म्हणजेच कर्मयोग मोक्षदायक आहे असें निर्विवाद सिद्ध होतें. या सिद्धांताला श्रुतीप्रमाणें, शाण्डिल्य ऋषीचा निःसंदिग्ध अनुभवदेखील प्रत्यक्ष प्रमाणासारखा उपयोगी पडत आहे. म्हणून कर्मयोग मोक्षदायक आहे की

नाहीं, असा संशय प्रदर्शित करणेंदेखील श्रुतीच्या विरुद्ध आहे हें कोणीही विसरतां कामा नये.

## चवदाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत चार मंत्र असून त्यांतील विषयविवेचन फारच महत्त्वाचें आहे. पहिल्या मंत्रांत या जगद्रूप ब्रह्माची उपासना करावयास सांगितलें आहे. जगताची उपासना कशी करावयाची, तें कर्म या अर्थाच्या ' क्रतु ' शब्दानें दर्शविलें आहे. ब्रह्म हें निर्गुण निराकार व अनिर्वचनीय असल्यामुळें, त्याला प्रत्यक्षपणें उपास्य मानतां येत नाहीं. शरीर किंवा मन यांची क्रिया जेथपर्यंत जाऊं शकते, तेथपर्यंतच उपासनेची मर्यादा निश्चित करिता येते. बुद्धि किंवा ज्ञान यांची क्रिया मानसिक शक्तीपलीकडे जाऊं शकते. पण केवळ ज्ञान किंवा विवेक येवढ्यालाच उपासना म्हणता येत नाहीं. शारीरिक किंवा मानासिक कर्माला उपासनेमध्यें प्राधान्य असतें. त्याकरितांच उपास्याच्या साकार किंवा सगुण स्वरूपाची आवश्यकता उत्पन्न होते. ब्रह्मतत्व दिक्कालातीत आहे; परंतु त्याची उपासना करावयाची झाल्यास त्याच्या सगुण व मर्यादित स्वरूपाचें ज्ञान असावें लागतें, म्हणजेच उपासनेचें क्षेत्र तयार होतें. विवेक, सामर्थ्य, सत्ता, प्रकाश, सौंदर्य, व्यापकत्त्व इत्यादि गुण प्रत्यक्ष ब्रह्मतत्त्वाचे आहेत असें म्हणतां आलें नाहीं तथापि, ते ब्रह्मापासून बनलेल्या या जगतांत आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा त्रिविध पदार्थांच्या द्वारांनीं अनुभवाला येतात. लोकोत्तर मनुष्यांच्या बुद्धींत दिसुन येणारें सामर्थ्य व प्रभुत्त्व, सूर्यादिकांचा प्रकाश, सृष्टीचें सौंदर्य, इच्छा, क्रिया, या शक्तींचा प्रभाव इत्यादि गुण त्या त्या पदार्थांपुरेत मर्यादित असतात. प्रत्येक गुणाची पूर्वपीठिका ब्रह्मापर्यंत पोंचविता येतें यावरून ब्रह्मतत्त्व हेंच एक सर्व गुणांचें व सर्व शक्तींचें उगमस्थान होय, असें मानल्यावांचून गत्यंतरच नाहीं. म्हणून या पिण्डब्रह्मांडांत ( जगतांत ) असणारी प्रत्येक वस्तु तत्त्वतः ब्रह्मरूपच आहे असें ठरतें. म्हणून ब्रह्मतत्त्व प्रत्यक्षपणें उपासनेच्या क्षेत्रांत येत नसलें तरी, त्याचें

जगदाकार स्वरूप उपासनेच्या क्षेत्रांत येऊं शकतें, हें दाखविण्याकरितांच दुसऱ्या मंत्रांत श्रुतीनें परब्रह्माचें सगुणत्वानें वर्णन केलें आहे.

सर्व जग उपासनीय आहे असें ठरलें आणि विश्वबंधुत्व, सर्वभूतहित, जगदुपासना इत्यादि तत्त्वें कितीहि थोर किंवा उदात्त असलीं तरी, तीं जशींच्या तशीं प्रत्यक्ष व्यवहारांत येऊं शकत नाहींत; त्यांचा कांहीं तरी संकोचच करावा लागतो. या तत्त्वांचा संकोच करण्याचें धर्म हेंच साधन होय. वैदिक ऋषींनीं वर्णाश्रमधर्माची संस्थापना करून या विश्वोपासनेचा व्यवहारक्षम व अभ्युदय–निश्रयेसकारक असा उत्कृष्ट मार्ग जगताला घालून दिला आहे. मानवी बुद्धींतूनच धर्मशास्त्र प्रगट झालें असल्यामुळें, त्यांत मानवी प्राण्यालाच प्राधान्य येणें स्वाभाविक होतें. धर्माचें साध्य जें अभ्युदय निःश्रेयस तें मानवी प्राण्याकरितांच असल्यामुळें, मानवी जीवनक्रमाशीं निगडित असलेल्या सृष्टींतील गुण शक्ति इत्यादिकांचा उपास्य या नात्यानें स्वीकार केला जाणें ओघानेंच प्राप्त होतें. अर्थात् ज्ञानविज्ञान (अध्यात्मज्ञान व आधिभौक्तिक ज्ञान), शुद्ध व सात्विक प्रेम, सामर्थ्य इत्यादि दैवी संपत्तीच्या सर्व सद्‌गुणांनाच उपास्य मानणें अवश्य ठरतें. अशा दिव्य सद्‌गुणांना किंवा सामर्थ्यांनाच ईश्वरी सद्‌गुण, किंवा ईश्वरी सामर्थ्य असें म्हणतात. या सद्‌गुणांचें किंवा सामर्थ्यांचें संवर्धन करणारीं जीं जीं कर्में आहेत किंवा असतील, त्या सर्वांचा 'क्रतु' या एकाच शब्दात श्रुतीनें समावेश केला आहे. अशा क्रतुस्वरूप कर्माशिवाय इतर कोणतेंही कर्म या मोक्षमार्गांत समाविष्ट होऊं शकत नाहीं, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. शारीरिक, मानसिक व बौद्धिक सद्‌गुणांचें संवर्धन वैयक्तिक व सामाजिक अशा दोन्ही दृष्टींनीं व्हावें या उद्देशानेंच वैदिक ऋषींनीं वर्णाश्रमधर्म सांगितले आहेत. ब्रह्मोपासनेच्या बुद्धीनें स्वार्थत्यागपूर्वक या धर्मांचें आचरण केल्यास समाजाला सन्मार्गाचें वळण लागून अशा क्रतुरूप धर्माचरण करणाऱ्या स्थितप्रज्ञ मनुष्याला निःसंशय मुक्ति प्राप्त होते, अशाविषयीं शाण्डिल्य ऋषीनें आपला अनुभव सांगितला आहे. त्यावरून कर्म, उपासना व ज्ञान या तीनही

तत्त्वांचा ज्यांत अंतर्भाव होतो असा हा कर्मयोगमार्गच श्रुतीला अभिप्रेत असून तो अनुभवसिद्ध आहे असें निर्विवाद सिद्ध होतें.

**अथ पञ्चदशः खण्डः ।**

**अन्तरिक्षोदरः कोशो भूमिबुध्नो न जीर्यति दिशो ह्यस्य स्रक्तयो द्यौरस्योत्तरं बिल्ँ स एष कोशो वसुधानस्तस्मिन्विश्वमिद्ँ श्रितम् ॥ १ ॥**

**अन्तरिक्षोदरः भूमिबुध्नः दिशः हि अस्य स्रक्तयः द्यौः अस्य उत्तरम् बिलम् (सः) कोशः न जीर्यति । सः एषः कोशः वसुधानः । तस्मिन् इदम् विश्वम् श्रितम् ।**

अंतरिक्ष ही ज्याची पोकळी आहे, भूमि हा ज्याचा तळ आहे, दिशा ह्या ज्याच्या बाजू आहेत, द्युलोक हें ज्याचें वरील तोंड आहे, असा हा कोश (हांडा) क्षीण होत नाहीं. हा कोश ( विश्वाचा ) खजिना आहे. त्यांत हें सर्व विश्व भरून राहिलें आहे.

मागील खंडांत विश्वोपासनेचें वर्णन केलें आहे. त्या उपासनेचें स्पष्टीकरण करण्याकरितां निराळ्या प्रकारानें जगताचें रूपकात्मक वर्णन या मंत्रांत केलें आहे. त्रैलोक्य हा एक खाजिना असून त्यांत सर्व स्थावर जंगम पदार्थ भरून ठेवले आहेत, असें या कोशरूपकाचें तात्पर्य आहे. स्वर्ग, मृत्यु, पाताळ अशी त्रैलोक्याविषयींची कल्पना दशोपनिषदांत अभिप्रेत नाहीं. भूगोल ( पृथ्वी ) वातावरण ( अन्तरिक्ष ) व त्यापलिकडील सर्व भाग ( द्युलोक ) हेंच तैलोक्य होय, असा उपनिषदांचा अभिप्राय आहे. याच त्रैलोक्याचें येथें कोशरूपानें वर्णन केलें आहे.

**तस्य प्राची दिग्जुहूर्नाम सहमाना नाम दक्षिणा राज्ञी नाम प्रतीची सुभूता नामोदीची तासां वायुर्वत्सः स य एतमेवं वायुं दिशां वत्सं वेद न पुत्ररोद्ँ रोदिति सोऽहमेतमेवं वायुं दिशां वत्सं वेद मा पुत्ररोद्ँ रुदम् ॥ २ ॥**

**तस्य ( विश्वकोशस्य ) प्राची दिक् जुहूः नाम दक्षिणा सहमाना नाम प्रतीची राज्ञी नाम उदीची सुभूता नाम। तासां वत्सः वायुः। यः एतम् दिशाम् वत्सम् वायुम् एवम् वेद सः पुत्ररोदम् न रोदिति। सः अहम् एतम् दिशाम् वत्सम् वायुम् एवम् वेद पुत्ररोदम् मा रुदम्।**

त्या विश्वकोशाची पूर्व दिशा जुहू ( हवनाला योग्य ) नांवाची आहे. दक्षिण दिशा सहमाना ( कर्मफलभोग ) नांवाची आहे. पश्चिम दिशा (वरुण राजाची) राणी नांवाची आहे. आणि उत्तर दिशा सुभूता (समृद्धि) नांवाची आहे. त्या दिशांचा वत्स (त्यांच्या-पासून उत्पन्न होणारा) वायु होय. जो त्या दिशांचा वत्स अशा वायूला याप्रमाणें जाणतो, तो पुत्रशोकानें शोक करीत नाहीं (त्याच्यावर पुत्र शोकाचें संकट येत नाहीं). मीं (मंत्रद्रष्ट्या ऋषीनें) त्या दिशांचा वत्स अशा वायूला ह्याप्रमाणें जाणिलें आहे (म्हणून), त्या मला पुत्रशोक झाला नाहीं.

प्रस्तुत मंत्रांत दिशांचीं विशिष्ट नांवें सांगून, त्या दिशांपासून उत्पन्न होणारा वायु हा त्या दिशांचा वत्स होय असें म्हटलें आहे. निरनिराळे वारे उपदिशांतूनच सुटतात असें आधुनिक शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे, तें लक्षांत घेऊनच या वर्णनाचा विचार करावयास पाहिजे. मुख्य दिशांमध्यें उपदिशांचा अन्तर्भाव करूनच येथें मुख्य दिशांचा वायूशीं संबंध दर्शविला आहे असें मानल्यास प्राचीन व नवीन मतांची एकवाक्यता करितां येईल. दिशा व वायु यांचा श्रुतीनें दर्शविलेला सामान्य संबंध शास्त्रशुद्ध व सर्वसंमत आहे. मग त्या मुख्य दिशा घ्याव्यात कीं उपदिशा घ्याव्यात हा तपशिलाचा प्रश्न असल्यामुळें त्यांत बदल झाल्यानें श्रुतीच्या मुख्य सिद्धां-ताची हानि होत नाहीं. म्हणून तपशीलाचे बाबतींत एकवाक्यता झालीच पाहिजे असा आग्रह धरण्याचें कारण नाहीं. दिशा व वायु यांच्या संबंधाचें ज्ञान मनुष्यानें अवश्य संपादन करावयास पाहिजे असें या मंत्राचें तात्पर्य आहे.

**अरिष्टं कोशं प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना प्राणं प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भूः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भुवः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना स्वः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना ॥३॥**

**अमुना ३ ( त्रिरावृत्तिर्निश्चयार्थे )अरिष्टम् कोशम् प्रपद्ये । अमुना ३ प्राणम् प्रपद्ये । अमुना ३ भूः प्रपद्ये । अमुना ३ भुवः प्रपद्ये । अमुना ३ स्वः प्रपद्ये ।**

ह्यानें( वायुज्ञानानें )च मी अविनाशी कोशाला पोंचतों; ह्यानेंच मी प्राणशक्तीला प्राप्त होतों; ह्यानेंच मी भूलोकाला प्राप्त होतों; ह्यानेंच मी भुवर्लोकाला प्राप्त होतों; ह्यानेंच मी स्वर्लोकाला प्राप्त होतों.

प्रस्तुत मंत्रांत प्रत्येक वाक्याला जोडून ‘अमुना’ हें पद तीन वेळा उच्चारिलें आहे. विशेष निश्चय दर्शविण्याकरितांच ही त्रिवार उक्ति आहे असें समजावें. मागील मंत्रांत दिशा, वायु व त्यांचा संबंध या विषयांचें ज्ञान अवश्य संपादन करावयास पाहिजे असें सांगितलें आहे. या वायु-विद्येच्या योगानें आपल्याला कोणती फलप्राप्ति झाली, याचें वर्णन मंत्र-द्रष्ट्या ऋषीनें या मंत्रांत केलें आहे. पहिल्या वाक्यांत अरिष्ट हा शब्द आला आहे. अरिष्ट या शब्दाचा अवयवार्थ घेतल्यास नाश न पावलेलें असा अर्थ होतो.अरिष्ट म्हणजे सध्यां अस्तित्वांत असलेल्या जगताला मी पोहों-चलों. याचा अर्थ असा कीं, मला या दिशा, वायु व त्यांचा संबंध पूर्ण-पणें कळल्यामुळेंच या जगताचें ज्ञान झालें. या प्रमाणेंच इतर वाक्यांचा अर्थ समजावा. त्यांचें स्पष्टीकरण पुढील मंत्रांत व्हावयाचेंच आहे.

**स यदवोचं प्राणं प्रपद्य इति प्राणो वा इद॑ँ सर्वं भूतं यदिदं किंच तमेव तत्प्रापत्सि ॥ ४ ॥**

**सः ( अहम् ) प्राणम् प्रपद्ये इति यत् अवोचम् इदम् यत् किम् च इदम् सर्वम् भूतम् प्राणः वै तत् । तम् एव प्रापत्सि ।**

मी प्राणशक्तीला पोंचलों, असें जें सांगितलें तें, जें कांहीं आहे तें हें सर्व भूतमात्र प्राणच आहे, म्हणून त्याला मी पोंचलों ( असें सांगितलें. )

**अथ यदवोचं भूः प्रपद्य इति पृथिवीं प्रपद्येऽन्तरिक्षं प्रपद्ये दिवं प्रपद्य इत्येव तदवोचम् ॥ ५ ॥**

**अथ भूः प्रपद्ये इति यत् अवोचम् तत् पृथिवीम् प्रपद्ये अन्तरिक्षम् प्रपद्ये दिवम् प्रपद्ये इति एव अवोचम् ।**

आतां भुर्लोकाला मी पोचलों असें जें सांगितलें (तें), पृथ्वीला पोंचलों, अंतरिक्षाला पोंचलों, व द्युलोकालाही पोंचलों अशाच भावनेनें सांगितलें.

**अथ यदवोचं भुवः प्रपद्य इत्यग्निं प्रपद्ये वायुं प्रपद्य आदित्यं प्रपद्य इत्येव तदवोचम् ॥ ६ ॥**

**अथ यत् भुवः प्रपद्ये इति अवोचम् तत् अग्निम् प्रपद्ये वायुम् प्रपद्ये आदित्यम् प्रपद्ये इति एव अवोचम् ।**

आतां जें मीं भुवर्लोकाला पोंचलों असें सांगितलें तें अग्नीला पोंचलों, वायूला पोंचलों व आदित्याला पोंचलों अशा भावनेनें सांगितलें.

**अथ यदवोचᳪं स्वः प्रपद्य इत्यृग्वेदं प्रपद्ये यजुर्वेदं प्रपद्ये सामवेदं प्रपद्य इत्येव तदवोचं तदवोचम् ॥ ७ ॥**

**अथ यत् स्वः प्रपद्ये इति अवोचम् तत् ऋग्वेदम् प्रपद्ये यजुर्वेदम् प्रपद्ये सामवेदम् प्रपद्ये इति एव अवोचम् । २**

आतां जें मीं स्वर्लोकाला पोचलों असें सांगितलें तें ऋग्वेदाला पोंचलों, यजुर्वेदाला पोंचलों व सामवेदाला पोंचलों, अशा भावनेनेंच सांगितलें ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे ).

तिसऱ्या मंत्रांत आपल्याला जी फलप्राप्ति झाली असें ऋषीनें सांगितलें आहे, त्याचें स्पष्टीकरण ह्या चार मंत्रांत करण्यांत आलें आहे. त्रैलोक्यांतील सर्व पदार्थांत आढळून येणारें सामर्थ्य हें प्राण–सामर्थ्याचेंच अंश रूप होय,असा प्राणविद्येचा सिद्धांत आहे. त्याचा अनुवाद करून ऋषि म्हणतो कीं, मला प्राणाची प्राप्ति झाली, म्हणजे त्रैलोक्यांतील शक्तिमान् पदार्थांचें ज्ञान झालें व त्या त्या पदार्थांच्या शक्तींचा कसा उपयोग करून घ्यावा तेंहि बरोबर समजलें, असा ह्या म्हणण्याचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें भूः, भूवः आणि स्वः या पदांत त्रैलोक्याचें बाह्यस्वरूप, अग्नि, वायू व आदित्य या देवता आणि ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांचें मला पूर्ण ज्ञान झालें असा अर्थ अभिप्रेत आहे.

टीपः—प्रस्तुत खंडांतील सातही मंत्रांचा भावार्थ विवरणांत आला असल्यामुळें या खंडाचा निराळा सारांश लिहिलेला नाहीं.

**अथ षोडशः खण्डः ।**

**पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्वि꣡ꣳशति वर्षाणि तत्प्रातःसवनं चतुर्वि꣡ꣳशत्यक्षरा गायत्री गायत्रं प्रातःसवनं तदस्य वसवोऽन्वायत्ताः प्राणा वाव वसव एते हीद꣡ꣳ सर्वं वासयन्ति ॥ १॥**

**पुरुषः वाव यज्ञः । तस्य यानि चतुर्विंशति वर्षाणि तत् प्रातःसवनम् । चतुर्विंशत्यक्षरा गायत्री । गायत्रम् प्रातःसवनम् । तत् अस्य वसवः अन्वायत्ताः। प्राणाः वाव वसवः । हि एते इदम् सर्वम् वासयन्ति ।**

पुरुष हाच यज्ञ होय. त्याचीं जी ( पहिलीं ) चोवीस वर्षें तेंच प्रातःसवन ( यज्ञांतील सोमसवनाचा एक विधि ) होय. गायत्री ( मंत्र )चोवीस अक्षरी आहे. गायत्री छंद प्रातःसवनांत असतो. त्या प्रातःसवनाला वसु देवता संबद्ध असतात. प्राणशक्ति ह्याच वसुदेवता होत. कारण हे प्राणच ह्या सर्व शरीरास राहवितात. ( शरीराच्या जीवनास कारण असतात ).

मनुष्य हाच यज्ञ होय. या वाक्याचें तात्पर्य असें कीं, मनुष्याचा आयुष्यक्रम किंवा जीवनक्रम यज्ञमय झाला पाहिजे. म्हणजे मनुष्यानें आपलें प्रत्येक काम उपासनाबुद्धीनेंच करावयास पाहिजे. चौदाव्या खंडांत यज्ञाचें स्वरूप स्पष्ट झालेंच आहे. सर्व जग परमात्मस्वरूपच असल्यामुळें, मानवी कर्मांचा या विश्वरूप परमात्म्याशीं संबंध येतो कीं नाहीं, अशी शंका घेण्याला जागाच उरत नाहीं. वर्णाश्रमधर्मानें मनुष्याचें आयुष्य नियमित झालें आहे. हीं वर्णाश्रमविहित कर्में परमात्मसेवेच्या हेतूनें स्वार्थत्यागपूर्वक करणें हाच औपनिषद् विद्येस अभिप्रेत असलेला यज्ञ होय. अशा प्रकारच्या यज्ञाकरितां केलेलीं कामें बंधनकारक होत नाहींत, म्हणून तूं आपलीं सर्व कर्में यज्ञाच्या हेतूनेंच कर असा भगवान श्रीकृष्णानें अर्जुनास उपदेश केला आहे. ( गी. ३.९ र. दी. पृ. १०० ते १०२ )

सोमयागात सोमसवनाच्या विधीचे तीन विभाग असतात. त्यांतील पहिल्या विभागास प्रातःसवन असें म्हणतात. या प्रातःसवनामध्यें वसुदेवता मुख्य असून गायत्रीच्या चोवीस अक्षरांचें साद्दश्य घेऊन मानवी आयुष्यांतील पहिल्या चोवीस वर्षांच्या विभागास प्रातःसवन असें ठरविलें आहे. या चोवीस वर्षांपैकीं बाल्यावस्थेचीं उपनयनापूर्वीचीं आठ वर्षें सोडलीं तर, उरलेलीं सोळा वर्षें हा ब्रह्मचर्याश्रमाचा काल ठरतो. स्मृतिकारांनीं ब्रह्मचर्याश्रमाची कालमर्यादा बारा वर्षें सांगितली असली, तरी ती श्रुतीनें सोळा वर्षें ठरविली आहे.

**तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा वसव इदं मे प्रातःसवनं माध्यंदिनꣳ सवनमनुसंतनुतेति माहं प्राणानां वसूनां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥ २ ॥**

**तम् एतस्मिन् वयसि किंचित् उपतपेत् चेत् सः ब्रूयात् हे प्राणाः वसवः इदम् मे प्रातःसवनम् माध्यंदिनम् सवनम् अनुसंतनुत इति । अहम् प्राणानाम् वसूनाम् यज्ञः मध्ये मा विलाप्सीय इति । ततः एव उदेति ह अगदः भवति ह ।**

त्या पुरुषाला त्या ( पहिल्या चोवीस वर्षांच्या ) आयुष्यांत कांहीं पीडा झाली तर त्यानें हे पुढील मंत्र ( प्रार्थना ) म्हणावे कीं, हे प्राणरूपी वसु देवांनो, हें माझें प्रातःसवन ( यज्ञकर्म ) माध्यंदिन सवनाला (पुढील यज्ञकर्माला) जोडून द्या. माझ्या हातून प्राणरूपी वसु देवांचा यज्ञ मध्येंच लुप्त न होवो. ह्याच प्रार्थनेनें तो पुरुष ( पीडेंतून ) वर येतो ( मुक्त होतो ) व निरोगी होतो.

प्राण ह्याच वसु देवता होत असें मागील मंत्रांत सांगितलें आहे. बृहदारण्यकोपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायांतील नवव्या ब्राह्मणांत पृथ्वी, अग्नि, अन्तरिक्ष इत्यादि आठ देवतांना वसु ही संज्ञा दिली आहे. हा भेद असला तरी, तो बाह्यस्वरूपांतील आहे, तत्त्वांतील नव्हे. कारण वसु या शब्दाचा अर्थ छांदोग्य आणि बृहदारण्यक या दोहोंमध्यें सारखाच अभिप्रेत आहे. जीवांचें अस्तित्व ( राहणें ) ज्यांच्यावर अवलंबून आहे, म्हणजे जे देव वसतीला आधारभूत असतात तेच वसु होत. हें वसु शब्दांतील तत्त्व छांदोग्याप्रमाणें बृहदारण्यकांतही स्वीकारलें आहे. म्हणून वर दर्शविलेला भेद तत्त्वविरोधी आहे असें मानण्याचें कारण नाहीं. ब्रह्मचर्याश्रमाच्या काळांत बाह्य संकटांनीं किंवा रोगादिकांनीं अडचणी उत्पन्न झाल्या तर त्यांचें निवारण होण्याकरितां यज्ञाच्या भाषेनेंच वसूंची प्रार्थना करावयास सांगितलें आहे. त्यावरून लहानपणापासूनच स्वतःच्या जीवनक्रमाविषयींची यज्ञबुद्धि अन्तःकरणांत दृढमूल व्हावी अशाविषयीं प्रत्येकानें काळजी घेतली पाहिजे, असें श्रुतीनें सुचविलें आहे.

**अथ यानि चतुश्चत्वारिꣳशद्वर्षाणि तन्माध्यंदिनꣳ सवनं चतुश्चत्वारिꣳशदक्षरा त्रिष्टुप्त्रैष्टुभं माध्यंदिनꣳ सवनं तदस्य रुद्रा अन्वायत्ताः प्राणा वाव रुद्रा एते हीदꣳ सर्वꣳ रोदयन्ति ॥ ३ ॥**

**अथ यानि चतुश्चत्वारिंशत् वर्षाणि तत् माध्यंदिनम् सवनम्। चतुश्चत्वारिंशदक्षरा त्रिष्टुप्। त्रैष्टुभम् माध्यंदिनम् सवनम्। तत् अस्य रुद्राः अन्वायत्ताः। प्राणाः रुद्राः वाव। हि एते इदम् सर्वम् रोदयन्ति।**

आतां जीं ( पुढील ) चवेचाळीस वर्षें तेंच माध्यंदिन सवन ( यज्ञांतील सोमसवनाचा दुसरा विधि ) होय. ४४ अक्षरी त्रिष्टुप छंद असतो. त्रिष्टुप छंदरूपच माध्यंदिन सवन असतें. त्याला रुद्र देवता संबद्ध असतात. प्राण हेच रुद्र होत. कारण तेच या सर्वाला संतप्त करितात.

मनुष्याच्या पहिल्या २४ वर्षांनंतरच्या ४४ वर्षांच्या विभागाला माध्यंदिन सवन म्हटलें आहे. त्रिष्टुप छंदाचीं ४४ अक्षरें असून, त्याचा माध्यंदिन सवनाशीं संबंध आहे. या सादृश्यावरूनच ४४ वर्षांच्या आयुष्याच्या विभागाला माध्यंदिन सवन ही संज्ञा दिली आहे. हा गृहस्थाश्रमाचा काळ आहे. माध्यंदिन सवनाची रुद्र ही देवता या गृहस्थाश्रमाच्या ४४ वर्षांच्या कालाशीं संबद्ध आहे. रडवितात ते रुद्र देव होत, असा श्रुतीनें येथेंही रुद्र शब्दाचा अर्थ दिला आहे. हे प्राणरूपी रुद्र या मर्त्य शरीरांतून जातांना सर्वांसच रडवितात म्हणून त्यांना रुद्र ही संज्ञा देण्यांत येते, असें बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें आहे. २४ वर्षांपासून पुढील ४४ वर्षें हा ऐन तारुण्याचा काल आहे. या कालांत चांगल्याचें संरक्षण व संवर्धन आणि वाइटांचा प्रतिकार याच गोष्टी मुख्य असतात. त्याकरितां संपादन, पराक्रम, आक्रमण इत्यादि स्वरूपांची कामें मनुष्याला याच काळांत करावीं लागतात. अशा कामात कोणाला तरी पीडा होणें अपरिहार्य असतें. म्हणून पीडा देणारी रुद्र ही देवता या कालाशीं संबद्ध असते असें श्रुतीनें दर्शविलें आहे.

**तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा रुद्रा इदं मे माध्यंदिनꣳ सवनं तृतीयसवनमनुसंतनुतेति माहं प्राणानाꣳ रुद्राणां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥ ४ ॥**

तम् एतस्मिन् वयसि किंचित् उपतपेत् चेत् सः ब्रूयात् प्राणाः रुद्राः इदम् मे माध्यंदिनम् सवनम् अनुसंतनुत इति । अहम् प्राणानाम् रुद्राणाम् यज्ञः मध्ये मा विलोप्सीय इति । ततः एव उदेति ह अगदः भवति ह ।

त्या पुरुषाला ह्या ४४ वर्षांच्या विभागांत कांहीं पीडा झाली तर त्यानें पुढील मंत्र ( प्रार्थना ) ह्मणावे कीं, हे प्राणरूपी रुद्रांनो हें माझें माध्यंदिन सवन ( यज्ञकर्म ) तृतीय सवनाला ( पुढील यज्ञकर्माला ) जोडून द्या. माझ्या हातून प्राणरूपी रुद्रदेवांचा यज्ञ मध्येंच लुप्त न होवो. या मंत्रांनीं तो पुरुष पीडेंतून वर येतो ( मुक्त होतो ) व निरोगी होतो.

अथ यान्यष्टाचत्वारिंशद्वर्षाणि तत्तृतीयसवनमष्टाचत्वारिंशदक्षरा जगती जागतं तृतीयसवनं तदस्यादित्या अन्वायत्ताः प्राणा वावादित्या एते हीदं सर्वमाददते ॥ ५ ॥

अथ यानि अष्टाचत्वारिंशत् वर्षाणि तत् तृतीयसवनम् । अष्टाचत्वारिंशदक्षरा जगती । जागतम् तृतीयसवनम् । तत् अस्य आदित्याः अन्वायत्ताः । प्राणाः आदित्याः वाव हि एते इदम् सर्वम् आददते ।

आतां जीं ( शेवटचीं ) अठ्ठेचाळीस वर्षें तेंच तृतीय सवन ( यज्ञांतील सोमसवनाचा तिसरा विधि) होय. अठ्ठेचाळीस अक्षरी जगती छंद असतो. जगतीछंदरूपीच तृतीय सवन असतें. त्याला आदित्य देवता संबद्ध असतात. प्राण हेच आदित्य होत. कारण हे प्राणरूपी आदित्य हें सर्व ग्रहण करितात.

माध्यंदिन सवनाचा काल ६८ वर्षाला समाप्त होतो; व तेथून पुढें ४८ वर्षांचा तृतीय सवनाचा काल सुरू होतो. तृतीयसवनांत जगती हा छंद व आदित्य हे देव मुख्य असतात. जगती छंदाच्या ४८ अक्षरांच्या संख्येच्या सादृश्यावरूनच ४८ वर्षांच्या कालविभागाला तृतीयसवन ही संज्ञा दिली आहे. या कालाशीं प्राणरूपी आदित्य देव संबद्ध असतात.

**तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा आदित्या इदं मे तृतीयसवनमायुरनुसंतनुतेति माहं प्राणानामादित्यानां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो हैव भवति ॥ ६ ॥**

**तम् एतस्मिन् वयसि किंचित् उपतपेत् चेत् सः ब्रूयात् हे प्राणाः आदित्याः इदम् मे तृतीयसवनम् आयुः अनुसंतनुत इति । अहम् प्राणानाम् आदित्यानाम् यज्ञः मध्ये मा विलोप्सीय इति । ततः एव उदेति ह अगदः भवति ह ।**

त्या पुरुषाला ह्या ( तृतीय सवनाच्या ) आयुष्यांत कांहीं पीडा झाली तर त्यानें हे ( पुढील ) मन्त्र ( प्रार्थना ) ह्मणावे कीं, हे प्राणरूपी आदित्यांनो, हें माझें तृतीय सवन आयुष्याच्या शेवटाला जोडा. प्राणरूपी आदित्यदेवतांचा यज्ञ मध्येंच लुप्त न होवो. त्या प्रार्थनेनें तो पुरुष ( पीडेंतून ) वर येतो (मुक्त होतो) व निरोगी होतो.

**एतद्ध स्म वै तद्विद्वानाह महिदास ऐतरेयः स किं म एतदुपतपसि योऽहमनेन न प्रेष्यामीति स ह षोडशं वर्षशतमजीवत्प्र ह षोडशं वर्षशतं जीवति य एवं वेद ॥ ७ ॥**

**तत् एतत् विद्वान् ऐतरेयः महिदासः आह ह स्म वै । सः ( त्वम् ) मे किम् एतत् उपतपसि यः अहम् अनेन न प्रेष्यामि इति। सः षोडशम् वर्षशतम् अजीवत् ह । यः एवम् वेद सः षोडशम् वर्षशतम् प्रजीवति ह ।**

तें हें ( पुरुषयज्ञकर्म ) जाणणारा ऐतरेय महिदास ऋषि म्हणाला कीं, ( हे रोगा ) तो तूं मला कां ही पीडा करतोस ? कारण मी ह्या पीडेनें मरणार नाहीं. तो महिदास एकशें सोळा वर्षे जगला. जो ह्याप्रमाणें जाणतो तो एकशें सोळा वर्षे जगतो.

सहाव्या मंत्रांत प्राणरूप आदित्यांची प्रार्थना दिली असून सातव्या मंत्रांत या यज्ञाचें फल सांगितलें आहे. ऐतरेय महिदास हा ऐतरेय ब्राह्मणाचा कर्ता आहे, त्याचाच या मंत्रांत उल्लेख केला आहे. ऐतरेय महिदासाविषयीं ऐतरेय उपनिषदाच्या उपक्रमांत सविस्तर खुलासा करण्यांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. ऐ. उ. पृ. २ ते ४ ) या ऋषीला ११६ वर्षें आयुष्य लाभलें, तें त्यानें आपला जीवनक्रम यज्ञमय केला होता म्हणूनच लाभलें, यांत शंका नाहीं. याप्रमाणें पुरुषयज्ञाचें पूर्ण ज्ञान संपादन करून जो यावज्जीव तदनुसार वर्तन करील त्याला ऐतरेय महिदासाप्रमाणेंच पूर्णायुष्याचा लाभ होईल असें या मंत्रांत सांगितलें आहे.

---

## १६ व्या खंडाचा सारांश.

वैदिक कालांत मानवी आयुष्याचें साधारण मान १०० वर्षांहून अधिक होतें असें या १६ व्या खंडांतील विवेचनावरून उघड दिसतें. ११६ वर्षें हें मनुष्याचें पूर्ण आयुष्य होय अशी वैदिक ऋषींची निश्चित कल्पना आहे. कारण ऐतरेय महिदासाचें उदाहरण त्यांच्या डोळ्यापुढें होतें. ह्मणून ११६ वर्षें हीच पूर्णायुष्याची मर्यादा होय असें ठरवून, त्याचे त्यांनीं तीन विभाग केले आहेत. २४, ४४, व ४८ अशी या तीन विभागांची अनुक्रमानें संख्या आहे. याच उपनिषदाच्या दुसऱ्या अध्यायांत ( छां. अ. २ खं. २३ पृ. १०९ ते ११३ ) तीन आश्रम-धर्मस्कंध सांगितले आहेत. आणि या खंडांत देखील मानवी आयुष्याचे तीनच विभाग निश्चित केले आहेत. त्यावरून चतुर्थाश्रमाचा या वेळीं आश्रमव्यवस्थेंत समावेश झाला नव्हता असें निःसंशय ठरतें. उपनयनाचा काल या वेळीं अनिश्चित असला तरी, तो पहिल्या आठ वर्षांच्या बाल्यावस्थेंत असला पाहिजे. २४ वर्षांच्या वयापर्यंत ब्रह्मचर्याश्रम पाळावा लागत होता. या ब्रह्मचर्याश्रमाला प्रातःसवन अशी संज्ञा देऊन, वसुदेवनांशीं त्याचा संबंध जोडला आहे. निरनिराळ्या विभागांतील देवतांचीं नांवें निरनिराळीं असलीं

तरी, तीं केवळ प्राणांचीं नांवें असून सर्व आयुष्याची प्राण हीच एक अधिदेवता आहे. वसु, रुद्र व आदित्य हीं नांवें त्या त्या अवस्थेंत घडणाऱ्या प्राणांच्या कार्यांचीं निदर्शक आहेत. २४ वर्षांपर्यंत या प्राणदेवतेच्या साहाय्यानें आचार, सामर्थ्य, शील, विद्या, इत्यादि सद्गुणांचा संचय करावयाचा असतो. वसु या शब्दाचा अर्थ राहवणें ह्मणजे संचय करणें असा होतो. अशा अभिप्रायानेंच श्रुतीनें या २४ वर्षांच्या विभागांत प्राणांला वसु ही अर्थपूर्ण संज्ञा दिली आहे. ब्रह्मचर्याश्रमधर्मांच्या साधनांनीं शरीर, मन व बुद्धि यांचा विकास करणें हा या २४ वर्षांच्या विभागांतील मुख्य उद्देश आहे. तो वसुरूपी प्राणांच्या सहाय्यानें मनुष्यानें पूर्ण तडीस न्यावा. मध्यंतरीं संकटें किंवा अडचणी येतील पण त्यांना न भितां प्राणरूपी वसूंची कृपा संपादन करून, ( प्राणसामर्थ्याचें संवर्धन करून ) संकटांचा प्रतिकार करावा व उत्साहपूर्वक आपलें जीवनविकासाचें ध्येय पूर्णपणें गांठावें असा श्रुतीचा विद्यार्थीदशेंतील सर्व तरुणांना उपदेश आहे.

२४ ते ६८ वर्षांच्या विभागात गृहस्थाश्रमधर्म येतो. या काळांतील मानवी आयुष्याचें स्वरूप तेजस्वी असेंच असावयास पाहिजे. या अभिप्रायानेंच श्रुतीनें प्राणांला रुद्र ही संज्ञा दिली आहे. समाज—राष्ट्र, निष्कंटक, स्वतंत्र व उत्कर्षशाली राखण्याचें उत्तरदायित्व गृहस्थाश्रमावरच येऊन पडतें. ह्मणून हा ४४ वर्षांचा कालविभाग रुद्रदेवतेचा आहे. यांत निरपवाद तितिक्षा मुळींच योग्य नाहीं. क्षमा किंवा सहनशीलता हे दिव्य सद्गुण असले तरी, ते समाजधर्मांत निरपवाद नसतात, हें गृहस्थाश्रमांतील कोणाहि मनुष्यानें केव्हांही विसरतां कामा नये. वाइटाचा प्रतिकार करून चांगल्याचें संरक्षण व संवर्धन करण्यांत प्रत्येक गृहस्थानें तत्पर असलें पाहिजे, असा श्रुतीचा उपदेश आहे.

शेवटच्या ४८ वर्षांच्या विभागांत प्राणांला आदित्य ही संज्ञा दिली आहे. ग्रहण करून जाणारा तो आदित्य होय, असा श्रुतीनेंच आदित्य

शब्दाचा अर्थ सांगितला आहे. तो लक्षांत घेतल्यास ज्या योगानें समाज सुसंघटित राहील, तेंच कर्म या विभागांत येतें. या कालविभागास आश्रमांच्या अनुक्रमानें वानप्रस्थाश्रम असें ह्मणतां येईल. या आश्रमाचे ऐवजीं संन्यासाश्रम असें नांव या कालविभागास देण्यास काय हरकत आहे? येथें आश्रमांचीं नांवें दिलेलीं नाहींत, ह्मणून वरील प्रश्न उत्पन्न होणें शक्य आहे. त्या प्रश्नाचें उत्तर इतकेंच कीं, ४८ वर्षांच्या या शेवटच्या कालविभागाला कोणतेंही नांव देण्यास हरकत नाहीं, हें जरी खरें असलें तथापि, या विभागांत कर्मसंन्यास करावयाला मात्र श्रुतीनें सांगितलें नाहीं. उलट समाजसंघटनेला पोषक असें कर्मच करावयास सांगितलें आहे. सर्वांना घेऊन जाणें किंवा सर्वांचा संग्रह करणें, असें या विभागांतील कर्माचें स्वरूप श्रुतीनें स्पष्ट केलें आहे. म्हणून या विभागाला संन्यासाश्रम असें म्हणावयाचें झालें तरी, समाजसंघटनेला अनुकूल अशीं कर्तव्यें या संन्यासाश्रमांत आहेत असें कबूल केल्यावांचून गत्यंतरच नाहीं याप्रमाणें प्राणदेवतेची कोणत्याही कालांत उपासना न सोडता, ठराविक मर्यादा पाळून, मनुष्यानें आपल्या जीवनक्रमांत परमात्मसेवेला प्राधान्य दिलें ह्मणजे तो यज्ञस्वरूप होतो. व असा यज्ञमय जीवनक्रम चालविणारा मनुष्य दीर्घकालपर्यंत जगून आपल्या सदाचरणानें समाजाला सन्मार्ग दाखवून स्वतः कृतार्थ होतो.

---

## अथ सप्तदशः खण्डः ।

**स यदशिशिषति यत्पिपासति यन्न रमते ता अस्य दीक्षाः ॥ १ ॥**

**सः यत् अशिशिषति यत् पिपासति यत् न रमते ताः अस्य दीक्षाः ।**

तो ( पुरुष ) जी खाण्याची इच्छा करितो, जी पिण्याची इच्छा करितो ( परंतु ) जो रमत नाहीं ( क्रीडादि व्यवहार करीत नाहीं ) त्या त्याच्या दीक्षा ( यज्ञव्रतें ) होत.

प्रस्तुत मंत्रांत दीक्षेचा–व्रतस्थपणाचा–सामान्य नियम सांगितला आहे. मागील सोळाव्या खंडांत सांगितल्याप्रमाणें मनुष्याला आपला जीवनक्रम यज्ञमय करावयाचा झाल्यास त्यानें जागरूकपणें दीक्षेची–व्रतस्थपणाची मर्यादा अवश्य पाळली पाहिजे. यज्ञकर्त्यानें पाळावयाच्या मर्यादेस दीक्षा असें म्हणतात. मागील खंडांतील विवेचनाप्रमाणें पाहतां २४ वर्षांच्या वयापर्यंत ब्रह्मचर्य, ६८ वर्षांपर्यंत गार्हस्थ्य व पुढें वानप्रस्थ हे धर्म पाळावयाचे असतात. मनुष्यानें आपआपलें वयोमान पाहून त्या त्या विभागांत आश्रमधर्माप्रमाणें आपलें वर्तन ठेवावें, इतकाच त्यांतील अर्थ आहे व ही गोष्ट मुळींच अशक्य नाहीं. मात्र उदात्त ध्येय, सावधपणा, आत्मनिरीक्षण, मनोनिग्रह इत्यादि गुणांची आवश्यकता आहे. त्याकरितां १७ व्या खंडाच्या या पहिल्या मंत्रांत व्रतस्थपणाचें सामान्य स्वरूप सांगितलें आहे, त्याचा अंतर्भाव औपनिषद् विद्येंतील वैराग्यांतच होतो. कारण ही व्रतरूपी दीक्षा यावज्जीव चालावयाची आहे. मायावादी वेदान्तानें वैराग्याला बहुतेक वैतागाचें स्वरूप दिलें आहे, पण ती कल्पना औपनिषद् विद्येला मुळींच अभिप्रेत नाहीं. मायावादानें किंवा मायावादी संन्यासमार्गानें शारीरकर्माची सवलत ठेविली असली, तथापि वैराग्यांतील वैतागाचें मूलभूत स्वरूप कायमच आहे. ही वैतागाची कल्पना उत्तरोत्तर वाढत जाऊन, विषय हे वमनवत् समजावे, अशी एक चमत्कारिक कल्पना वैराग्यास जोडली गेली. त्यामुळें वैराग्याचें बुद्धिग्राह्य, शास्त्रशुद्ध आणि व्यवहार्य असें स्वरूप नाहींसें झालें आणि खरें वैराग्य हा एक अतिमानुष गुण आहे अशी समजूत होऊन बसली. मायावादाच्या असल्या बुद्धिग्राह्य न होणाऱ्या कल्पनांमुळें वेदान्ताला व्यवहाराविरुद्ध व अतिमानुष असें स्वरूप आलें आणि तो बुद्धिवादाच्या कक्षेंतून बाहेर जाऊन बसला. यामुळें वैदिक धर्माची केवढी हानि झाली तिची कल्पना करणें देखील कठिण आहे. औपनिषद् विद्येंत वैदिक ऋषींनीं वेदान्ताचे सर्व सिद्धान्त बुद्धिवादानेंच प्रतिपादन केले आहेत. अशा रीतीनें बुद्धिग्राह्य अशी ब्रह्म-

विद्येची प्रस्थापना करून वैदिक ऋषींनीं मनुष्याला व्यवहार्य असा अमृतत्वाचा मार्ग दाखवून दिला, अशाविषयीं औपनिषद् विद्येंत जीं अनेक उदाहरणें दिसून येतात त्यांपैकींच प्रस्तुत मंत्रांतील वैराग्याचें लक्षण हें एक प्रत्यक्ष उदाहरणच आहे.

मनुष्य जिवंत असेपर्यंत विषय व इंद्रियें यांचा संयोग अपरिहार्य आहे. किंबहुना, या संयोगावरच मनुष्याचें जीवन अवलंबून आहे. शरीर, मन व बुद्धि हीं चांगलीं निरोगी व तेजस्वी राहतील अशा बेतानें मनुष्यानें अन्न-पाणी इत्यादिकांचें ग्रहण केलेंच पाहिजे. आरोग्य व तेजस्विता येवढ्याच हेतूनें केल्या जाणाऱ्या खाणेंपिणें इत्यादि व्यवहाराला विषयसेवन असें नांव आहे, यांत उपभोगाची–चैनीची कल्पना मुळींच नाहीं. वस्तुतः खाण्यापिण्याचा व्यवहार करीत असतां मनुष्य वैराग्यशील आहे कीं चैन-बाज आहे, हें दुसऱ्या मनुष्याला ओळखतां यावयाचें नाहीं. कारण, हा व्यवहार चैनीच्या हेतूनेंही घडण्याचा पूर्ण संभव असतो. चैन किंवा विलास या हेतूनें केलेला व्यवहार हाच विषयोपभोग होय. विषयसेवन किंवा विषयोपभोग हे भेद व्यवहाराच्या बाह्य स्वरूपावरून ठरवावयाचे नसून, ते कर्त्याच्या हेतू-वरूनच ठरवावयास पाहिजेत. म्हणून मनुष्याला आपल्या अन्तःकरणांत वैराग्यवृत्ति उत्पन्न झाली आहे कीं नाहीं, हें आत्मनिरीक्षणाच्या योगानें समजूं शकेल. या बाबतींत दुसऱ्याची परीक्षा घेणें फारसें सोपें नाहीं हें जरी खरें असलें तथापि, कांहीं गोष्टी उघड उघड विलासाच्या म्हणूनच दिसतात. असल्या गोष्टींविषयीं विरक्त मनुष्याच्या अन्तःकरणांत इच्छाच उत्पन्न होत नाहीं. विरक्त मनुष्यानें देखील आपला जीवनक्रम व्रतस्थच राखला पाहिजे. कारण व्रतस्थपणा हें त्याच्या अभ्युदयनिःश्रेयस–प्राप्तीचें मुख्य साधन आहे. म्हणून वैराग्यशील मनुष्याच्या अन्तःकरणांत खाण्या-पिण्याची इच्छा उत्पन्न झाली तरी, त्या इच्छेंत रति म्हणजे चैनबाजीचा हेतु नसतो. ‘ न रमते ’ म्हणजे विषय सेवनांत रममाण होण्याची कल्पना नष्ट होणें हेंच वैराग्याचें मूळ तत्त्व होय. या उपभोगवासनेचा दोष अन्तः-

करणांतून ज्या मानानें नाहींसा होतो त्यामानानें तें वैराग्यशील होऊं लागतें. म्हणून विषयसेवन बंद करणें हें वैराग्याचें लक्षण नसून उपभोगवासना नष्ट करणें हेंच वैराग्य होय. ज्यानें ही दुष्ट वासना नष्ट केलेली असते त्याच्या विवेकशील अशा सर्व व्यवहारांना श्रुतीनें दीक्षा ही उच्च पदवी दिली आहे.

**अथ यदश्नाति यत्पिबति यद्रमते तदुपसदैरेति ॥ २ ॥**

**अथ यत् अश्नाति यत् पिबति यत् रमते तत् उपसदैः ( तुल्यम् ) एति।**

तसेंच जेव्हां तो भोजन करितो, जेव्हां पाणी पितो व जेव्हां रमतो ( क्रीडादि व्यवहार करितो ) तेव्हां ते त्याचे उपसद ( यज्ञांतील पयःपान इत्यादि विधि ) तुल्य समजावे.

मागील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें कांहीं प्रकार दिसण्यांत विलासासारखे दिसतात व वैराग्यशील मनुष्याला याही गोष्टी करण्याचा प्रसंग येतो. पण असल्या गोष्टी करण्यांत त्याच्या अन्तःकरणात चैनीचा हेतु नसतो हें लक्षांत ठेविलें पाहिजे. कांहीं तरी तशी महत्त्वाची आवश्यकता उत्पन्न झाल्यामुळें तो या विलासी दिसणाऱ्या व्यवहारास सादर झालेला असतो. वैराग्यशील मनुष्याच्या या व्यवहारांना श्रुतीनें यज्ञाच्या भाषेनें 'उपसद' हें नांव दिलें आहे.

**अथ यद्धसति यज्जक्षति यन्मैथुनं चरति स्तुतशस्त्रैरेव तदेति ॥ ३ ॥**

**अथ यत् हसति यत् जक्षति यत् मैथुनम् चरति तत् स्तुतशस्त्रैः एव ( तुल्यम् ) एति।**

तसेंच जें तो हंसतो, जें उपहार करितो, जो स्त्री-समागम करितो तें स्तोत्र व शस्त्रें ( विशिष्ट मंत्र ) यांच्याशीं तुल्य होतें.

स्तोत्र व शस्त्र हीं निरनिराळ्या प्रकारचीं सूक्तें आहेत. त्यांचें पठन किंवा अनुष्ठान करणें याला देखील हींच नांवें दिलीं जातात.

**अथ यत्तपो दानमार्जवमहिँसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः ॥ ४ ॥**

**अथ यद् तपः दानम् आर्जवम् अहिंसा सत्यवचनम् ताः अस्य दक्षिणाः इति ।**

तसेंच तो जें व्रत, दान, सरलता अहिंसा, सत्यभाषण करितो त्या त्याच्या दक्षिणा ( यज्ञांतील ऋत्विजांना दिल्या जाणाऱ्या देणग्या ) समजाव्या.

मानवी जीवनक्रमास यज्ञाचें स्वरूप दिलें असल्यामुळें, यज्ञांतील मुख्य मुख्य गोष्टी मानवी आयुष्यांत बसवून दाखविण्याकरितां दक्षिणा कोणती तें या मंत्रांत सांगितलें आहे. दक्षिणा म्हणजे यजमानाकडून ऋत्विजांस दिली जाणारी देणगी. या पुरुषयज्ञांत सद्गुण, सद्वर्तन, इत्यादिकांनाच दक्षिणा असें म्हटलें आहे, तप ( नियमित सदाचरण ) दान ( योग्य परोपकार ), आर्जव ( सरळपणा ), अहिंसा ( परपीडा न करणें ), व सत्यभाषण याच ह्या यज्ञांतील दक्षिणा होत. या पांच गुणांमध्यें वैयक्तिक व सामाजिक नीतीचा अन्तर्भाव होतो. मनुष्यानें व्यक्तिधर्माचें पालन करणें यज्ञदृष्ट्या जसें अवश्य आहे तसेंच समाजधर्माचें ( सामाजिक कर्तव्यांचें ) पालन करणेंही अवश्य आहे. नुसत्या व्यक्तिधर्मानें किंवा नुसत्या समाजधर्मानें, मनुष्याचा आयुष्यक्रम यज्ञमय होत नाहीं. दक्षिणेशिवाय ज्याप्रमाणें यज्ञाची पूर्तता होत नाहीं, त्याचप्रमाणें वैयक्तिक व सामाजिक सद्गुणांशिवाय या पुरुषयज्ञाची पूर्तता व्हावयाची नाहीं. या अभिप्रायानेंच उपरोक्त सद्गुणांना श्रुतीनें दक्षिणा असें म्हटलें आहे. धार्मिक नीति या शब्दांत वरील सारख्या सर्व गुणांचा अन्तर्भाव होतो. तैत्तिरीय शाखेंतील नारायण उपनिषदाच्या शेवटच्या खंडांत या मंत्रासारखेंच जीवितमय यज्ञाचें वर्णन आलें आहे. त्यात ‘ दमः शमयिता दक्षिणा ’ असें म्हटलें आहे. शान्तिप्रधान ( सात्विक ) आत्मसंयमन हीच या यज्ञांतील दक्षिणा होय असा याचा अर्थ आहे. आत्मसंयमन हें सर्व सद्गुणांचें मूळच असल्यामुळें,

नारायणोपनिषदांतील दक्षिणेचा उल्लेख प्रस्तुत मंत्रांतील अभिप्रायास अनुसरूनच आहे.

**तस्मादाहुः सोष्यत्यसोष्टेति पुनरुत्पादनमेवास्य तन्मरणमेवावभृथः ॥ ५ ॥**

**( यत् ) सोष्यति असोष्ट इति आहुः तस्मात् एव अस्य पुनरुत्पादनम् । मरणम् तत् एव अवभृथः ।**

जसें सोमरस काढतों; सोमरस काढला असें ( यज्ञांत ) म्हणतात. तसच त्या पुरुषाचें संतति उत्पादन समजावें; आणि मरण हेंच अवभृथ [ यज्ञसमाप्तिदर्शक ] स्नान होय.

**तद्धैतद्घोर आङ्गिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वोवाचापिपास एव स बभूव सोऽन्तवेलायामेतत्त्रयं प्रतिपद्येताक्षितमस्यच्युतमसि प्राणसँशितमसीति तत्रैते द्वे ऋचौ भवतः ॥ ६ ॥**

**तत् एतत् आङ्गिरसः घोरः देवकीपुत्राय कृष्णाय उक्त्वा उवाच । सः अपिपासः एव बभूव । सः अन्तवेलायाम् एतत् त्रयम् प्रतिपद्येत ( हे प्राण ) अक्षितम् असि अच्युतम् असि संशितम् असि इति । तत्र एते द्वे ऋचौ भवतः ।**

तें हें ज्ञान ( पुरुषयज्ञविद्या ) आंगिराऋषीचा पुत्र घोर नामक ऋषि देवकीपुत्र कृष्णाला सांगून म्हणाला कीं, ( जो ही यज्ञविद्या जाणतो) तो निःस्पृह होतो. तो अंतकाळीं ह्या (पुढील) तीन तत्त्वांना प्राप्त होईल. हें प्राणा ( परमात्मन् ) तूं ( अस्खलित ) अक्षरणशील आहेस, अक्षय आहेस व सूक्ष्म आहेस याविषयीं ह्या ( पुढील ) दोन ऋचा आहेत.

प्रस्तुत खंडाच्या पाहिल्या मंत्रापासून येथपर्यंत झालेल्या विवेचनाचा या मंत्रांत उपसंहार केला आहे. या सहा मंत्रांच्या प्रकरणांत मानवी जीवनक्रम यज्ञमय कसा करावयाचा याचें विभागशः ( तपशीलवार ) प्रतिपादन

केलें आहे. यालाच गीतेनें ज्ञानयज्ञ असें म्हटलें आहे. प्रस्तुत प्रकरणांतील एकंदर विवेचन लक्षांत घेतल्यास गीतेनें या यज्ञाला दिलेली ज्ञानयज्ञ ही संज्ञा फारच अर्थपूर्ण आहे असें समजून येईल. ही ज्ञानयज्ञाची विद्या आंगिरस गोत्रांतील घोर नांवाच्या ऋषीनें देवकीपुत्र कृष्णाला उपदेशिली, असें या मंत्रांच्या पहिल्या वाक्यांत स्पष्ट म्हटलें आहे. कुरुक्षेत्राच्या रण-भूमीवर अर्जुनाला ब्रह्मविद्येचा उपदेश करणारा भगवान् श्रीकृष्ण हाच येथील देवकीपुत्र कृष्ण आहे काय? हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाला नास्ति पक्षी उत्तर देण्याला जोरदार असें प्रमाण आढळत नाहीं. आचार्यांनीं याविषयीं स्पष्ट असा कांहींच खुलासा केलेला नाहीं. तथापि त्यांना या बाबतींत किंचित् संशय वाटत असावा, असें त्यांनीं दिलेल्या 'शिष्याय' या पर्यायशब्दावरून दिसतें. परंतु हा संशय प्रमाणभूत होत नाहीं. गीतेच्या प्रास्ताविक भाष्यांत आचार्यांनीं कृष्णावताराचा उल्लेख कर-तांना देवकीचा नामनिर्देश केला आहे त्यावरून, भगवान् श्रीकृष्ण हाच येथील देवकीपुत्र कृष्ण असावा असा आचार्यांचाही आशय दिसतो. मागील पांच मंत्रांतील विवेचनावरून पाहिल्यास भगवान् श्रीकृष्णानीं गीतेंत उपदेशि-लेल्या मोक्षदायक कर्मयोगाशीं या विवेचनाचें अत्यंत साम्य आहे, असें स्पष्ट दिसून येईल. मनुष्यानें आपला जीवनक्रम यज्ञमय–उपासनामय करावा व हा उपासनामय आयुष्यक्रम ब्रह्मज्ञानावरच पूर्णपणें अधिष्ठित असावा, असें कर्मयोगाचें रहस्य आहे. व तेंच या घोरांगिरस ऋषीनें या प्रकरणांत प्रतिपादन केलें आहे. तेव्हां ही विद्या भगवान् श्रीकृष्णाला या आंगिरस ऋषीनें उपदेशिली होती असें प्रस्तुत मंत्रावरून निःसंशय सिद्ध होतें. तथापि हा प्रश्न विशेषतः इतिहासशास्त्रांतील असल्यामुळें त्यासंबंधीं संशोधन होऊन योग्य प्रमाणें पुढें आल्यावांचून घोरांगिरस ऋषीचा शिष्य हा भगवान् श्रीकृष्ण नव्हे असें म्हणणें साधार ठरणार नाहीं. तसें जोरदार ऐतिहासिक प्रमाण पुढें येईपर्यंत हा सिद्धांत म्हणजे घोरांगिरस ऋषीचा शिष्य हाच भगवान् श्रीकृष्ण होय, हे मान्य करण्यास हरकत नाहीं. भूतकालीन ऐति-

हासिक सिद्धांताला प्रमाणदृष्ट्या एक प्रकारची कालमर्यादा असते, म्हणजे ते त्रिकालाबाधित आहेत असे सहसा म्हणतां येत नाहीं; हें जरी खरें असलें तथापि, वेदांत शास्त्राच्या दृष्टीने हा सिद्धांत निराबाध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ऋषींचा शिष्य झाल्याने ईश्वरावताराम कमी-पणा येत नाही. शास्त्रतः या विषयातील विवेचन व गीतेंतील कर्मयोगाचें विवेचन एक असून हा मार्ग प्रत्यक्ष मोक्षदायक म्हणूनच श्रुतीने उप-देशिला आहे, तो श्रीकृष्णाला कोणत्या ऋषीपासून प्राप्त झाला त्याचें येथें स्पष्टीकरण केले आहे.

उपभोगाविषयींची तृष्णा नष्ट होणे हा या ब्रह्मविद्येचा किंवा ज्ञान-यज्ञाचा सहज परिणाम म्हणूनच सांगितला आहे. कारण या खंडाच्या पहिल्याच मंत्रात जे दीक्षेचे—तटस्थपणाचें प्रतिपादन केले आहे त्या प्रति-पादनास अनुलक्षूनच येथील अपिपास या विशेषणाचा अर्थ करावयास पाहिजे. या अध्यात्मविद्येच्या योगाने मनुष्य अपिपास म्हणजे विषयसुखा-विषयीं निरिच्छ होतो, असाच त्याचा अभिप्राय आहे. ही निस्पृहता उपा-सनादि इतर विद्यांचाच परिणाम आहे असा जुन्या टीकाकारांचा अभि-प्राय आहे, परंतु तो अर्थ प्रकरणास सोडून असल्यामुळे अग्राह्य आहे. 'बभूव' या परोक्ष भूतकाली क्रियापदाचा विध्यर्थासारखा उपयोग वैदिक वाङ्मयात केला जातो. शेवटी प्रार्थनासदृश अशी जी तीन वाक्ये दिलीं आहेत त्यांत परब्रह्माच्या तात्त्विक स्वरूपाचें वर्णन अभिप्रेत आहे. अविनाशी स्वयंप्रकाश व तत्त्वतः केव्हाही कमीजास्त न होणारें असे जें ब्रह्मतत्त्व त्याची अंतकालीं मनुष्याला पूर्ण प्रतीति होते, असें या ज्ञानमय यज्ञविद्येचें प्रधान फल शेवटी सांगितले आहे. ह्यावरून ज्ञानमूलक, उपासनामय-यज्ञमय असा हा कर्मयोग साक्षात् मोक्षदायक आहे असे निर्विवाद सिद्ध होतें.

**आदित्प्रत्नस्य रेतसः । उद्वयं तमसस्परि ज्योतिः पश्यन्त उत्तरँ स्वः पश्यन्त उत्तरं देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तममिति ज्योतिरुत्तममिति ॥ ७ ॥**

**प्रत्नस्य रेतसः आदित् तमसः परि उत्तरम् ज्योतिः उत्पश्यन्तः स्वः उत्तरम् ( ज्योतिः ) पश्यन्तः उत्तमम् ज्योतिः देवत्रा देवम् सूर्यम् वयम् अगन्म।**

मुख्य बीजाचें आदिकारण असे, अंधकाराहून पलीकडचें तेज पाहणारे आणि अंतर्यामीं असणारें श्रेष्ठ तेज पाहणारे आम्ही सर्वश्रेष्ठ तेज व सर्व देवाचा देव अशा सूर्याला जाऊन मिळालों. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

प्रस्तुत मंत्र हा अत्यंत प्राचीन असून, ' आदित्प्रत्नस्य' या ऋचेच्या द्रष्ट्यानें ( कर्त्यानें ) त्यात स्वानुभव सांगितला आहे. म्हणून प्रमाण व अनुभव या दोनही दृष्टींनीं हा मंत्र अत्यंत महत्वाचा ठरतो. सगुणब्रह्म प्रकृतिपुरुष, हिरण्यगर्भ इत्यादि शब्दांनीं ज्या तत्वाचा निर्देश केला जातो तेंच ' प्रत्नस्य रेतसः' या पदानीं सांगितलेलें आदिबीज म्हणजे या सृष्टीचें पहिलें व मुख्य कारण होय. सर्व सृष्टीचें आरंभस्थान जें सगुण ब्रह्म त्याचें देखील अधिष्ठान किंवा कारण असलेल्या शुद्ध ब्रह्मतत्त्वाचे पुढील वाक्यांतून वर्णन केले आहे. अंधकाराच्या पलीकडचे, अशा अर्थाच्या विशेषणांत अज्ञानाचाही समावेश करावयास पाहिजे. कारण पिण्डब्रह्मांडातील अंतर्बाह्य तेज येथे श्रुतीला विवक्षित आहे. ' स्वः' या पदावरून हृदयस्थ किंवा अन्तर्गत तेज दर्शविलें आहे. सर्व देवतांचा सम्राट्, सूर्यमण्डलात असणारा, देवाधिदेव, परमात्मा ह्याच्या स्वरूपाला आम्ही जाऊन पोचलों असा स्वानुभव ऋषीनें प्रस्तुत मंत्रांत सांगितला आहे. या खण्डात प्रतिपादन केलेला पुरुषयज्ञरूपी कर्मयोग मोक्षदायक आहे या विषयींचें मांत्रवर्णिक प्रमाण म्हणूनच श्रुतीनें हा मंत्र येथें घेतला आहे. त्यावरून येथवर प्रतिपादन केलेला पुरुषयज्ञ किंवा अध्यात्मयज्ञ अभ्युदय-निःश्रेयसप्राप्तीचें साक्षात् साधन आहे असें श्रुतीनें सयुक्तिक व सप्रमाण दाखविलें आहे.

---

## १७ व्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत मानवी व्यवहारास यज्ञाचें स्वरूप कसें येतें हें तपशीलवार दाखविलें आहे. मागील खंडांत मानवी आयुष्याचे तीन भाग सांगून सामान्य यज्ञाचें वर्णन केलें आहे; व यज्ञांतील मुख्य मुख्य गोष्टी या खंडांत मनुष्याच्या आयुष्यक्रमाशीं जुळवून दाखविल्या आहेत. सोळा व सतरा या दोनही खंडांतील विवेचन तत्त्वतः प्रत्यक्ष कर्मयोगाचेंच आहे. त्याचें यज्ञीय भाषेनें वर्णन करण्याचा उद्देश असा कीं, बुद्धिपुरःसर होणारीं मनुष्याचीं सर्व कर्में यज्ञार्थ असावींत. कारण यज्ञार्थ केलेलीं कर्में मनुष्याला बंधक न होतां कल्याणकारकच होतात, असा श्रुतीचा सिद्धांत असून त्याचा गीतेनेंही अनुवाद केला आहे. ( गीता अ. ३ श्लोक ९ ). यज्ञार्थ कर्म झालें तरी तें निष्काम बुद्धीनेंच व्हावयास पाहिजे, असें या खंडाच्या पहिल्या मंत्रांतील दीक्षेच्या स्वरूपावरून श्रुतीनें दाखविलें आहे; व हा नियम वर दिलेल्या गीतेच्या श्लोकाच्या उत्तरार्धांतही आलेला आहे. कर्मयोगांतील दीक्षा म्हणजे व्रतस्थपणा कांहीं मुदतीचा नसून तो जन्मभर पाळावयाचा आहे. वस्तुतः अमुक एखादा विषय अजीबात टाकावयाचा असा नियम या दीक्षेंत मुळींच नाहीं. आवश्यकतेप्रमाणें कोणत्याही विषयाचें सेवन करण्यास हरकत नाहीं, पण तें विषयसेवन नियमित असावयास पाहिजे. त्यांत उपभोगाची—चैनीची वासना म्हणजे रति उत्पन्न होतां कामा नये, हाच त्यांतील मुख्य नियम होय व तोच फार कठिण आहे. विषयांचा अजीबात त्याग करणें सोपें पण वर सांगितल्याप्रमाणें नियमपूर्वक विषय सेवन करणेंच कठिण आहे, असें मानवी स्वभावाच्या भावनाप्रवणतेमुळें कबूल करावें लागतें. बुद्धिप्रवण मनुष्यासच ही गोष्ट शक्य असते.

उपसद, स्तोत्र-शस्त्र व सवन म्हणजे सोमरस काढणें या वर्णनावरून मनुष्याचे सर्व व्यवहार या यज्ञांत समाविष्ट होण्यास अडचण नाहीं, मात्र ते यज्ञाच्या—ईश्वरोपासनेच्या हेतूनें नियमित म्हणजे नियत असावयास पाहिजेत. ब्रह्मचर्य, गार्हस्थ, वानप्रस्थ ( किंवा संन्यास ) या तीनही

आश्रमांचा यज्ञांतच समावेश होत असल्यामुळें, अमूक एक कर्म या यज्ञाविरुद्ध आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. निरनिराळीं कर्में निरनिराळ्या आश्रमांस अनुकूल किंवा प्रतिकूल असतील; परंतु तीं जर नियत स्वरूपाचीं असतील तर तीं या यज्ञाला विरुद्ध नाहींत. उदाहरणार्थ, सोमसवनरूपी प्रजोत्पादनाचें कर्म हें ब्रह्मचर्य, वानप्रस्थ, किंवा संन्यास या आश्रमांना विरुद्ध आहे; पण गृहस्थधर्मास अनुकूल असल्यानें तें या यज्ञांत समाविष्ट होण्यास अडचण नाहीं. आश्रमधर्मानुकूल आणि नियत असें कोणतेंही कर्म यज्ञाशीं एकरूप होतें. अविनाशी, शुद्ध व स्वयंप्रकाश अशा परब्रह्माच्या तात्त्विक स्वरूपाचें ज्ञान संपादन करणें या यज्ञाला अवश्य आहे असें या खंडाच्या पांचव्या मंत्रांत सांगितलें आहे. यज्ञाच्या रूपकावरूनच उपासनेचा मानवी जीवनक्रमांत अंतर्भाव होतो हें सांगावयास नकोच. कर्म उपासना व ज्ञान हीं तीन तत्त्वें मिळून तयार झालेला हा पुरुषयज्ञ म्हणजेच ज्ञानमूलक भक्तियुक्त कर्तव्याचरणरूप कर्मयोग होय असें न सांगतां देखील कोणालाही सहज समजून येईल. ही कर्मयोगविषयक ब्रह्मविद्या घोर नामक आंगिरस ऋषीनें श्रीकृष्णास उपदेशिली असें सहाव्या मंत्रांत सांगितलें आहे. श्रीकृष्णाच्या गुरूचें निराळेंच नांव पुराणग्रन्थांतून आढळतें. परंतु एकाच व्यक्तीचीं अनेक नांवें असूं शकतील अशी कल्पना स्वीकारून, वाटल्यास एकवाक्यताही करितां येईल. तशी एकवाक्यता झाली नाहीं तरी, पौराणिक वचनांवरून श्रुतिवचनाचा बाध होऊं शकत नाहीं. शेवटीं प्राचीन ऋषीचें अनुभववाक्य देऊन, हा ब्रह्मविद्यान्तर्गत कर्मयोगमार्ग साक्षात् मोक्षदायक असून तो सर्वश्रेष्ठ आहे, म्हणून प्रत्येक मुमुक्षूनें या मार्गाचें अवलंबन करावें, असा उपदेश करून श्रुतीनें हें खंड समाप्त केलें आहे.

---

## अथाष्टादशः खण्डः ।

**मनो ब्रह्मेत्युपासीतेत्यध्यात्ममथाधिदैवतमाकाशो ब्रह्मेत्युभयमादिष्टं भवत्यध्यात्मं चाधिदैवतं च ॥ १ ॥**

**मनः ब्रह्म इति उपासीत इति अध्यात्मम् । अथ आकाशः ब्रह्म इति अधिदैवतम् । अध्यात्मम् च अधिदैवतम् च उभयम् आदिष्टम भवति ।**

अंतःकरणाची (बुद्धीची) ब्रह्मबुद्धीनें उपासना करावी ही अध्यात्म उपासना होय. तसेंच आकाशाची ब्रह्मबुद्धीनें (उपासना-करावी) ही अधिदैवत उपासना होय. अध्यात्म उपासना व अधिदैवत उपासना ह्या दोन्हीही (वेदांत) सांगितल्या आहेत.

**तदेतच्चतुष्पाद्ब्रह्म वाक्पादः प्राणः पादश्चक्षुः पादः श्रोत्रं पाद इत्यध्यात्ममथाधिदैवतमग्निः पादो वायुः पाद आदित्यः पादो दिशः पाद इत्युभयमेवादिष्टं भवत्यध्यात्मं चैवाधिदैवतं च ॥२॥**

**तत् एतत् ब्रह्म चतुष्पाद् । वाक् पादः प्राणः पादः चक्षुः पादः श्रोत्रम् पादः इति अध्यात्मम् । अथ अग्निः पादः वायुः पादः आदित्यः पादः दिशः पादः इति अधिदैवतम् । अध्यात्मम् च अधिदैवतम् च उभयम् एव आदिष्टम् भवति ।**

तें हें ब्रह्म चार अंशात्मक आहे. वाणी हा एक अंश, प्राण हा एक अंश, नेत्र हा एक अंश व श्रोत्र हा एक अंश. हें (त्याचें) अध्यात्म स्वरूप होय. तसेंच अग्नि हा एक अंश, वायु हा एक अंश, आदित्य हा एक अंश व दिशा हा एक अंश. हें त्याचें अधिदेवत **स्वरूप** होय. अध्यात्म व अधिदैवत हीं दोन्ही **स्वरूपें** [वेदांत] सांगितलेलीं आहेत.

**वागेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः सोऽग्निना ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन व एवं वेद ॥ ३ ॥**

**वाक् एव ब्रह्मणः चतुर्थः पादः। सः अग्निना ज्योतिषा भाति च तपति च। यः एवम् वेद सः कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च।**

वाणी हाच ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो अंश अग्निरूप तेजानें प्रकाशतो व सामर्थ्यवान् होतो. जो ह्याप्रमाणें जाणतो तो कीर्तीनें, यशानें ( कार्यसिद्धीनें ) व ब्रह्मतेजानें तेजस्वी व ऐश्वर्यसंपन्न होतो.

**प्राण एव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स वायुना ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥ ४ ॥**

**प्राणः एव ब्रह्मणः चतुर्थः पादः। सः वायुना ज्योतिषा भाति च तपति च। यः एवम् वेद (सः) कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च।**

प्राण हाच ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो वायुरूप तेजानें प्रकाशतो व सामर्थ्यवान् होतो. जो ह्याप्रमाणें जाणतो तो कीर्तीनें, यशानें ( कार्यसिद्धीनें) व ब्रह्मतेजानें तेजस्वी व ऐश्वर्यसंपन्न होतो.

**चक्षुरेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स आदित्येन ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥ ५ ॥**

**चक्षुः एव ब्रह्मणः चतुर्थः पादः। सः आदित्येन ज्योतिषा भाति च तपति च। यः एवम् वेद (सः) कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च।**

चक्षु हाच ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो सूर्यरूप तेजानें प्रकाशतो व सामर्थ्यवान् होतो. जो ह्याप्रमाणें जाणतो तो कीर्तीनें, यशानें ( कार्यसिद्धीनें ) व ब्रह्मतेजानें तेजस्वी व ऐश्वर्यसंपन्न होतो.

**श्रोत्रमेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स दिग्भिर्ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद य एवं वेद ॥ ६ ॥**

**श्रोत्रम् एव ब्रह्मणः चतुर्थः पादः। सः दिग्भिः ज्योतिषा भाति च तपति च। यः एवम् वेद (सः) कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च।**

श्रोत्र हाच ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो दिशारूप तेजानें (दिक्शक्तीनें) प्रकाशतो व सामर्थ्यवान् होतो. जो ह्याप्रमाणें जाणतो तो कीर्तीनें, यशानें (कार्यसिध्दीनें) व ब्रह्मतेजानें तेजस्वी व ऐश्वर्यसंपन्न होतो. द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.

---

## १८ व्या खंडाचा सारांश.

मन व आकाश हीं दोन तत्त्वें अध्यात्मिक व आधिदैविक उपासनेंतील उपास्यें म्हणून सांगितलीं आहेत. मन हा शब्द येथें बुद्धि ह्या अर्थानेंच घ्यावयास पाहिजे. तसा तो बृहदारण्यकोपनिषदांत एके ठिकाणीं घेतलाही आहे. (उ. नि. २. प्र. बृ. उ. अ. १ ब्रा. ५ मं. १२ पृ. १२८ ते १३०). अन्तःकरण हे आध्यात्मिक उपासनेचें केंद्र होय असें या खंडाच्या पहिल्या मंत्रांत सांगितलें आहे. आदित्य ही अन्तःकरणाची देवता होय असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे. या देवतेवर भक्ति ठेवून अन्तःकरणतत्त्वाचें सांगोपांग ज्ञान संपादन करणें हीच मनोब्रह्माची उपासना होय. या प्रमाणेंच परमात्म्यावर भक्ति ठेवून आकाश तत्त्वाचें सांगोपांग ज्ञान संपादन करण्यानें आकाशब्रह्माची उपासना होते, असा पहिल्या दोन मंत्रांचा अभिप्राय आहे. वाणी, प्राण, चक्षु, व श्रोत्र हीं अन्तःकरणाचीं अंगें असल्यामुळें या मनोब्रह्माला चतुष्पाद असें विशेषण दिलें आहे. त्याचप्रमाणें अग्नि, वायु, आदित्य व दिशा, हीं आकाशाचीं चार अंगें म्हणून त्यालाही चतुःष्पाद असें ह्मटलें आहे. मन

(अन्तःकरण) व आकाश एकाच परमात्मतत्त्वाचीं मुख्य अशीं आध्यात्मिक व आधिदैविक स्वरूपें होत. त्यांपैकीं आध्यात्मिक अंगाचा आधिदैविक अंगाशीं पोष्यपोषक (उपजीव्योपजीवक) संबंध असल्याचें पुढील चार मंत्रांत सांगितलें आहे. अन्तःकरणाच्या सर्वांगीण ज्ञानाला ( विद्येला ) सांप्रतकाळीं मानसशास्त्र असें म्हणण्यात येतें. या खंडांतील भाषेस अनुसरून त्यालाच आध्यात्मविद्या असेंही म्हणतां येईल. परंतु ब्रह्मविद्येलाच सामान्यतः अध्यात्मविद्या असें म्हणण्याचा प्रचार पडलेला असल्यामुळें, त्या शब्दाचा येथें उपयोग न करितां मानसशास्त्र किंवा मानसविद्या हाच शब्द सोयीच्या दृष्टीनें येथें स्वीकारणें योग्य होईल. मानसविद्या व आधिदैविक विद्या यांचें सम्यक् ज्ञान संपादन करून, मनुष्यानें या मनोब्रह्माची व आकाशब्रह्माची उपासना करावी. ही उपासना म्हणजे अभ्युदयप्राप्तीचें एक उत्कृष्ट साधन होय. मात्र हा अभ्युदय मोक्षाला प्रतिबंधक आहे हें मायावादी संन्यासमार्गीयांचें मत श्रुतीच्या अभिप्रायाविरुद्ध आहे. अभ्युदय हा मोक्षाला [ निःश्रेयसाला ] पूर्ण अनुकूल असल्याचें दशोपनिषदांत अनेक ठिकाणीं स्पष्ट प्रतिपादन केलें आहे. याच अभिप्रायानें ब्रह्मवर्चस हें पद या खंडांतील फलश्रुतीच्या प्रत्येक वाक्यांत श्रुतीनें घातलें आहे. संपात्ति कीर्ति, सामर्थ्य किंवा सत्ता एवढ्यानेंच मनुष्य ब्रह्मवर्चस्वी होत नाहीं; त्यांत ज्ञानविज्ञानाचा अवश्य समावेश करावयास पाहिजे. म्हणजे ऐश्वर्यादि गुणांनीं विशिष्ट असलेल्या ज्ञानविज्ञानसंपन्न मनुष्यालाच ब्रह्मवर्चस्वी म्हणणें शास्त्रदृष्ट्या योग्य ठरतें. याप्रमाणें मोक्षानुकूल अभ्युदयकारक अशा आध्यात्मिक व आधिदैविक विद्यांचें—उपासनांचें वर्णन करून श्रुतीनें हें खंड संपविलें आहे.

---

## अथैकोनविंशः खण्डः ।

**आदित्यो ब्रह्मेत्यादेशस्तस्योपव्याख्यानमसदेवेदमग्र आसीत् तत्सदासीत्तत्समभवत्तदाण्डं निरवर्तत तत्संवत्सरस्य मात्रामशयत तन्निरभिद्यत ते आण्डकपाले रजतं च सुवर्णं चाभवताम् ॥ १ ॥**

आदित्यः ब्रह्म इति आदेशः। तस्य उपव्याख्यानम्। अग्रे इदम् असत् एव आसीत्। तत् सत् आसीत्। तत् समभवत्। तत् आण्डम् निरवर्तत। तत् संवत्सरस्य मात्राम् अशयत। तत् निरभिद्यत। ते आण्डकपाले रजतम् च सुवर्णम् च अभवताम्।

आदित्य (सूर्य) हेंच ब्रह्म होय, असा ( वेदाचा ) उपदेश आहे. त्याच्याविषयींचें स्पष्टीकरण असें आहे. प्रारंभीं हें ( आदित्य-रूप ) ब्रह्म अव्यक्त होतें. तें व्यक्त झालें. तें घन ( संघटित ) झालें. त्याचें अंडें ( गोळा ) बनलें. तें संवत्सरप्रमाण ( वर्षभर ) तसेंच राहिलें. नंतर तें फुटलें. त्याचीं दोन शकलें झालीं. एक कांतिहीन व दुसरें कांतिमान् झालें. [ रजत = दुर्वर्ण. मेदिनी व विश्वकोश ]

**तद्यद्रजतँ सेयं पृथिवी यत्सुवर्णँ सा द्यौर्यज्जरायु ते पर्वता यदुल्बँ स मेघो नीहारो या धमनयस्ता नद्यो यद्वास्तेय-मुदकँ स समुद्रः ॥ २ ॥**

तत् यत् रजतम् सा इयम् पृथ्वी। यत् सुवर्णम् सा द्यौः। यत् जरायु ते पर्वताः। यत् उल्बम् सः नीहारः मेघः। याः धमनयः ताः नद्यः। यत् वास्तेयम् उदकम् सः समुद्रः।

जें कांतिहीन ( शकल ) तीच ही पृथ्वी होय. जें कांतिमान् ( शकल ) तोच द्युलोक (तेजोमय लोक) होय. स्थूल ( बाहेरची ) वार हेच पर्वत, सूक्ष्म ( आंतील ) वार हाच नीहाररूप मेघ,

ज्या धमन्या त्याच नद्या, जें बस्तीतील पाणी तोच समुद्र होय.

**अथ यत्तदजायत सोऽसावादित्यस्तं जायमानं घोषा उलूलवोऽनूदतिष्ठन्सर्वाणि च भूतानि सर्वे च कामास्तस्मात्तस्योदयं प्रति प्रत्यायनं प्रति घोषा उलूलवोऽनूत्तिष्ठन्ति सर्वाणि च भूतानि सर्वे च कामाः ॥ ३ ॥**

अथ यत् तत् अजायत सः असौ आदित्यः। सर्वाणि भूतानि च सर्वे कामाः च उलूलवः तम् जायमानम् अनु उदतिष्ठन्। तस्मात् तस्य उदयम् प्रति प्रत्यायनम् प्रति सर्वाणि भूतानि च सर्वे कामाः च घोषाः उलूलवः अनु उत्तिष्ठन्ति।

नंतर जें कांहीं ( त्या अंड्यांपासून ) उत्पन्न झालें तोच हा आदित्य ( सूर्य ) होय. उत्पन्न झालेल्या त्या ( आदित्याला ) अनुलक्षून सर्व पदार्थ आणि सर्व 'उलूलु' असे घोष ( दीर्घशब्द ) उत्पन्न झाले. म्हणून त्याच्या उदयकालीं व अस्तकालीं सर्व भूतें व मनोरथ कलकल शब्द करणारे होतात.

**स य एतमेवं विद्वानादित्यं ब्रह्मेत्युपास्तेऽभ्याशो ह यदेनꣳ साधवो घोषा आ च गच्छेयुरुप च निम्रेडेरन् निम्रेडेरन् ॥ ४ ॥**

यः सः एतम् आदित्यम् एवम् विद्वान् ब्रह्म इति उपास्ते एनम् ह यत् साधवः घोषाः आगच्छेयुः च उपनिम्रेडेरन् च।

जो कोणी ह्या सूर्याला ह्याप्रमाणें जाणून त्याची ब्रह्मभावानें उपासना करील त्याला कल्याणकारक शब्द प्राप्त होतील व सुखी करतील. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.)

---

## १९ व्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत जगदुत्पत्तीविषयीं एक प्राचीन आख्यायिका आलंकारिक शब्दांनीं वर्णिली आहे. प्रारंभीं असत् व सत् हे शब्द आले आहेत. असत् व सत् या शब्दांनीं अर्थाचा नेहमींच थोडा फार घोंटाळा होतो. म्हणून पूर्वापर संदर्भावरूनच त्यांचा अर्थनिश्चय करावयास पाहिजे. तैत्तिरीय उपनिषदांतील आनंदवल्लींत या शब्दांचा विचार सविस्तर करण्यांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. तैत्ति० आनंदवल्ली अनुवाक ७ मं. १). उत्पन्न होण्याचे पूर्वीं हें जग अव्यक्त होतें व नंतर व्यक्त झालें, इतकाच अर्थ येथील सत् व असत् या शब्दांत विवक्षित आहे. प्रारंभीं गोलकाच्या स्वरूपांत जगाची उत्पत्ति झाली, असें दर्शविण्याकरिताच मंत्रांत आण्ड हा शब्द घातला आहे. व हाच शब्द ब्रह्म शब्दाला जोडून ब्रह्मांड असा संयुक्त शब्द पुरातन कालापासून रूढ झाला आहे. ह्या गोलकाची द्यावापृथिवीच्या रूपानें दोन शकलें झालीं. त्यांतील पृथ्वीशकल विशेष कांतिमान् नसल्यामुळें त्याला रजत् असें नांव देण्यांत आलें आहे. रजत् या शब्दाचा दीप्तिहीन अगर वर्णहीन असा अर्थ कांहीं कोशकारांनीं दिला आहे. द्युलोकरूपी दुसरें शकल प्रकाशमय असल्यामुळे त्याला सुवर्ण असें म्हटलें आहे. या शकलांच्या मध्यें सर्व सृष्टि असून त्या सृष्टीचा चालक भगवान् आदित्य हा सूर्यबिंबाच्या रूपानें प्रकट झाला. सूर्यमंडळाची अधिष्ठात्री देवता भगवान् आदित्य हेंच सर्व सृष्टीचें आदिकारण होय असें या खण्डाच्या पहिल्या मन्त्रांत दर्शविलें आहे. आदित्य देवता व दृश्य सूर्यबिंब या दोहोंत आत्यन्तिक भेद नाहीं. एकाच ईशशक्तीचीं आधिभौतिक व आधिदैविक अशीं हीं दोन स्वरूपें होत, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. वैदिक ब्रह्मविद्येंत वर्णन केलेलें सूर्याचें हें जगच्चालकत्व आधुनिक भौतिक शास्त्रवेत्त्यांनीं देखील मान्य केलें आहे. सूर्याच्या उदयास्ताबरोबर एक प्रकारचा ध्वनि उत्पन्न होतो, असें तिसऱ्या मन्त्रांत वर्णन आहे. तें प्राणिमात्रांच्या शब्दाला अनुलक्षूनच असावें असें दिसतें.

तथापि उत्तरध्रुवप्रदेशावर उषःकालाच्या प्रारंभीं एक प्रकारचा अस्फुट ध्वनि वातावरणांत घुमत राहतो असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे, ती कल्पना देखील येथें अभिप्रेत असण्याचा संभव आहे. जगदुत्पत्तीचें विवेचन बृहदारण्यकाच्या पहिल्या अध्यायांतील दुसऱ्या व चौथ्या ब्राह्मणांत सविस्तर आलें आहे. याप्रमाणें सृष्टीची उत्पत्ति, तिचा व्यवहार, आदित्य-मण्डळ इत्यादिकांचें ज्ञान संपादन करून, जो आदित्यब्रह्माची उपासना करितो त्याला हें सर्व जग अनुकूल होतें, अशी या ज्ञानाची फलश्रुति सांगून श्रुतीनें हें खण्ड समाप्त केलें आहे.

( टीपः—या अध्यायाच्या एकोणीस खंडांपैकीं अर्धा अधिक भाग सूर्याच्या वर्णनानेंच भरलेला आहे. तीं सर्व वर्णनें प्राचीन वैदिक मंत्रांतलि वर्णनास अनुसरून असावींत असें दिसतें. दहाव्या खंडापासून निरनिराळे महत्त्वाचे विषय आले आहेत त्यांचें विवेचन त्या त्या ठिकाणीं सविस्तर करण्यांत आलें असल्यानें, अध्यायाचा निराळा उपसंहार लिहिण्याची आवश्यकता नाहीं. )



## चतुर्थोऽध्यायः ।

### अथ प्रथमः खण्डः ।

**जानश्रुतिर्ह पौत्रायणः श्रद्धादेयो बहुदायी बहुपाक्य आस स ह सर्वत आवसथान्मापयांचक्रे सर्वत एव मेऽन्नमत्स्यन्तीति ॥१॥**

**जानश्रुतिः पौत्रायणः श्रद्धादेयः बहुदायी बहुपाक्यः आस ह। सर्वतः मे एव अन्नम् अत्स्यन्ति इति सः सर्वतः आवसथान् मापयांचक्रे।**

जनश्रुतीचा पुत्र जानश्रुति पौत्रायण हा श्रद्धापूर्वक दानधर्म करणारा, पुष्कळ दान देणारा आणि विपुल अन्न तयार करविणारा होता. माझेंच अन्न सर्वांनीं खावें (सर्वांना मिळावें) अशा इच्छेनें त्यानें सर्वत्र गृहांची मोजणी केली. (कोठें कोठें किती अन्न लागतें याचा हिशेब केला.)

**अथ हꣳसा निशायामतिपेतुस्तद्धैवꣳ हꣳसो हꣳसमभ्युवाद हो होऽयि भल्लाक्ष भल्लाक्ष जानश्रुतेः पौत्रायणस्य समं दिवा ज्योतिराततं तन्मा प्रसाङ्क्षीस्तत्त्वा मा प्रधाक्षीरिति ॥ २ ॥**

**अथ निशायाम् हंसाः अतिपेतुः ह। तत् हंसः हंसम् एवम् अभ्युवाद ह। हा हो अयि भल्लाक्ष भल्लाक्ष जानश्रुतेः पौत्रायणस्य ज्योतिः दिवा समम् आततम्। तत् मा प्रसाङ्क्षीः तत् त्वा मा प्रधाक्षीः (त्) इति।**

एकदां रात्रींच्या वेळीं हंस तेथें (जानश्रुतीच्या सौधावर) येऊन उतरले; तेव्हां एक हंस दुसऱ्या हंसाला म्हणाला कीं, ओ हो! अरे, भल्लाक्षा, भल्लाक्षा, (द्विरुक्ति आश्चर्यदर्शक) जानश्रुति पौत्रायणाचें तेज सूर्यासारखें पसरलें आहे, त्याच्याशीं संयुक्त होऊं नको (त्या तेजांत जाऊं नको), म्हणजे तें तुला जाळणार नाहीं.

**तमु ह परः प्रत्युवाच कम्बर एनमेतत्सन्तꣳ सयुग्वानमिव रैक्कमात्थेति यो नु कथꣳ सयुग्वा रैक्क इति ॥ ३ ॥**

**तम् उ परः प्रत्युवाच ह । कम्बर एतत्सन्तम् एनम् सयुग्वानम् रैक्कम् इव आत्थ इति । यः सयुग्वा रैक्कः कथम् नु इति ( पप्रच्छ )।**

त्याला दुसऱ्या ( हंसानें ) उत्तर दिलें हे कंबरा ! अशा असणाऱ्या ह्याला ( जानश्रुतीला ) छकड्याखालीं असणाऱ्या रैक्क ऋषीसारखा म्हणतोस कां ? तो सयुग्वा रैक्क कसा आहे? ( असें पहिल्या हंसानें विचारलें. )

**यथा कृतायविजितायाधरेयाः संयन्त्येवमेनꣳ सर्वं तदभिसमैति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इति ॥ ४ ॥**

**यथा कृतायविजिताय आधरेयाः संयन्ति एवम् यत् किंच प्रजाः साधु कुर्वन्ति तत् सर्वम् एनम् अभिसमैति । यः तत् वेद सः यत् वेद । तत् सः मया उक्तः इति ।**

ज्याप्रमाणें कृतसंज्ञक फासा जिंकणाराला खालचे ( त्रेता, द्वापर, कलि संज्ञक फासे ) प्राप्त होतात त्याप्रमाणें लोक जें कांहीं सत्कर्म करितात तें सर्व त्याला ( रैक्काला ) प्राप्त होतें. जो हें जाणतो त्यालाही तें ( तसेंच फळ ) प्राप्त होतें. ( तें सर्व त्याच्या हातून घडल्यासारखें होतें ). म्हणून तुला मीं त्या ( रैक्का ) विषयीं सांगितलें.

**तदु ह जानश्रुतिः पौत्रायण उपशुश्राव स ह संजिहान एव क्षत्तारमुवाचाङ्गारे ह सयुग्वानमिव रैक्कमात्थेति यो नु कथꣳ सयुग्वा रैक्क इति ॥ ५ ॥**

**तत् उ जानश्रुतिः पौत्रायणः उपशुश्राव ह । सः संजिहानः एव क्षत्तारम् उवाच ह । अङ्गारे सयुग्वानम् रैक्कम् इव आत्थ इति ह । यः ( पप्रच्छ ) कथम् नु सयुग्वा रैक्कः इति ।**

तें ( हंसांचें भाषण ) जानश्रुति पौत्रायणानें (महालांतून) ऐकलें. तो (सकाळीं भाटाची स्तुती ऐकून) उठतांच स्तुतिपाठकाला म्हणाला कीं, हे अंगारि, मला तूं सयुग्वा रैक्कासारखा म्हणतोस काय? त्या अंगारीनें विचारलें कीं, सयुग्वा रैक्क कसा आहे?

**यथा कृतायविजितायाधरेयाः संयन्त्येवमेनꣳ सर्वं तदभिसमैति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इति ॥ ६ ॥**

**यथा कृतायविजिताय आधरेयाः संयन्ति एवम् यत् किंच प्रजाः साधु कुर्वन्ति तत् सर्वम् एनम् अभिसमैति । यः तत् वेद सः यत् वेद । सः मया उक्तः एतत् इति ।**

ज्याप्रमाणें कृतसंज्ञक फासा जिंकणाराला खालचे (त्रेता, द्वापर व कलिसंज्ञक डाव ) प्राप्त होतात, त्याप्रमाणें लोक जें सत्कर्म करितात तें सर्व ह्याला (रैक्काला) प्राप्त होतें. ( तें सर्व कर्म याचेहातून घडल्यासारखें होतें. ) जो हें जाणतो त्याला ( तसेंच फळ ) प्राप्त होतें. म्हणून तुला मीं त्या रैक्काविषयीं सांगितलें.

**स ह क्षत्तान्विष्य नाविदमिति प्रत्येयाय तꣳ होवाच यत्रारे ब्राह्मणस्यान्वेषणा तदेनमर्च्छेति ॥ ७ ॥**

**सः क्षत्ता अन्विष्य प्रत्येयाय । न अविदम् इति ( प्रत्युवाच ) ह । तम् उवाच ह । अरे ब्राह्मणस्य यत्र अन्वेषणा तत् एनम् अर्च्छ इति ।**

तो स्तुतिपाठक त्याचा शोध करून परत आला आणि म्हणाला, मला तो सांपडला नाहीं. तेव्हां त्याला ( जानश्रुति ) म्हणाला, अरे ! ब्रह्मवेत्त्याचा जेथें शोध करणें योग्य आहे तेथें ( तशा एकांत स्थलीं ) त्याला पहा.

**सोऽधस्ताच्छकटस्य पामानं कषमाणमुपोपविवेश तꣳ हाभ्युवाद त्वं नु भगवः सयुग्वा रैक्व इत्यहꣳ ह्यरा३ इति ह प्रतिजज्ञे स ह क्षत्ताविदमिति प्रत्येयाय ॥ ८ ॥**

**सः शकटस्य अधस्तात् पामानम् कषमाणम् उपोपविवेश। तम् ( क्षत्ता ) अभ्युवाद ह। भगवः त्वम् नु सयुग्वा रैक्वः इति। अरे अहम् हि ( सः ) इति प्रतिजज्ञे। सः क्षत्ता प्रत्येयाय। अविदम् इति ( उवाच ) ह।**

तो स्तुतिपाठक छकड्याच्या खालीं खरूज खाजवीत असणाऱ्या (रैक्वा)जवळ जाऊन बसला आणि त्याला म्हणालाः— महाराज तुम्हीच कां सयुग्वा रैक्व ऋषि ? अरे ! मीच तो, असें ( रैक्वानें ) निश्चित सांगितलें. तो स्तुतिपाठक परत गेला आणि मला ( तो रैक्व ) सांपडला असें जानश्रुति राजाला म्हणाला.

## पहिल्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडाचे आठ मंत्र असून त्यात जानश्रुति राजाच्या कथेचा पहिला भाग आला आहे. जानश्रुतीची, जानश्रुति व पौत्रायण अशीं दोन नांवें आलीं असून तीं दोनहि कुलनामासारखींच दिसतात. तथापि त्यांपैकीं जानश्रुति हे व्यक्तिनाम असावें असें वाटतें. हा जानश्रुति राजा मोठा उदार व अतिशय अन्नदान करणारा होता. त्यानें आपल्या राज्यांत लोकांच्या पुष्कळ सुखसोयी केल्या असून, सार्वजनिक उपयोगाकरितां धर्मशाळाही बांधल्या होत्या. अशोक राजानें ज्याप्रमाणें धर्मशाळा, दवाखाने, पाणपोया इत्यादि गोष्टी केल्या, त्याप्रमाणेंच पूर्वी वैदिककाळीं जानश्रुतीनें देखील लोकोपयोगीं पुष्कळच गोष्टी केल्या होत्या असें या वर्णनावरून दिसतें. ‘ आवसथ ’ या शब्दांत धर्मशाळा, दवाखाने, अन्नसत्रें इत्यादि गोष्टींचा समावेश होतो. अशा प्रकारच्या लोकोपयोगी कामांनीं थोर म्हणून जानश्रुतीची कीर्ति सर्वत्र पसरली होती.

एके दिवशीं हा राजा आपल्या गच्चीवर निजला असतां, त्यानें दोन हंसांचा परस्परांशीं झालेला संवाद ऐकला. कंबर व भल्लाक्ष अशीं त्या दोन हंसांचीं नांवें होतीं. हे हंस कोण असावेत, याविषयीं निरनिराळ्या टीकाकारांचें निरनिराळे तर्क आहेत. जानश्रुतीच्या मनांतील विचारांनाच येथें हंसांचें रूप दिलें आहे असें कित्येक मानतात, तर कित्येकांनीं आकाशांत संचार करणारे ते योगी असावेत असा तर्क सुचविला आहे. त्यांच्या नांवांवरून व संभाषणावरून ते पक्षी नसून मनुष्यच होतें असें दिसतें. म्हणून, कंबर व भल्लाक्ष या नांवांच्या दोन तपस्वी प्रवाशांचा हा संवाद आहे, असें समजणें अधिक सयुक्तिक होईल. जानश्रुति, आपल्या सज्जावर निजला असतां, दोन प्रवाशांचें आपसांतील बोलणें त्यानें ऐकलें; त्यांतील आशय असा कीं, जानश्रुति हा कर्तृत्वशाली, श्रीमंत व उदार असला तरी, रैक्क नांवांचा ऋषि या जानश्रुतीपेक्षां देखील थोर आहे. कारण जानश्रुतीपेक्षां, रैक्क हा विद्वत्तेत अत्यंत श्रेष्ठ आहे. कर्तृत्व, श्रीमंती व औदार्य एवढ्या गुणांनींच थोरपणा येत नसून, खरोखर तो विद्येनेंच प्राप्त होतो. विद्वत्ता हें थोरपणाचें मुख्य लक्षण असून कर्तृत्त्वादि गुण हीं त्याचीं अवांतर लक्षणें होत. म्हणजे विद्येला या गुणांची जोड असावयास पाहिजे हें खरें पण त्या विद्वत्तेलाच आग्रस्थान द्यावें लागतें. जानश्रुति राजा विद्वत्तेंत रैक्कापेक्षा कमी असल्यानें त्याचा थोरपणाही रैक्काच्या मानानें खालच्या पायरीचाच ठरेल. जानश्रुति व रैक्क यांच्या थोरपणाची तुलना करितांना, फाशाच्या खेळांतील एक दृष्टांत दिला आहे. तो असाः— कृत, त्रेता, द्वापर व कलि हीं युगनामें या खेळांतील घरांस दिलेलीं असून कृत या नांवाचें घर इतर तिहींपेक्षां श्रेष्ठ असल्यानें कृताचें दान पडल्याबरोबर कृत हें घर जिंकलें जातें आणि त्याच्या बरोबर बाकीचीं तीन घरेंही जिंकलीं जातात. कारण तीं कृताचेच पोटभेद असतात. म्हणून कृताबरोबर त्याच्या पोटांतील तीनहि भाग सहजच येतात. त्याप्रमाणेंच विद्वत्तेंत इतर गुणांचाहि

समावेश होतो. म्हणून जानश्रुतीपेक्षां रैक्वऋषि हाच श्रेष्ठ ठरतो, असा हंसांच्या संवादांतील अभिप्राय आहे.

रैक्व ऋषीची कीर्ति ब्रह्मविद्येविषयींच होती. ब्रह्मविद्येंत निष्णात असलेल्या रैक्वऋषीची प्रत्यक्ष भेट घ्यावी अशी जानश्रुतीला इच्छा होऊन, त्यानें आपल्या आंगारी नांवाच्या सेवकाला रैक्वऋषीचा शोध करण्याविषयीं आज्ञा दिली. इकडे तिकडे बराच शोध केल्यावर, रैक्व ऋषीचा पत्ता लागत नाहीं, असें त्या सेवकानें येऊन सांगितलें. तेव्हां जानश्रुति सेवकास म्हणाला कीं, तूं ज्या ज्या ठिकाणीं रैक्वाचा शोध केलास, तीं ठिकाणें ब्रह्मवेत्त्यांचीं नव्हत. ब्रह्मविद्येचें संशोधन करणारे ऋषि ज्या ठिकाणीं राहतात त्या ठिकाणीं जाऊन रैक्वाचा शोध कर, म्हणजे तो तुला सांपडेल. जानश्रुतीच्या या वाक्यावरून औपनिषद् विद्येचें संशोधन करणारे ऋषि ठराविक जागेंतच म्हणजे अरण्यांत किंवा तत्सदृश एकाद्या एकांत स्थळींच रहात असावेत ही गोष्ट प्रसिद्ध होती असें दिसतें. जानश्रुतीच्या सांगण्याप्रमाणें सेवकानें अरण्यांत शोध केल्यावर, एका छकड्याखालीं आंगावरील गजकर्ण खाजवीत बसलेला एक ब्राह्मण त्याला दिसला. ज्या ब्राह्मणाला, रैक्व ऋषि म्हणतात ते आपणच काय, असा सेवकानें नम्रपणें प्रश्न केल्यावर रैक्वऋषीनें ' होय, मलाच तो म्हणतात, ' असें सांगितलें. इतक्याच कथाभागावर हें खंड समाप्त झालें आहे.

---

## अथ द्वितीयः खंडः ।

**तदु ह जानश्रुतिः पौत्रायणः षट् शतानि गवां निष्कमश्वतरीरथं तदादाय प्रतिचक्रमे तꣳ हाभ्युवाद ॥ १ ॥**

**तत् उ जानश्रुतिः पौत्रायणः गवाम् षट् शतानि निष्कम् अश्वतरीरथम् तत् आदाय प्रतिचक्रमे तम् अभ्युवाद ह ।**

तेव्हां जानश्रुति पौत्रायण सहाशें गायी, अलंकार आणि अश्वतरी ( खेचरें ) जोडलेला रथ घेऊन रैक्वाकडे गेला आणि त्याला म्हणाला.

**रैक्वेमानि षट् शतानि गवामयं निष्कोऽयमश्वतरीरथो नु म एतां भगवो देवताँ शाधि यां देवतामुपास्स इति ॥ २ ॥**

**रैक्व इमानि गवाम् षट् शतानि अयम् निष्कः अयम् अश्वतरीरथः (गृहाण)। भगवः ( त्वम् ) नु याम् देवताम् उपास्से एताम् मे शाधि इति।**

हे रैक्वा! गायींचीं हीं सहा शतें (सहाशें गायीं) हा सुवर्णाचा अलंकार, हा खेचरांचा रथ ग्रहण कर ( आणि ) हे भगवन् ! तूं ज्या देवतेची उपासना करितोस त्या देवतेचें ज्ञान मला समजावून सांग ( त्या विद्येचा मला उपदेश कर ).

**तमु ह परः प्रत्युवाचाह हारेत्वा शूद्र तवैव सह गोभिरस्त्विति तदु ह पुनरेव जानश्रुतिः पौत्रायणः सहस्रं गवां निष्कमश्वतरीरथं दुहितरं तदादाय प्रतिचक्रमे ॥ ३ ॥**

**परः तम् उ प्रत्युवाच ह । अह शूद्र गोभिः सह हारेत्वा तव एव अस्तु इति । तत् उ ह पुनः एव जानश्रुतिः पौत्रायणः गवाम् सहस्रम् निष्कम् अश्वतरीरथम् दुहितरम् तद् आदाय प्रतिचक्रमे ।**

रैक्व ऋषि नंतर त्याला म्हणाला कीं, अरे शूद्रा ! [ या ] गायींसह हा अलंकार व रथ तुलाच असूं दे. ( तुझा तुलाचलखलाभ होवो, मला नको ). तें ( रैक्वाचें मत ) ओळखून, पुनः जानश्रुति पौत्रायण एक हजार गायीं, सुवर्णालंकार, खेचरांचा रथ आणि ( स्वतःची ) कन्या हें सर्व घेऊन ( रैक्वाकडे ) परत आला.

**तꣳ हाभ्युवाद रैक्वेदꣳ सहस्रं गवामयं निष्कोऽयमश्वतरीरथ इयं जायायं ग्रामो यस्मिन्नास्सेऽन्वेव मा भगवः शाधीति ॥ ४ ॥**

तम् ह अभ्युवाद । रैक्व इदम् गवाम् सहस्रम् अयम् निष्कः अयम् अश्वतरीरथः इयम् जाया यस्मिन् आस्से अयम् ग्रामः ( गृह्यताम् ) । भगवः मा अनुशाधि एव इति ( अब्रवीत् ) ।

( तो जानश्रुति ) त्याला नमस्कार करून म्हणाला. हे रैक्वा ! हें गार्यींचें सहस्र ( हजार गार्यी ) हा सुवर्णालंकार, हा खेचरांचा रथ ही पत्नी ( आणि ) जेथें तूं आहेस तो हा गांव ( हें सर्व ग्रहण करून ), हे भगवन्, मला उपदेश कर.

**तस्या ह मुखमुपोद्गृह्णन्नुवाचाजहारेमाः शूद्रानेनैव मुखेनालापयिष्यथा इति ते हैते रैक्वपर्णा नाम महावृषेषु यत्रास्मा उवास स तस्मै होवाच ॥ ५ ॥**

सः तस्याः मुखम् उपोद्गृण्हन् तस्मै उवाच ह । शूद्र इमाः आजहार । अनेन एव मुखेन माम् आलापयिष्यथाः इति । यत्र ( असौ ) उवास महावृषेषु ते ह एते रैक्वपर्णाः अस्मै ( दत्ताः ) । सः तस्मै ( विद्याम् ) उवाच ह ।

तिच्या मुखाला ( स्वीकारदर्शक ) स्पर्श करणारा (तो) रैक्व ऋषि त्याला म्हणाला, हे शूद्रा ( जानश्रुति ), हें ( गार्यी कन्या, गांव, वगैरे सर्व ) तूं आणिलेस ( तरी ), या मुखानेंच म्हणजे ज्या कन्येच्या मुखाला मीं स्पर्श केला त्या कन्येच्या योगानेंच मला बोलावयास लावशील. जेथें (तो रैक्व ) रहात होता तो महावृष प्रांतांतील हा रैक्वपर्ण नांवाचा गांव त्या रैक्व ऋषीला ( जानश्रुतीनें दिला ). नंतर तो रैक्व ऋषि त्या राजाला उपदेश करिता झाला.

---

## दुसऱ्या खंडाचा सारांश.

जानश्रुति पौत्रायणाला रैक्काचा शोध लागल्यावर तो बरीच मोठी दक्षिणा घेऊन रैक्काकडे गेला. या दक्षिणेंत पुष्कळशा गायी, एक हार, व अश्वतरीरथ इतक्या वस्तु होत्या. अश्वतरी या शब्दाचा 'खेचर' हा अर्थ रूढ आहे. खेचर या जनावराची निपज पूर्वी होत असून तें त्यावेळीं हीन मानलें जात नव्हतें असें यावरून दिसतें. जानश्रुतीनें आणलेली दक्षिणा अपुरी अतएव अग्राह्य आहे असें दर्शवून, रैक्कानें ती घेण्याचें नाकारिलें. तेव्हां जानश्रुतीनें त्या दक्षिणेत आणखी भर घालून शिवाय आपली कन्याही रैक्काला समर्पण करण्यासाठीं आणिली. पुष्कळ दक्षिणा व जानश्रुतीची कन्या पाहून रैक्काला संतोष झाला. त्यानें तिच्या मुखाला स्पर्श करून पत्नी या नात्यानें तिचें ग्रहण केलें; व तो जानश्रुतीला उपदेश करण्यास तयार झाला. या खंडांत तिसऱ्या मंत्रांत जानश्रुतीची दक्षिणा नाकारतांना, जानश्रुतीला अनुलक्षून रैक्कानें वापरलेला शूद्र हा शब्द शिवीसारखा दिसतो; परंतु पांचव्या मंत्रांत जानश्रुतीची दक्षिणा व कन्या संतोषपूर्वक स्वीकारतांना रैक्कानें जानश्रुतीला पुनः शूद्र या शब्दानेंच संबोधिलें आहे; त्यावरून या खंडात दोन ठिकाणीं आलेला शूद्र शब्द हीनतादर्शकच असावा असें म्हणतां येत नाहीं. बृहदारण्यकांतील पहिल्या अध्यायाच्या चौथ्या ब्राह्मणांत शूद्राच्या वर्णधर्माचें वर्णन आलें आहे. ( उ. र. प्र. बृ. अ. १ ब्रा. ४ मं. १३ पृ. ८७ ते ८९ ). त्या वर्णनावरून शूद्र हा हीन वर्ण नव्हे असाच श्रुतीचा अभिप्राय दिसतो. या खंडांत दोन ठिकाणीं आलेला शूद्र शब्द देखील हीनत्व दर्शक आहे असें म्हणण्यास बलवत्तर प्रमाण नाहीं. तिसऱ्या मंत्रांत दक्षिणा नाकारतांना रैक्क ऋषि थोडा रागावलेला आहे, असें त्यांतील शब्दयोजनेवरून दिसतें. शूद्र शब्दाच्या हीन अर्थाला रैक्काची क्रोधवृत्ति येवढेंच काय तें प्रमाण आहे. परंतु पांचव्या मंत्रांत आलेल्या शूद्र शब्दावरून तें प्रमाण बाधित—निरुपयोगी ठरतें. मग येथें दोन ठिकाणीं आलेल्या शूद्र शब्दांचा अर्थ काय ? असा

प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. त्याचें उत्तर असें कीं, शूद्र हा शब्द येथें जानश्रुतीच्या पिढीजात धंद्याचा वाचक आहे; जानश्रुति हा मूर्धाभिषिक्त राजा नसून जहागीरदार किंवा बराच मोठा जमीनदार असा एक श्रीमंत गृहस्थ असावा. पूर्वी १० गांवांचें किंवा १०० गांवांचे ग्रामाधिकारी असत; व हे अधिकार वंशपरंपरा चालू रहात. अशांपैकीं जानश्रुति असेल तर, त्याचा शेतकीचा धंदा असणें अस्वाभाविक नाहीं; व याच अभिप्रायानें रैक्वानें त्याला शूद्र असें म्हटलें असावें. सर्व टीकाकारांनीं तिसऱ्या मंत्रांतील शूद्र शब्दाबद्दल पुष्कळ वाटाघाट करून असें ठरविलें आहे कीं, या वाक्यांतील शूद्र हा शब्द जातिवाचक-धंद्याचा वाचक नसून, रैक्वाच्या मनःस्थितीचा बोधक आहे. ब्रह्मसूत्रकारांनीं देखील येथील शूद्र शब्दाचा विचार केला आहे. ( ब्र. सू. अ. १ पा. ३ सूत्र ३४ ). शुच् + द्रु असें शूद्र शब्दाचे दोन अवयव कल्पून त्यांचा दुःख देणारा किंवा दुःख घालविणारा असा दोनही प्रकारचा अर्थ दर्शविला आहे. तिसऱ्या मंत्रांतील शूद्र शब्द त्रास-दायक अशा अर्थाचा असून पांचव्या मंत्रांतील शूद्र शब्दाचा दुःखनिवारक असा अर्थ समजावा, असें ब्रह्मसूत्रकाराचे तात्पर्य असावें. शूद्र शब्दाची शुच् व द्रु या विभागांनींच व्युत्पत्ति होते असें नाहीं. ती इतर रीतीनेंही व्युत्पा-दितां येते. तिचा एक प्रकार उदाहरणादाखल उ. नि. र. प्र. बृहदा पृ. ८७ वर दिला आहे तो पहावा.

बृहदारण्यक श्रुतीच्या अभिप्रायास अनुसरून येथें शूद्र शब्दाचा अर्थ घेतल्यास, जानश्रुति हा वर्णानें—गुणकर्मानें ( पिढीजात धंद्यानें ) शूद्र होता असें ठरतें. तेवढ्यानें तो हीन किंवा हलक्या दर्जाचा होता असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं. तथापि, रैक्वानें जानश्रुतीला ' शूद्र ' असें म्हणून त्याच्या मुलीचें पाणिग्रहण केलें असल्यामुळें, त्याच्या जातीचा प्रश्न उपस्थित होतो. म्हणून जानश्रुति हा कुलानें, जातीनें क्षत्रिय आणि वर्णानें म्हणजे धंद्यानें शूद्र होता असें टीकाकारांनीं ठरविलें आहे. जानश्रुति जातीनें किंवा कुलानें क्षत्रिय असावा असें पाहिल्या खंडांतील त्याच्या वर्ण-

नांत श्रुतीनें दर्शविलें आहे; म्हणून वरील अनुमान साधार आहे असें म्हणतां येईल.जानश्रुतीनें गांव, कन्या व दक्षिणा रैक्काला अर्पण केल्यावर रैक्कानें त्याला विद्योपदेश देण्याचें मान्य केलें.

---

## अथ तृतीयः खण्डः ।

**वायुर्वाव संवर्गो यदा वा अग्निरुद्वायति वायुमेवाप्येति यदा सूर्योऽस्तमेति वायुमेवाप्येति यदा चन्द्रोऽस्तमेति वायुमेवाप्येति ॥ १ ॥**

**वायुः वाव संवर्गः ( अस्ति )। यदा वै अग्निः उद्वायति ( तदा ) वायुम् एव अप्येति । यदा सूर्यः अस्तम् एति वायुम् एव अप्येति । यदा चंद्रः अस्तम् एति वायुम् एव अप्येति ।**

वायु हाच संवर्ग ह्मणजे संग्राहक आहे. कारण जेव्हां अग्नि विझतो तेव्हां तो वायूलाच मिळतो, म्हणजे वायूस्वरूप होतो; जेव्हां सूर्य अस्ताला जातो तेव्हां तो वायूलाच मिळतो; जेव्हां चंद्र अस्ताला जातो तेव्हां तो वायूलाच मिळतो.

अग्नि, सूर्य, चंद्र या तेजोमय पदार्थांचें वायु हें मूळ कारण होय असें येथें दर्शविलें आहे. वायूपासून तेजाची उत्पत्ति झाली असल्यामुळें, वायु हे तेजाचें लयस्थान असणे स्वाभाविक होय. यापुढें तीन उदाहरणें दिलीं आहेत, त्यांत सूर्यचंद्रांचा दैनंदिन अस्त देखील वायूंतच होतो असें म्हटलें आहे तें चिंत्य आहे असें वाटलें तरी, तात्त्विक दृष्ट्या तेज व वायु यांचा कार्यकारणभाव शास्त्रशुद्ध असल्यामुळें, वायूचें संवर्गस्वरूप निरपवाद आहे यांत शंका नाहीं व तेंच येथें अभिप्रेत आहे.

**यदाप उच्छुष्यन्ति वायुमेवापियन्ति वायुर्ह्येवैतान्सर्वान्संवृङ्क्त इत्यधिदैवतम् ॥ २ ॥**

**यदा आपः उच्छुष्यंन्ति वायुम् एव अपियन्ति । वायुः एव एतान् सर्वान् संवृङ्क्ते । इति आधिदैवतम् ।**

जेव्हां पाणी सुकतें ( तेव्हां ) तें वायूलाच मिळतें ( म्हणजे-वायुरूप होतें ). वायुच या सर्वांचा आपल्यामध्यें संग्रह करितो. हें वायूचें आधिदैविक स्वरूप समजावें.

**अथाध्यात्मं प्राणो वाव संवर्गः स यदा स्वपिति प्राणमेव वागप्येति प्राणं चक्षुः प्राणꣳ श्रोत्रं प्राणं मनः प्राणो ह्येवैतान्सर्वान्संवृङ्क्त इति ॥ ३ ॥**

**अथ अध्यात्मम् । प्राणः वाव संवर्गः । सः यदा स्वपिति ( तदा ) वाक् प्राणम् एव अप्येति चक्षुः प्राणम् श्रोत्रम् प्राणम् मनः प्राणम् ( अप्येति ) । हि प्राणः एव एतान् सर्वान् संवृङ्क्ते इति ।**

यापुढें ( वायूचा ) आध्यात्मिक संवर्ग ( सांगितला आहे ). प्राण हाच संग्राहक होय. प्राणी जेव्हां झोपीं जातो ( तेव्हां ) वाणी—वागिंद्रिय—वाक्शक्ति प्राणालाच जाऊन मिळतें; श्रवणेंद्रिय प्राणांतच मिळतें; मनही प्राणांतच मिळतें. कारण प्राण हाच या सर्वांचा आपल्यामध्यें संग्रह करितो.

**तौ वा एतौ द्वौ संवर्गौ वायुरेव देवेषु प्राणः प्राणेषु ॥ ४ ॥**

**देवेषु वायुः एव प्राणेषु प्राणः । तौ वै एतौ द्वौ संवर्गौ ।**

देवतांमध्यें वायु आणि इंद्रियांमध्यें ( वाक् चक्षु श्रोत्र व-मन यांमध्यें ) प्राण असे हे दोन प्रकारचे संवर्ग आहेत.

**अथ ह शौनकं च कापेयमभिप्रतारिणं च काक्षसेनिं परिविष्यमाणौ ब्रह्मचारी बिभिक्षे तस्मा उ ह न ददतुः ॥ ५ ॥**

**अथ ह शौनकम् कापेयम् च अभिप्रतारिणम् काक्षसेनिम् च परिविष्य माणौ तौ ब्रह्मचारी बिभिक्षे । तस्मै उ ह न ददतुः ।**

एकदां कपिवंशांतील शौनक आणि कक्षसेनाच्या वंशातील अभिप्रतारी या नांवांच्या दोन ऋषींची पात्रें वाढलीं जात असतां

त्यांचे जवळ एका ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा ( अन्नाची ) याचना केली ( परंतु ) त्याला ( त्यानीं ) अन्न दिलें नाहीं.

**स होवाच महात्मनश्चतुरो देव एकः कः स जगार भुवनस्य गोपास्तं कापेय नाभिपश्यन्ति मर्त्या अभिप्रतारिन्बहुधा वसन्तं यस्मैवा एतदन्नं तस्मा एतन्न दत्तमिति ॥ ६ ॥**

**सः उवाच ह। भुवनस्य गोपाः सः एकः कः देवः चतुरः महात्मनः जगार। हे कापेय हे अभिप्रतारिन् बहुधा वसन्तम् तम् मर्त्याः न अभिपश्यन्ति । यस्मै वै एतत् अन्नम् ( अस्ति ) तस्मै एतत् ( युवाभ्याम् ) न दत्तम् इति।**

तो ब्रह्मचारी म्हणाला कीं, जगताचा रक्षक तो एकच प्रजापति देव चार महात्म्यांचा ( अग्निइत्यादि चार देवता व वाणि इत्यादि चार प्राण यांचा ) ग्रास करितो, ह्मणजे आपल्या स्वरूपांत मिळवून घेतो, हे कापेया! आणि हे अभिप्रतारि ! व्यापक रूपानें असणाऱ्या त्या वायूला मानवी प्राणी पहात नाहींत, ह्मणजे जाणत नाहींत. ज्याच्या करितां ( ज्या देवा करितां ) हें अन्न तयार केलेलें असतें, त्या देवाला (च) तुम्हीं दोघांनीं हें अन्न दिलें नाहीं.

**तदु ह शौनकः कापेयः प्रतिमन्वानः प्रत्येयायात्मा देवाना जनिता प्रजाना҃ हिरण्यद҃ष्ट्रो बभसोऽनसूरिर्महान्तमस्य महिमानमाहुरनद्यमानो यदनन्नमत्तीति वै वयं ब्रह्मचारिन्नेदमुपास्महे दत्तास्मै भिक्षामिति ॥ ७ ॥**

**शौनकः कापेयः तत् उ ह प्रतिमन्वानः ( सन् ) प्रत्येयाय। देवानाम् आत्मा प्रजानाम् जनिता बभसः हिरण्यदंष्ट्रः अनसूरिः ( अस्ति )। अस्य महिमानम् महान्तम् आहुः यत् अनद्यमानः ( सः ) अन्नम् अत्ति इति । हे ब्रह्मचारिन् वयम् इदम् आ उपास्महे वै। अस्मै भिक्षाम् दत्त इति ( उवाच )।**

शौनक वंशातील कापेय, त्या ब्रह्मचाऱ्याच्या वाक्याचें मनन करीत असतां, जाणता झाला ( म्हणजे त्याला कळून-

चुकलें ) कीं, अग्नि सूर्य इ. देवांचा आत्मा ( मूल स्वरूप ) आणि प्राणिमात्रांचा जनक असा सर्वभक्षक ( सर्वांचे लयस्थान असून ) ज्याच्या दाढा तेजोमय आहेत असा आणि ज्ञानवान् (असा वायु) हा देव आहे. ह्या वायूचें सामर्थ्य फार मोठें आहें असें म्हणतात. अनिंद्य ( पवित्र ) असा तो वायु स्वतः कोणाचेंही भक्ष्य न होतां सर्वांचें भक्षण करितो. ( म्हणजे सर्वांचें लयस्थान होतो. हे ब्रह्म-चाऱ्या आम्ही त्याचीच उपासना करितों. अहो या ब्रह्मचाऱ्याला भिक्षा द्या, असें तो म्हणाला.

**तस्मा उ ह ददुस्ते वा एते पञ्चान्ये पञ्चान्ये दश सन्तस्तत्कृतं तस्मात्सर्वासु दिक्ष्वन्नमेव दशकृतꣳ सैषा विराडन्नादी तयेदꣳ सर्वं दृष्टꣳ सर्वमस्येदं दृष्टं भवत्यन्नादो भवति य एवं वेद २ ॥८॥**

**तस्मै उ ह ददुः । ते वै एते पञ्च अन्ये पञ्च अन्ये ( मिलित्वा) दश सन्तः कृतं (भवन्ति) तत् तस्मात् सर्वासु दिक्षु दश कृतम् अन्नम्(आस्ति) एव। एषा विराट् अन्नादी ( अस्ति )। तया इदम् सर्वम् दृष्टम्। यः एवम् वेद अस्य इदम् सर्वम् दृष्टम् भवति। ( सः ) अन्नादः भवति।**

ते त्या ब्रह्मचाऱ्याला ( अन्न ) देते झाले. ते हे पांच (वायु- इ. ) व दुसरे पांच ( प्राण इ. ) मिळून दहा हे कृतसंज्ञक होतात. ( कृत ही द्यूतांतील एक संज्ञा आहे. ) ह्मणून सर्व दिशां-मध्यें वर सांगितलेले पदार्थ कृतसंज्ञेप्रमाणें अन्नरूपोंन ( असतात). तो हा विराट दशाक्षरी छंद ( वर सांगितलेले अन्न ) भक्षण कर-णारा आहे. त्या विराट छंदानें हें सर्व वर्णिलें आहे. जो ही अशी संवर्गविद्या जाणतो त्याला हें सर्व समजतें आणि तो अन्न खाण्यास ( व पचविण्यास ) समर्थ होतो. द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे.

प्रस्तुत मंत्रांत संवर्गविद्येचा उपसंहार आला आहे. वायुसंवर्गाचें आधिदैविक पांच व आध्यात्मिक पांच मिळून दहा प्रकार होतात. त्याचे विराट छंदाशीं दाखविलेलें सादृश्य केवळ संख्येपुरतेंच आहे. वायु हा दशदिशांना व्यापून राहिला असल्यामुळें, तो सर्व अन्नांचा द्रष्टा आहे. अन्न या शब्दांत भोग्य व भोक्ता या दोहोंचाहि समावेश होतो. अद्यऽतेत्ति च भूतानि, अशी तैत्तिरीयोपनिषदांत अन्न शब्दाची व्याख्या केली आहे (उ. र. प्र. तै. आ. वल्ली. अनु. २ मं. १ पृ. १३ ते १५ ). या संवर्ग-विद्येचें फल तैत्तिरीय उपनिषदाच्या व्याख्येला अनुसरूनच सांगितलें आहे. शौनक कापेय हा ब्राह्मण ऋषि असून अभिप्रतारिन् हा क्षत्रिय असावा. ब्रह्मचाऱ्यानें वायूच्या संवर्गस्वरूपाचें वर्णन केलेलें पाहून त्यांनीं त्याला भोजन दिलें.

---

## तिसऱ्या खंडाचा सारांश.

जानश्रुतीची दक्षिणा स्वीकारून रैक्वानें त्याच्या कन्येचें पाणिग्रहण केलें व तो रैक्वपर्ण या गांवांत ग्रामाधिपति म्हणून राहूं लागला. नंतर त्यानें जानश्रुतीला संवर्गविद्येचा उपदेश केला. संवर्गविद्येचा विज्ञानशास्त्रांत समावेश होत असला तरी, विज्ञान हें ब्रह्मज्ञानाचें अंगच असल्यामुळें, या संवर्गविद्येचा ब्रह्मविद्येंत अंतर्भाव करण्यास मुळींच हरकत नाहीं. संवर्ग म्हणजे संग्रह किंवा संग्राहक असा अर्थ समजावा. या खंडाच्या पहिल्या दोन मंत्रांत वायूचा आधिदैविक संवर्ग सांगितला आहे. सूर्याचे उदयास्त ज्या तत्त्वापासून किंवा ज्या तत्त्वामध्यें होतात तेंच सर्व देवतांचें अधिष्ठान होय असें कठोपनिषदांत म्हटलें आहे. कठोपनिषदांतील हें वाक्य परमात्म-तत्त्वालाच अनुलक्षून आहे. परंतु " प्राणाद्वा एष उदेति प्राणेऽस्तमेति" असें बृहदारण्यकांत या कल्पनेचें स्पष्टीकरण केलें आहे. या वाक्याचा कठश्रुतीशीं कसा मेळ बसतो त्याचा खुलासा वरील मंत्राच्या विवरणांत आला आहे. ( उ. र. प्र. बृ. अ. १ ब्रा. ५ मं २३ पृ. १४८–१४९).

बृहदारण्यकांतील वाक्याप्रमाणेंच येथें सूर्याचा संबंध दर्शविला आहे. सूर्य व चंद्र यांचा वायूशीं संबंध एकच प्रकारानें जोडला आहे. स्थूल, सूक्ष्म इत्यादि नाना प्रकारचीं वायुस्वरूपें वैदिक ऋषींना ज्ञात होतीं. सृष्टींतील मोठमोठ्या घडामोडी ज्या शक्तीमुळें घडतात ती शक्ति वायुरूप किंवा प्राणरूप असल्याचें प्रश्नोपनिषदांत सविस्तर वर्णन आलें आहे. मंत्र २ व ३ यात वायूचा अध्यात्म संवर्ग सांगितला आहे. इंद्रियद्वारा प्रत्ययास येणाऱ्या नानाविध शक्ति प्राणाचे ठिकाणींच केंद्रीभूत होतात. म्हणून शरीर व इंद्रियें यांतील सर्व शक्तींचें प्राण हें संकलित स्वरूप ( संवर्ग ) होय, असा वायूच्या आध्यात्मिक संवर्गाचा अभिप्राय आहे. रैक्वानें वायु-संवर्गाची जी विद्या सांगितली तिचें संक्षिप्त वर्णन या खंडाच्या पहिल्या चार मंत्रांत आलें आहे. या संवर्गविद्येचें महत्व दर्शविण्याकरितां पुढील चार मंत्रांत एक ऐतिहासिक कथा दिली आहे.

कपि गोत्रांतील शौनक ऋषि व कक्षसेनाचा पुत्र अभिप्रतारी या नांवाचे दोन ऋषि आपलीं पानें वाढून घेऊन भोजनाला प्रारंभ करण्याच्या बेतांत होते, इतक्यांत एक ब्रह्मचारी त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला व त्यांच्याजवळ भोजन मागूं लागला, परंतु शौनक व अभिप्रतारी यांनीं त्याला अन्न देण्याचें नाकारिलें. ऋषींचा हा नकार सांप्रतकाळीं अमळ चमत्कारिक वाटेल. कारण, जेवणाच्या वेळीं कोणींहि येऊन अन्न मागितलें तरी त्याला नकार देऊं नये अशी धर्मशास्त्रविषयक कल्पना रूढ झाली आहे; परंतु हा धर्मशास्त्राचा नियम गांवांत राहणाऱ्या गृहस्थालाच लागू आहे ही गोष्ट प्रथम लक्षांत ठेविली पाहिजे. शिवाय अन्न मागणाऱ्या मनुष्याच्या पात्रापात्रतेचा विचार अशा वेळीं करण्याचें कारण नाहीं, ही कल्पना वरील धर्मशास्त्राच्या विचारास जोडली जाते, म्हणून शौनक व अभिप्रतारी यांचें हें करणें योग्य नाहीं असें वाटणें शक्य आहे;परंतु कोणतेंहि दान दुसऱ्याला देण्याच्यावेळीं त्याच्या पात्रापात्रतेचा विचार केलाच पाहिजे, असा दानाच्या पद्धतीचा मूळ शास्त्रीय नियम असल्यामुळें, या ऋषिद्वयानें केलें तेंच बरोबर

होतें असें म्हणावें लागतें. पात्रापात्र विचार न करण्याची हल्लींची रूढीच अशास्त्रीय व समाजाला अपायकारक आहे यांत शंका नाहीं. म्हणून शौनक व अभिप्रतारी यांनीं, अन्न मागणारा हा मनुष्य कितपत सत्पात्र आहे हें पाहिल्यावांचून त्याला अन्न देण्याचें नाकारिलें तें योग्यच होतें. आलेल्या ब्रह्मचाऱ्यानें अन्न व प्राण यांचा संबध कसा आहे, पिण्ड-ब्रह्माण्डांतील मुख्य चार शक्ति अन्नावरच कशा अवलंबून आहेत इत्यादि तत्त्वांचें प्रतिपादन केल्यावर ब्रह्मचाऱ्याची विद्वत्ता त्यांना चांगलीच दिसून आली व त्यांनीं त्याला आनंदानें भोजन दिलें. दानशूर लोक शौनक व अभिप्रतारी यांचा कित्ता आपल्यापुढें ठेवतील तर समाजातील दानपद्धति निर्दोष होऊन ती समाजाला कल्याणकारक होईल यांत शंका नाहीं.

कपिगोत्रोत्पन्न शौनक ऋषीचा जोडीदार अभिप्रतारी हा क्षत्रिय होता, यांचा या संवर्गविद्येत उल्लेख आला आहे आणि हीच संवर्गविद्या रैक्कानें जानश्रुतीला सांगितली आहे, त्या अर्थी जानश्रुति हा क्षत्रियच असला पाहिजे असें अनुमान ब्रह्मसूत्रकारांनीं काढलें आहे (ब्र. सू. १. ३. ३५). यावरूनही जानश्रुति हा जातीनें क्षत्रिय होता असें ठरतें. परंतु दुसऱ्या खंडाच्या पांचव्या मंत्रांत शूद्र शब्द पुन्हा आला आहे, त्याचा विचार सूत्रकारांनीं किंवा भाष्यकारांनी केलेला दिसत नाहीं याबद्दल मात्र आश्चर्य वाटतें. पांचव्या मंत्रांत आलेला शूद्र शब्द निंदाव्यंजक तर नाहींच, उलट तो जानश्रुतीचें वैशिष्ट्य दर्शविणाराच दिसतो. कारण शूद्र शब्द उच्चारणारा रैक्क या वेळीं मोठ्या संतोषानें बोलत आहे. म्हणून शूद्र हा शब्द हीनपणा दर्शविणारा नाहीं. उत्तर कालांत शूद्र हा शब्द हीनपणाचा द्योतक झाला; पण छांदोग्याच्या काळांत तो तसा नव्हता. म्हणून जानश्रुति जातीनें क्षत्रिय आणि वर्णानें–गुणकर्मानें शूद्र म्हणजे शेतकरी होता असें म्हणणें अधिक सयुक्तिक ठरतें. शौनक व अभिप्रतारी या दोघांनीं ब्रह्मचाऱ्यानें प्रतिपादन

केलेल्या संवर्गविद्येचें महत्त्व ओळखूनच त्या ब्रह्मचाऱ्यास सत्पात्र ठरविलें. याप्रमाणें ही संवर्गविद्या पिण्डब्रह्माण्डातील आधिदैविक शक्तीचें ज्ञान करून देणारी असल्यामुळें, या संवर्गविद्येच्या ज्ञानानें मनुष्य अन्नाद म्हणजे भोक्तृत्वशक्तिमान् होतो असें श्रुतीनें या विद्येला शोभण्याजोगेंच फल सांगितलें आहे.

---

## अथ चतुर्थः खण्डः ।

**सत्यकामो ह जाबालो जबालां मातरमामन्त्रयांचक्रे ब्रह्मचर्यं भवति विवत्स्यामि किंगोत्रोन्वहमस्मीति ॥ १ ॥**

**जाबालः ह सत्यकामः जबालाम् मातरम् आमन्त्रयांचक्रे। भवति ब्रह्मचर्यम् विवत्स्यामि अहम् किंगोत्रः नु अस्मि इति ।**

जबालेचा मुलगा सत्यकाम आपल्या जबाला नामक मातेला विचारता झाला. हे आई ! मी विद्याभ्यासाकरितां ब्रह्म-चारी होऊन ( गुरु समीप ) राहूं इच्छितो; मी कोणत्या गोत्राचा आहे बरें?

प्रस्तुत मंत्रापासून दुसऱ्या एका महत्त्वाच्या ऐतिहासिक कथेचा प्रारंभ होत आहे. सत्यकाम हा या कथेंतील मुख्य नायक आहे. तो लहान असतांनाच त्याला विद्याभ्यासाची इच्छा झाली. अभ्यास करणारे विद्यार्थी त्या वेळीं गुरूच्या घरींच रहात असत. बरोबरीचीं मुलें विद्याभ्यासा-करितां गुरूकडे राहिलेलीं पाहून आपणही असें विद्याभ्यासाकरितां गुरूकडे जावें अशी सत्यकामाला इच्छा होणें स्वाभाविकच होतें. गुरूकडे गेल्यावर प्रथम आपलें नांव, मातापित्यांचें नांव व कुलनाम म्हणजे गोत्र सांगावें लागतें, हें त्याला त्याच्या सोबत्यांकडून कळलें असलें पाहिजे, असें या मंत्रांतील त्याच्या प्रश्नावरून उघड दिसतें. त्याच्या मातेच्या जबाला या नांवावरूनच सत्यकामाला जाबाल असें उपनाम प्राप्त झालें होतें.

विद्याध्ययन करण्याची इच्छा अनिवार झाल्यामुळेंच सत्याकामानें आपल्या मातेजवळ अनुज्ञा मागितली व आपल्या गोत्रासंबंधीं माहितीही विचारली.

**सा हैनमुवाच नाहमेतद्वेद तात यद्गोत्रस्त्वमसि बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे साहमेतन्नवेद यद्गोत्रस्त्वमसि जबाला तु नामाहमस्मि सत्यकामो नाम त्वमसि स सत्यकाम एव जाबालो ब्रुवीथा इति ॥ २ ॥**

**सा एनम् उवाच ह । तात त्वम् यद्गोत्रः असि एतत् अहम् न वेद । परिचारिणी अहम् बहु परिचरन्ती यौवने त्वाम् अलभे । सा अहम् यद्गोत्रः त्वम् असि एतत् न वेद । अहम् तु जबाला नाम । त्वम् सत्यकामः नाम असि । सः ( त्वम् ) सत्यकामः जाबालः इति एव ब्रुवीथाः ।**

ती त्याला म्हणाली वत्सा तूं ज्या गोत्राचा आहेस तें गोत्र मला माहीत नाहीं. परिचारिका (दासी) अशी मी अनेक तऱ्हेनें सेवा करीत असतां तारुण्यामध्यें तूं मला झालास. अशी मी ज्या ( कोणत्या ) गोत्राचा तूं आहेस तें जाणत नाहीं. फक्त माझें नांव जबाला आणि तुझें नांव सत्यकाम आहे. ( म्हणून ) मी सत्यकाम जाबाल आहे येवढेंच तूं सांग.

जबालेनें आत्मवृत्त थोडक्यांत सांगितलें आहे, तें खरोखरच हृदयद्रावक आहे यांत शंका नाहीं. ती एक चुकून भ्रष्ट झालेली स्त्री असावी. ' बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे ' एवढें एकच वाक्य तिच्या आत्मवृत्ताचें वैशिष्टयदर्शक आहे. तरुणपणांत परिचारिका –दासी या नात्यानें मी पुष्कळांची सेवा करीत असतां, मला तुझी प्राप्ति झाली एवढेंच तिनें सांगितलें आहे. यावरून वाचकांनीं काय तें अनुमान काढावयाचें आहे.

भाष्यकारादि प्राचीन टीकाकारांनीं यांतील अभिप्राय असा सांगितला आहे कीं, तारुण्यांत जबाला गर्भवती असतांनाच तिचा पती निवर्तला.

त्याला बरेच दिवस झाले असल्यानें, पतीचें नांव किंवा उपनांव जबाला विसरून गेली होती. वैधव्यांत आपलें व आपल्या मुलाचें पोट भरण्याकरितां ती दुसऱ्याची सेविका झाली होती. म्हणून जबाला भ्रष्ट स्त्री नसून विधवा होती. तिला झालेला पुत्र तिच्या विवाहित पतीचा होता.

प्राचीन टीकाकारांचें हें अनुमान फारसें साधार दिसत नाहीं. पतीचें नांव, जात, कुळ इत्यादि सर्व गोष्टी अजीबात विसरुन जाणें हिंदु विवाहित स्त्रीच्या बाबतींत मुळींच संभवत नाहीं. तसें असतें तर तिनें आपल्या विवाहाचा स्पष्ट उल्लेख केला असता; परंतु तसें कांहींच केलेंलें नाहीं. परिचारिणी या एकाच शब्दावरुन तिच्या वृत्तान्तांतील खोंच उघड होत आहे. या सर्व गोष्टींचा विचार केल्यास जबाला ही चुकून किंवा जुलुमानें भ्रष्ट झालेली स्त्री असावी, हेंच अनुमान अधिक दृढ होतें.

**स ह हारिद्रुमतं गौतममेत्योवाच ब्रह्मचर्यं भगवति वत्स्याम्युपेयां भगवन्तमिति ॥ ३ ॥**

सः हारिद्रुमतम् गौतमम् एत्य उवाच ह। भगवति ब्रह्मचर्यम् वत्स्यामि भगवन्तम् उपेयाम् इति।

तो ( सत्यकाम ) हरिद्रुमताचा मुलगा गौतम ऋषि याजकडे जाऊन म्हणाला:— भगवन् ! आपल्याजवळ मी ( विद्याभ्यासा करितां ) ब्रह्मचारी ह्मणून राहतों. मी आपल्याला शरण आलों आहे.

हारिद्रुमत व गौतम हीं दोनही नांवें कुलनामांसारखींच दिसतात, त्यांतील कोणतेंही एक व्यक्तिनाम समजावें. सत्यकाम ज्या ठिकाणीं रहात होता, त्याच्यापासून जवळच कोठें तरी हारिद्रुमताचा आश्रम असावा व आपल्या सोबत्यांकडून माहिती मिळवून सत्यकाम हारिद्रुमताकडे गेला असावा असा तर्क करण्यास हरकत नाहीं. आपणाला शिष्य म्हणून अध्ययन सांगावें अशी सत्यकामानें ऋषीची प्रार्थना केली.

तꣳ होवाच किंगोत्रो नु सोम्यासीति स होवाच नाहमेतद्वेद भो यद्गोत्रोऽहमस्म्यपृच्छं मातरꣳ सा मा प्रत्यब्रवीद्बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे साहमेतन्न वेद यद्गोत्रस्त्वमसि जबाला तु नामाहमस्मि सत्यकामो नाम त्वमसीति सोऽहꣳ सत्यकामो जाबालोऽस्मि भो इति ॥ ४ ॥

हे सोम्य किंगोत्रः नु असि ? इति (सः) तम् उवाच ह । भोः अहम् यद्गोत्रः अस्मि एतत् न वेद । मातरम् अपृच्छम् । सा मा प्रत्यब्रवीत् । परिचारिणी अहम् बहु चरन्ती यौवने त्वाम् अलभे । सा अहम् यद्गोत्रः त्वम् असि एतत् न वेद । अहम् तु जबाला नाम अस्मि त्वम् सत्यकामः नाम असि इति । भोः सः अहम् जाबालः सत्यकामः अस्मि इति ।

हे मुला! तूं कोणत्या गोत्राचा आहेस? असें ऋषीनें त्याला विचारलें. ( तो म्हणाला ):--महाराज! मी कोणत्या गोत्राचा आहे हें मला ठाऊक नाहीं. मी आईला विचारलें. ती मला म्हणाली कीं, परिचारिका दासी अशी मी अनेक तऱ्हेनें सेवा करीत असतां तारुण्यामध्यें तूं मला झालास. अशा त्या मला ( कोणत्या) गोत्राचा तूं आहेस तें ठाऊक नाहीं. फक्त माझें नांव जबाला आहे आणि तुझें नांव सत्यकाम आहे. तो मी जाबाल सत्यकाम आहे.

पुढील भविष्य ओळखूनच सत्यकामानें आपल्या मातेजवळ गोत्राची चौकशी केली होती; परंतु जबालेनें मोजक्या शब्दांत आपल्या पूर्ववृत्ताचा उल्लेख करून आपणास तुझ्या गोत्राची माहिती नाहीं असें सांगितलें होतें. जबालेनें केलेला आत्मवृत्ताचा उल्लेख अगदीं त्रोटक असला तरी, तो मुख्यार्थाविषयीं पूर्ण निःसंदिग्ध होता. सत्यकामाच्या अटकळीप्रमाणें हारिद्रुमत ऋषीनें त्याला गोत्राविषयीं प्रश्न केला, तेव्हां सत्यकामानें आपल्या मातेचें वृत्त अक्षरशः त्याला सांगितलें; त्यांत मातेनें उच्चारिलेले शब्द देखील जसेच्या तसेच कायम ठेवले; व शेवटीं तो म्हणाला. “ मला गोत्र मुळींच

ठाऊक नाहीं. जबाला हें माझ्या मातेचें नांव आहे तेंच गोत्रनामासारखें माझ्या नांवास जोडलेलें आहे. म्हणून मला सत्यकाम जाबाल असें म्हणतात. ''

**तꣳ होवाच नैतदब्राह्मणो विवक्तुमर्हति समिधꣳ सोम्याहरोप त्वा नेष्ये न सत्यादगा इति तमुपनीय कृशानामबलानां चतुःशता गा निराकृत्योवाचेमाः सोम्यानुसंव्रजेति ता अभिप्रस्थापयन्नुवाच नासहस्रेणावर्तेयेति स ह वर्षगणं प्रोवास ता यदा सहस्रꣳ संपेदुः ॥ ५ ॥**

**( सः ) तम् उवाच ह । अब्राह्मणः एतत् विवक्तुम् न अर्हति । सोम्य ( त्वम् ) सत्यात् न अगाः । समिधम् आहर । त्वा उपनेष्ये इति । तम् उपनीय कृशानाम् अबलानाम् चतुःशताः गाः निराकृत्य उवाच । सौम्य इमाः अनुसंव्रज इति । ताः अभिप्रस्थापयन् असहस्रेण न आवर्तेय इति सत्यकामः उवाच । ताः यदा सहस्रम् संपेदुः । तावत् सः वर्षगणम् प्रोवास ह ।**

तो ( गौतम ) सत्यकामाला म्हणाला कीं, अब्राह्मण—शूद्र हें असें स्पष्ट बोलूं शकणार नाहीं. वत्सा! तूं सत्यापासून ढळला नाहींस. एक समिधा आण, मी तुझें उपनयन करितों. नंतर त्याचें उपनयन केल्यावर ( व त्याला वेदाध्ययन सांगितल्यावर ) तो गौतम ऋषी, रोड आणि अशक्त अशा चारशें गायी निराळ्या काढूनें त्याला म्हणाला वत्सा ! यांच्या मागून जा ( त्यांचे पालन पोषण कर ). नंतर त्या गायींना नेत असतां, या चारशे गायींच्या हजार गायी झाल्याशिवाय मी परत येणार नाहीं असें ( सत्यकाम ) म्हणाला. ( नंतर ) तो त्या हजार गायी होईपर्यंत, पुष्कळ दिवस अरण्यांत राहिला.

प्रस्तुत मंत्रांतील अब्राह्मण या पदाचा संस्कारहीन शूद्र असाच अर्थ ब्रह्मसूत्रकारानीं घेतला आहे. येथील ब्राह्मण शब्द संस्कारयुक्त द्विजांचा

वाचक आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीनही वर्णांना वैदिक संस्कारांचा अधिकार आहे या विषयीं सर्वांचें एकमत आहे. संस्कारहीन अशा परंपरेंत उत्पन्न झालेल्या मुलांत अशी जाज्वल्य सत्यनिष्ठा दिसून यावयाची नाहीं, आनुवंशिक संस्कार उत्तम प्रकारचे असतील तरच अशी सत्यनिष्ठा संभवते, असा हारिद्रुमत ऋषीचा निर्णय आहे. म्हणजे हारिद्रुमतानें वैदिक संस्कार, वेदाध्ययन इत्यादि गोष्टींनीं सिद्ध होणाऱ्या द्विजत्वाचा अधिकार येथें गुणांवरून ठरविला आहे, जन्मावरून नाहीं, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

हारिद्रुमतानें सत्यकामाचें उपनयन करून अशक्त व रोड अशा चारशें गायी त्याच्या स्वाधीन केल्या, इतक्याच अर्थाचे शब्द या मंत्रांत आले आहेत. तथापि उपनीय या पदांतच अध्याप्य हें पद गर्भित आहे असें सत्यकामाच्या पुढील चरित्रावरून सिद्ध होतें. म्हणून हारिद्रुमतानें उपनयनानंतर सत्यकामाला विद्येचें शिक्षण दिलें आणि मगच त्याला गोरक्षणाचें कार्य सांगितलें असें समजणें योग्य होय. सत्यकामानें देखील संतोषपूर्वक गोरक्षण करण्याचें मान्य करून, या चारशें गायींच्या हजार गायी झाल्याशिवाय मी परत येणार नाहीं असें आपण होऊन आपल्या गुरूला अभिवचन देऊन, तो गायी घेऊन गेला.

## चौथ्या खंडाचा सारांश.

पूर्वींच्या तीन खंडांतील जानश्रुतीच्या कथेप्रमाणेंच या खंडांत आलेलें सत्यकामाचें पूर्वचरित्र जातिसंस्थेच्या इतिहासाच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचें आहे. जानश्रुतीला दोन वेळां दिल्या गेलेल्या शूद्र या विशेषणावरून जाति व वर्ण या दोन संस्था एकरूप नसून परस्पराभिन्न होत्या असें अनुमान करितां येतें. त्याप्रमाणेंच या खंडातील पांचव्या मंत्रांत हारिद्रुमत ऋषीनें सत्यकामाच्या जातीविषयीं केलेल्या निर्णयावरून जाति निश्चित करण्याचे बाबतींत जन्माप्रमाणें गुणांलाहि वैदिक ऋषींकडून प्राधान्य दिलें जात

होतें, असें निश्चित अनुमान करितां येतें. सत्यकामाच्या गुणावरून हारिद्रुमतानें त्याची जाति वैदिक संस्काराला योग्य आहे असें ठरविलें परंतु त्याच्या मातेच्या जातीची मुळींच चौकशी केली नाहीं. त्यावरून जाति निश्चयाचें बाबतींत पितृवंशाचा विचार करणेंच वैदिक ऋषींना अवश्य वाटत होतें; परंतु उत्तर काळांत मातृवंशाला महत्व आलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हारिद्रुमतानें सत्यकामाचें उपनयन ज्या काळांत केलें, त्यावेळीं स्त्रियांच्या जातीविषयीं प्रश्नच उत्पन्न होत नसावा, किंबहूना "स्त्र्यपराधात्कर्तुश्च पुत्रदर्शनम्" (स्त्रीच्या चुकीमुळें, जन्मलेला पुत्र कर्त्याचा--पित्याचा समजावा) या जैमिनीय सूत्राप्रमाणें जबालेच्या जातीकडे हारिद्रुमतानें दुर्लक्षच केलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सरसहा गुणावरूनच जाति ठरत असत असा अर्थ नाहीं. गोत्रावरून-जन्मावरून त्यावेळीं जातिनिश्चय करण्यांत येत होता हें जरी खरें असलें तथापि, प्रसंगविशेषीं गुणांवरून देखील जातिनिर्णय केला जात होता, असें या खंडांत आलेल्या हकिगतीवरून निःसंशय ठरतें.

---

## अथ पञ्चमः खण्डः ।

**अथ हैनमृषभोऽभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव प्राप्ताः सोम्य सहस्रं स्मः प्रापय न आचार्यकुलम् ॥१॥**

**अथ एनम् ऋषभः सत्यकाम ३ इति अभ्युवाद ह । (सः) हे भगवः इति प्रतिशुश्राव ह । सहस्रम् प्राप्ताः स्मः । नः आचार्यकुलम् प्रापय ।**

नंतर या सत्यकामाला, हे सत्यकामा ! अशी एक वृषभ हाक मारिता झाला. (तेव्हां) त्या (सत्यकामानें), हे भगवन् ! असें म्हणून प्रत्युत्तर दिलें. आम्ही हजार झालों (आतां) आम्हांला गुरूच्या घराकडे घेऊन चल (असें तो म्हणाला).

**ब्रह्मणश्च ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानीति तस्मै होवाच प्राची दिक्कला प्रतीची दिक्कला दक्षिणा दिक्कलोदीची दिक्कलैष वै सौम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणः प्रकाशवान्नाम ॥ २ ॥**

ते च ब्रह्मणः पादम् ब्रवाणि इति । भगवान् मे ब्रवीतु इति तस्मै उवाच ह । हे सौम्य प्राची दिक् कला प्रतीची दिक् कला दक्षिणा दिक् कला उदीची दिक् कला । एषः ब्रह्मणः चतुष्कलः प्रकाशवान् नाम पादः (अस्ति)।

शिवाय, मी तुला ब्रह्मस्वरूपाचा एक पाद [भाग] सांगतों. महाराज! मला सांगा असें सत्यकाम म्हणाला.हे वत्सा! पूर्व दिशा ही एक कला, पश्चिम दिशा ही एक कला, दक्षिण दिशा ही एक कला व उत्तर दिशा ही एक कला असा हा ब्रह्मस्वरूपाच्या चार कलांनीं ( अंशानीं ) ( समजला जाणारा ) प्रकाशवान् नांवाचा पाद ह्मणजे भाग आहे.

**स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणः प्रकाशवानित्युपास्ते प्रकाशवानस्मिँल्लोके भवति प्रकाशवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणः प्रकाशवानित्युपास्ते ॥३॥**

यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् प्रकाशवान् इति उपास्ते सः अस्मिन् लोके प्रकाशवान् भवति । यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् प्रकाशवान् इति उपास्ते ( सः ) प्रकाशवतः लोकान् जयति ह ।

जो याप्रमाणें ज्ञान झालेला पुरुष ब्रह्मस्वरूपाच्या ह्या चार अंश असलेल्या भागाची, प्रकाशवान् ( या स्वरूपानें ) उपासना करितो तो इहलोकांत तेजस्वी होतो. जो याप्रमाणें ज्ञान झालेला ब्रम्हस्वरूपाच्या ह्या पूर्वी सांगितलेल्या चार अंशाच्या भागाची, प्रकाशवान् या स्वरूपानें उपासना करितो [ तो ] तेजोमय लोकांना प्राप्त होतो म्हणजे त्याला तेजोमय लोक मिळतात.

## पाचव्या खंडाचा सारांश.

मागील खंडाच्या शेवटीं सांगितल्या प्रमाणें सत्यकाम जाबाल गायींसह लांब अरण्यांत जाऊन राहिला. सत्यकाम जात्याच तैलबुद्धीचा असून विद्याभ्यासाच्या योगानें यावेळीं त्याची बुद्धि चांगली सुसंस्कृत झाली होती, त्यामुळें एखाद्या खुशालचेंडू गुराख्याप्रमाणें त्यानें आपलें आयुष्य व्यर्थ घालविलें नाहीं. अरण्यांत राहिल्यावर सत्यकामानें सृष्टिनिरीक्षण करून चांगलेंच ज्ञान संपादन केलें. पृथ्वी, नद्या, डोंगर, वनस्पती, प्राणी इत्यादिकांचें निरीक्षण करून सत्यकामानें ब्रह्मज्ञानांतील सिद्धान्तांचें कसें संशोधन केलें त्याच्या मनोरंजक हकीकतीचें आलंकारिक वर्णन श्रुतीनें केलें आहे. जिज्ञासूंनीं या आलंकारिक वर्णनांतील अंतरंगाचा काळजीपूर्वक अभ्यास करावयास पाहिजे. गायींच्या खिल्लारांतील एका वृषभानें सत्यकामाला आपणाला गुरुगृहीं नेण्यास सांगितलें व त्याला प्रकाशमय अशा दिशारूप ब्रह्माचा उपदेश केला.

सत्यकामाची आतांपर्यंतची कथा साधी पण तात्त्विक दृष्ट्या महत्त्वाची आहे. तिच्याशीं या पांचव्या खंडांतील प्रकरणाचा विचार केल्यास, पुढीलप्रमाणें निष्कर्ष निघतो. सत्यकामानें अरण्यांत राहून गायींचें पालन पोषण करण्यास सुरवात केली व त्याचा हा क्रम पुष्कळ दिवस चालू होता. या कालांत आपल्या समवेत असलेल्या, शेंकडों गायीबैलाचें सूक्ष्म निरीक्षण करण्याचा त्यानें दृढाभ्यास चालू ठेवला होता. या त्याच्या निरीक्षणात्मक अभ्यासानें त्याला असें निश्चित समजून आलें कीं, पूर्व पश्चिम वगैरे चार दिशा परमात्म्याच्याच कला ( अंश ) असून या सर्व दिशानीं स्वच्छंदानें संचार करणारा प्राणी प्रकाशवान् म्हणजे अत्यंत तेजस्वी होतो. यावरून दिशा हा परमेश्वराचा प्रकाशवान् नांवाचा एक अंश असून त्याच्या स्वरूपाचें ज्ञान व उपासना या दोहोंच्या योगानें पूर्ण तेजस्विता संपादन करितां येते. हा त्याचा सिद्धांत गायींपेक्षां वृषभाच्या निरीक्षणावरूनच

मुख्यत्वेंकरून सिद्ध झाला असल्यामुळें श्रुतीनें हा अभिप्राय वृषभाच्याच मुखानें वदविला आहे.

वृषभाची तेजस्विता भारवी कवीनें किराताच्या चवथ्या सर्गांत वर्णन केली आहे, त्याचें येथें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं.

---

## अथ षष्ठः खण्डः ।

**अग्निष्टे पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभिसायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥१॥**

**सोम्य : अग्निः ते पादम् वक्ता इति । सः श्वोभूते गाः प्रस्थापयांकार ह । यत्र ताः अभिसायम् बभूवुः तत्र अग्निम् उपसमाधाय समिधम् आधाय गाः उपरुध्य अग्नेः पश्चात् प्राङ् उपोपविवेश ।**

वत्सा ! अग्नि तुला ब्रह्माचा पुढील दुसरा पाद सांगेल [ असें त्या वृषभानें सत्यकामाला सांगितलें ]. तो दुसरे दिवशीं गायींना घेऊन [ गुरुगृहाकडे ] निघाला. त्या गायी ज्या ठिकाणीं संध्याकाळचे वेळीं पोचल्या, त्याच जागीं अग्नि प्रदीप्त करून, [ सिद्ध करून ], अग्नीमध्यें समिधा स्थापन करून, भोंवतीं गायींना थांबवून [ बसवून ] नंतर अग्नीच्या पश्चिमेकडे, पूर्वेस तोंड करून अग्नीचे जवळच तो [ सत्यकाम ] बसला.

**तमग्निरभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥२॥**

**अग्निः तम् सत्यकाम ३ इति अभ्युवाद । ( सः ) हे भगवः इति प्रतिशुश्राव ह ।**

नंतर अग्नि त्याला, हे सत्यकामा! अशी हाक मारिता झाला. तो ( सत्यकाम ), हे भगवन्! असें म्हणाला.

**ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच पृथिवी कलान्तरिक्षं कला द्यौः कला समुद्रः कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणोऽनन्तवान्नाम ॥ ३ ॥**

**सौम्य! ते ब्रह्मणः पादम् ब्रवाणि। ( सः ) भगवान् मे ब्रवीतु इति तस्मै उवाच ह। पृथिवी कला, अन्तरिक्षम् कला, समुद्रः कला द्यौः कलाः। सोम्य एषः वै ब्रह्मणः चतुष्कलः अनन्तवान् नाम पादः ( आस्ति )।**

वत्सा ! तुला ब्रह्माचा दुसरा पाद सांगतों. महाराज मला सांगा, असें तो [सत्यकाम] अग्नीला म्हणाला. पृथ्वी ही एक कला, अंतरिक्ष [ वातावरण ] ही एक कला, द्युलोक [ आकाश ] ही एक कला आणि समुद्र ही एक कला. हे वत्सा! ह्या चार अंशांनीं समजला जाणारा अनन्तवान् या नांवाचा हा ब्रह्माचा दुसरा भाग होय.

**स य एतमेवं विद्वाँश्चतुष्कलं पादं ब्रह्मणोऽनन्तवानित्युपास्तेऽनन्तवानस्मिँल्लोके भवत्यनन्तवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वाँश्चतुष्कलं पादं ब्रह्मणोऽनन्तवानित्युपास्ते ॥ ४ ॥**

**यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् अनन्तवान् इति उपास्ते सः अस्मिन् लोके अनन्तवान् भवति। यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् अनन्तवान् इति उपास्ते ( सः ) अनन्तवतः लोकान् जयति ह।**

जो याप्रमाणें ज्ञान झालेला पुरुष, ब्रह्मस्वरुपाच्या या चार अंश असलेल्या भागाची अनन्तवान् रूपानें उपासना करितो, तो या जगांत अनन्त होतो, ह्मणजे त्याची दृष्टि सर्वव्यापी होते. जो याप्रमाणें ज्ञान झालेला, [ पुरुष ] ब्रह्मस्वरूपाच्या या चार अंश असलेल्या भागाची अनन्तवान् स्वरूपानें उपासना करितो तो अनन्त अशा लोकांना ( अविनाशी लोकांस ) जातो— प्राप्त होतो.

## सहाव्या खंडाचा सारांश.

या खंडांत सत्यकामाला अग्नीनें ब्रह्माच्या दुसऱ्या पादाचा उपदेश केला आहे त्याचा देखील आधिभौतिक दृष्टीनें विचार करण्याजोगा आहे. सत्यकाम आतां सृष्टिनिरीक्षण करण्यांत चांगलाच प्रवीण झाला होता. पृथ्वी आणि वातावरण या दोन्ही पदार्थांचा अग्नीशीं प्रत्यक्ष संबंध येतो हें त्याच्यासारख्या बुद्धिमान् व निरीक्षणपूर्वक अभ्यास करणाऱ्या अभ्यास-काला सहज कळण्याजोगें होतें. अग्नींतील तेजाच्या सादृश्यानें द्युलोकाची ( सूर्यचंद्रांच्या व नक्षत्रांच्या स्थानाची ) कल्पना त्यानें सोपपत्तिक बसविली; आणि या तिहींनाहि आधारभूत असलेल्या सूर्यमंडळापलीकडील महदाकाशाची आपल्या सिद्धांतास जोड देऊन तो त्यानें पूर्ण केला आहे. या महदाशाकालाच समुद्र हें नांव दिलें आहे. प्रस्तुत प्रकरणांत समुद्र शब्दाचा भूलोकावरील समुद्र हा अर्थ घेणें अशक्य आहे हें त्यांच्या क्रमा-वरूनच सिद्ध होतें; म्हणून समुद्र म्हणजे प्राचीन भाषेंतील दिव्य आप किंवा अर्वाचीन कालांत ज्याला ईथर म्हणतात, तेंच तत्त्व या प्रकरणांतील समुद्र शब्दानें विवक्षित आहे यांत शंका नाहीं. मागील खंडांत वृषभाच्या उपदेशानें समजलेली तेजस्विता, तिची उपासना व या तेजाच्या उपासनेला साधनीभूत पूर्ण स्वातंत्र्य इत्यादि कारणांनीं प्राप्त होणाऱ्या तेजोमय संपत्तीला सर्वव्यापी दृष्टीची जोड देणें हेंच सहाव्या खंडांतील अग्नीच्या उपदेशाचें तात्पर्य आहे. तेजस्वितेला व्यापक बुद्धीची जोड अवश्य आहे; आणि बाह्य जगाचें विस्तृत ज्ञान हेंच या बुद्धीच्या व्यापकपणाचें मुख्य साधन होय, असा या प्रकरणाचा अभिप्राय आहे.

---

## अथ सप्तमः खण्डः ।

**हꣳसस्ते पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयाञ्चकार ता यत्राभिसायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥ १ ॥**

( हे सोम्य ) हंसः ते पादम् वक्ता इति । सः श्वोभूते गाः अभिप्रस्थापयांचकार ह । यत्र ताः अभिसायम् बभुवुः तत्र अग्निम् उपसमाधाय गाः उपरुध्य समिधम् आधाय अग्नेः पश्चात् प्राङ् उपोपविवेश।

वत्सा! हंस तुला ( ब्रह्माचा पुढील तिसरा ) पाद सांगेल (असें त्या अग्नीनें सत्यकामाला सांगितलें). तो दुसरे दिवशीं गायींना घेऊन गुरुगृहाकडे निघाला. नंतर त्या गायी ज्या ठिकाणीं संध्याकाळीं पोंचल्या त्याच जागीं अग्नि प्रदीप्त करून, भोंवतीं गायींना थांबवून —बसवून अग्नीमध्यें समिधा स्थापन करून अग्नीच्या पश्चिमेकडे पूर्वेस तोंड करून अग्नीजवळ तो ( सत्यकाम ) बसला.

**तꣳ हꣳस उपनिपत्याभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ २ ॥**

हंसः तम् उपनिपत्य सत्यकाम ३ इति अभ्युवाद । ( सः ) हे भगवः इति प्रतिशुश्राव ह ।

नंतर हंस त्याच्या जवळ येऊन, हे सत्यकामा ! अशी त्याला हाक मारिता झाला. तो ( सत्यकाम ), हे भगवन् असें म्हणाला.

**ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाचाग्निः कला सूर्यः कलः चन्द्रः कला विद्युत्कलैष सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणो ज्योतिष्मान्नाम ॥ ३ ॥**

**सोम्य! ते ब्रह्मणः पादम् ब्रवाणि। ( सः ) भगवान् मे ब्रवीतु इति तस्मै उवाच ह। अग्निः कला सूर्यः कला चन्द्रः कला विद्युत् कला। सोम्य एषः वै ब्रह्मणः चतुष्कलः ज्योतिष्मान् नाम पादः अस्ति।**

हे वत्सा! तुला ( मी ) ब्रह्माच्या पादाचा उपदेश करितों. तो सत्यकाम, हे भगवन्, आपण मला उपदेश करावा असें त्या आदित्याला ह्मणाला. अग्नि हा एक अंश ( कला ); सूर्य हा दुसरा अंश ( कला ); चंद्र हा तिसरा अंश ( कला ); विद्युत् हा चौथा अंश ( कला ). हे वत्सा हाच ब्रह्माचा, चार अंश—कला असलेला ज्योतिष्मान् ( दीप्तिमान् ) या नांवाचा पाद ( अंश ) होय.

**स य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मणो ज्योतिष्मानित्युपास्ते ज्योतिष्मानस्मिँल्लोके भवति ज्योतिष्मतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मणो ज्योतिष्मानित्युपास्ते॥४॥**

**यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् ज्योतिष्मान् इति उपास्ते सः अस्मिन् लोके ज्योतिष्मान् भवति। यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् ज्योतिष्मान् इति उपास्ते ( सः ) ज्योतिष्मतः लोकान् जयति ह।**

जो, याप्रमाणें ज्ञान असलेला पुरुष, ब्रह्माच्या या चतुष्कलात्मक पादाची दीप्तिमान् या स्वरूपानें उपासना करितो तो या लोकांत दीप्तिमान्—तेजस्वी होतो. जो असें ज्ञान झालेला पुरुष, ब्रह्माच्या या चतुष्कलात्मक पादाची दीप्तिमान् या स्वरूपानें उपासना करितो तो दीप्तिमान् अशा लोकांना जातो.

## सातव्या खंडाचा सारांश.

सत्यकामानें अग्नीचें निरीक्षण करून, जशी पूर्वींची उपपत्ति बसविली आहे तशीच हंसाच्या स्वरुपावरून त्यानें जी उपपत्ति

बसविली, तिचें वर्णन या खंडांत आलें आहे. अग्नि, सूर्य, चन्द्र व विद्युत् असे या ज्योतिष्मान् नामक ब्रह्मपादाचे चार अंश आहेत. या चार स्वरूपांनीं सर्व जग प्रकाशित होत असतें. जगताला प्रकाश मिळतो तो या चार देवतांपासूनच होय. उपलक्षणाच्या योगानें इतर प्रकाशक शक्तींचा अंतर्भाव या चारींमध्यें करण्यास हरकत नाहीं. चन्द्र ही एक स्वतंत्र प्रकाशक देवता म्हणून पुष्कळ ठिकाणीं मानण्यांत येतें. या बाबतींत आधुनिक शास्त्रांचा मतभेद दिसून येईल. किंबहुना आमच्याकडील ज्योतिष-शास्त्राचें मत देखील किंचित् वेगळेंच आहे. त्यावरून ज्योतिष शास्त्राचा श्रौतमताशीं विरोध येतो असें समजण्याचें कारण नाहीं. श्रुतीनें, प्रकाशक अशा चार देवता ( कला ) येथें सांगितल्या आहेत त्यांची चार ही संख्या दिग्दर्शनार्थ आहे. प्रकाशक शक्तींची संख्या निश्चित करणें, हा श्रुतीचा मुख्य उद्देश नसून, त्यांच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण करणें हाच मुख्य उद्देश आहे. चार ही संख्या बदलून एकाद्या शास्त्रकारानें ती वाढविली किंवा कमी केली तरी, तत्त्वतः श्रौतमताशीं त्याचा विरोध येत नाहीं. प्रकाशक शक्तींमध्यें विद्युत् ही शक्ति श्रेष्ठ असल्याचेंहि येथें दर्शविलें आहे. प्रकाशक, हें या सर्व देवतांचें सामान्य स्वरूप आहे व तीच ब्रह्मशक्ति होय. ज्योतिष्मान् हें ब्रह्मस्वरूपाचें नांव असून, त्याची ज्ञानपूर्वक उपासना केल्यानें मनुष्य दीप्तिमान् व यशस्वी होतो. सामर्थ्य, सत्ता, ज्ञान इत्यादि गुण या फलश्रुतीमध्यें विवक्षित आहेत. अग्नि, आदित्य, विद्युत् इत्यादिकांच्या ज्ञानाचें श्रुतीनें सांगितलेलें फळ नेहमींच अनुभवाला येण्याजोगें असल्यामुळें, तें अद्भुत नसून पूर्णपणें बुद्धिग्राह्य आहे असें ठरतें.

---

## अथाष्टमः खण्डः ।

**मद्गुष्टे पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभिसायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥ १ ॥**

**( सोम्य ) मद्गुः ते पादम् वक्ता इति । सः श्वोभूते गाः अभिप्रस्थापयांचकार ह । यत्र ताः अभिसायम् बभूवुः तत्र अग्निम् उपसमाधाय गाः उपरुध्य समिधम् आधाय अग्नेः पश्चात् प्राङ् उपोपविवेश ।**

वत्सा ! मद्गु ( पाणकोंबडा ) तुला ब्रह्माचा या पुढील पाद सांगेल. तो दुसरे दिवशीं गायींना घेऊन ( गुरुगृहाकडे ) निघाला. नंतर, त्या गायी ज्या ठिकाणीं संध्याकाळीं पोंचल्या, त्याच जागीं अग्नि प्रदीप्त करून, भोंवतीं गायींना थांबवून–बसवून अग्नीमध्यें समिधा स्थापन करून अग्नीच्या पश्चिमेकडे पूर्वेस तोंड करून अग्नीचे जवळच तो ( सत्यकाम ) बसला.

**तं मद्गुरुपनिपत्याभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ २ ॥**

**मद्गुः उपनिपत्य हे सत्य काम ३ इति तम् अभ्युवाद ।( सः )हे भगवः इति प्रतिशुश्राव ।**

नंतर पाणकोंबडा समोर येऊन, हे सत्यकामा! अशी त्याला हाक मारिता झाला. तो (सत्यकाम) हे भगवन् ! असें म्हणाला.

**ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच प्राणः कला चक्षुः कला श्रोत्रं कला मनः कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मण आयतनवान्नाम ॥ ३ ॥**

**सोम्य ! ते ब्रह्मणः पादम् ब्रवाणि । ( सः ) भगवान् मे ब्रवीतु इति तस्मै उवाच ह । प्राणः कला चक्षुः कला श्रोत्रम् कला मनः कला । सोम्य एषः वै ब्रह्मणः चतुष्कलः आयतनवान् नाम पादः ( अस्ति ।**

हे वत्सा! मी तुला ब्रह्माचा पाद सांगतो. हे भगवन्! मला ब्रह्मपादाचा उपदेश करा, असें ( सत्यकाम ) ह्मणाला. प्राण ही एक कला–अंश; नेत्र ही एक कला; श्रोत्र ही एक कला; मन

ही एक कला. वत्सा! हाच ब्रह्माचा चतुष्कलात्मक आयतनवान् नामक पाद आहे.

**स य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मण आयतनवानित्युपास्त आयतनवानस्मिँल्लोके भवत्यायतनवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मण आयतनवानित्युपास्ते ॥ ४ ॥**

**यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् आयतनवान् इति उपास्ते सः अस्मिन् लोके आयतनवान् भवति। यः एवम् विद्वान् ब्रह्मणः एतम् चतुष्कलम् पादम् आयतनवान् इति उपास्ते (सः) आयतनवतः लोकान् जयति ह।**

जो याप्रमाणें ज्ञान असलेला पुरुष, ब्रह्माच्या या चतुष्कलात्मक पादाची आयतनवान रूपानें उपासना करितो, तो ह्या लोकीं सुदेही होतो जो असें ज्ञान असलेला पुरुष, ब्रह्माच्या या चतुष्कलात्मक पादाची आयतनवान् या स्वरूपानें उपासना करितो तो आयतनवानांच्या लोकांना जातो.

## आठव्या व्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत आयतन या शब्दाचा अर्थ आश्रयस्थान असा आहे; तो संदर्भाला अनुसरून, क्वचित् शरीर अशा अर्थाचाहि होईल त्याचप्रमाणें मद्गु म्हणजे पाणकोंबड्यासारखा एक पक्षी आहे, त्याच्या ठिकाणीं पाण्यांत बुडतांना दिसून येणाऱ्या प्राणशक्तीवरून सत्यकामानें हा ( लिंग व स्थूल देहासुद्धां ) शरीररूपी ब्रह्मपादाचा सिद्धांत निश्चित केला आहे.

---

## अथ नवमः खण्डः ।

**प्राप हाचार्यकुलं तमाचार्योऽभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ १ ॥**

( सः ) आचार्यकुलम् प्राप ह । आचार्यः तम् सत्यकाम ३ इति अभ्युवाद ह । ( सः ) भगवः इति प्रतिशुश्राव ।

नंतर तो गुरूच्या घरीं पोंचला. गुरूनें त्याला 'सत्यकामा' अशी हाक मारली. हे भगवन्! असें तो म्हणाला.

**ब्रह्मविदिव वै सोम्य भासि को नु त्वानुशशासेत्यन्ये मनुष्येभ्य इति ह प्रतिजज्ञे भगवाꣳस्त्वेव मे कामे ब्रूयात् ॥ २ ॥**

सौम्य ! ब्रह्मवित् इव भासि । कः नु त्वा अनुशशास इति ( पप्रच्छ )। मनुष्येभ्यः अन्ये इति ( सः ) प्रतिजज्ञे ह । कामे भगवान् तु एव मे ब्रूयात् ।

वत्सा! तूं ब्रह्मवेत्ता झाला आहेस असें दिसतें. कोणीं बरें तुला ब्रह्मविद्या शिकवली? असें गुरूनें विचारलें. मनुष्याहून इतरांनीं शिकविली, परंतु मी इच्छितों कीं, आपणच ती मला शिकवावी, असें तो ( सत्यकाम ) म्हणाला.

**श्रुतꣳ ह्येव मे भगवद्दृशेभ्य आचार्याद्धैव विद्या विदिता साधिष्ठं प्रापतीति तस्मै हैतदेवोवाचात्र ह न किंचन वीयायेति वीयायेति ॥ ३ ॥**

हि मे भगवद्दृशेभ्यः एव श्रुतम् आचार्यात् एव विदिता विद्या साधिष्ठम् प्रापति इति । तस्मै एतत् उवाच ह अत्र किंचन न वीयाय इति ।

कारण मीं आपल्या सारख्या ऋषींपासून ऐकिलें आहे कीं, गुरूपासून समजलेली विद्याच श्रेष्ठत्व पावते ( श्रेष्ठ ठरते ). तो (गौतम ऋषी) त्या सत्यकामाला असें म्हणाला कीं, तुझ्या विद्येमध्यें

कोणतीही न्यूनता राहिली नाहीं. (तुझी विद्या श्रेष्ठ असून परिपूर्ण झाली आहे.) द्विरुक्ति खंडसमाप्तिदर्शक आहे.

## नवव्या खंडाचा सारांश.

सत्यकाम गायी घेऊन ज्या अरण्यांत राहिला होता, तें त्याच्या गुरूच्या आश्रमापासून तीन मुक्कामांवर होतें. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत गायींच्या स्वच्छंद गतीनें जितकें अंतर तुटलें जाईल, तितकाच एक मुक्काम होता; असें हें मार्गाचें परिमाण सत्यकामाच्या येथवरच्या हकीगतीवरून स्पष्ट दिसतें. चारशें गायींच्या हजार गायी होण्यास अधिकांत अधिक चार वर्षें लागतील. हीं चार वर्षें सत्यकामानें गायींच्या सहवासांत अरण्यांत काढलीं असें समजण्यास हरकत नाहीं. या मुदतांत सत्यकामानें सृष्टिनिरीक्षणाचा चांगलाच अभ्यास केला. सत्यकामाची बुद्धि जात्याच उत्कृष्ट होती व त्याने केलेल्या विद्याभ्यासाच्या योगानें ती चांगलीच सुसंस्कृत झाली होती. या काळांत सत्यकामानें सृष्टिनिरीक्षणाच्या योगानें ब्रह्मविद्या संपादन केली. अग्नि, पशु व पक्षी हें त्याच्या निरीक्षणांतील मुख्य विषय होते. वृषभ इत्यादि पशूंचें निरीक्षण करून दिशा व प्रकाश हें एक ब्रह्माचें स्वरूपच आहे असा त्यानें सिद्धांत बसविला. अग्निनिरीक्षणावरून सृष्टीचें भौतिक स्वरूप हा देखील ब्रह्माचा एक पादच (अंश) आहे असें त्यानें ठरविलें. हंसाचें निरीक्षण करून अग्नि, सूर्य, चंद्र, विद्युत् इत्यादि तेजोमय ब्रह्मस्वरूपाचा त्यानें निश्चय केला व पाणकोंबड्याचें निरीक्षण करून प्राणशक्ति या ब्रह्माच्या अंशाचें स्वरूप त्यानें ओळखलें. याप्रमाणें आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक इत्यादि सर्व अंगांनीं त्याचें ब्रह्मज्ञान पूर्ण झालें होतें. पूर्ण स्वातंत्र्य, शुद्ध व मोकळी हवा, ब्रह्मचर्य, नियमित वर्तन, सात्त्विक व ओजस्वी आहार आणि तेजस्वी ब्रह्मविद्येचें ज्ञान या गुणांनीं त्याचें मुखमण्डल दैदिप्यमान दिसूं लागलें तर त्यांत नवल काय! सत्यकामाला पाहिल्याबरोबर गुरूनें त्याला ब्रह्मज्ञानाविषयींच प्रश्न केला.

तिसऱ्या मंत्रांतील या दोघांचीं प्रश्नोत्तरें अतिशय महत्त्वाचीं आहेत. तुला ब्रह्मविद्या कोणीं शिकविली ? या गुरूच्या प्रश्नास सत्यकामानें सरळ उत्तर दिलें कीं, मला ब्रह्मविद्या मनुष्यानें शिकविली नाहीं. जुन्या टीकाकारांनीं, 'मला देवतांनीं ब्रह्मविद्या शिकविली' असा सत्यकामाच्या वाक्यांतून अर्थ काढला आहे. परंतु अशी अद्भुत कल्पना करण्याची येथें मुळींच गरज नाहीं. कारण, सत्यकामाला कोणाकोणापासून उपदेश मिळाला त्याची सविस्तर हकीगत पांचव्या खंडापासून येथवर श्रुतीनेंच दिली आहे. असें असतां, देवतांची कल्पना करणें मुळींच सयुक्तिक नाहीं. मला जरी ब्रह्मविद्या मिळाली असली तरी, आपणांजवळ पुनः ब्रह्मविद्येचा अभ्यास करण्याची माझी इच्छा आहे, असे सत्यकामानें नम्रपणानें सांगितलें; आणि गुरुवांचून ब्रह्मज्ञान होत नाहीं ह्या नियमाचाहि त्यानें उल्लेख केला आहे; परंतु हा नियम सार्वत्रिक नाहीं, तुझ्यासारख्या शीलगुणसंपन्न बुद्धिमान् अभ्यासी मनुष्याला वैयक्तिक गुरूची आवश्यकताच नाहीं, तुझें ज्ञान पूर्ण होऊन तूं कृतार्थ झाला आहेस, असें त्याच्या गुरूनें—गौतमऋषीनें त्याला स्पष्ट सांगितलें आहे.

---

## अथ दशमः खण्डः ।

**उपकोसलो ह वै कामलायनः सत्यकामे जाबाले ब्रह्मचर्यमुवास तस्य ह द्वादश वर्षाण्यग्नीन्परिचचार स ह स्मान्यानन्तेवासिनः समावर्तयꣳस्तꣳ ह स्मैव न समावर्तयति ॥ १ ॥**

**कामलायनः उपकोसलः सत्यकामे जाबाले वै ब्रह्मचर्यम् उवास ह । तस्य अग्नीन् द्वादश वर्षाणि च परिचचार ह । सः अन्यान् अन्तेवासिनः समावर्तयन् स्म ह तम् एव न समावर्तयति स्म ह ।**

कमलाचा मुलगा उपकोसल नांवाचा विद्यार्थी सत्यकाम जाबालाजवळ ब्रह्मचर्यानें विद्याभ्यास करण्याच्या हेतूनें राहता झाला. आणि त्याच्या ( गुरूच्या ) अग्नीची त्यानें बारा वर्षें सेवा

केली. तो सत्यकाम ऋषि इतर शिष्यांना घरीं जाण्यास अनुज्ञा देत होता, परंतु त्या उपकोसलाला मात्र तो सत्यकाम परवानगी देत नव्हता.

**तं जायोवाच तप्तो ब्रह्मचारी कुशलमग्नीन्परिचचारीन्मा त्वाग्नयः परिप्रवोचन्प्रब्रूह्यस्मा इति तस्मै हाप्रोच्यैव प्रवासांचक्रे ॥ २ ॥**

**जाया तम् उवाच । ब्रह्मचारी तप्तः । अग्नीन् कुशलम् परिचचारीत् । अस्मै प्रब्रूहि । अग्नयः त्वा मा परिप्रवोचन् इति । ( सः ) तस्मै अप्रोच्य एव प्रवासांचक्रे ह ।**

पत्नी सत्यकामाला म्हणाली: हा ब्रह्मचारी फारच श्रमला आहे. यानें अग्नीची चांगली सेवा केली आहे. याला आपण (समावर्तनपूर्वक) निरोप द्यावा. (कारण ) अग्नीचा आपणांस बोल लागूं नये. तो सत्यकाम त्या उपकोसलाला ( समावर्तनपूर्वक ) निरोप न देतां प्रवासाला निघून गेला.

**स ह व्याधिनानाशितुं दध्रे तमाचार्यजायोवाच ब्रम्हचारिन्नशान किं नु नाश्नासीति स होवाच बहव इमेऽस्मिन्पुरुषे कामा नानात्यया व्याधिभिः प्रतिपूर्णोऽस्मि नाशिष्यामीति ॥ ३ ॥**

**सः व्याधिना अनशितुम् दध्रे ह । आचार्यजाया तम् उवाच । ह ब्रह्मचारिन् अशान । किम् नु न अश्नासि इति । अस्मिन् पुरुषे बहवः इमे कामाः नानात्ययाः । व्याधिभिः प्रतिपूर्णः अस्मि । न आशिष्यामि इति सः उवाच ह ।**

त्यानें मानसिक दुःखामुळें उपाशी राहण्याचा निश्चय केला. ( तेव्हां ) आचार्यपत्नी त्याला म्हणाली, हे शिष्या, भोजन कर. तूं कां बरें जेवीत नाहींस ? या देहामध्यें पुष्कळ मनोरथ अनेक पीडाकारक असतात. मी दुःखानें ग्रस्त झालों आहे, म्हणून कांहीं खाणार नाहीं, असें तो म्हणाला.

**अथ हाग्नयः समूदिरे तप्तो ब्रम्हचारी कुशलं नः पर्यचारी द्धन्तास्मै प्रब्रवामेति तस्मै होचुः प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्मेति ॥ ४ ॥**

अथ अग्नयः समूदिरे ह । ब्रह्मचारी तप्तः । नः कुशलम् पर्यचारीत् । हन्त अस्मै प्रब्रवाम इति । ( ते ) तस्मै ऊचुः ह । प्राणः ब्रह्म कम् ब्रह्म खम् ब्रह्म इति ।

नंतर अग्नि ( आत्मगत ) म्हणाले, हा ब्रह्मचारी फार श्रमला आहे. (कारण) यानें आमची उत्तम सेवा केली आहे. अहो, याला ( आपण ) ज्ञान सांगू या. नंतर ते त्याला म्हणाले, प्राण हें ब्रह्माचें स्वरूप होय. आनंद हें ब्रह्माचें स्वरूप होय आणि आकाश हें ब्रह्माचें स्वरूप होय.

**स होवाच विजानाम्यहं यत्प्राणो ब्रह्म कं च तु खं च न विजानामीति ते होचुर्यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव कमिति प्राणं च हास्मै तदाकाशं चोचुः ॥ ५ ॥**

सः उवाच । यत् प्राणः ब्रह्म ( तत् ) अहम् विजानामि । किंतु कम् च खम् च न विजानामि ह इति । ते ऊचुः ह । यत् वाव कम् तत् एव खम् यत् एव खम् तत् एव कम् इति । अस्मै च प्राणम् तदाकाशम् च ऊचुः ह ।

तो म्हणालाः—तुम्हीं जें प्राण हेंच ब्रह्म असें मला सांगितलें तें चांगलें समजलें; परंतु क ( आनंद ) हें ब्रह्म, ख ( आकाश ) हें ब्रह्म हें मात्र समजलें नाहीं. ते अग्नी म्हणालेः, जें खरोखर 'क' म्हणजे आनंदरूप आहे तेंच ख म्हणजे आकाश होय. आणि जें खरोखर आकाशरूप आहे तेंच आनंदरूप आहे. नंतर ते त्या उपकोसलाला प्राण व प्राणाला अधिष्ठान असलेलें आकाश ( हृदयाकाश ) यांचा तात्त्विक उपदेश करिते झाले.

## दहाव्या खंडाचा सारांश.

नवव्या खंडाच्या शेवटीं, सत्यकामाच्या कथेचा पूर्वार्ध समाप्त झाला. या खंडांत त्या कथेचा उत्तरार्ध सुरु झाला आहे. सत्यकामाचें ज्ञान परिपूर्ण झालें होतें, याविषयीं त्याच्या गुरूकडून--गौतमऋषीकडून प्रशस्तिपत्र मिळाल्यांवर सत्यकाम जाबालानें गृहस्थाश्रम स्वीकारला व तो स्वतंत्र आश्रम करून राहूं लागला. सत्यकामाची थोर विद्वत्ता व तपश्चर्या यांची कीर्ति ऐकून अनेक शिष्य विद्याध्ययनाकरितां त्याच्याजवळ येऊन राहिले. त्यांतच उपकोसल नांवाचा एक शिष्य येऊन राहिला होता. कामलायन हें या उपकोसलाचें दुसरें नाव आहे. पुष्कळ शिष्य आपलें विद्याध्ययन पूर्ण करून गुरूची अनुज्ञा घेऊन आपल्या घराकडे गेले. विद्या संपवून गुरूच्या अनुज्ञेनें घरीं जावयास निघण्याचे वेळीं एक प्रकारचा धार्मिक समारंभ करितात त्याला समावर्तन असें म्हणतात. या समावर्तनालाच सांप्रतकाळीं सोडमुंज असें नांव पडलें आहे. हा सोडमुंजीचा विधि गुरुगृहीं अध्ययन समाप्त झाल्यानंतर करावयाचा असतो. परंतु त्याची आता कवाईत मात्र शिल्लक राहिली आहे.

अनेक शिष्यांचें समावर्तन झालें तरी, उपकोसलाचें विद्याध्ययन व गुरुसेवा ही चालूच होती. त्याला अद्यापि गुरूची अनुज्ञा मिळत नाहीं व त्याची विद्याहि पूर्ण झाली नाहीं असें पाहून, सत्यकामाच्या पत्नीला त्याच्याविषयीं कळवळा वाटूं लागला. ही बाई धर्मनिष्ठ, कर्तव्यदक्ष, दयाशील वथोर मनाची होती. तिनें उपकोसलाची विद्या पूर्ण करून त्याला निरोप देण्याविषयीं सत्यकामाला परोपरीनें सांगितलें. या उपकोसल कामलयनानें आपल्या येथें अग्नींची बारा वर्षें एकनिष्ठपणें सेवा केली आहे, त्यानें या कामांत पुष्कळच कष्ट सोसले आहेत, तरी त्याची विद्या पूर्ण करून त्याला आपण अनुज्ञा द्यावी, नाहीं तर ते अग्नीच तुम्हांस दोष देतील म्हणजे या कामांत तुमच्याकडेच दोष येईल; असें पत्नीचें भाषण ऐकून सत्यकाम कांहीं न बोलतां प्रवासाला निघून गेला. सत्यकामाच्या या वर्तनाचा अर्थ त्याच्या पत्नीला

व त्या उपकोसल शिष्याला नीटसा समजला नाहीं. गुरूच्या या वर्तनामुळें उपकोसल अधिकच दुःखी झाला व त्यानें अन्नपाण्याचा त्याग केला. गुरुपत्नीनें प्रेमपूर्वक त्याला अन्न खाण्याबद्दल आग्रह केला तरी त्यानें तसें करण्याचें नाकारलें आणि तो गुरूच्या अग्नींची एकनिष्ठेनें उपासना करूं लागला. तेव्हां अग्नींनीं प्रसन्न होऊन त्याला ब्रह्मोपदेश केला. अग्नींनीं ब्रह्माचीं प्राण, आनंद व आकाश अशीं तीन स्वरूपें सांगितलीं. त्यांपैकीं प्राणरूप ब्रह्म आपणास समजलें, परंतु क-आनंद व ख-आकाश हीं दोन स्वरूपें नीटशीं समजलीं नाहींत असें उपकोसलानें सांगितल्यावरून अग्नींनीं त्या तत्त्वांचा सविस्तर उपदेश करण्यास आरंभ केला. इतकी कथा या खंडांत आली आहे. उपकोसलाचा इतर विद्याभ्यास पूर्ण झाला होता; पण सर्व विद्यांची पूरक जी ब्रह्मविद्या तिचें पूर्ण ज्ञान त्याला हवें होतें व त्याकरितांच तो राहिला होता. आपण ज्याप्रमाणें सुसंस्कृत अशा बुद्धीच्या सामर्थ्यावर निरीक्षणादिकांच्या योगानें ब्रह्मज्ञान संपादन केलें तसेंच तें उपकोसलानेंहि संपादन करावें अशी सत्यकामाची इच्छा असावी; म्हणून तो कांहीं न बोलतां प्रवासाला निघून गेला होता. उपकोसलाला आपल्या गुरूची इच्छा स्पष्टपणें कळली नाहीं तरी, त्यानें आपल्या गुरुप्रमाणेंच ब्रह्मज्ञान संपादन करण्याचा प्रयत्न केला; व त्याच्या प्रयत्नानें अग्नीपासून त्याला ब्रह्मज्ञानाची प्राप्ति झाली. अग्नींनीं त्याला ब्रह्मज्ञानाचा कसा उपदेश केला, त्याचें क्रमशः वर्णन पुढील खंडांत यावयाचें आहे.

---

## अथैकादशः खण्डः ।

**अथ हैनं गार्हपत्योऽनुशशास पृथिव्यग्निरन्नमादित्य इति य एष आदित्ये पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥ १ ॥**

**अथ एनम् गार्हपत्यः अनुशशास ह । पृथिवी अन्नम् अग्निः आदित्यः इति । यः एषः आदित्ये पुरुषः दृश्यते सः अहम् अस्मि । सः एव अहम् अस्मि इति ।**

( नंतर ) त्या उपकोसलाला गार्हपत्याग्नीनें उपदेश केला कीं, पृथ्वी, अन्न, अग्नि व सूर्य हीं माझीं रूपें आहेत. जो हा सूर्यमंडळाध्यें पुरुष दिसतो तो मी आहे. तोच मी ( गार्हपत्याग्नि ) आहे.

**स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावरपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुञ्जामोऽस्मिꣳश्च लोकेऽमुष्मिꣳश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् एतम् उपास्ते सः पापकृत्याम् अपहते । लोकी भवति । सर्वम् आयुः एति । ज्योग्जीवति । अस्य अवरपुरुषाः न क्षीयन्ते । यः यवम् विद्वान् एतम् उपास्ते तम् वयम् अस्मिन् लोके अमुष्मिन् च उपभुञ्जामः।**

जो याप्रमाणें जाणणारा या गार्हपत्याग्नीची उपासना करितो तो पातकांप्रत नष्ट करितो, लोकांत श्रेष्ठ होतो, पूर्णायुषी होतो, त्याचा जीवनक्रम उज्वल तेजस्वी होतो, याच्या संततीचा क्षय होत नाहीं. जो याप्रमाणें जाणणारा या गार्हपत्याग्नीची उपासना करितो त्याचें आम्ही ह्या लोकीं व परलोकीं रक्षण करितो.

## अकराव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत दोनच मंत्र आहेत. पृथ्वी व अन्न आणि अग्नि व सूर्य हीं तत्त्वतः एकरूप असून या पार्थिव शरिरांतील जीवात्मा व आदित्य मंडलांतील प्रधानशक्ति यांचेंहि तात्त्विक स्वरूप एकच आहे. आधिदैविक व आध्यात्मिक यांच्या बाह्य स्वरूपांचें व अंतरंग स्वरूपांचें वर्णन येथें सूत्रमय भाषेनें केलें आहे. हें ज्ञान उपकोसलाला गार्हपत्याग्नीपासून मिळालें. हें ज्ञान संपादन करून गार्हपत्याग्नीची उपासना केल्यानें मनुष्याचा जीवनक्रम ब्रह्मवर्चस्वी होतो, असें या ज्ञानपूर्वक उपासनेचें फल आहे.

---

## अथ द्वादशः खण्डः ।

**अथ हैनमन्वाहार्यपचनोऽनुशशासापो दिशो नक्षत्राणि चन्द्रमा इति य एष चन्द्रमसि पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥ १ ॥**

अथ अन्वाहार्यपचनः एनम् अनुशशास ह । आपः दिशः नक्षत्राणि चन्द्रमाः इति । यः एषः पुरुषः चन्द्रमसि दृश्यते सः अहम् अस्मि । सः एव अहम् अस्मि इति ।

नंतर दक्षिणाग्नीनें त्या उपकोसलाला उपदेश केला कीं, जल ( पाणी ), दिशा, नक्षत्रें आणि चंद्र हीं माझीं ( दक्षिणाग्नीचीं ) स्वरूपें होत. आणि जो हा चंद्रमंडलामध्यें पुरुष दिसतो तो मी आहे. मीच तो दाक्षिणाग्नि आहे.

**स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावरपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुञ्जमोऽस्मिꣳश्च लोकेऽमुष्मिꣳश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥ २ ॥**

यः एवम् विद्वान् एतम् उपास्ते सः पापकृत्याम् अपहते । लोकी भवति । सर्वम् आयुः एति । ज्योग् जीवति । अस्य अवरपुरुषाः न क्षीयन्ते । यः एवम् विद्वान् एतम् उपास्ते तम् वयम् अस्मिन् लोके अमुष्मिन् लोके च उपभुञ्जामः।

जो याप्रमाणें जाणणारा या दक्षिणाग्नीची उपासना करितो, तो पातकांप्रत नष्ट करितो, लोकांत श्रेष्ठ होतो, पूर्णायुषी होतो, त्याचा जीवनक्रम--उज्वल तेजस्वी होतो, याच्या संततीचा क्षय होत नाहीं. जो याप्रमाणें जाणणारा या दक्षिणाग्नीची उपासना करितो त्याचें आम्ही ह्या लोकीं व परलोकीं रक्षण करितों.

## बाराव्या खंडाचा सारांश.

दक्षिणाग्नीनें गार्हपत्याप्रमाणेंच उपकोसलाला उपदेश केला आहे. जल व दिशा यांचा संबंध जोडतांना, मेघ असा अर्थ समजावा. दक्षिणाग्नि व चन्द्र यांचें तात्त्विक स्वरूप एक आहे व आप, दिशा, नक्षत्रें यांत चन्द्र हा मुख्य असून त्याच्याशीं दक्षिणाग्नीचें तत्त्वतः ऐक्य असल्यानें, इतराशीं देखील अप्रत्यक्षपणें ऐक्य आहे असें ठरतें. असें ज्ञान संपादन करूनच दक्षिणाग्नीची उपासना करावी, असें या खंडांत श्रुतीनें सांगितलें आहे. या उपासनेचें फळ पूर्वीसारखें ब्रह्मवर्चस्वप्राप्ति हेंच आहे.

---

## अथ त्रयोदशः खण्डः ।

**अथ हैनमाहवनीयोऽनुशशास प्राण आकाशो द्यौर्विद्युदिति य एष विद्युति पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥१॥**

**अथ आहवनीयः एनम् अनुशशास ह । प्राणः आकाशः द्यौः विद्युत् इति । यः एषः विद्युति पुरुषः दृश्यते सः अहम् अस्मि । सः एव अहम् अस्मि इति ।**

नंतर आहवनीय अग्नीनें ह्या उपकोसलाला उपदेश केला कीं, प्राण, आकाश, द्युलोक आणि वीज हीं चार माझीं स्वरूपें आहेत. जो हा विद्युद्रूपांत पुरुष दिसतो तो मी आहे. मीच तो (आहवनीय) आहे.

**स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावरपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुञ्जामोऽस्मिꣳश्च लोकेऽमुष्मिꣳश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥ २ ॥**

**यः एवम् विद्वान् एतम् उपास्ते सः पापकृत्याम् अपहते । लोकी भवति । सर्वम् आयुः एति ज्योग्जीवति । अस्य अवरपुरुषाः न क्षीयन्ते । यः एवम् विद्वान् एतम् उपास्ते तम् वयम् अस्मिन् लोके अमुष्मिन् लोके च उपभुञ्जमः ।**

जो याप्रमाणें जाणणारा आह्वनीय अग्नीची उपासना करितो तो पातकांप्रत नष्ट करितो, लोकांत श्रेष्ठ होतो, पूर्णायुषी होतो, त्याचा जीवनक्रम उज्जल—तेजस्वी होतो, त्याच्या संततीचा क्षय होत नाहीं. जो याप्रमाणें जाणणारा आह्वनीय अग्नीची उपासना करितो त्याचें आम्ही ह्या लोकीं व परलोकीं रक्षण करितों.

## तेराव्या खंडाचा सारांश.

आह्वनीय अग्नीनें उपकोसलाला प्राण, आकाश, द्युलोक व विद्युत्शक्तीचें आह्वनीय अग्नीशीं ऐक्य दाखविलें आहे. विद्युत् ही सर्व शक्तींमध्यें अत्यंत श्रेष्ठ असून तेजाचें तें एक मूळ तत्वच आहे. ह्या प्राणादि सर्व तत्त्वांचें ज्ञान संपादन करावें. अशी ज्ञानपूर्वक आह्वनीयाची उपासना केल्यानें मनुष्य पूर्ण ब्रह्मवर्चस्वी होतो असें त्याचें पूर्वीप्रमाणेंच फल सांगितलें आहे.

---

## अथ चतुर्दशः खण्डः ।

**ते होचुरुपकोसलैषा सोम्य तेऽस्मद्विद्यात्मविद्या चाचार्यस्तु ते गतिं वक्तेत्याजगाम हास्याचार्यस्तमाचार्योऽभ्युवादोपकोसल ३ इति ॥ १ ॥**

ते ऊचुः ह । सोम्य उपकोसल एषा ते अस्मद्विद्या आत्मविद्या च ( कथिता )। आचार्यः तु ते गतिम् वक्ता इति । अस्य आचार्यः आजगाम् ह । आचार्यः उपकोसल ३ इति तम् अभ्युवाद ।

ते ( सर्व—तीनहि—अग्नि ) म्हणाले वत्सा उपकोसला ! ही तुला अग्निविद्या व आत्मविद्या सांगितली आहे. तुझे गुरूच त्या विद्यांचें तत्व सांगतील. नंतर त्याचा गुरु सत्यकाम प्रवासाहून परत आला. गुरूनें त्याला, हे उपकोसला ! अशी हांक मारिली.

**भगव इति ह प्रतिशुश्राव ब्रह्मविद इव सोम्य ते मुखं भाति को नु त्वानु शशासेति को नु मानुशिष्याद्भो इतीहापेव निह्नुत इमे नूनमीदृशा शशासेति अन्यादृशा इतीहाग्नीनभ्यूदे किं नु सोम्य किल तेऽवोचन्निति ॥ २ ॥**

**( सः ) हे भगवः इति प्रतिशुश्राव ह । सोम्य ब्रह्मविदः इव ते मुखम् भाति । कः नु त्वा अनुशशास इति । भोः कः नु मा अनुशिष्यात् इति इह अपनिह्नुत इव अन्यादृशाः इमे ईदृशाः नूनम् इति अग्नीन् अभ्यूदे । सोम्य किम् नु ते किल अवोचन् इति ।**

तो ( उपकोसल ), महाराज ! असें म्हणाला. वत्सा ब्रह्मवेत्त्याच्या मुखासारखें तूझें मुख दिसतें. कोणी बरें तुला उपदेश केला ? (असें सत्यकामानें विचारलें). महाराज! मला कोण उपदेश करणार ? असें म्हणून त्यानें ती गोष्ट ( क्षणमात्र ) लपविल्यासारखें केलें. लगेच तो म्हणाला, परक्यासारखे असणारे हे असले ( स्वकीयासारखे झालेले ) अग्नी आहेत, असा उपकोसलानें अग्नींचा निर्देश केला. सत्यकाम म्हणाला:, हे वत्सा ! त्याअग्नींनीं तुला काय सांगितलें बरें ?

**इदमिति ह प्रतिजज्ञे लोकान्वाव किल सोम्य तेऽवोचन्नहं तु ते तद्वक्ष्यामि यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यन्त एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यत इति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच ॥ ३ ॥**

**इदम् इति प्रतिजज्ञे ह । सोम्य ते किल लोकान् वाव अवोचन् । अहम् तु ते तत् वक्ष्यामि । यथा आपः पुष्करपलाशे न श्लिष्यन्ते ( तथा ) एवंविदि पापम् कर्म न श्लिष्यते इति । मे भगवान् ब्रवीतु ( इति ) सः तस्मै उवाच ह ।**

हें असें सांगितलें, असें उपकोसल म्हणाला. ( त्यावर ) सत्यकाम म्हणाला: वत्सा ! त्या अग्नींनीं (तुला) लोक सांगितलें,

मी तुला त्यांतील तत्त्व सांगतों. ज्याप्रमाणें पाणी कमलपत्राला चिकटत नाहीं त्याप्रमाणें अशा तत्त्वज्ञान्याला पापकर्माचा लेप लागत नाहीं. तेव्हां उपकोसल म्हणालाः आपण मला त्या तत्वाचा उपदेश करा.

## चवदाव्या खंडाचा सारांश.

खण्ड १० ते १४ अखेर पर्यंतच्या पांच खंडांत उपकोसल या नांवाच्या विद्यार्थ्याची कथा आली आहे. या विद्यार्थ्याला ब्रह्मविद्या संपादन करण्याची उत्कंठा लागली होती; परन्तु त्याच्यामध्यें निरीक्षण-शक्ति व स्वतंत्र विचारसामर्थ्य हीं कितपत आहेत तें गुरूला अजमावून पहावयाचें होतें, म्हणून त्याला ब्रह्मविद्येचें शिक्षण देण्याचें काम गुरूनें दिरंगाईवर टाकलें व तो प्रवासास गेला. हेतु हा कीं, मिळालेल्या एकांताचा उपयोग करून त्याची विचारशक्ति जागृत होते कीं नाहीं तें पहावें. गुरूच्या अंदाजाप्रमाणें गोष्ट घडून आली. उपकोसल हा सत्यकामाच्या अग्निहोत्रांतील अग्नींची सेवा तत्परतेनें करीत होता. त्यावेळीं त्याची विचारशक्ति जागृत होऊन गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय हे तीन अग्नी, अग्निहोत्रादि कर्म, त्यांतील हविर्द्रव्य व त्यांचा तिन्ही अग्नींशीं येणारा संबंध या सर्व गोष्टींचें तात्त्विक स्वरूप लक्षांत घेऊन उपकोसलानें त्यांचा काळजीपूर्वक अभ्यास केला. त्यानें एकंदर बारा तत्त्वें निश्चित केलीं; परंतु त्यांचा परस्पर संबंध काय आणि ऐहिक व परमार्थिक दृष्ट्या मानवी जीवन-क्रमाला त्यांचा उपयोग काय, हें मात्र त्याला चांगलेंसें समजलें नाहीं. तें यापुढें त्याच्या गुरूनें, सत्यकामानें त्याला समजावून दिलें. ज्याप्रमाणें सत्यकामानें स्वतः अरण्यांत राहून सूक्ष्म निरीक्षण, स्वतत्र विचार व सतत प्रयत्न इत्यादि सद्गुणांच्या जोरावर दृढाभ्यास करून ब्रह्मविद्या संपादन केली, त्याप्रमाणेंच आपल्या शिष्यानें देखील स्वतंत्रपणें विचार करण्याचा प्रयत्न करावा असा सत्यकामाचा हेतु होता व तो

बऱ्याच अंशीं पूर्ण झाला असें पाहिल्यावर त्यानें त्याला उपदेश करण्यास प्रारंभ केला. या कथेंत गुरुपत्नीचा प्रेमळपणा व उपकोसलाचा दृढनिश्चय, सोशिकपणा, आणि निरलसता वगैरे सद्गुण चांगले व्यक्त होत आहेत.

---

## अथ पञ्चदशः खण्डः ।

**य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यत एष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति तद्यद्यप्यस्मिन्सर्पिर्वोदकं वा सिञ्चति वर्त्मनी एव गच्छति ॥ १ ॥**

**( सः ) उवाच ह । अक्षिणि यः एषः पुरुषः दृश्यते एषः आत्मा इति । एतत् अभयम् अमृतम् एतत् ब्रह्म इति ।तत् यदि अपि अस्मिन् सर्पिः उदकम् वा सिञ्चति तत् वर्त्मनी एव गच्छति ।**

सत्यकाम म्हणाला कीं, नेत्रांमध्यें जो हा पुरुष दिसतो तोच आत्मा आणि तेंच भयरहित असें अविनाशी तत्त्व असून, तेंच ब्रह्म होय. म्हणून जरी तूप किंवा पाणी डोळ्यांत घातलें तरी तें बाजूच्या कोपऱ्यांनाच जातें. ( तें या नेत्रस्थ पुरुषाला स्पर्श करूं शकत नाहीं. )

**एतꣳसंयद्वाम इत्याचक्षत एतꣳ हि सर्वाणि वामान्यभिसंयन्ति सर्वाण्येनं वामान्यभिसंयन्ति य एवं वेद ॥२॥**

**एतम् संयद्वाम इति आचक्षते । हि एतम् सर्वाणि वामानि अभिसंयन्ति । यः एवम् वेद एनम् सर्वाणि वामानि अभिसंयन्ति ।**

या अक्षिस्थ पुरुषाला ‘ संयद्वाम ’ असें म्हणतात. ( ज्यामध्यें सर्व प्रकारचें सौंदर्य एकत्र होतें तो, असा संयद्वाम शब्दाचा अर्थ आहे. ) कारण तो सर्व सौंदर्याचें केंद्रस्थान असतो. जो याप्रमाणें जाणतो त्याला सर्व प्रकारचें सौंदर्य प्राप्त होतें.

**एष उ एव वामनीरेष हि सर्वाणि वामानि नयति सर्वाणि वामानि नयति य एवं वेद ॥ ३ ॥**

**एषः उ एव वामनीः । हि एषः सर्वाणि वामानि नयति । यः एवम् वेद सः सर्वाणि वामानि नयति ।**

या पुरूषालाच वामनी असें म्हणतात. कारण तो सर्व प्रकारच्या सौंदर्याचा नेता असतो. जो याप्रमाणें जाणतो तो सर्व सौंदर्यविषयांचा नेता होतो.

**एष उ एव भामनीः । हि सर्वेषु लोकेषु भाति । सर्वेषु लोकेषु भाति य एवं वेद ॥ ४ ॥**

**एषः उ एव भामनीः । हि सर्वेषु लोकेषु एषः भाति । यः एवम् वेद ( सः ) सर्वेषु लोकेषु भाति ।**

या पूरुषालाच भामनी असें म्हणतात. कारण हा सर्व लोकांमध्यें ( व्यवहारांमध्यें ) प्रकाशक असतो. जो याप्रमाणें जाणतो तो सर्व लोकांमध्यें प्रकाशक होतो.

या चार मंत्रांमध्यें डोळ्यांनीं अनुभवास येणाऱ्या दर्शनशक्तीचें वर्णन आलें आहे. या शक्तींत तीन भाग पडतात. ( १ ) केन्द्रीभवन, ( २ ) गति व ( ३ ) प्रकाश ( ज्ञान ). मनुष्यानें आपल्या दर्शनशक्तीचें परीक्षण करितांना या तीनहि प्रकारांचा काळजीपूर्वक विचार करावयास पाहिजे. यांपैकीं एकाद्या ठिकाणीं दोष किंवा कमकुवतपणा असल्यास, त्या मानानें त्याची दर्शनशक्ति सदोष किंवा अपुरी ठरते; म्हणून मनुष्यानें या अक्षिपुरुषाचा म्हणजे वर सांगितलेल्या दर्शनशक्तीच्या तीन प्रकारांचा, आणि तद्द्वारां ओळखतां येणाऱ्या व त्या शक्तीला आधारभूत अशा आत्मतत्त्वाचा दृढाभ्यास करून त्याचें ज्ञान संपादन करावें. असें ज्ञान संपादन केल्यास, ऐहिक व पारमार्थिक

अशा दोनहि दृष्टींनीं मनुष्याला केवढा लाभ होतो, तें सत्यकाम ऋषीनें या मंत्रांत सांगितलें आहे.

**अथ यदु चैवास्मिञ्छव्यं कुर्वन्ति यदि च नार्चिषमेवाभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुदङ्ङेति मासाꣳस्तान्मासेभ्यः संवत्सरꣳ संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्म गमयत्येष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तन्ते नावर्तन्ते ॥ ५ ॥**

**अथ यत्उ अस्मिन् शव्यम् कुर्वन्ति यदि न एव च(कुर्वन्ति )आर्चिषम् एव अभिसंभवन्ति । अर्चिषःअहः अह्नः आपूर्यमाणपक्षम् आपूर्यमाणपक्षात् यान् षट् उदङ् मासान् तान् एति । मासेभ्यः संवत्सरम् संवत्सरात् आदित्यम् आदित्यात् चन्द्रमसम् चन्द्रमसः विद्युतम् ( इति ) तत्पुरुषः अमानवः अस्ति । सः एनान् ब्रह्म गमयति । एषः देवपथः ब्रह्मपथः । एतेन प्रतिपद्यमानाः ( जीवा ) इमम् मानवम् आवर्तम् न आवर्तन्ते न आवर्तन्ते ।**

आतां हे ज्ञानी पुरुष मृत झाले असतां त्यांचें जें और्ध्वदेहिक कर्म करितात, किंवा जरी ज्ञानी पुरुषांचें तसें और्ध्वदेहिक कोणी मुळींच केलें नाहीं तथापि, त्या ज्ञानी पुरुषांचे जीवात्मे प्रकाशकिरणांच्या स्वरूपाला प्राप्त होतात. प्रकाशकिरणांतून दिवसस्वरूपांत मिळतात. दिवसांतून शुक्लपक्षाला जातात. शुक्ल पक्षांतून जे ऊत्तरायणाचे सहा महिने त्यांप्रत जातात. त्या मासांतून संवत्सररूपास पावतात. संवत्सरांतून सूर्यमंडळास जातात. सूर्यमंडलांतून चंद्रलोकाला जातात. तेथून ते विद्युत्स्वरूप होतात. तो विद्युत्पुरुष अ-मानव ह्मणजे मनुष्यधर्माच्या पलीकडचा असून तो या ज्ञानी जीवांना ब्रह्मपदास पोंचवितो. हाच निरनिराळ्या देवतांनीं युक्त असा ब्रह्मप्राप्तीचा मार्ग होय. या मार्गानें

जाणारे ( ब्रह्मस्वरूप होणारे ) जीव या मानवी जन्ममरणाच्या भोंवऱ्यांमध्यें पुनः सांपडत नाहींत.

ब्रह्मज्ञानसंपन्न पुरुष जसा अर्चिरादिमार्गानें ब्रह्मतत्त्वाला पोहोंचतो त्याप्रमाणेंच ही अक्षिपुरुषाची दर्शनविद्या संपादन केलेला मनुष्य देखील त्याचमार्गानें कसा जातो हें दाखविण्याकरितां पुढील मंत्र आहे. तात्पर्य हें कीं, दर्शनविद्या ही देखील ब्रह्मविद्याच आहे हें लक्षांत ठेवावयास पाहिजे.

या मंत्रांत अर्चिरादि मार्गाचें वर्णन आलें आहे. या वर्णनाला अनुलक्षून बादरायणाचार्यांनीं बराच विस्तृत विचार केला आहे ( ब्र. सू. अ. ४ पा. ३ सू. १ ते ६ ). त्यात असें म्हटलें आहे कीं, उपनिषदांमध्यें ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांचीं अनेक प्रकारचीं वर्णनें आढळत असलीं तरी, त्या सर्वांचें एकीकरण होणें शक्य आहे. त्या सर्वांना मिळूनच ' अर्चिरादि मार्ग ' किंवा देवयान अशीं नांवें आहेत. सर्व मार्गांचें एकीकरण होण्याकरितां बादरायणाचार्यांनीं आणखी कांहीं गोष्टींची भर घातली आहे.

या विषयाचा विचार करीत असतां, अर्चिरादि मार्गांत प्रकाश किरणांसारखे पदार्थ, महिने, संवत्सर इत्यादि कालवाचक शब्द, सूर्य चंद्र व विद्युत् या सर्वांचा उल्लेख आलेला आहे. तीं सर्व देवतांचीं नांवें समजावीं असा ब्रह्मसूत्रकारांचा अभिप्राय आहे. या सर्व देवता जीवात्म्याला ब्रह्मापर्यंत नेऊन पोंचवितात असें त्याच प्रकरणांत म्हटलें आहे. त्याचा अर्थ इतकाच कीं, जीवात्मा आपल्या ज्ञानैश्वर्यादि सामर्थ्यानेंच या सर्व देवतास्थानांचें आक्रमण करीत असला तरी, त्या सर्व देवता त्याच्या उत्क्रांतीला सहाय्यकच होतात. प्रस्तुत सूक्तांत ( मंत्रांत ) विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे ती ही कीं, जीवात्मा विद्युत्स्वरूपाला पावल्यानंतर विद्युत् रूपी देवच त्या जीवाला ब्रह्मस्वरूपाला पोंचवितो, असें या मंत्राच्या शेवटीं मुद्दाम स्वतंत्रपणें सांगितलें आहे. विजेचा स्वाभाविक धर्मच असा आहे कीं, तिचें व्यक्त स्वरूपांतील कार्य झाल्याबरोबर ती आपल्या मूळच्या कारण

स्वरूपांत लीन होते. हा विशेष धर्म लक्षांत घेऊन श्रुतीनें स एनान् ब्रह्म गमयति असें म्हटलें आहे.

## पंधराव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडांत, सत्यकाम-ऋषीनें उपकोसलाला अध्यात्मतत्त्वांचा उपदेश करून त्यांचें फलहि सांगितलें आहे. उपकोसलाला अग्नीपासून ब्रह्माच्या आधिभौतिक व आधिदैविक स्वरूपांचें ज्ञान प्राप्त झालें होतें. ब्रह्माच्या आध्यात्मिक स्वरूपाचें ज्ञान अद्यापि त्याला पूर्णपणें झालें नव्हतें. तें तुला तुझ्या गुरूपासून प्राप्त होईल असें त्याला अग्नीनीं सांगितलें होतें. त्याप्रमाणें सत्यकाम ऋषीनें त्याला या खंडांत अध्यात्मतत्त्वांचा उपदेश केला आहे. अध्यात्म या शब्दाचा वैदिक भाषेंत प्रायः मानवी जीविताशींच संबंध असतो. सर्व बाह्य इंद्रियांत चक्षुरिन्द्रिय हें मुख्य असून तेंच ब्रह्माच्या आध्यात्मिक स्वरूपाचें केंद्रस्थान होय, अशा अभिप्रायाचें वर्णन श्रुतींत अनेक ठिकाणीं आढळतें. दर्शनशक्ति हा एक मानवी जीवनक्रमांतील महत्त्वाचा भाग आहे. या दर्शनशक्तीच्या अभ्यासांत चक्षुरिन्द्रियाचें बाह्य व अंतःस्वरूप, त्याचा अंतःकरणाशीं येणारा संबंध व तद्द्वारा येणारा आत्मसंबंध हे विषय प्रामुख्यानें येतात. या विषयांचें सांगोपांग ज्ञान झालें असतां मनुष्याला सौंदर्याचा लाभ होतो. सौंदर्याशीं शरीर, इंद्रियें, मन व बुद्धि यांचा संबंध येतो. म्हणजे शारीरिक शोभा हा एकच सौंदर्याचा भाग नसून, इन्द्रियसामर्थ्य भरपूर असणें, सद्गुण व बुद्धीचा कुशाग्रपणा या गोष्टी देखील सौंदर्यातच समाविष्ट होतात. ज्ञानपूर्वक नेत्रस्थ पुरुषाची उपासना केल्यानें मनुष्याला सौंदर्याचा लाभ होतो व तो दीप्तिमान् (भामनी) होतो. प्रभुत्व, शक्ति, सत्ता किंवा ऐश्वर्य यांचा या दीप्तिमानपणांतच अंतर्भाव होतो. श्रुतीनें सांगितलेलें हें फल बुद्धिग्राह्य असेंच आहे. याप्रमाणें या नेत्रस्थ पुरुषाच्या उपासनेच्या योगानें मनुष्य ब्रह्मवर्चस्वी होऊन शेवटीं अर्चिरादि मार्गानें ब्रह्मपदाला प्राप्त होतो.

---

## अथ षोडशः खण्डः ।

**एष ह वै यज्ञो योऽयं पवत एष ह यन्निदꣳ सर्वं पुनाति यदेष यन्निदꣳ सर्वं पुनाति तस्मादेष एव यज्ञस्तस्य मनश्च वाक्च वर्तनी ॥ १ ॥**

**यः अयम् पवते एषः वै यज्ञः। यन् एषः इदम् सर्वम् पुनाति ह। यत् एषः यन् इदम् सर्वम् पुनाति तस्मात् एषः यज्ञः एव॥ वाक् च मनः च तस्य वर्तनी ( भवतः )।**

जो हा वाहतो तो वायु हाच यज्ञ होय. गतिमान् असा हा वायु या सर्व पदार्थांना पवित्र करितो. ज्या अर्थी हा गतिमान् वायु सर्वांना पवित्र करणारा आहे त्या अर्थी तो यज्ञस्वरूपच आहे. वाणी आणि मन ह्या दोन वायुरूप यज्ञाच्या पद्धती होत.

**तयोरन्यतरां मनसा सꣳस्करोति ब्रह्मा वाचा होताध्वर्युरुद्गातान्यतराꣳ स यत्रोपाकृते प्रातरनुवाके पुरा परिधानीयाया ब्रह्मा व्यववदाति ॥ २ ॥**

**ब्रह्मा मनसा तयोः। अन्यतराम् संस्करोति। होता अध्वर्युः उद्गाता च वाचा अन्यतराम् ( संस्करोति )। यत्र प्रातरनुवाके उपाकृते ( सति ) परिधानीयायाः ( ऋचः ) पुरा सः ब्रह्मा व्यववदति।**

यज्ञांतील ब्रह्मा नांवाचा ऋत्विज, मनाच्या योगानें त्या दोहोंपैकीं दुसरीचा म्हणजे वाणीचा संस्कार करितो. आणि होता, अध्वर्यू किंवा उद्गाता यां पैकीं कोणताहि ऋत्विज वाणीनें मनाचा संस्कार करितो. त्या वेळीं प्रातरनुवाक या नांवाचें सूक्त सुरू झालें असतां, परिधानीय नांवाची ऋचा म्हणण्याचे अगोदर तो ब्रह्मा ( मौन सोडून जेव्हां ) चुकीनें भाषण करितो,

**अन्यतरामेव वर्तनीꣳ सꣳस्करोति हीयतेऽन्यतरा स यथैक-पाद् व्रजन्रथो वैकेन चक्रेण वर्तमानो रिष्यत्येवमस्य यज्ञो रिष्यति यज्ञꣳ रिष्यन्तं यजमानोऽनुरिष्यति स इष्ट्वा पापीयान्भवति ॥३॥**

**अन्यतरां वर्तनीम् एव संस्करोति। अन्यतरा हीयते। यथा एकपाद् व्रजन् ( मनुष्यः ) वा एकेन चक्रेण व्रजन् रथः रिष्यति एवम् अस्य सः यज्ञः रिष्यति । यज्ञम् रिष्यन्तम् अनु यजमानः रिष्यति। इष्ट्वा सः पापीयान् भवति।**

( त्या वेळीं ) जर ब्रह्मा दोहोंपैकीं ( मन व वाणी यांपैकीं) एकीचाच संस्कार करील तर, दुसरी नाश पावेल. ( यज्ञाच्या-दृष्टीनें निरुपयोगी होईल ). ( या एकाच वर्तनीनें—वाणी किंवा मन यांपैकीं एकाच मार्गानें तो यज्ञ चालवील तर ), ज्याप्रमाणें एका पायाचा मनुष्य चालूं लागला किंवा एकाच चाकानें रथ चालूं लागला म्हणजे तो नाश पावतो, त्याप्रमाणें (वाणी अशुद्ध असतां, नुसत्या मनाचा संस्कार करण्यानें किंवा त्याच्या उलट, म्हणजे मन व वाणी ही दोन्ही शुद्ध ठेवण्याची खबरदारी न घेईल तर ), त्याचा तो यज्ञ नाश पावतो; आणि यज्ञाच्या नाशानें यजमानाचा नाश होतो; आणि तशा यज्ञानें तो यज्ञकर्ता पापी होतो.

**अथ यत्रोपाकृते प्रातरनुवाके न पुरा परिधानीयाया ब्रह्मा व्यववदत्युभे एव वर्तनी सꣳस्कुर्वन्ति न हीयतेऽन्यतरा ॥ ४ ॥**

**अथ यत्र प्रातरनुवाके उपाकृते ( सति ) परिधानीयायाः पुरा ब्रह्मा न व्यव वदति ( तत्र ) उभे एव वर्तनी संस्कुर्वन्ति। अन्यतरा न हीयते।**

आतां ज्यावेळीं प्रातरनुवाकाला प्रारंभ झाल्यावर परिधानी-या ऋचेच्या पूर्वीं, ब्रह्मा ( अशास्त्र ) भाषण करीत नाहीं, ( मौन

सोडीत नाहीं ), त्या वेळीं मन व वाणी या दोनही वर्तनी संस्कार युक्त–शुद्ध होतात. ( त्यांपैकीं एकही बिघडत नाहीं. )

**स यथोभयपाद्व्रजन्रथो वोभाभ्यां चक्राभ्यां वर्तमानः प्रतितिष्ठत्येवमस्य यज्ञः प्रतितिष्ठति यज्ञं प्रतितिष्ठन्तं यजमानोऽनु प्रतितिष्ठति स इष्ट्वा श्रेयान्भवति ॥५॥**

**यथा उभयपात् व्रजन् वा उभाभ्याम् चक्राभ्याम् वर्तमानः रथः प्रतितिष्ठति एवम् अस्य सः यज्ञः प्रतितिष्ठति । प्रतितिष्ठन्तम् यज्ञम् अनु यजमानः प्रतितिष्ठति । सः इष्ट्वा श्रेयान् भवति ।**

ज्याप्रमाणें दोन्ही पायांनीं चालणारा मनुष्य किंवा दोन चाकांनीं चालणारा रथ नाश पावत नाहीं, ( इष्ट स्थलीं पोंचतो ) त्याप्रमाणें त्याचा यज्ञ देखील नाश पावत नाहीं ( सिद्धीस जातो ); आणि तो यज्ञ परिपूर्ण झाल्यानें यजमान कृतकृत्य होतो. असा यज्ञ केल्यावर श्रेय:संपन्न यजमान सुप्रतिष्ठित होतो.

## सोळाव्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खण्डांत प्रथम वायूलाच यज्ञ असें म्हटलें आहे. येथें वायु हा शब्द प्राणशक्तीचा बोधक आहे असें समजावें. मन व वाणी ही प्राण-तत्त्वाशीं संबद्ध असतात. म्हणून मन किंवा वाणी यांच्या गुणदोषांचे परिणाम प्राणवायूवर घडणें स्वाभाविकच आहे असें दर्शविण्याकरितां श्रौत-यज्ञांतील एक विशिष्ट प्रकार दृष्टांतादाखल घेतला आहे. प्रातरनुवाकाचे पठन चालू असतां ब्रह्मयानें मौन धारण करावें असा नियम आहे. प्रातरनुवाकाचें एकाग्र चित्तानें श्रवण करून त्यांत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मयानें आपली वाणी व मन शुद्ध ठेवावें, असा या नियमाचा अभि-प्राय आहे. या बाबतींत ब्रह्मयानें चूक केल्यास यज्ञ निष्फळ होऊन तो हानिकारक होतो. परंतु नियमास अनुसरून ब्रह्मयानें आपली वाणी व मन

सुसंस्कृत ठेविली तर यज्ञ सफल होऊन तो कल्याणकारक होतो. यावरून वाचिक व मानसिक संस्कारांचें महत्त्व किती आहे तें या खंडांत श्रुतीनें स्पष्ट केलें आहे.

---

## अथ सप्तदशः खण्डः ।

**प्रजापतिर्लोकानभ्यतपत्तेषां तप्यमानानाꣳ रसान्प्रावृहदग्निं पृथिव्या वायुमन्तरिक्षादादित्यं दिवः ॥ १ ॥**

प्रजापतिः लोकान् अभ्यतपत् । तप्यमानानाम् तेषाम् रसान् प्रावृहत् । पृथिव्याः अग्निम् अन्तरिक्षात् वायुम् दिवः आदित्यम् ।

सृष्टिकर्ता ब्रह्मदेव, पृथ्वी, अन्तरिक्ष व द्युलोक यांना तापविता झाला व तप्त होणाऱ्या त्यांचे रस म्हणजे प्रधान अंश काढिता झाला; म्हणजे पृथ्वीपासून अग्नि, अन्तरिक्षापासून वायु व द्युलोकापासून सूर्य ( हे रस प्रजापतींनें काढले ).

प्रस्तुत मंत्रांत अग्नि, वायु व आदित्य यांच्या उत्पत्तीचें वर्णन आलंकारिक रीतीनें केलें आहे. हें वर्णन फारच मार्मिक आहे. प्रजापतीनें त्रैलोक्याचें संशोधन करून त्याचें पृथक्करण केलें; आणि अग्नि व पृथ्वी, वायू व अंतरिक्ष, सूर्य व द्युलोक यांचा कार्यकारणभाव निश्चित केला. येथें प्रजापतीचा उल्लेख केवळ पूज्यभावदर्शक आहे. कोणा तरी विद्वान् अशा प्राचीन ऋषीनें केलेल्या भौतिक शास्त्राच्या प्राथमिक संशोधनाचें हें वर्णन आहे. तें प्राथमिक असलें तरी, अत्यंत मार्मिक असून श्रुतीनें त्याचें वर्णन मनोरंजक भाषेनें केलें आहे. यांतील प्रजापति शब्दानें सामान्यतः वेद हा लाक्षणिक अर्थहि घेतां येईल.

**स एतास्तिस्रो देवता अभ्यतपत्तासां तप्यमानानाꣳ रसान्प्रावृहदग्नेर्ऋचो वायोर्यजूꣳषि सामान्यादित्यात् ॥ २ ॥**

**सः एताः तिस्रः देवताः अभ्यपतत् । तप्यमानानाम् तासाम् रसान् प्रावृहत् । अग्नेः ऋचः वायोः यजूंषि आदित्यात् सामानि ।**

तो प्रजापति त्या तीनहि देवतांना तापविता झाला; ( आणि ) तापणाऱ्या त्या देवतांचे रस ( सार ) काढिता झाला. म्हणजे अग्नीपासून ऋचा ( वृत्तबद्ध वैदिक वाक्यें ), वायूपासून यजु ( वैदिक गद्य वाक्यें ) आणि सूर्यापासून सामें ( गायनोपयोगी वैदिक वाक्यें ) ( असे रस त्यानें काढले ).

ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे अनुक्रमें अग्नि, वायु व आदित्य या देवतांपासून प्रजापतीनें उत्पन्न केले असें या मंत्रांत म्हटलें आहे. त्याचा अभिप्राय असा कीं, या तीनहि वेदांत अनुक्रमें ह्या तीन देवता प्रमुख असून मुख्यत्वेंकरून त्यांचेंच वर्णन त्या त्या वेदांत आलें आहे.

**स एतां त्रयीं विद्यामभ्यतपत्तस्यास्तप्यमानाया रसान्प्रावृहद्भूरित्यृग्भ्यो भुवरिति यजुर्भ्यः स्वरिति सामभ्यः ॥ ३ ॥**

**स एताम् त्रयीम् विद्याम् अभ्यतपत् । तप्यमानायाः तस्याः रसान् प्रावृहत् । भूः इति ऋग्भ्यः भुवः इति यजुर्भ्यः स्वः इति सामभ्यः ।**

तो प्रजापति, या तीनाहि प्रकारच्या वेदविद्येला तापविता झाला. तप्त झालेल्या त्या विद्यांचे रस ( सार ) काढिता झाला. म्हणजे भूः असा शब्द ऋचापासून भुवः हा शब्द यजूंपासून आणि स्वः हा शब्द सामांपासून ( त्यानें काढला ).

तीन वेदांपासून तीन व्याहृति शब्दांची उत्पत्ति झाली असें या मंत्रांत सांगितलें आहे. सांप्रतकालीं सात व्याहृति प्रसिद्ध आहेत; परंतु तीनच व्याहृति प्रथम रूढ झाल्या व पुढें निरनिराळ्या ऋषींनीं त्यांत आणखी भर घातल्यामुळें त्यांची सात ही संख्या वाढली. महाचमस्य नांवाच्या ऋषीनें 'महः' ही चवथी व्याहृति या तीन व्याहृतींना जोडली असें तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें आहे ( उ. नि. र. प्र. तैत्ति. शीक्षा. अनुवाक ५ ).

शीक्षा अध्यायाच्या या पांचव्या अनुवाकांत व्याहृतींचेंच सविस्तर विवेचन करण्यांत आलें आहे, तें छांदोग्यांतील प्रस्तुत वर्णनास धरूनच आहे.

**तद्यदृक्तो रिष्येद्भूः स्वाहेति गार्हपत्ये जुहुयादृचामेव तद्रसेनर्चां वीर्येणर्चां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥ ४ ॥**

**तत् यत् ऋक्तः ऋष्येत् भूः स्वाहा इति गार्हपत्ये जुहुयात्। तत् ऋचाम् एव ( अस्ति )। ऋचाम् रसेन ऋचाम् वीर्येण यज्ञस्य विरिष्टम् संदधाति।**

म्हणून, जेव्हां ऋचेसंबंधीं चूक होईल ( तेव्हां) भूः स्वाहा या मंत्रानें गार्हपत्याग्नीला आहुति समर्पण करावी. ( कारण ) ‘ भूः स्वाहा ’ हें पद ऋचांशींच संबद्ध आहे. (म्हणून) ऋचांच्या रसानें किंवा ऋचांच्या सामर्थ्यानें यज्ञांत पडलेला खंड जोडला जातो. ( यज्ञ अखंडित होतो ).

**स यदि यजुष्टो रिष्येद्भुवः स्वाहेति दक्षिणाग्नौ जुहुयाद्यजुषामेव तद्रसेन यजुषां वीर्येण यजुषां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति॥५॥**

**सः यदि यजुष्टः ऋष्येत् भुवः स्वाहा इति दक्षिणाग्नौ जुहुयात्। तत् यजुषाम् एव ( अस्ति )। यजुषाम् रसेन यजुषाम् वीर्येण यज्ञस्य विरिष्टम् संदधाति।**

अथवा, ऋत्विजाच्या हातून यजुर्वेदाविषयीं म्हणजे यज्ञांत म्हणावयाच्या वैदिक गद्यभागाविषयीं चूक झाली तर, ( त्यानें ) भुवः स्वाहा या मंत्रानें दक्षिणाग्नीमध्यें आहुति द्यावी. कारण भुवः हे पद यजुर्वेदाशीं संबद्ध आहे. म्हणून यजुर्वेदाच्या रसानें किंवा यजुर्वेदाच्या सामर्थ्यानें यज्ञांत पडलेला खण्ड जोडला जातो. ( यज्ञ अखंडित होतो. )

**अथ यदि सामतो रिष्येत्स्वः स्वाहेत्याहवनीये जुहुयात्साम्नामेव तद्रसेन साम्नां वीर्येण साम्नां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥ ६ ॥**

**अथ यदि सामतः रिष्येत् स्वः स्वाहा इति आहवनीये जुहुयात् । तत् साम्नाम् एव ( अस्ति )। साम्नाम् रसेन साम्नाम् वीर्येण यज्ञस्य विरिष्टम् संदधाति ।**

अथवा जर, सामवेदाच्या बाबतींत चूक होईल तर, स्वः स्वहा या मंत्रानें आहवनीय अग्नींत आहुति द्यावी. कारण स्वः हें पद सामवेदाशीं संबद्ध आहे. म्हणून सामवेदाच्या रसानें किंवा सामवेदाच्या वीर्यानें यज्ञांत पडलेला खंड जोडला जातो. ( यज्ञ अखांडत होतो. )

**तद्यथा लवणेन सुवर्णꣳ संदध्यात्सुवर्णेन रजतꣳ रजतेन त्रपु त्रपुणा सीसꣳ सीसेन लोहं लोहेन दारु दारु चर्मणा ॥ ७॥**

**तत् यथा लवणेन सुवर्णम् सुवर्णेन रजतम् रजतेन त्रपु त्रपुणा सीसम् सीसेन लोहम् लोहेन दारु चर्मणा दारु ( संदध्यात् ) ।**

ज्याप्रमाणें टांकणखारानें सोनें, सोन्यानें रुपें, रुप्यानें कथील, कथिलानें शिसें, शिशानें लोखंड, लोखंडानें लाकूड किंवा कांतड्यानें लांकूड सांधिलें जातें; ( पक्कें जोडतां येतें )

**एवमेषां लोकानामासां देवतानामस्यास्त्रय्या विद्याया वीर्येण यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति भेषजकृतो ह वा एष यज्ञो यत्रैवंविद्ब्रह्मा भवति ॥ ८ ॥**

**एवम् एषाम् लोकानाम् आसाम् देवतानाम् अस्याः त्रय्याः विद्यायाः वीर्येण यज्ञस्य विरिष्टम् संदधाति । यत्र एवंवित् ब्रह्मा भवति एषः यज्ञः भेषजकृतः वै भवति ह ।**

त्याप्रमाणें ह्या पृथिव्यादि लोकांच्या, ह्या अग्नी वगैरे देवतांच्या आणि ह्या ऋग्वेदादि वेदत्रयीच्या सामर्थ्यानें यज्ञांतील उणीव, तो ( ब्रह्मा ) भरून काढितो. ज्या यज्ञामध्यें ज्ञानविज्ञान-

संपन्न असा ब्रह्मा असतो तो यज्ञ औषधाप्रमाणें ( निश्चित हितकारक ) होतो.

मंत्र ७ व ८ यांमध्यें सहाव्या मंत्राच्या अखेरपर्यंत करण्यांत आलेल्या विवेचनाचा निष्कर्ष सांगितला आहे. वेद, देवता व व्याहृति, पृथिव्यादि लोक इत्यादिकांच्या ज्ञानानें यज्ञकर्म कसें अखंडित करितां येतें तें सांगितलें आहे. अशा प्रकारचा अखंडित यज्ञ कर्त्याला कल्याणकारक होतो. आधिभौतिक, आधिदैविक इत्यादि सर्व विद्या यज्ञाशीं संलग्न झाल्या असल्यामुळें या सर्व विद्यांपासून समाजाला होणारा फायदा यज्ञाच्या द्वारानें होत होता, अशा अभिप्रायानेंच यज्ञाला औषध रसायन असें येथें म्हटलें आहे. या सर्व विद्यांचें ज्ञान यज्ञसंस्थेचा अध्यक्ष जो ब्रह्मा त्याला असणें अत्यंत अगत्याचें आहे. सातव्या मंत्रांत आलेलीं उदाहरणें वैदिक ऋषींच्या व्यापक बुद्धिमत्तेचीं निदर्शक आहेत. त्या उदाहरणांवरून उपनिषद्‌काळांतील वैदिक समाजाचा व्यवहार भौतिक दृष्ट्या देखील रानटी स्थितींत मुळींच नव्हता असें निःसंशय सिद्ध होतें.

**एष ह वा उदक्प्रवणो यज्ञो यत्रैवंविद्ब्रह्मा भवत्येवंविद्ँ ह वा एषा ब्रह्माणमनुगाथा यतो यत आवर्तते तत्तद्गच्छति ॥ ९ ॥**

**यत्र एवंवित् ब्रह्मा भवति ( तत्र ) एषः यज्ञः वै उदक्प्रवणः ( भवति ) ह । एवंविदम् ब्रह्माणम् वै एषा अनुगाथा अस्ति ह । यतः यतः आवर्तते तत् तत् गच्छति ।**

जेथें याप्रमाणें जाणणारा ब्रह्मा नांवाचा ऋत्विज असतो तो यज्ञ खरोखर उन्नतिकारक होतो. अशा प्रकारच्या विद्वान् ब्रह्मा नामक ऋत्विजाला अनुलक्षून ही अनुगाथा (म्हणजे परंपरागत श्लोक किंवा म्हण ) आहे. कर्मामध्यें जेथें जेथें बिघाड येतो तेथें तेथें ब्रह्मा जातो. म्हणजे सर्व कर्मावर नजर ठेवून तें सर्व यथासांग घडवून आणितो.

**मानवो ब्रह्मैवैक ऋत्विक्कुरूनश्वाभिरक्षत्येवंविद्ध वै ब्रह्मा यज्ञं यजमान१ं सर्वा१ंश्चर्विजोऽभिरक्षति तस्मादेवंविदमेव ब्रह्माणं कुर्वीत नानेवंविदं नानेवंविदम् ॥ १० ॥**

**एवंवित् ब्रह्मा मानवः ऋत्विक् । एवंवित् ब्रह्मा एकः ( अपि यथा ) अश्वा कुरून् अभिरक्षति एवम् यज्ञम् यजमानम् सर्वान् ऋत्विजः च अभिरक्षति । तस्मात् एवंविदम् एव ब्रह्माणम् कुर्वीत । अनेवंविदम् न कुर्वीत ।२**

अशा प्रकारचा ब्रह्मा सर्वांत पूज्य ऋत्विज होय. अशा प्रकारचा ब्रह्मा एकटा असला तरी, ज्याप्रमाणें घोडी उत्तर कुरूंचें त्या देशांतील सर्वांचें रक्षण करिते, त्याप्रमाणें ( तो ) यज्ञाचें, यजमानाचें आणि सर्व ऋत्विजांचें संरक्षण करितो. म्हणून, अशा विद्वानालाच ब्रह्मा करावें. असा विद्वान् नसेल त्याला ब्रह्मा कधींहि करूं नये. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

## सतराव्या खंडाचा साराश.

१६ व्या खंडाच्या प्रारंभीं वायूला यज्ञ म्हटलें आहे. यज्ञ हा पवित्र करणारा असतो, त्याप्रमाणें वायुहि पवित्र करणारा आहे असें कारण सांगितलें आहे. वायूमध्यें अनेक प्रकारचें मिश्रण आहे. त्या सर्वांत प्राणवायु हा मुख्य असून तोच सर्वांना पवित्र करणारा आहे. या प्राणवायूच्या साहाय्याखेरीज प्राणिमात्रांचे कोणतेच व्यवहार चालूं शकत नाहींत. किंबहुना, निसर्गांतील ज्वलनक्रियेला देखील प्राणवायूचीच अपेक्षा असते. म्हणून प्राणवायूलाच मुख्यत्वेंकरून यज्ञ असें म्हटलें आहे; आणि म्हणूनच मन व वाणी ह्या त्या यज्ञाच्या वर्तनी म्हणजे कार्य करण्याचे मार्ग होत असें सांगितलें आहे. हा संबंध श्रौत यज्ञांमध्यें सुद्धां श्रुतींनीं कसा कायम ठेविला आहे तें दाखविण्याकरितां दृष्टांत म्हणून सोळाव्या खंडांतील तिसऱ्या चवथ्या सूक्तापासून सतराव्या खंडाच्या अखेरपर्यंत यज्ञ

प्रकरण आलें आहे. या प्रकरणांत ब्रह्मा या नांवाच्या ऋत्विजाचा उल्लेख पुष्कळदां आला आहे. कारण यज्ञांत काम करणाऱ्या सर्व ऋत्विजापेक्षां त्याची योग्यता फारच मोठी आहे. म्हणून अत्यंत विद्वान्, स्वतंत्रपणें विचार करण्याला समर्थ, दक्ष व समयसूचक अशा मनुष्यालाच ब्रह्मा नेमला पाहिजे. भौतिक, आधिदैविक, वैदिक, आध्यात्मिक इत्यादि विद्यांचें ज्ञान या ब्रह्म्यास असलें पाहिजे. उत्तर कालांत यांतील कांहीं विद्या बुडाल्या तरी, कांहीं विद्यांची निरुपयोगी कोटिक्रमाच्या पद्धतीनें अनावश्यक वाढ झाली; म्हणजे मूळ विद्येंत भर न पडतां शब्दजाल मात्र वाढलें. त्यामुळें या सर्व विद्या एका मनुष्यानें संपादन करणें ही गोष्ट असंभवनीय वाटूं लागली. त्यांचें मूळ स्वरूप, त्यांतील विषयांप्रमाणेंच प्राचीन काळीं आटोपसर असेंच होतें, म्हणून ब्रह्मा या सर्व विद्यांनीं संपन्न असावा असें येथें श्रुतीनें सांगितलें आहे व हा श्रुतीचा कडक निर्बंध आहे.

---

## चवथ्या अध्यायाचा उपसंहार

तत्त्वज्ञानाच्या इतिहासाच्या दृष्टीनें हा चवथा अध्याय पुष्कळच महत्वाचा आहे. या आध्यायांत ऐतिहासिक तीन कथा आल्या आहेत. रैक्व नांवाच्या ऋषीपासून जानश्रुतिपौत्रायण नांवाच्या राजाला अध्यात्म-विद्येचा उपदेश कसा मिळाला याविषयींची हकीकत पहिल्या कथेंत आली आहे. समाजांत श्रेष्ठ कोणाला समजावें, म्हणजे श्रेष्ठत्वाची गमकें कोणतीं, या प्रश्नाचें स्पष्टीकरण करण्याकरितां धर्मशास्त्रकारांनीं श्रेष्ठत्वाचीं पांच गमकें सांगितलीं आहेत. पैसा, कुल ( बंधु ), वय, कर्तृत्व व विद्या हींच तीं पांच गमकें होत. यांत पहिल्यापेक्षां दुसरें, दुसऱ्यापेक्षां तिसरें, अशा क्रमानें शेवटच्या विद्येला अधिक महत्त्व येतें. परंतु परिस्थितीप्रमाणें यांत थोडी फार उलटापालट होण्याचाहि संभव असतो. तें कसेंहि असलें तरी, श्रेष्ठत्वाचें गमक म्हणून ब्रह्मज्ञानाचा या पांचांत समावेश होत नाहीं आणि म्हणूनच श्रेष्ठ म्हणजे ब्रह्मवेत्ता असा अर्थ करणें बरोबर होत नाहीं

अशी कित्येकांची समजूत झालेली दिसते; परंतु ही समजूत अगदींच युक्ति-शून्य व श्रुतिविरुद्ध आहे असें प्रस्तुतच्या आध्यायाच्या पहिल्या खंडातील हंसांच्या भाषणावरून निःसंशय सिद्ध होतें. रैक्वऋषि दरिद्री होता, अर्थात् तो दानशूर नव्हता हें निराळें सांगावयास नको. रैक्वाच्या कर्तबगारीविषयीं देखील हंसानें उल्लेख केलेला नाहीं. त्यावरून श्रीमंत, दानशूर व कर्तब-गार असा जानश्रुति राजा रैक्वापेक्षां श्रेष्ठ आहे असें वाटणें स्वाभाविक होतें; पण रैक्वाच्या ब्रह्मविद्येपुढें ब्रह्मज्ञान नसलेल्या जानश्रुतीचे हे सर्व गुण फिकेच ठरले. यावरून ब्रह्मज्ञान हेंच श्रेष्ठत्वाचें पहिल्या प्रतीचें गमक होय, बाकीचीं सर्व गमकें त्यापेक्षां कमी दर्जाचीं आहेत, असें ठरते. अर्थात् विद्या ह्या शब्दाच्या अर्थांतून ब्रह्मज्ञान केव्हांहि वगळतां येणार नाही.

जानश्रुति राजानें प्रथम देऊं केलेली दक्षिणा, विद्येच्या महत्वाच्या मानानें अगदींच कमी दर्जाची होती म्हणून, रैक्व ऋषीनें ती घेण्याचें नाकारिलें; त्यामुळें राजानें भरपूर दक्षिणा देऊन, तिच्या बरोबर आपली कन्याहि अर्पण केली, तेव्हां ऋषीची स्वारी संतुष्ट होऊन, राजाला ज्ञानोपदेश करण्यास तयार झाली. रैक्व ऋषि जांवई व जानश्रुति हा सासरा असें या दोघांचें नातें आता उत्पन्न झालें; आणि आपल्या पुत्रतुल्य अशा जामा-ताचा श्वशुर जानश्रुति हा शिष्य झाला, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. जानश्रुति व रैक्व या दोघांत घडलेल्या या व्यवहारावरून रैक्व ऋषीच्या त्याग-वृत्तीविषयीं गैरसमज होण्याचा संभव आहे. तो असा कीं, रैक्व ऋषि ज्ञानी होता पण विरक्त नव्हता. कारण, त्यानें राजापासून अधिक दक्षिणा घेतली व राजाच्या मुलीबरोबर विवाह देखील केला. रैक्व ऋषीचें हें आच-रण वैराग्याच्या विरुद्ध झालें असें सकृद्दर्शनीं वाटलें तरी, विचाराअंतीं त्याचें वैराग्य या गोष्टीनें कमी ठरत नाहीं असेंच कबूल करावें लागेल. या गोष्टीचा विचार करितांना, व्यवहार व ब्रह्मज्ञान हे दोन विषय तमःप्रकाशासारखे एकमेकांच्या विरुद्ध आहेत, ही कल्पना अजिबात

टाकून दिली पाहिजे. ती श्रुतिसंमत तर नाहींच, उलट त्या दोहोंची परस्परानुकूलताच श्रुतीस अभिप्रेत आहे, ही गोष्ट प्रथमतः लक्षांत ठेविली पाहिजे. जानश्रुति राजा, आपणापासून ज्या ब्रह्मविद्येची अपेक्षा करितो आहे, तिची योग्यता जानश्रुतीला पूर्णपणें कळलेली आहे कीं नाहीं व त्या विद्येची त्याला खरोखर उत्कट इच्छा आहे कीं नाहीं, हें पाहण्याचाही ऋषीचा उद्देश असावा. आपण झिडकारलें तरी न रागावतां, राजानें पुनः भरपूर दक्षिणा देऊन उपदेश करण्याविषयीं प्रार्थना केली असें पाहिल्यावरच, रैक्व ऋषीनें त्याला उपदेश केला. यांत ब्रह्मविद्येविषयीं रैक्वाचा सात्विक सदभिमान व राजाची उत्कट इच्छा व्यक्त होते. कोणतीहि विद्या सत्पात्र अशा शिष्यालाच द्यावी हा नियम वैदिक धर्मांत प्राचीन कालापासून शिष्टसंमत झालेला आहे. शिष्याची पात्रता त्याच्या व्यवहारावरूनच ठरवावी लागणार हें उघड आहे. या पात्रतेचीं गमकें मनुस्मृतिकारांनीं सांगितलीं आहेत. मनुस्मृतिकारांनीं हीं गमकें वैदिक इतिहासावरूनच निश्चित केलीं असलीं पाहिजेत यांत शंका नाहीं. या विषयाचें विशेष स्पष्टीकरण तैत्तिरीय उपनिषदांतील शीक्षाध्याया-च्या उपसंहारांत झालें आहे [ उ. नि. र. प्र. तै. पृ. ७६ ].

जानश्रुति जातीनें क्षत्रिय व वर्णानें–धंद्यानें शूद्र होता असें मागें दाखविलेंच आहे. रैक्व आणि जानश्रुति यांचा शरीरसंबंध झाला पण रैक्वानें त्याला शूद्र म्हटलें आहे त्यावरून, जानश्रुति हा जातीनें शूद्र होता कीं काय ! या प्रश्नाला ब्रह्मसूत्रकारांनीं बरेंच महत्व दिलें आहे. जातीनें जानश्रुति शूद्र नाहीं असें ठरविण्याकरितां सूत्रकारांनीं चैत्ररथाचा उल्लेख केला आहे. रैक्वानें जानश्रुतीला उपदेश करितांना, अभिप्रतारी व शौनक यांची कथा सांगितली आहे. हे दोघे भोजनाकरितां बसले असतां, त्यांचा एका ब्रह्मचाऱ्याशीं झालेला संवाद रैक्वानें वर्णन केला आहे. चैत्ररथ हें या अभिप्रतारीचें कुलनाम आहे व शौनकाचें कापेय असें कुलनाम आहे. कापेय घराण्याकडे चैत्ररथ घराण्याचें पुरोहितत्व असल्याविषयीं तांड्य

ब्राह्मणांत स्पष्ट उल्लेख आहे. यावरून चैत्ररथ अभिप्रतारी हा जातीनें क्षत्रिय आहे असें सिद्ध होत असून, त्याचा या जानश्रुतीच्या उपदेश-प्रकरणांत उल्लेख आला असल्यानें, चैत्ररथाप्रमाणें जानश्रुति देखील क्षत्रिय-च असावा असें सूत्रकारानीं ठरविलें आहे. सूत्रकारांचें हें अनुमान बरेंच दूरान्वित वाटतें. जानश्रुति हा चैत्ररथ घराण्यांतील होता असें दाखवितां आलें असतें तर गोष्ट निराळी होती; परंतु सूत्रकाराला तसें दाखवितां आलें नाहीं ही गोष्ट खरी. तथापि, जानश्रुति वर्णानें शूद्र असला तरी, तो ब्रह्मविद्येस अनधिकारी नव्हता असें बृहदारण्यक श्रुतीवरून सूत्रकारास दाखवितां आलें असतें. पण बादारयणाचार्यांनीं तसें कां दाखविलें नाहीं तें कळत नाहीं. जात व वर्ण हीं ब्रम्हसूत्रकारांच्या वेळीं एक झालीं होतीं म्हणून, जानश्रुति वर्णानें शूद्र असला तरी जातीनें नव्हता, या गोष्टीस सूत्रकारानीं महत्व दिलें नसावें असें अनुमान करण्यास जागा आहे. विवाहाचा संबंध जातीशीं येतो, वर्णाशीं किंवा धंद्याशीं येत नाहीं, म्हणून रैक्क ऋषीनें जानश्रुतीच्या कन्येशीं विवाह केला, असें समजण्यास हरकत नाहीं. वस्तुतः जातीचा निश्चय जन्माप्रमाणें गुणांवरून देखील त्यावेळीं केला जात असे, हें सत्यकाम जाबालाच्या पूर्ववृत्तावरून उघड दिसून येतें. जानश्रुतीसारखा श्रीमंत, दानशूर व विद्याभिलाषी असा मनुष्य जातीनें शूद्र असला तरी, सत्यकाम जाबालाप्रमाणें, गुणांवरून शूद्र नसून द्विज आहे असे ठरविण्यास त्यावेळीं मुळींच हरकत नव्हती. रैक्क ऋषीनें तसेंच ठरवून जानश्रुतीच्या मुलीचें पाणिग्रहण केलें असावें असेंही अनुमान करितां येईल. तात्पर्य इतकेंच कीं, रैक्काचा विवाह किंवा सत्यकाम जाबालाचें उपनयन हे व्यवहार ज्या काळांत घडले, त्या काळांत जातीचा निश्चय केवळ जन्मावरच अवलंबून नसून तो गुणांवरूनहि केला जात असे असें निःसंशय ठरतें.

'भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ।' असें केनोपनिषदांत वाक्य आहे. सत्यकाम जाबालानें केलेलें ब्रह्मविद्येचें अध्य-

यन हें केनोपनिषदांतील वरील वाक्याचें प्रत्यक्ष उदाहरणच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. अरण्यांत राहून, गुरूनें दिलेल्या गायींचें पालन-पोषण करूनच सत्यकाम थांबला नाहीं; त्यानें ब्रह्मतत्त्वाचा विचार करून ब्रह्मविद्येंतील महत्वाच्या सिद्धाताचें संशोधन केलें. सर्व दिशा व त्या दिशानां भरून राहिलेलें आकाश हा ब्रम्हाचा अंशच आहे असें त्याच्या प्रथम लक्षांत आलें. सूर्यचंद्रादिकाचे प्रकाशकिरण पृथ्वीपर्यंत आणून पोंचाविण्याचें काम हें आकाशच करितें. आकाशामध्यें ही प्रकाशवाहक शक्ति नसती तर, सूर्यादिकांचें प्रकाशकिरण आपल्याला नेहमीं मिळतात तसे ते मिळाले नसते. याच अभिप्रायानें ब्रह्माच्या या अंशाला प्रकाशवान् असें नांव देण्यांत आलें आहे. जो या प्रकाशवान् अंशाची उपासना करितो तो चमकणारा—प्रभावशाली होतो. हें ज्ञान सत्यकामाला वृषभानें सांगितलें असें आलंकारिक रीतीनें वर्णन केलें आहे, त्याचा अर्थ असा कीं, स्वच्छंदाने संचार करून हृष्टपुष्टांग झालेल्या बैलाकडे पाहून सत्यकामानें विचार केला व या निरीक्षणाच्याच योगानें त्याचा हा सिद्धांत बसला. याप्रमाणेंच, रात्रीच्या वेळीं अग्नीच्या समीप बसून त्याने विचार केला, तेव्हां त्याला विश्वाचें अनंतत्व नीट कळून आलें. तेजस्वी हंसाचें नीट निरीक्षण करून त्यानें विश्वांतील तेजोमय तत्वांचा निश्चय केला; आणि पाण्यांत बुडणाऱ्या पक्ष्याकडे पाहून त्यानें प्राणतत्वाचें संशोधन केलें. याप्रमाणें सत्यकामानें आपल्या निरीक्षणसामर्थ्याचा उपयोग करूनच ब्रह्मज्ञान संपादन केलें व तो पूर्ण ब्रह्मवेत्ता झाला. तुलनात्मक विचारशक्ति, तीव्र बुद्धिमत्ता, उत्कट जिज्ञासा, इत्यादि गुणांच्या जोरावरच सत्यकामाला ब्रह्मविद्या संपादन करितां आली. अशा स्वावलंबनानें संपादन केलेली ब्रह्मविद्या मनुष्याला पूर्ण कल्याणकारक होते असें सत्यकामाला कळून चुकलें; म्हणूनच त्याचा शिष्य जो उपकोसल त्यानें देखील अशा स्वावलंबनानेंच ब्रह्मविद्या संपादन करावी असा सत्यकामाचा उद्देश होता. या हेतूस्तव पत्नीनें

उपकोसलाबद्दल रदबदली केली असतांहि तिकडे दुर्लक्ष करून तो प्रवासाला निघून गेला, असें सत्यकामाच्या चरित्राच्या उत्तरार्धांत सांगितलें आहे; सत्यकामाच्या हेतूप्रमाणें, उपकोसलानें अग्नीपासून ब्रह्मज्ञान संपादन केलें. तेव्हां सत्यकामाला त्याबद्दल आनंद वाटला यांत नवल नाहीं. उपनिषदांतील या सत्यकामादिकाच्या वर्णनास अनुलक्षूनच, एखाद्या गुरूकडे न जातां स्वावलंबनानेंच ब्रह्मज्ञान संपादन करणें शक्य आहे, असें भगवान् श्रीकृष्णानें गीतेंत सांगितलें आहे. (गीता४. ३८र. दी. पृ. १४९). या स्वावलंबनाच्या मार्गांत निरीक्षणाभ्यास हाच मुख्य असतो. श्रीमद्भागवतांत यदु राजास भेटलेल्या अवधूतानें आपण चोवीस गुरूपासून उपदेश घेतला असें सांगितलें, त्याचा अभिप्राय देखील हाच आहे. बुद्धिमत्ता, जिज्ञासा इत्यादि गुणांनीं निरीक्षणशक्ति पूर्ण जागृत झाल्यावर ही सर्व सृष्टि ब्रह्मज्ञान संपादन करण्याचे कामीं त्याला उपयोगांत आणितां येते. किंबहुना, सृष्टिरचनेंतील परमेश्वराचा तो एक हेतुच आहे. जीवाला ब्रह्मज्ञान संपादन करितां यावें या हेतूनेंच परमात्मा नानाविध सृष्टीच्या रूपानें प्रकट झाला आहे, असें बृहदारण्यकोपनिषदांत स्पष्ट सांगितलें आहे ( उ. नि. र. प्र. बृह. अ. २ ब्रा. ५ मं. १९ पृ. ११२ ते ११५ ). यावरून, विज्ञान ( आधिभौतिक ज्ञान ) हें जसें सामर्थ्यसंपादनाचें अद्वितीय साधन आहे तसेंच तें ब्रम्हज्ञान संपादन करण्याचेंहि श्रेष्ठ साधन होय असें ठरतें. निरीक्षणाभ्यासानें ब्रह्मज्ञान संपादन करावयाचें म्हटलें म्हणजे, विज्ञानशास्त्राची योग्यता कबूलच करावयास पाहिजे; व याच उद्देशानें दशोपनिषदांत आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक अशा नानाविध शक्तींचें वर्णन करण्यांत आलें आहे. औपनिषद् विद्येचा हा अभिप्राय ओळखून सृष्टपदार्थांच्या निरीक्षणानें ब्रह्मज्ञान संपादन केल्यास, केनोपनिषदांत सांगितल्याप्रमाणें मनुष्याला अमृतत्वाची प्राप्ति होते. सत्यकाम किंवा उपकोसल यांचीं चरित्रें वरील नियमांच्या सिद्धतेकरितां श्रुतीनें येथें नमूद केलेलीं आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

# पञ्चमोऽध्यायः।

## अथ प्रथमः खण्डः।

**यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद ज्येष्ठश्च ह वै श्रेष्ठश्च भवति प्राणो वाव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ॥१॥**

**यः वै ज्येष्ठम् च श्रेष्ठम् च वेद ह सः ज्येष्ठः च श्रेष्ठः च वै भवति ह। प्राणः वाव ज्येष्ठः च श्रेष्ठः च ( अस्ति )।**

जो कोणी ज्येष्ठ व श्रेष्ठ ( प्राण ) ह्याला जाणतो ( उपासना करितो ) तो सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. प्राण हाच सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे.

या मंत्रांत श्रेष्ठ हा शब्द रूढ अर्थाचाच आहे. पण ज्येष्ठ शब्दाचा अर्थ व्यापकपणानेंच घ्यावयास पाहिजे. सर्व ब्रह्मांडाच्या दृष्टीनें पाहिल्यास सर्वांच्या अगोदर ब्रह्मतत्त्वापासून प्राणशक्तीच उत्पन्न झाली आहे. म्हणून सृष्टींत एकंदर पदार्थांच्या मानानें प्राण हाच ज्येष्ठ म्हणजे सर्वांहून वडील ठरतो. त्याप्रमाणेंच प्राणिमात्रांच्या देहांमध्यें देखील सर्व इंद्रियांच्या अगोदर प्राणाचीच उत्पत्ति होते. यावरून तेथेंहि तो ज्येष्ठच ठरतो.

**यो ह वै वसिष्ठं वेद वसिष्ठो ह स्वानां भवति वाग्वाव वसिष्ठः ॥२॥**

**यः वै वसिष्ठम् वेद ह ( सः ) स्वानाम् वसिष्ठः भवति ह। वाक् वाव वसिष्ठः ( अस्ति )।**

जो वसतीचें ( राहणीचें ) मुख्य साधन जाणतो तो स्वजनांच्या वसतीला ( त्यांचा योगक्षेम चालविण्याला ) समर्थ होतो. वाणी हीच वसिष्ठ म्हणजे योगक्षेम चालविण्याचे मुख्य साधन आहे.

प्राणतत्त्वापासूनच इंद्रियशक्ति प्रगट होतात म्हणून प्राणाचें वर्णन झाल्यावर या मंत्रापासून इंद्रियशक्तींच्या वर्णनास प्रारंभ झाला आहे. वसिष्ठ हें एका मन्त्रद्रष्ट्या ऋषीचें नाव प्रसिद्ध आहे; परंतु प्रस्तुत मन्त्रात वसिष्ठ हा शब्द वस्—राहणें ह्या धातूपासून साधिला असल्यामुळें त्याचा वरीलप्रमाणें अर्थ केला आहे.

**यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रति ह तिष्ठत्यस्मिꣳश्च लोकेऽमुष्मिꣳश्च चक्षुर्वाव प्रतिष्ठा ॥३॥**

**यः वै प्रतिष्ठाम् वेद ह ( सः ) अस्मिन् च अमुष्मिन् च लोके प्रतितिष्ठति ह। चक्षुः वाव प्रतिष्ठा।**

जो कोणी स्थैर्याचें महत्त्व जाणतो तो इहलोकीं व परलोकीं स्थिर होतो. चक्षुरिंद्रिय हेंच स्थैर्याचें मुख्य साधन होय.

**यो ह वै संपदं वेद सꣳ हास्मै कामाः पद्यन्ते दैवाश्च मानुषाश्च श्रोत्रं वाव संपत् ॥४॥**

**यः वै संपदम् वेद ह अस्मै दैवाः च मानुषाः च कामाः संपद्यन्ते ह। श्रोत्रम् वाव संपत्।**

जो कोणी संपत्तीचें महत्व जाणतो त्याला दैवी व मानवी ( अशा दोन्ही प्रकारची ) संपत्ति संपादन करितां येते. श्रोत्रेंद्रियांची शक्ति हीच खरी संपत्ति होय.

बृहदारण्यकोपनिषदात चक्षु हें मानवी वित्त असून श्रोत्र हें दैवी वित्त होय असें म्हटलें आहे. ( उ. नि. र. प्र. बृहदा. अ. १ ब्रा. ४ मं. १७ पृ. १०१ ते १०४ ). परंतु या मन्त्रांत श्रोत्रालाच या दोनही वित्तांची संज्ञा दिली आहे, हा या दोन उपनिषदांत फरक आहे. छांदोग्यकारांच्या मतानें श्रोत्रेन्द्रिय हें ज्ञानाचें मुख्य साधन असल्यानें श्रोत्रेन्द्रियालाच त्यांनीं दैवी व मानवी वित्त म्हटलें असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

**यो ह वा आयतनं वेदायतनꣳ ह स्वानां भवति मनो ह वा आयतनम् ॥५॥**

**यः वै आयतनम् वेद ह ( सः ) स्वानाम् आयतनम् भवति ह। मनः वाव आयतनम्।**

जो कोणी आश्रयस्थानाचें महत्त्व जाणतो तो स्वजनांचें आश्रयस्थान होतो. मन हेंच प्रत्येकाचें आश्रयस्थान होय.

**अथ ह प्राणा अहꣳश्रेयसि व्यूदिरेऽहꣳ श्रेयानस्म्यहꣳ श्रेयानस्मीति ॥ ६ ॥**

**अथ अहम् श्रेयान् अस्मि अहम् श्रेयान् अस्मि इति अहंश्रेयसि प्राणाः व्यूदिरे ह।**

एकदां ‘ मी श्रेष्ठ आहे ’, ‘ मी श्रेष्ठ आहे ’ असें ह्मणून आपापल्या श्रेष्ठपणाविषयीं इंद्रियें वादविवाद करूं लागलीं.

**ते ह प्राणाः प्रजापतिं पितरमेत्योचुर्भगवन्को नः श्रेष्ठ इति तान्होवाच यस्मिन्व उत्क्रान्ते शरीरं पापिष्ठतरमिव दृश्येत स वः श्रेष्ठ इति ॥ ७ ॥**

**ते प्राणाः पितरम् प्रजापतिम् एत्य भगवन् नः कः श्रेष्ठः इति ऊचुः ह। वः यस्मिन् उत्क्रान्ते ( सति ) शरीरम् पापिष्ठतरम् इव दृश्येत सः वः श्रेष्ठः ( अस्ति ) इति तान् उवाच ह।**

तीं इंद्रियें पालनकर्त्या प्रजापतीकडे जाऊन, हे भगवन्! आमच्यामध्यें कोण श्रेष्ठ आहे? असें म्हणालीं. तुमच्यापैकीं जो निघून गेला असतां, शरीर अत्यंत पापिष्ठ म्हणजे तेजोहीन झाल्यासारखें दिसेल तो तुम्हांमध्यें श्रेष्ठ होय. असें तो प्रजापति त्यांना म्हणाला.

**सा ह वागुच्चक्राम सा संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा कला अवदन्तः प्राणन्तः प्राणेन पश्यन्त-**

**चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह वाक् ॥ ८ ॥**

**सा वाक् उच्चक्राम ह । सा संवत्सरम् प्रोष्य पर्येत्य उवाच । मत् ऋते कथम् जीवितुम् अशकत । यथा कलाः अवदन्तः प्राणेन प्राणन्तः चक्षुषा पश्यन्तः श्रोत्रेण शृण्वन्तः मनसा ध्यायन्तः ( जीवितुम् शक्नुवन्ति ) एवम् । इति ( श्रुत्वा ) वाक् प्रविवेश ह ।**

नंतर ती वाणी ( शरीरांतून ) बाहेर गेली आणि एक वर्ष-पर्यंत बाहेर राहिल्यावर पुनः परत येऊन म्हणाली कीं, माझ्या-वांचून तुम्ही कसें जगूं शकलां ? जसें मुके न बोलतां, प्राणानें श्वासोच्छ्वास करीत. डोळ्यांनीं पहात, कानांनीं ऐकत आणि मनानें ध्यान करीत जगूं शकतात त्याप्रमाणें आमचा जीवनक्रम चालू होता. ( असें प्राणादिकांनीं त्या वाणीला सांगितलें ). असें ऐकून वाणीनें ( मुकाट्यानें ) शरीरांत प्रवेश केला.

**चक्षुर्होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथान्धा अपश्यन्तः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह चक्षुः ॥ ९ ॥**

**चक्षुः उच्चक्राम ह । तत् संवत्सरम् प्रोष्य पर्येत्य उवाच ह । मत् ऋते कथम् जीवितुम् अशकत इति । यथा अन्धाः अपश्यन्तः प्राणेन प्राणन्तः वाचा वदन्तः श्रोत्रेण शृणवन्तः मनसा ध्यायन्तः ( जीवितुम् शक्नुवन्ति ) एवम् । इति ( श्रुत्वा ) चक्षुः प्रविवेश ह ।**

नंतर चक्षु ( शरीरांतून ) बाहेर गेले आणि एक वर्षपर्यंत बाहेर राहिल्यावर पुनः परत येऊन म्हणाले कीं, माझ्यावांचून तुम्ही कसे जगूं शकलां? जसे आंधळे न पाहतां, प्राणानें श्वासो-च्छ्वास करीत, वाणीनें बोलत. कानानें ऐकत,आणि मनानें ध्यान

करीत जगूं शकतात, त्याप्रमाणें ( आमचा जीवनक्रम चालू होता असें प्राणादिकांनीं त्या चक्षूस सांगितलें ). असें ऐकून चक्षूनें ( मुकाट्यानें ) शरीरांत प्रवेश केला.

**श्रोत्रꣳ होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा बधिरा अशृण्वन्तः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह श्रोत्रम् ॥ १० ॥**

**श्रोत्रम् उच्चक्राम ह । तत् संवत्सरम् प्रोष्य पर्येत्य उवाच । कथम् मत् ऋते जीवितुम् अशकत इति । यथा बधिराः अशृण्वन्तः प्राणेन प्राणन्तः वाचा वदन्तः चक्षुषा पश्यन्तः मनसा ध्यायन्तः ( जीवितुम् शक्नुवन्ति ) एवम् । इति (श्रुत्वा) श्रोत्रम् प्रविवेश ह ।**

नंतर श्रोत्र ( शरीरांतून ) बाहेर गेले आणि एक वर्षपर्यंत बाहेर राहिल्यावर पुनः परत येऊन म्हणालें कीं, माझ्यावांचून तुम्ही कसे जगूं शकलां? जसे बहिरे न ऐकतां प्राणानें श्वासोच्छ्वास करीत, वाणीनें बोलत, डोळ्यांनीं पहात आणि मनानें ध्यान करीत जगूं शकतात, त्याप्रमाणें ( आमचा जीवनक्रम चालू होता असें प्राणादिकांनीं त्या श्रोत्रास सांगितलें ). असें ऐकून श्रोत्रानें ( मुकाट्यानें ) शरिरांत प्रवेश केला.

**मनो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा बाला अमनसः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेणैवमिति प्रविवेश ह मनः ॥ ११ ॥**

**मनः उच्चक्राम ह । तत् संवत्सरम् प्रोष्य पर्येत्य उवाच । मत् ऋते जीवितुम् कथम् अशकत इति । यथा अमनसः बालाः प्राणेन प्राणन्तः वाचा वदन्तः चक्षुषा पश्यन्तः श्रोत्रेण शृण्वन्तः एवम् । इति ( श्रुत्वा ) मनः प्रविवेश ह ।**

नंतर मन ( शरिरांतून ) बाहेर गेलें आणि एक वर्षपर्यंत बाहेर राहिल्यावर पुनः परत येऊन म्हणालें कीं, माझ्यावांचून तुम्ही कसे जगूं शकलां? जसें मनरहित बाल, ( तारतम्यशक्ति नसलेलीं लहान मुलें) प्राणानें श्वासोच्छ्वास करीत, वाणीनें बोलत डोळ्यांनीं पहात, कानांनीं ऐकत जगूं शकतात, त्याप्रमाणें ( आमचा जीवनक्रम चालू होता; असें प्राणादिकांनीं त्या मनास सांगितलें ). असें ऐकून मनानें (मुकाट्यानें) शरिरांत प्रवेश केला.

**अथ ह प्राण उच्चिक्रमिषन्स यथा सुहयः पड्वीशशङ्कून्संखिदे-देवमितरान्प्राणान्समखिदत्तꣳ हाभिसमेत्योचुर्भगवन्नेधि त्वं नः श्रेष्ठोऽसि मोत्क्रमीरिति ॥ १२ ॥**

अथ प्राणः उच्चिक्रमिषत् । यथा सुहयः पड्वीशशङ्कून् संखिदेत् एवम् सः इतरान् प्राणान् समखिदत् । तम् (इतरे प्राणाः) अभिसमेत्य उचुः ह । भगवन् एधि । त्वम् नः श्रेष्ठः असि । मा उत्क्रमीः इति ।

नंतर प्राण बाहेर जाऊं लागला तेव्हा, ज्याप्रमाणें जातिवंत घोड्यानें पायबंदाच्या मेखा उपटाव्यात त्याप्रमाणें त्यानें चक्षुरादि इंद्रियांना उखडून काढण्यास प्रारंभ केला. तेव्हां तीं इंद्रियें प्राणाला म्हणालीं, हे भगवन्! तूं रहा ( जाऊं नको ). तूंच आमच्यामध्यें श्रेष्ठ आहेस.

**अथ हैनꣳ वागुवाच यदहं वसिष्ठोऽस्मि त्वं तद्वसिष्ठोऽसीत्यथ हैनं चक्षुरुवाच यदहं प्रतिष्ठास्मि त्वं तत्प्रतिष्ठासीति ॥ १३ ॥**

अथ एनम् वाक् उवाच ह । यत् अहम् वसिष्ठः अस्मि तत् त्वम् वसिष्ठः असि इति । अथ एनम् चक्षुः उवाच ह । यत् अहम् प्रतिष्ठा अस्मि तत् त्वम् प्रतिष्ठा असि इति ।

नंतर वाणी प्राणाला ह्मणाली, मी जी वसिष्ठ ( योगक्षेम-समर्थ आहे ) तें सामर्थ्य खरोखर तुझें आहे. ( खरा समर्थ तूंच आहेस). नंतर नेत्रेंद्रिय प्राणाला ह्मणालें, मी जो स्थिरसामर्थ्यवान् आहे तें खरोखर तुझेंच सामर्थ्य आहे.

**अथ हैनꣳ श्रोत्रमुवाच यदहꣳ संपदस्मि त्वं तत्संपदसीत्यथ हैनं मन उवाच यदहमायतनमस्मि त्वं तदायतनमसीति ॥ १४ ॥**

अथ एनम् श्रोत्रम् उवाच ह । यत् अहम् संपत् अस्मि तत् संपत् त्वम् असि इति । अथ मनः एनम् उवाच ह । यत् अहम् आयतनम् अस्मि तत् आयतनम् त्वम् असि इति ।

नंतर श्रोत्रेंद्रिय प्राणाला म्हणालें, मी जें संपादनसामर्थ्य-वान् आहे तें सामर्थ्य खरोखर तुझेंच आहे. नंतर मन प्राणाला म्हणालें, जें मी आश्रयसामर्थ्यवान आहे तें सामर्थ्य खरोखर तुझेंच आहे.

**न वै वाचो न चक्षूꣳषि न श्रोत्राणि न मनाꣳसीत्याचक्षते प्राणा इत्येवाचक्षते प्राणो ह्येवैतानि सर्वाणि भवति ॥ १५ ॥**

न वै वाचः न चक्षूंषि न श्रोत्राणि न मनांसि इति आचक्षते । प्राणः इति एव आचक्षते । हि प्राणः एव एतानि सर्वाणि भवति ।

वाणी नव्हे, नेत्र नव्हे, कान नव्हे, किंवा मनही नव्हे, ( ही इंद्रियें स्वतंत्र नव्हेत ), असें म्हणतात. त्यांना प्राण असेंच म्हणतात. कारण प्राणच या सर्व इंद्रियशक्तींचीं रूपें धारण करितो.

## पहिल्या खंडाचा सारांश.

प्राणाचें सर्वश्रेष्ठत्व दर्शविण्याकरितां मुख्य प्राण व इतर इंद्रियशक्ति यांचें वर्णन व त्यांच्यांतील चढाओढ याविषयीं प्रस्तुत खंडांत आलंकारिक

रीतीनें वर्णन करण्यांत आलें आहे. हा विषय बृहदारण्यकांतील सहाव्या अध्यायाच्या पहिल्या ब्राह्मणांत बहुतेक असाच आला आहे. फरक आहे तो इतकाच कीं, तेथें वाणी, चक्षु, श्रोत्र व मन यांचेबरोबर वीर्यशक्तीचाहि उल्लेख करण्यांत आला असून प्रजोत्पादन हेंच या वीर्यशक्तीचें फल होय असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे. येथें (छान्दोग्योपनिषदांत) वीर्यशक्तीचा उल्लेख नाहीं. वाणी, चक्षु, श्रोत्र व मन या चारच इंद्रियांनीं प्राणाशीं चढाओढ मांडली व शेवटीं त्यांनीं प्राणाचें श्रेष्ठत्व मान्य केलें. अशा धर्तीचा प्राणसंवाद प्रश्नोपनिषदांतही संक्षेपानें आला आहे. बृहदारण्यकोपनिषदांत प्राणाचें श्रेष्ठत्व वर्णन झाल्यानंतर शेवटीं अन्न व वस्त्र यांच्याविषयीं थोडेंसें वर्णन करून मगच सहाव्या अध्यायाचें पहिलें ब्राह्मण समाप्त करण्यांत आलें आहे. परंतु या खंडात हा अन्नवस्त्राचा विषय आलेला नाहीं. त्याचा उल्लेख पुढील खंडांत येईल. बाकीचा सर्व विषय बृहदारण्यकाप्रमाणेंच येथें आला असल्यामुळें त्याचें विशेष विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं.

---

## अथ द्वितीयः खण्डः ।

**स होवाच किं मेऽन्नं भविष्यतीति यत्किंचिदिदमाश्वभ्य आशकुनिभ्य इति होचुस्तद्वा एतदनस्यान्नमनो ह वै नाम प्रत्यक्षं न ह वा एवंविदि किंचनानन्नं भवतीति ॥ १ ॥**

**किम् मे अन्नम् भविष्यति इति सः उवाच ह । आश्वभ्यः आशकुनिभ्यः यत् इदम् किंचित् तत् वै एतत् अनस्य अन्नम् इति ऊचुः ह । अनः ह वै (तव) प्रत्यक्षम् नाम अस्ति । एवंविदि किंचन वै अनन्नम् न भवति ह इति ।**

माझें अन्न कोणतें आहे? असें प्राणानें विचारलें. कुत्र्यांपर्यंत किंवा पक्ष्यांपर्यंत जें कांहीं आहे तें हें सर्व प्राणाचें अन्न आहे. (असें इतर इंद्रियें त्याला ह्मणालीं). कारण अन ह्मणजे सर्व-भक्षक हें प्राणाचें प्रत्यक्ष नांवच आहे. या प्रमाणें प्राणविद्या-

संपन्न झालेल्या विद्वानाला अनन्न असें कांहींच रहात नाहीं. म्हणजे कोणत्याही पदार्थाचा उपयोग करण्यास किंवा उपभोग घेण्यास तो पूर्ण स्वतंत्र व समर्थ असतो.

**स होवाच किं मे वासो भविष्यतीत्याप इति होचुस्तस्माद्वा एतदशिष्यन्तः पुरस्ताच्चोपरिष्टाच्चाद्भिः परिदधति लम्भुको ह वासो भवत्यनग्नो ह भवति ॥ २ ॥**

**किम् मे वासः भविष्यति इति सः उवाच ह । आपः इति ते ऊचुः । तस्मात् वै अशिष्यन्तः एतत् अद्भिः पुरस्तात् उपरिष्टात् च परिदधति । लम्भुकः वासः भवति ह । अनग्नः भवति ह ।**

माझें वस्त्र कोणतें ? असें प्राणानें विचारलें. पाणी हें तुझें वस्त्र आहे असें ( इतर इंद्रियांनीं ) सांगितलें. म्हणूनच खाणारे लोक ह्या प्राणाला पाण्यानें अगोदर आणि मागाहून आच्छादित करितात. त्या योगानें ( तो प्राण ) वस्त्रयुक्त होतो. तो वस्त्राच्छादित होतो.

**तद्धैतत्सत्यकामो जाबालो गोश्रुतये वैयाघ्रपद्यायोक्त्वोवाच यद्यप्येतच्छुष्काय स्थाणवे ब्रूयाज्जायेरन्नेवास्मिञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ३ ॥**

**सत्यकामः जाबालः वैयाघ्रपद्याय गोश्रुतये तत् एतत् उक्त्वा उवाच ह । शुष्काय स्थाणवे अपि यदि एतत् ब्रूयात् अस्मिन् शाखाः जायेरन् पलाशानि प्ररोहेयुः एव इति ।**

सत्यकाम जाबाल व्याघ्रपद वंशांतील गोश्रुति नांवाच्या आपल्या शिष्याला हें प्राणविद्येचें ज्ञान सांगून ह्मणाला कीं, वाळलेल्या लाकडाला जरी हें ज्ञान सांगितलें तरी, त्याच्यावर डहाळ्या उत्पन्न होतील ! त्याला पालवीही फुटेल ! ( ही प्राणविद्या एखाद्या

वाळलेल्या लाकडासारख्या जरठाला सांगितली तरी त्याला तरुण बनवील ).

**अथ यदि महज्जिगमिषेदमावास्यायां दीक्षित्वा पौर्णमास्याः रात्रौ सर्वौषधस्य मन्थं दधिमधुनोरुपमथ्य ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत् ॥ ४ ॥**

**अथ यदि महत् जिगमिषेत् अमावास्यायाम् दीक्षित्वा पौर्णिमास्याम् रात्रौ सर्वौषधस्य मन्थम् दधिमधुनोः उपमथ्य ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहा इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मन्थे संपातम् अवनयेत् ।**

आतां जर महत्त्व प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल तर, त्यानें अमावास्येच्या दिवशीं दीक्षा घेऊन पुढील पौर्णिमेच्या रात्रीं सर्व औषधींचें ( मन्थ ) सत्त्व दही आणि मध यांच्या सह घुसळून नंतर, ' जेष्ठाय श्रेष्ठाय स्वाहा ' ( असा मन्त्र ह्मणून ) अग्नीमध्यें घृताची आहुति घालून, शिल्लक राहिलेलें तूप वर सांगितलेल्या मिश्रणांत टाकावें.

**वसिष्ठाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत्प्रतिष्ठायै स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत्संपदे स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेदायतनाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत् ॥ ५ ॥**

**वसिष्ठाय स्वाहा इति अग्नौ अजस्य हुत्वा मन्थे संपातम् अवनयेत् । प्रतिष्ठायै स्वाहा इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मन्थे संपातम् अवनयेत् । संपदे स्वाहा इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मन्थे संपातम् अवनयेत् । आयतनाय स्वाहा इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मन्थे संपातम् अवनयेत् ।**

वसिष्ठाय स्वाहा या मंत्रानें अग्नीत तुपाची आहुति देऊन शिल्लक राहिलेलें तूप वरील मिश्रणांत टाकावें. प्रतिष्ठायै स्वाहा या मंत्रानें अग्नींत आहुति देऊन अवशिष्ट तूप वरील मिश्रणांत टाकावें.

संपदे स्वाहा या मंत्रानें अग्नींत आहुति देऊन शिल्लक राहिलेलें तूप वरील मिश्रणांत टाकावें. आयतनाय स्वाहा या मंत्रानें अग्नींत आहुति देऊन राहिलेलें घृत वरील मिश्रणांत टाकावें.

**अथ प्रतिसृप्याञ्जलौ मन्थमाधाय जपत्यमो नामास्यमा हि ते सर्वमिदꣳ स हि ज्येष्ठः श्रेष्ठो राजाधिपतिः स मा ज्यैष्ठ्यꣳ श्रैष्ठ्यꣳ राज्यमाधिपत्यं गमयत्वहमेवेदꣳ सर्वमसानीति ॥ ६ ॥**

अथ प्रतिसृप्य अञ्जलौ मन्थम् आधाय जपति हि । अमः नाम असि । हि अमा ते इदम् सर्वम् । हि सः ज्येष्ठः श्रेष्ठः राजा अधिपतिः हि ( अस्ति ) । ज्यैष्ठ्यम् श्रैष्ठ्यम् राज्यम् आधिपत्यम् सः माम् गमयतु । अहम् एव इदम् सर्वम् असानि इति ।

नंतर (अग्नीपासून) थोडें मागें सरून ओंजळींत वरील मिश्रण घेऊन असा मंत्र जपावा कीं, ( हे हविर्द्रव्या ), अम हें तुझें नांव आहे; कारण प्राणाच्या योगानें हें सर्व जग तुझ्या स्वाधीन आहे; कारण तो प्राण ज्येष्ठ, श्रेष्ठ, राजा व अधिपति आहे; ज्येष्ठपणा, श्रेष्ठपणा, राज्य आणि आधिपत्य तो मला प्राप्त करून देवो. हें सर्व मीच होईन असें कर.

**अथ खल्वेतयर्चा पच्छ आचामति तत्सवितुर्वृणीमह इत्याचामति वयं देवस्य भोजनमित्याचामति श्रेष्ठꣳ सर्वधातममित्याचामति तुरं भगस्य धीमहीति सर्वं पिबति निर्णिज्य कꣳसं चमसं वा पश्चादग्नेः संविशति चर्मणि वा स्थण्डिले वा वाचंयमो ऽप्रसाहः स यदि स्त्रियं पश्येत्समृद्धं कर्मेति विद्यात् ॥ ७ ॥**

अथ खलु एतया ऋचा पच्छः आचामति । तत् सवितुः वृणीमहे इति आचामति । वयम् देवस्य भोजनम् इति आचामति । श्रेष्ठम् सर्वधातमम् इति आचामति । तुरम् भगस्य धीमहि इति सर्वम् पिबति । कंसम् चमसम् वा निर्णिज्य अग्नेः पश्चात् चर्मणि वा स्थण्डिले वा वाचंयमः अप्रसाहः संविशति । सः यदि स्त्रियम् पश्येत् ( तदा ) कर्म समृद्धम् इति विद्यात् ।

नंतर त्यानें पुढील ऋचेंतील प्रत्येक चरण पदशः म्हणून त्या मिश्रणाचें आचमन करावें. तत्सवितुर्वृणीमहे असें म्हणून पहिलें आचमन, वयं देवस्य भोजनम् यानें दुसरें आचमन, श्रेष्ठम् सर्व धातमम् यानें तिसरें आचमन करावें आणि तुरं भगस्य धीमहि यानें शिल्लक राहिलेलें सर्व मिश्रण प्यावें. नंतर कंस किंवा चमस ( मिश्रण पात्र ) धुतल्यावर अग्नीच्या मागें चर्मावर किंवा केवल उन्नत भूमीवर मौनी व शांतचित्त होऊन शयन करावें. तो जर ( स्वप्नांत ) स्त्रीला पाहील तर आपलें कर्म सफल झालें असें त्यानें समजावें.

**तदेष श्लोको यदा कर्मसु काम्येषु स्त्रियꣳ स्वप्नेषु पश्यति । समृद्धिं तत्र जानीयात्तस्मिन्स्वप्ननिदर्शने तस्मिन्स्वप्ननिदर्शने ॥८॥**

तत् एषः श्लोकः। यदा काम्येषु कर्मसु स्वप्नेषु स्त्रियम् पश्यति तस्मिन् स्वप्ननिदर्शने तत्र समृद्धिं जानीयात्।

त्याविषयीं असा ( प्राचीन ) श्लोक—मंत्र आहे:—काम्य कर्मांत जेव्हां स्वप्नांत स्त्री दिसते तेव्हां तसें स्वप्न दिसलें असतां कर्माची सिद्धि होणार असें समजावें.

या खंडांतील सर्व विषय बृहदारण्यकांत आले असल्यामुळें, येथें त्यांचा निराळा सारांश लिहिला नाहीं. बृहदारण्यकांतील ६ व्या अध्यायाच्या ३ ऱ्या ब्राह्मणांत हा विषय आला आहे. तेथें पात्रांचें विशेष वर्णन असून हविर्द्रव्याकरितां पुष्कळ पदार्थांची यादी आली आहे.

---

## अथ तृतीयः खण्डः ।

**श्वेतकेतुर्हारुणेयः पञ्चालानाꣳ समितिमेयाय तꣳ ह प्रवाहणो जैवलिरुवाच कुमारानु त्वाशिषत्पितेत्यनु हि भगव इति ॥ १ ॥**

**आरुणेयः श्वेतकेतुः पञ्चालानाम् समितिम् एयाय । तम् जैबालिः प्रवाहणः उवाच ह । कुमार कः त्वा अनुशिषत् । भगवः पिता हि ( अनुशिषत् ) इति ।**

आरुणि गोत्रांतील श्वेतकेतु नांवाचा ऋषिपुत्र पञ्चाल देशाच्या राजसभेंत गेला. त्याला जीवलाचा पुत्र प्रवाहण राजा ह्मणाला:— मुला ! तुला विद्या कोणीं शिकविली ? ( श्वेतकेतु ह्मणाला:— ) भगवन् ! पित्यानेंच मला विद्या शिकविली.

**वेत्थ यदितोऽधि प्रजाः प्रयन्तीति न भगव इति वेत्थ यथा पुनरावर्तन्त ३ इति न भगव इति वेत्थ पथोर्देवयानस्य पितृयाणस्य च व्यावर्तना ३ इति न भगव इति ॥ २ ॥**

**प्रजाः इतः यत् अधिप्रयन्ति ( तत् ) वेत्थ इति । भगवः न इति (उवाच) । यथा पुनः आवर्तन्ते (तत्) वेत्थ इति । भगवः न इति । देवयानस्य पितृयाणस्य च पथोः व्यावर्तना वेत्थ इति । भगवः न इति ।**

( या पुढें प्रवाहण राजाचे प्रश्न व श्वेतकेतुचीं उत्तरें अशी वाक्य-योजना आहे ). प्र०—माणसें मेल्यानंतर कोठें जातात ? उ०—भगवन् ! मला ठाऊक नाहीं. २ प्र०—तीं माणसें कशीं परत येतात ? उ०-- भगवन् ! मला तें माहीत नाहीं. ३ प्र०-- देवयान आणि पितृयाण या दोन मार्गांतील फरक तुला माहीत आहे काय ? उ०-- भगवन् ! मला तें अवगत नाहीं.

**वेत्थ यथासौ लोको न संपूर्यत ३ इति न भगव इति वेत्थ यथा पञ्चम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति नैव भगव इति ॥ ३ ॥**

**असौ लोकः यथा न संपूर्यते ( तत् ) वेथ इति । भगवः न इति । यथा पञ्चम्याम् अहुतौ आपः पुरुषवचसः भवन्ति ( तत् ) वेत्थ इति । भगवः ! न एव इति ।**

४ प्र०— हा परलोक मरून जाणाऱ्या जीवांनीं कसा भरून जात नाहीं तें तूं जाणतोस काय? उ०— भगवन्! मला तें समजलेलें नाहीं. आणि ५ प्र०— पांचव्या आहुतीमध्यें पाणी जीवरूप कसें बनतें तें तूं जाणतोस काय? भगवन्! हें-ही मला ठाऊक नाहीं.

**अथानु किमनुशिष्टोऽवोचथा यो हीमानि न विद्यात्कथꣳ सोऽनुशिष्टो ब्रुवीतेति स हायस्तः पितुरर्धमेयाय तꣳ होवाचाननुशिष्य वाव किल मा भगवानब्रवीदनु त्वाशिषमिति ॥ ४ ॥**

अथ अनुशिष्टः ( इति ) किम् अन्ववोचथाः । हि यः इमानि न विद्यात् स कथम् अनुशिष्टः ( अस्मि ) इति ब्रुवीत । सः आयस्तः पितुः अर्धम् एयाय । तम् उवाच ह । मा अननुशिष्य किल त्वा अन्वशिषम् इति भगवान् अब्रवीत् इति ।

मग (राजा म्हणाला) मी समाप्तविद्य आहे असें तूं कसें बोललास? जो हे ( वरील पांच प्रश्नांतील ) विषय जाणत नाहीं त्यानें, मी समाप्तविद्य आहे असें कसें ह्मणावें? ( या प्रमाणें फजीत झाल्यामुळें ) तो (श्वेतकेतु) खिन्न होऊन बापाच्या जवळ गेला व ह्मणाला, हे भगवन्! मला पुरी विद्या न शिकवतां, तुझें शिक्षण पूर्ण झालें, असें तुम्हीं सांगितलें!

**पञ्च मा राजन्यबन्धुः प्रश्नानप्राक्षीत्तेषां नैकंचनाशकं विवक्तुमिति स होवाच यथा मा त्वं तदैतानवदो यथाहमेषां नैकंचन वेद यद्यहमिमानवेदिष्यं कथं ते नावक्ष्यमिति ॥ ५ ॥**

राजन्यबन्धुः मा पञ्च प्रश्नान् अप्राक्षीत् तेषाम् एकंचन विवक्तुम् न अशकम् इति । सः उवाच । यथा एतान् मा त्वम् तदा अवदः यथा अहम् एतेषाम् एकंचन न वेद । यदि अहम् इमान् अवेदिष्यम् कथम् ते ( तत् ) न अवक्ष्यम् इति ।

तो सामान्य क्षत्रिय (प्रवाहण राजा ) मला पांच प्रश्न विचारिता झाला. त्यांपैकीं एकाही प्रश्नाचें उत्तर मी देऊं शकलों नाहीं. पिता म्हणाला, तूं जे हे ( पांच प्रश्न ) मला सांगितलेस त्यांपैकीं एकाचेंही ज्ञान मला नाहीं. जर मला या विषयांचें ज्ञान असतें तर, मीं तें तुला कां सांगितलें नसतें ?

**स ह गौतमो राज्ञोऽर्धमेयाय तस्मै ह प्राप्तायार्हां चकार स ह प्रातः सभाग उदेयाय त१ँ होवाच मानुषस्य भगवन्गौतम वित्तस्य वरं वृणीथा इति स होवाच तवैव राजन्मानुषं वित्तं यामेव कुमारस्यान्ते वाचमभाषथास्तामेव मे ब्रूहीति स ह कृच्छ्री बभूव ॥६॥**

**सः गौतमः राज्ञः अर्धम् एयाय ह। ( सः ) तस्मै प्राप्ताय अर्हाम् चकार ह। प्रातः सभागे उदेयाय ह। तम् उवाच ह। भगवन् गौतम मानुषस्य वित्तस्य वरम् वृणीथाः इति। सः उवाच ह। राजन् तव एव मानुषम् वित्तम् ( अस्तु )। कुमारस्य अन्ते याम् एव वाचम् अभाषथाः ताम् एव मे ब्रूहि इति। सः कृच्छ्री बभूव ह।**

तो गौतम ऋषि राजाचे घरीं गेला. त्या राजानें आलेल्या त्या गौतम ऋषीचा सत्कार केला. प्रातःकाळीं राजा सभेमध्यें असतां, तेथें तो गौतम ऋषि आला. त्याला राजा म्हणाला, हे गौतम ऋषे ! मानवी द्रव्य पाहिजे असेल तितकें मागून घे. गौतम म्हणाला, राजा ! तुझें मानवी द्रव्य तुजजवळच राहो. ( मला नको ). मुलाजवळ तूं जें भाषण बोललास तेंच मला समजावून सांग. ( हें ऐकून ) राजा चिंताग्रस्त झाला.

**त१ँ ह चिरं वसेत्याज्ञापयांचकार त१ँ होवाच यथा मा त्वं गौतमावदो यथेयं न प्राक्त्वत्तः पुरा विद्या ब्राह्मणान्गच्छति तस्मादु सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूदिति तस्मै होवाच ॥ ७ ॥**

**तम् चिरम् वस इति आज्ञापयांचकार ह । तम् उवाच ह । गौतम यथा माम् त्वम् अवदः यथा पुरा इयम् विद्या त्वत्तः प्राक् ब्राह्मणान् न गच्छति । तस्मात् उ सर्वेषु लोकेषु क्षत्रस्य एव प्रशासनम् अभूत् । इति तस्मै उवाच ह ।**

त्या गौतम ऋषीला पुष्कळ दिवस राहा, अशी राजा आज्ञा करिता झाला; नंतर तो त्याला ह्मणाला कीं, गौतमा ! जिच्या विषयीं तूं मला बोललास ती ही ब्रह्मविद्या पूर्वी तुझ्या अगोदर ब्राह्मणांना प्राप्त झालेली नव्हती; ( क्षत्रियांत मात्र तिची अध्ययनपरंपरा चालू होती ); ह्मणून सर्व लोकांवर क्षत्रियांचीच सत्ता चालू होती; असें तो ( प्रवाहण राजा ) गौतमाला म्हणाला.

**टीपः**— हें प्रवाहणजैवलीच्या कथेचें प्रकरण बृहदारण्यकोपनिषदांतील सहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या ब्राह्मणांत आलें आहे. येथें हें आख्यान दहाव्या खण्डाच्या अखेरपर्यंत चालू आहे. करितां या प्रकरणाचा सारांश दहाव्या खंडाच्या शेवटीं दिला आहे.

---

## अथ चतुर्थः खण्डः ।

**असौ वाव लोको गौतमाग्निस्तस्यादित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिश्चन्द्रमा अङ्गारा नक्षत्राणि विस्फुलिङ्गाः ॥१॥**

**गौतम असौ लोकः वाव अग्निः । आदित्यः एव तस्य समित् । रश्मयः धूमः । अहः अर्चिः । चन्द्रमाः अङ्गाराः । नक्षत्राणि विस्फुलिङ्गाः ।**

गौतमा ! द्युलोक हाच अग्नि होय. सूर्य हीच त्याची समिधा होय. किरण हा या अग्नीचा धूर आहे. दिवस ही ज्वाला आहे. चंद्र हा त्यांतील निखारा आहे व नक्षत्रें ह्या त्या अग्नीच्या ठिणग्या होत.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुतेः सोमो राजा संभवति ॥२॥**

तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः श्रद्धाम् जुह्वति। तस्याः आहुतेः सोमः राजा संभवति।

त्या ह्या द्युलोकरूपी अग्नीमध्यें देव श्रद्धेचें हवन करितात. त्या आहुतीपासून सोमराजा ( जीवनरस ) उत्पन्न होतो.

---

## अथ पञ्चमः खण्डः ।

**पर्जन्यो वाव गौतमाग्निस्तस्य वायुरेव समिदभ्रं धूमो विद्युदर्चिरशनिरङ्गारा ह्रादनयो विस्फुलिङ्गाः ॥ १ ॥**

गौतम पर्जन्यः वाव अग्निः । तस्य वायुः एव समित् । अभ्रम् धूमः विद्युत् अर्चिः। अशनिः अङ्गाराः । ह्रादनयः विस्फुलिङ्गाः

हे गौतमा ! पर्जन्य हाच अग्नि होय. वायु ही त्या अग्नींतील समिधा आहे. ढग हा त्या अग्नीचा धूर आहे. वीज ही त्या अग्नीची ज्वाला आहे. अशनि ह्मणजे कडाडून पडणारी वीज ते निखारे होत व गर्जना ह्या त्याच्या ठिणग्या होत.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः सोमꣳ राजानं जुह्वति तस्या आहुतेर्वर्षꣳ संभवति ॥ २ ॥**

तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः सोमम् राजानम् जुह्वति। तस्याः आहुतेः वर्षम् संभवति।

त्या ह्या पर्जन्यरूपी अग्नीमध्यें देव सोमराजाचें (रसतत्त्वाचें) हवन करितात. त्या आहुतीपासून वृष्टि होते. (त्या-सूक्ष्म जीवनरसाचें पाण्यांत रूपांतर होतें ).

---

## अथ षष्ठः खण्डः ।

**पृथ्वी वाव गौतमाग्निस्तस्याः संवत्सर एव समिदाकाशो धूमो रात्रिरर्चिर्दिशोऽङ्गारा अवान्तरदिशो विस्फुलिङ्गाः ॥१॥**

हे गौतम पृथ्वी वाव अग्निः । संवत्सरः एव तस्याः समित् । आकाशः धूमः । रात्रिः आर्चिः दिशः अङ्गाराः । अवान्तरदिशः विस्फुलिङ्गाः ।

हे गौतमा ! पृथ्वी हाच अग्नि होय. संवत्सर ही त्या अग्नीची समिधा आहे. ( निळें ) आकाश हा त्या अग्नीचा धूर आहे. रात्र ही ज्वाला आहे. दिशा हे निखारे व उपदिशा ह्या त्याच्या ठिणग्या होत.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा वर्षं जुह्वति**
**तस्या आहुतेरन्नꣳ संभवति ॥ २ ॥**

तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः वर्षम् जुह्वति । तस्या आहुतेः अन्नम् संभवति ।

त्या ह्या पृथ्वीरूप अग्नीमध्यें देव जलाचें हवन करितात. त्या आहुतीपासून ( पृथ्वीसंयुक्त जलापासून ) अन्न उत्पन्न होतें.

## अथ सप्तमः खण्डः ।

**पुरुषो वाव गौतमाग्निस्तस्य वागेव समित्प्राणो धूमो जिह्वार्चिश्चक्षुरङ्गाराः श्रोत्रं विस्फुलिङ्गाः ॥ १ ॥**

हे गौतम पुरुषः वाव अग्निः । वाक् एव तस्य समित् । प्राणः धूमः जिह्वा अर्चिः चक्षुः अङ्गाराः । श्रोत्रम् विस्फुलिङ्गाः ।

हे गौतमा ! पुरुष हाच अग्नि होय. वाणी ही त्याची समिधा आहे. प्राण हा त्याचा धूर आहे. जीभ ही त्याची ज्वाला होय. डोळे हे निखारे होत. कान ह्या ठिणग्या होत.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा अन्नं जुह्वति तस्या आहुते रेतः संभवति ॥ २ ॥**

**तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः अन्नम् जुह्वति । तस्याः आहुतेः रेतः संभवति ।**

त्या ह्या पुरुषरूपी अग्नीमध्यें देव अन्नाचें हवन करितात. त्या अन्नरूप आहुतीपासून रेत उत्पन्न होतें.

## अथाष्टमः खण्डः ।

**योषा वाव गौतमाग्निस्तस्या उपस्थ एव समिद्यदुपमन्त्रयते स धूमो योनिरर्चिर्यदन्तःकरोति तेऽङ्गारा अभिनन्दा विस्फुलिङ्गाः १**

**हे गौतम योषा वाव अग्निः । तस्याः उपस्थः एव समित् । उपमन्त्रयते सः धूमः । योनिः अर्चिः । यत् अन्तःकरोति ते अङ्गाराः । अभिनन्दाः विस्फुलिङ्गाः ।**

हे गौतमा ! स्त्री हाच अग्नि होय. तिचें जननेंद्रिय हीच समिधा होय. तिच्याशीं होणारा संकेत हा धूर होय. प्रजनन ही ज्वाला होय. जें अंतर्गत कर्म ( संभोग ) करण्यांत येतें तें निखारे व ज्या आनन्दवृत्ति उत्पन्न होतात त्या ठिणग्या होत.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा रेतो जुह्वति तस्या आहुतेगर्भः संभवति २**

**तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः रेतः जुह्वति । तस्याः आहुतेः गर्भः संभवति ।**

त्या ह्या स्त्रीरूपी अग्नीमध्यें देव रेताचें हवन करितात. त्या आहुतीपासून गर्भ तयार होतो.

## अथ नवमः खण्डः ।

**इति तु पञ्चम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति स उल्बावृतो गर्भो दश वा नव वा मासानन्तः शयित्वा यावद्वाथ जायते ।**

इति तु पञ्चाम्याम् आहुतौ आपः पुरुषवचसः भवन्ति इति । सः उल्बावृतः गर्भः दश वा नव वा मासान् यावत् वै अन्तः शयित्वा अथ जायते ।

याप्रमाणें पांचवी आहुति पूर्ण झाली असतां, ( पूर्वी सांगितलेलें द्युलोकांतील रसोत्पादक अव्यक्ततत्त्व ) दिव्य आप, प्राणी या संज्ञेला प्राप्त होतें. असा तो वारेनें वेष्टिलेला गर्भ दहा किंवा नऊ महिनेपर्यंत मातेच्या उदरांत पडून राहून नंतर जन्म पावतो.

**स जातो यावदायुषं जीवति तं प्रेतं दिष्टमितोऽग्नय एव हरन्ति यत एवेतो यतः संभूतो भवति ॥ २ ॥**

जातः सः यावदायुषम् जीवति । प्रेतम् अग्नयः इतः दिष्टम् हरन्ति । यतः एव इतः यतः ( च ) संभूतः भवति ।

जन्म पावलेला तो प्राणी, आयुष्य असेपर्यंत जगतो. मेल्यावर त्याला अग्नि येथून पूर्वस्थानाला नेतात. जेथून तो प्राप्त झालेला असतो व ज्याच्या योगानें त्याची बनावट झालेली असते ( तिकडें अग्नी त्याला नेतात. )

---

## अथ दशमः खण्डः ।

**तद्य इत्थं विदुः ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते तेऽर्चिषमभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुदङ्ङेति मासाᳪस्तान् ॥ १॥ मासेभ्यः संवत्सरᳪ संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्म गमयत्येष देवयानः पन्था इति ॥ २ ॥**

ये तत् इत्थम् विदुः ये च इमे अरण्ये श्रद्धा तपः इति उपासते ते आर्चिषम् अभिसंभवन्ति । अर्चिषः अहः । अह्नः आपूर्यमाणपक्षम् । आपूर्यमाणपक्षात् यान् षट् उदङ् मासान् तान् एति । मासेभ्यः संवत्सरम् । संवत्सरात् आदि-

थम्। आदित्यात् चन्द्रमसम्। चन्द्रमसः विद्युतम् ( एति )। तत्पुरुषः अमानवः अस्ति। सः एनान् ब्रह्म गमयति। एषः देवयानः पन्थाः इति।

जे ( गृहस्थ असूनही ) पंचाग्निविद्येचें ज्ञान याप्रमाणें जाणतात किंवा जे ( वानप्रस्थ व संन्यासी ) अरण्यामध्ये श्रद्धेची म्हणजे पंचाग्निविद्येंत पहिल्या आहुतीच्या रूपानें सांगितलेल्या श्रद्धारूपी अव्यक्त तत्त्वाची तपश्चर्येच्या रूपानें उपासना करितात, ते अर्चिष म्हणजे प्रकाशकिरणांच्या स्वरूपाला प्राप्त होतात. प्रकाशकिरणांतून दिवसस्वरूपांत मिळतात. दिवसांतून शुक्ल-पक्षाला जातात. शुक्ल पक्षांतून जे उत्तरायणाचे सहा महिने त्यांप्रत जातात. त्या मासांतून संवत्सररूपास पावतात. ( ह्या सर्व त्या त्या स्थानांच्या देवता समजाव्या. ) संवत्सरांतून सूर्यमंडळास जातात. सूर्यमंडळातून चंद्रलोकाला जातात. तेथून ते विद्युत्स्वरूप होतात. तो विद्युत्पुरुष, अमानव म्हणजे मनुष्य नव्हे असा ( देवरूप असा ) या जीवांना ब्रह्माप्रत पोंचवितो. हा देवयान मार्ग होय.

**अथ य इमे ग्राम इष्टापूर्ते दत्तमित्युपासते ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रिं रात्रेरपरपक्षमपरपक्षाद्यान्षड्दक्षिणैति मासांस्तान्नैते संवत्सरमभिप्राप्नुवन्ति ॥ ३ ॥**

अथ ये इमे ग्रामे इष्टापूर्ते दत्तम् इति उपासते ते धूमम् अभिसंभवन्ति। धूमात् रात्रिम्। रात्रेः अपरपक्षम् अपरपक्षात् यान् षट् मासान् दक्षिणा एति तान् ( अभिसंभवन्ति )। एते संवत्सरम् न अभिप्राप्नुवन्ति।

आतां जे हे लोक गांवात ( येथें लोकांचें अज्ञान दर्शवि-ण्याकरितांच ग्रामे हें पद श्रुतींत आलें आहे. ) इष्ट म्हणजे वैय-क्तिक व कौटुंबिक धार्मिक आचार आणि पूर्त ह्मणजे लोकोपयोगीं

सार्वजनिक कामें व दत्त ह्मणजे दान इत्यादि कर्में करितात, ते धूम-स्वरूपाला प्राप्त होतात. धूमांतून रात्रीला, रात्रींतून कृष्णपक्षाला, कृष्णपक्षांतून ज्या सहा महिन्यांत सूर्य दक्षिणेकडे असतो त्या दक्षिणायनांतील महिन्यांना ते प्राप्त होतात. ( येथेंही पूर्वींप्रमाणेंच त्या त्या स्थानांच्या देवता ध्यावयाच्या आहेत. ) हे ( अज्ञानी लोक ) संवत्सराला प्राप्त होत नाहींत.

**मासेभ्यः पितृलोकं पितृलोकादाकाशमाकाशाच्चन्द्रमसमेष सोमो राजा तद्देवानामन्नं तं देवा भक्षयन्ति ॥ ४ ॥**

**मासेभ्यः पितृलोकम् । पितृलोकात् आकाशम् । आकाशात् चन्द्रमसम् । ( अभिसंभवन्ति ) । एषः सोमः राजा तत् देवानाम् अन्नम् ( अस्ति ) । तम् देवाः भक्षयन्ति ।**

ते दक्षिणायनांतील मासांतून पितृलोकाला, पितृलोकांतून आकाशाला व आकाशांतून चंद्रलोकाला ( जातात ). हा चंद्रच सोमराजा असून तो देवांचें अन्न आहे. त्याला देव भक्षण करितात.

**तस्मिन्यावत्संपातमुषित्वाथैतमेवाध्वानं पुनर्निवर्तन्ते यथेत-माकाशमाकाशाद्वायुं वायुर्भूत्वा धूमो भवति धूमो भूत्वाभ्रं भवति ॥ ५ ॥**

**तस्मिन् यावत् संपातम् उषित्वा अथ एतम् एव अध्वानम् पुनः यथा-इतम् निवर्तन्ते । आकाशात् वायुम् । वायुः भूत्वा धूमः भवति । धूमः भूत्वा अभ्रम् भवति ।**

त्या चंद्रलोकांत अपक्रांतीच्या कालापर्यंत राहून नंतर ह्याच पूर्वींच्या क्रमाच्या उलट मार्गानें ते जीव पुनः जसे गेले होते तसे परत येतात. तो जीव आकाशरूपाला प्राप्त होतो. तेथून वायु

रूपाला येतो. वायूरूप झाल्यावर धूमांत रूपांतर पावतो व धूम-रूप ( धुकें ) होऊन तो ढगांत रूपांतर पावतो.

**अभ्रं भूत्वा मेघो भवति मेघो भूत्वा प्रवर्षति त इह व्रीहियवा ओषधिवनस्पतयस्तिलमाषा इति जायन्तेऽतो वै खलु दुर्निष्प्रपतरं यो यो ह्यन्नमत्ति यो रेतः सिञ्चति तद्भूय एव भवति ॥६॥**

अभ्रम् भूत्वा मेघः भवति । मेघः भूत्वा प्रवर्षति । ते इह व्रीहियवाः ओषधिवनस्पतयः तिलमाषाः इति जायन्ते । यः यः अन्नम् अत्ति यः रेतः सिञ्चति तत् एव भूयः भवति । अतः वै खलु ( इदम् ) दुर्निष्प्रपतरम् ( अस्ति ) ।

अभ्ररूप झाल्यावर तो मेघरूप होतो. मेघरूप होऊन पर्जन्याच्या रूपानें तो पृथ्वीवर पडतो. असे आलेले ते जीव ह्या भूमंडलावर तांदूळ, जव, ओषधि, वनस्पति तीळ, उडीद इत्यादि पदार्थरूप होतात. जो जो प्राणी अन्न खातो आणि जेथें जेथें रेतःसिंचन करितो त्या ठिकाणीं या जीवाचा पुनः जन्म होतो. ह्मणूनच खरोखर या जन्ममरणरूपी चक्रांतून ( अज्ञानी जीवांची ) सुटका होणें दुरापास्त आहे.

**तद्य इह रमणीयचरणा अभ्याशो ह यत्ते रमणीयां योनिमापद्येरन्ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वाथ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिमापद्येरञ्श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चण्डालयोनिं वा ॥ ७ ॥**

तत् ये रमणीयचरणाः ( ते ) इह अभ्याशः ह रमणीयाम् योनिम् ब्राह्मणयोनिम् वा क्षत्रिययोनिम् वा वैश्ययोनिम् वा आपद्येरन् । अथ ये कपूयचरणाः ( ते ) इह अभ्याशः ह कपूयाम् योनिम् · श्वयोनिम् वा सूकरयोनिम् वा चण्डालयोनिम् वा आपद्येरन् ।

तेव्हां ( तसा जन्म घेत असतां ) जे सुशील व सदाचरणी असतात ते या जन्मांत तत्काल ( जन्म पावतांनाच ) उच्च जातीला म्हणजे ब्राह्मणजातीला, क्षत्रियजातीला किंवा वैश्यजातीला प्राप्त होतात; आणि ( याच्या उलट ) जे दुराचारी असतात ते या जन्मीं तत्काल ( जन्म पावत असतांच, ) हीन नीच जातीला म्हणजे कुत्रा, सूकर, किंवा चाण्डाल जातीला प्राप्त होतात.

**अथैतयोः पथोर्न कतरेणचन तानीमानि क्षुद्राण्यसकृदावर्तीनि भूतानि भवन्ति जायस्व म्रियस्वेत्येतत्तृतीयꣳ स्थानं तेनासौ लोको न संपूर्यते तस्माज्जुगुप्सेत तदेष श्लोकः ॥ ८ ॥**

**अथ एतयोः पथोः कतरेणचन न ( गच्छन्ति ) तानि इमानि क्षुद्राणि भूतानि जायस्व म्रियस्व इति असकृत् आवर्तीनि भवन्ति। एतत् तृतीयम् स्थानम्। तेन असौ लोकः न संपूर्यते। तस्मात जुगुप्सेत। तत् एषः श्लोकः।**

याहून निराळे, ( देवयान व पितृयाण ) या दोनही मार्गांपैकीं एका देखील मार्गानें न जाणारे, ते हे क्षुद्र जंतु 'जन्माला ये' आणि ' पुनः मर ' अशा रीतीनें एकसारखे जन्म-मरण चक्रांत परिभ्रमण करणारे असतात. तें हें तिसरें स्थान आहे. म्हणून हा द्युलोक सर्व जीवांकडून भरला जात नाहीं. त्या-विषयीं हा श्लोक ( मंत्र ) आहे.

**स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबꣳश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पञ्चमश्चाचरꣳस्तैरिति ॥ ९ ॥**

**हिरण्यस्य स्तेनः सुराम् पिबन् गुरोः तल्पम् आवसन् ब्रह्मह्य हा च एते चत्वारः तैः आचरन् पञ्चमः च ( एते ) पतन्ति इति।**

सुवर्ण ( ज्याची सोन्यांत किंमत होईल असा पदार्थ ) चोरणारा, दारू पिणारा, गुरुपत्नीशीं पापाचरण करणारा, शीलाचार-

संपन्न विद्वानाचा खून करणारा, हे चार व यांचेबरोबर आचरण करणारा ( साथीदार ) हे सर्व पतित होतात.

**अथ ह य एतानेवं पञ्चाग्नीन्वेद न सह तैरप्याचरन्पाप्मना लिप्यते शुद्धः पूतः पुण्यलोको भवति य एवं वेद य एवं वेद॥ १०॥**

**अथ यः एतान् पञ्चाग्नीन् एवम् वेद (सः) तैः सह आचरन् अपि पाप्मना न लिप्यते। य. एवम् वेद ( सः ) शुद्धः पूतः पुण्यलोकः भवति।**

परंतु जो मागें सांगितलेल्या पंचाग्नीचें यथार्थ स्वरूप जाणतो, त्याला या महापातकी लोकांबरोबर सहवास झाल्यानें संसर्गाचें पाप लागत नाहीं. याप्रमाणें जो जाणतो तो शुद्ध म्हणजे निष्पाप, पूत म्हणजे पवित्र व पुण्यलोक म्हणजे पुण्यशील किंवा पुण्यलोकांस पावणारा होतो. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

## ३ ते १० खंडांचा सारांश.

गौतमऋषि व प्रवाहण जैवली यांचें आख्यान तिसऱ्या खंडाच्या आरंभापासून सुरू झाले, ते या दहाव्या खंडाच्या अखेरीस समाप्त झालें आहे. प्रवाहण राजाने गौतमऋषीला ज्या ब्रह्मविद्येचा उपदेश केला तीच पंचाग्निविद्या होय. प्रश्नोपनिषदांतील प्राणविद्या, तैत्तिरीयोपनिषदांतील पंचकोशात्मक भार्गवी किंवा वारुणीविद्या आणि बृहदारण्यकांत व छांदोग्यांत प्रतिपादन केलेली ही पंचाग्निविद्या ह्या तत्त्वतः एकच आहेत. सर्वव्यापी अशा एकाच ब्रह्मतत्त्वाचें प्रतिपादन करणाऱ्या ह्या तीन शास्त्रीय रीति आहेत. ब्रह्मविद्येंतील उपसिद्धांतांची रचना मुख्यत्वेंकरून या तीन पद्धतींनीं करण्यांत आली आहे. या रचनाभेदांस अनुसरूनच वरील तीन नावें त्यांना देण्यांत येतात. कोणतीहि रचना घेतली तरी, ती पिण्डब्रह्माण्डात्मक विज्ञानाच्या योगानें तयार झालेली आहे असेंच दिसून येईल. विज्ञानशास्त्रें–भौतिकशास्त्रें केवळ भ्रमोत्पादक असल्यामुळें, परमार्थ-

दृष्टया तीं सर्वथैव त्याज्य होत, असें समजण्याची मायावादी सांप्रदयांत वहिवाटच पडून गेलेली आहे. ही गैरसमजुतीची परंपरा आज दोन हजार वर्षें एकसारखी चालू राहिली आहे. त्यामुळें कित्येक आधुनिक सुशिक्षितांना देखील असेंच वाटतें कीं, आधिभौतिक शास्त्रांचा परमार्थ-विचारांत मुळींच उपयोग नाहीं; जग व तदंतर्गत सर्व व्यवहार मिथ्या आभासरूप आहेत असें गृहीत धरूनच परमार्थाचा विचार करावयास पाहिजे इत्यादि इत्यादि. परंतु पूर्वग्रह सोडून दशोपनिषदांतील मूळ वाङ्मयाचा स्वतंत्र बुद्धीनें काळजीपूर्वक अभ्यास करावा, म्हणजे जीं आधिभौतिक शास्त्रें मिथ्या म्हणून आपण टाकून दिलीं त्यांचीच सोपानपरंपरा तयार करून वैदिक ऋषींनीं थेट ब्रह्मज्ञानाच्या प्रधान-सिद्धांतापर्यंत पोहोंचणारा हा विज्ञानाचा जिनाच बनविला आहे अशी कोणाचीहि खात्री पटेल. भौतिक ज्ञानाची दशोपनिषदांत अनेक ठिकाणीं जी मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे ती हेयत्वाकरितां–त्यागा-करितां नसून ब्रह्मज्ञानाचें तें एक अद्वितीय साधन होय, अशा हेतूनेंच केलेली आहे. ह्या खंडांत प्रवाहण राजानें उपदेशिलेली पंचाग्निविद्या म्हणजे ज्ञानविज्ञानाचें शास्त्रशुद्ध असें मिश्रणच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पृथिव्यादि पंचभूतें, ओषधि, वनस्पति इत्यादि जीवसृष्टि व देवता, दिव्य आप इत्यादि आधिदैविक सृष्टि यांचेंच विवेचन या पंचाग्निविद्येच्या रूपानें करण्यांत आलें आहे. आदित्यलोक ( द्युलोक ), बाष्परूप मेघ ( पर्जन्य ), पृथ्वी ( भूगोल ) बीज व स्त्री हे पांच अग्नि आहेत. येथें अग्नि ह्या शब्दाचें तात्पर्य इतकेंच कीं, ज्या तत्त्वांच्या संयोगानें हा सृष्टिक्रम चालला आहे त्या संयोगाचें स्थान किंवा अधिष्ठान म्हणजेच अग्नि होय. संयोग हा नेहमीं दोन पदार्थांत घडतो. अशा संयोगास त्या दोनहि पदार्थांच्या क्रिया कारणीभूत होतात किंवा त्यांतील एक पदार्थ स्थिर असून दुसऱ्या पदार्थाच्या क्रियेनेंच संयोग घडून येतो. उदाहरणार्थ, पुस्तकावर हात ठेवला म्हणजे हात व पुस्तक यांचा संयोग

झाला. येथें पुस्तक हा स्थिर पदार्थ असून फक्त हाताचीच क्रिया संयोगाला कारणीभूत झाली आहे. याप्रमाणेंच ज्या पांच तत्त्वांचा अग्निरूपानें निर्देश केला आहे ती तत्त्वें या सृष्टिजनक व्यापारामध्यें स्थिर आहेत अशी कल्पना करून, ज्या तत्त्वांचा क्रियेशीं मुख्यत्वेंकरून संबंध येतो त्यांना आहुतींचें रूप दिलें आहे. हीं आहुतिरूप तत्त्वें देखील पांच आहेत. तीं अशीं:–श्रद्धा ( दिव्य आप), सोम ( रसतत्त्व ), वृष्टि (पाणी), अन्न व रेत. याच त्या पांच आहुति होत. दिव्य–आप इत्यादि तत्त्वांचा द्युलोकादिकांशीं विशिष्ट प्रकारें संयोग होऊनच ही सर्व सृष्टि उत्पन्न झाली असें याचें तात्पर्य आहे. पण ज्या तत्त्वांना आहुति असें म्हटलें आहे त्यांचा द्युलोकांदिकांशीं आपोआप संयोग घडून येत नसून, तो संयोग घडवून आणण्याचा हेतुपुरस्सर उद्योग करणारी ईशशक्ति किंवा तिचे अंश ( देवता ) या सृष्टिक्रमामध्यें प्रधानत्वानें वावरत आहेत असा श्रुतीचा सिद्धान्त आहे. आधुनिक भौतिकशास्त्रवेत्त्यांनीं अनेक प्रकारच्या रासायनिक संयोगांचें संशोधन करून सृष्टीची कार्यकारणभावात्मक उपपत्ति अगदींच नवीन पण तर्कशुद्ध आणि सप्रमाण अशी सिद्ध केली आहे. ही उपपत्ति मान्य करण्यानें वैदिक ब्रह्मविद्येंतील वैज्ञानिक सिद्धान्तांची हानि तर व्हावयाची नाहींच, उलट त्यांत चांगल्या प्रकारची भर पडेल; आणि वैदिक ऋषींच्या हेतूप्रमाणें ब्रह्मज्ञानाचा बुद्धिगम्य मार्ग अधिकच सुकर होईल यांत शंका नाहीं. परंतु आधुनिक भौतिक शास्त्रवेत्त्यांना ईशशक्तींचें किंवा देवतांचें कर्तृत्व नीटसें मान्य करवत नाहीं हा औपनिषदिक विज्ञानशास्त्रांत व आधुनिक विज्ञानशास्त्रांत मोठाच फरक आहे. तथापि हा फरक किंवा मतभेद नष्ट होणें अशक्य अथवा असंभवनीय नाहीं. पदार्थांतील कार्यकारी शक्ति त्या त्या पदार्थांत स्वयंसिद्ध असून ती ज्ञानप्रयुक्त नसते, असें आधुनिकांचें मत आहे. पदार्थांची शक्ति व्यावहारिक दृष्ट्या स्वयंसिद्ध असली तरी, त्या शक्तीचें किंवा शक्तींचें उगमस्थान परमात्मतत्त्व हेंच होय असें वैदिक

ऋषींचें मत असून, पदार्थांत प्रगट होणाऱ्या या शक्ति मूळ परमात्मतत्त्वापासूनच निघत असल्यामुळें त्या परमात्म्याच्या ज्ञानशक्तीशीं संलग्न होऊनच प्रगट होतात, असा वैदिक ब्रह्मविद्येचा सिद्धान्त आहे. प्राचीन व आधुनिक विज्ञानशास्त्रांतील हा मतभेद सौम्य असून तो उत्तरोत्तर नाहींसा होण्याचाही संभव आहे. कारण मतभेद असला तरी तो तीव्रस्वरूपांत नसल्यामुळें त्याला विशेष महत्त्व देण्याचें प्रयोजनच नाहीं. विज्ञानशास्त्रांत तत्त्वाला विशेषसें महत्त्व नसल्यामुळें तात्त्विक मतभेद सौम्यच असतो. सृष्टिक्रमांतील ज्या ज्या रासायनिक व्यापारांचें संशोधन आधुनिकांनीं केलें आहे तें सर्व स्वीकारून त्या व्यापारांच्या कर्तृत्वशक्तीचें परमात्मा हेंच मुख्य केन्द्र होय एवढेंच काय तें वैदिक ब्रह्मविद्येचें विशेष म्हणणें आहे. त्याचा आधुनिक शास्त्रीय तत्त्वांशीं समन्वय होणें मुळींच कठिण नाहीं. देवतांनीं ईश्वर व द्युलोक ( आदित्यमंडळ ) यांचा संयोग करून रसतत्त्व उत्पन्न केलें. या रसतत्त्वाचा विद्युत्शक्तीच्या योगानें मेघांशीं संयोग करून पाणी ( वृष्टि ) उत्पन्न केलें. पृथ्वीवर पाऊस पडण्याच्यापूर्वी विद्युत्शक्तीच्या योगानें जे अनेक व्यापार घडतात त्यांचें आधुनिक शास्त्रकारांनीं अत्यंत मार्मिक विवेचन केलें आहे, त्याचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास, त्याची अस्फुट कल्पना श्रुतीनें केलेल्या पर्जन्याग्नीच्या वर्णनांत दिसून आल्यावाचून रहावयाची नाहीं. याप्रमाणें पंचाग्निविद्येचें वैज्ञानिक स्वरूप लक्षांत घेतल्यास उपनिषत्कालांत जे भौतिक सिद्धान्त उपलब्ध झाले होते त्यांचा काळजीपूर्वक उपयोग करूनच वैदिकऋषींनीं ब्रह्मज्ञानाचीं तत्त्वें सिद्ध केलीं असें निःसंशय ठरतें. आणि म्हणूनच प्राणविद्या, पंचकोशविद्या किंवा पंचाग्निविद्या हीं ब्रह्मविद्येचींच निरनिराळीं अंगें असल्यामुळें, या सर्व विद्यांचें अमृतत्व हें एकच फळ श्रुतीनें सांगितलें आहे.

अमृतत्वाला प्राप्त होण्याचा मार्ग म्हणजेच देवयानमार्ग होय. हा देवयान मार्ग क्रममुक्तिस्वरूपाचा असल्यामुळें तो सद्योमुक्तीच्या कल्पनेस

विरुद्ध आहे असें संन्यासमार्गीयांना वाटतें; परंतु सद्योमुक्ति व क्रममुक्ति यांतील भेद शास्त्रशुद्ध किंवा सयुक्तिक नाहीं. आभासरूप मायावादांत सद्योमुक्तीच्या कल्पनेस अवास्तव महत्त्व देण्यांत आलें आहे. आभास-वादाची कल्पना सोडून दिल्यास सद्योमुक्ति व क्रममुक्ति ह्या दोन कल्पना भिन्न नसून एकच आहेत असें समजून येईल. ब्रह्मसाक्षात्कारानंतर प्राप्त होणारी ब्राह्मी स्थिति मनुष्यदेहांतच असूं शकते, ती देवतारूपांत असूं शकतच नाहीं, असा नियम कोणासही करितां येणार नाहीं. ब्राह्मी स्थितीस पोहोंचलेला जीवात्मा तत्त्वतः ब्रह्मस्वरूपच झालेला असतो. मग तो मनुष्यरूपांत असला काय किंवा देवरूपांत असला काय सारखेंच. ज्या-प्रमाणें ब्राह्मी स्थितीस पोंचलेला ज्ञानी मनुष्य लोकसंग्रहार्थ मानवी कर्मे आचरून परमेश्वराच्या कार्यास सहाय करितो त्याप्रमाणेंच तो देवतारूपानें सृष्टिचक्र चालविण्यांत देखील परमेश्वराच्या कार्याला सहायच करीत असतो. असें देवतारूप धारण करण्यांत ज्ञानविज्ञानसंपन्न जीव परतंत्र नसून तो पूर्ण स्वतंत्रच आहे असें या देवयान मार्गाच्या वर्णनावरूनच सिद्ध होतें. कारण विद्युत्शक्तीच्या स्वरूपापर्यंत तो स्वतंत्रपणानें जातो; असें श्रुतीनें देवयान मार्गाचें वर्णन करितांना स्पष्ट सांगितलें आहे. शेवटीं ब्रह्मलोकाला जातो म्हणजे ज्या तत्त्वाचें मन किंवा वाणी यांनीं वर्णन करितां येत नाहीं अशा तत्त्वांत लीन होतो. ज्ञानी जीव या सृष्टिचक्रांतून एकदम नाहींसा होत नाहीं, तो क्रमाक्रमानें निरनिराळ्या पायऱ्यांवरून सृष्टिचक्रास सहाय करीत करीत मूलस्वरूपांत लीन होतो, असें या देवयान मार्गाचें तात्पर्य आहे. त्यावरून सद्योमुक्तीपेक्षां क्रममुक्तीचा मार्गच अधिक श्रेयस्कर होय असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. देवयान मार्गाचें प्रतिपादन करितांना संन्यास-मार्गी टीकाकारांना कर्मयोगाची अडचण कशी भासूं लागली आहे व ती टाळण्याकरितां श्रुतीनें उल्लेखिलेले वानप्रस्थ किंवा संन्यासी यांना देखील अज्ञानी ठरविण्याचा त्यांनीं कसा प्रयत्न केला आहे इत्यादि विषयांचें सवि-स्तर विवेचन बृहदारण्यकांत करण्यांत आलें असल्यामुळें, येथें त्याची पुन-

स्तुति करण्याचें कारण नाहीं. (उ. र. प्र. बृह. अ. ६ ब्रा. २ मं. १५ व दुसऱ्या ब्राह्मणाचा सारांश पृ. ६५७ ते ६६२). वस्तुतः अरण्यांत राहून श्रद्धापूर्वक, ज्ञानपूर्वक तप करणारे संन्यासी किंवा वानप्रस्थ हे मायावादांतील संन्यासमार्गी नसून, ते कर्मयोगी म्हणूनच श्रुतीला येथें उद्दिष्ट आहेत. कारण मायावादानें प्राप्त होणारा सर्व कर्मांचा स्वरूपतः संन्यास दशोपनिषदांत श्रुतीला कोठेंच अभिप्रेत नाहीं. यति किंवा संन्यासी यांचा दशोपनिषदांत अनेक ठिकाणीं उल्लेख आहे, तो चतुर्थाश्रमाला अनुलक्षून असल्यामुळें, हा संन्यासाश्रम कर्मयोगान्तर्गतच ठरतो; परंतु मायावादी संन्यास दशोपनिषदांमध्यें बसविण्याकरितां मायावादी संन्यासमार्गीयांनीं श्रुतीच्या अर्थाची जशी अनेक ठिकाणीं ओढाताण केली आहे तशी ती येथेंही केली असली तर त्यांत फारसें नवल नाहीं. परंतु हा ओढाताणीचा अर्थ केव्हांही अग्राह्यच ठरतो. तात्पर्य, या पंचाग्निविद्येचें ज्ञान संपादन करून मनुष्यानें कर्तव्याचरण केलें तर, असा ज्ञानविज्ञानसंपन्न स्थितप्रज्ञ देवयान मार्गानें ब्रह्मस्वरूपांत लीन होतो असेंच श्रुतीनें स्पष्ट प्रतिपादन केलें आहे.

पंचाग्निविद्येचें हें आख्यान जवळजवळ जसेंच्या तसेंच बृहदारण्यकांतही आलें आहे. गौतमऋषीला प्रवाहण जैवलीनें पंचाग्निविद्येचा उपदेश केला, हा वृत्तान्त ऐतिहासिक आहे, केवळ कल्पनिक नव्हे. हा इतिहास उपनिषत्-काळाच्या प्रारंभींच केव्हांतरी घडला असावा यांत शंका नाहीं. कारण पंचाग्निविद्या ही तैत्तिरीयोपनिषदांतील शिक्षाध्यायांत वर्णन केलेल्या याज्ञिकी विद्येच्या सदरांतच पडते. पंचाग्निविद्येच्या उपदेशाचा हा वृत्तान्त दोन ठिकाणीं ग्रथित करण्यांत आला असल्याचें वर सांगितलेंच आहे. तें लक्षांत घेतल्यावर बृहदारण्यकांतील पंचाग्निविद्या व छांदोग्यांतील पंचाग्नि-विद्या यांपैकीं आधींची कोणती व नंतरची कोणती असा प्रश्न उपस्थित झाल्यावांचून रहात नाहीं. अभ्यासकांना या प्रश्नाचा निर्णय करितां यावा म्हणून या दोन प्रकरणांतील कांहीं विषयांची तुलना करणें अवश्य आहे.

प्रस्तुत प्रकरणाच्या तिसऱ्या खंडांतील सातव्या मंत्रांत प्रवाहणाचें भाषण आलें आहे, त्याचें तात्पर्य असेः--गौतमानें आपणास ते पांचहि प्रश्न समजून देण्याविषयीं मागणी केली असतां, प्रवाहण जैवली मोठ्या संकटांत पडला आणि म्हणाला कीं, आजपर्यंत ही विद्या ब्राह्मणास प्राप्त झालेली नाहीं. ती क्षत्रियांना मात्र पूर्णपणें लाभली आहे; आणि या विद्येच्या सामर्थ्यावरच क्षत्रिय लोकांना आपली सत्ता अबाधित व निर्दोष राखतां आली. जैवलीच्या या भाषणावरून दिसतें कीं, ही ज्ञानविज्ञानात्मक पंचाग्निविद्या क्षत्रियांना पूर्णपणें प्राप्त झाली असून तिचा राजकारणाशीं–राजसत्तेशीं चांगलाच मेळ घातला गेला होता. म्हणजे अध्यात्मविद्या व क्षात्रविद्या यांचें सहकार्य होऊन तें सर्वांना श्रेयस्कर झालें होतें. हरिकीर्तन व राजकारण यांचा समर्थांनींही मेळ घालून दाखविला आहे ही गोष्ट देखील औपनिषद् विद्येच्या परंपरेस धरूनच झाली असें ठरतें. तसेंच, तत्त्ववेत्त्यानेंच राजा व्हावें किंवा राजानें तत्त्ववेत्ता झालें पाहिजे, अशा अर्थाचें एका ग्रीक तत्त्ववेत्त्याचें वाक्य इंग्रजींत प्रसिद्ध आहे, तें देखील प्रवाहणाच्या भाषणावरून निघणाऱ्या तत्त्वाला अनुसरूनच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रवाहणाचें हें भाषण बृहदारण्यक ६-२-८ मध्यें आलें आहे, पण त्यांत फरक आहे. छान्दोग्यांतील प्रवाहणाचें भाषण स्पष्ट आहे, तर बृहदारण्यकांतील त्याचें हें भाषण बरेंच अस्पष्ट आहे. ही विद्या अद्यापि ब्राह्मणांना मिळालेली नाहीं असें न म्हणतां गौतमाच्या कुळांत ही पंचाग्निविद्या अद्यापि कोणास मिळालेली नाहीं असें तो बृहदारण्यकांत म्हणत आहे. बृहदारण्यकांतील हा संदिग्धपणा हेतुपुरस्सर असणें शक्य दिसतें, तथापि तसें निश्चित ठरविण्याजोगें प्रमाण नाहीं. हे दोनही मंत्र एकमेकांशीं ताडून पाहिल्यास बृहदारण्यकांतील भाषेचा संदिग्धपणा लक्षांत भरण्याजोगा आहे इतकें मात्र खरें. बृहदारण्यकांतील ६ व्या अध्यायांतील दुसऱ्या मंत्रांत ( कंडिकेंत ) राजानें देवयान व पितृयाण मार्गांविषयीं केलेल्या प्रश्नाचें श्वेतकेतूनें नकारार्थी उत्तर दिल्यावर, तूं हें ऋषीचें वाक्य

ऐकिलें नाहींस काय ? असें म्हणून प्रवाहण राजानें एक प्राचीन मंत्र पठण केला आहे (उ. नि. र. प्र. बृ. अ. ६ ब्रा. २ मं. २ पृ. ६३९ व ६४०). या मंत्राचा उल्लेख छान्दोग्यांतील या प्रकरणांत मुळींच नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. देवयान मार्गाचें वर्णन करितांना छान्दोग्यांत असें म्हटलें आहे कीं, ज्ञानी जीव उत्क्रांत होत होत विद्युत्शक्तीपर्यंत गेल्यावर त्या शक्तीमधील अतिमानुष किंवा अमानव असा एक पुरुष (देव) या जीवाला ब्रह्मरूपाला पोंचवितो. येथें या वैद्युत् पुरुषाला अमानव असें विशेषण दिलें आहे. परन्तु बृहदारण्यकांत याच पुरुषाला अमानव असें विशेषण न देतां मानस असें विशेषण दिलें आहे ही गोष्ट देखील महत्त्वाची आहे. कारण, वरील दोन विशेषणांचा अर्थ अगदीं वेगळा आहे. छान्दोग्यांतील प्रस्तुत प्रकरणांतील १० व्या खंडाच्या नवव्या मंत्रांत पंचमहापातकांचें परिगणन केलें आहे व पंचाग्निविद्येच्या ज्ञानानें मनुष्य या पंचमहापातकांच्या संसर्गांतून देखील मुक्त होतो असें सांगितलें आहे. पण बृहदारण्यकांतील पंचाग्निविद्येच्या उपसंहारांत हा विषय मुळींच आलेला नाहीं.

येथवर या दोन प्रकरणांतील मुख्य मुख्य फरक दाखविले आहेत. आणखीही बारीक सारीक फरक बरेच निघतील. त्या सर्वांचा काळजीपूर्वक विचार केल्यास ग्रंथरचनेच्या दृष्टीनें या दोन प्रकरणांपैकीं आधींचें कोणतें व नंतरचें कोणतें याचा निर्णय करणें फारसें कठिण जाणार नाहीं असें वाटतें. मुख्य मुख्य फरकांवरून छान्दोग्यांतील प्रकरण जुनें असून बृहदारण्यकांतील रचना छान्दोग्याच्या नंतरची असावी असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. तें कसेंही असलें तरी, श्रुतीनें केलेलें पंचाग्निविद्येचें विवेचन अत्यंत महत्त्वाचें आहे यांत शंका नाहीं. मानवी जीविताला अत्यंत श्रेयस्कर असा मोक्षमार्ग प्रत्यक्ष दाखविणारी पंचाग्निविद्या प्रतिपादन करणाऱ्या वैदिक ऋषींचे वैदिकसमाजावर—हिंदुसमाजावर जे अनेक उपकार झाले आहेत त्यांचें शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे.

---

## अथैकादशः खण्डः ।

**प्राचीनशाल औपमन्यवः सत्ययज्ञः पौलुषिरिन्द्रद्युम्नो भाल्लवेयो जनः शार्कराक्ष्यो बुडिल आश्वतराश्विस्ते हैते महाशाला महाश्रोत्रियाः समेत्य मीमा॑ंसां चक्रुः को न आत्मा किं ब्रह्मेति ॥ १ ॥**

**औपमन्यवः प्राचीनशालः पौलुषिः सत्ययज्ञः भाल्लवेयः इन्द्रद्युम्नः शार्कराक्ष्यः जनः आश्वतराश्विः बुडिलः ते एते महाशालाः महाश्रोत्रियाः समेत्य नः कः आत्मा किम् ब्रह्म इति मीमांसाम् चक्रुः ह।**

उपमन्यूचा पुत्र प्राचीनशाल, पुलुषाचा मुलगा सत्ययज्ञ, भल्लवाचा मुलगा इंद्रद्युम्न शर्कराक्षाचा मुलगा जन, अश्वतराश्वाचा मुलगा बुडिल असे हे सुसंपन्न, कुटुंबवत्सल वेदविद्येमध्यें निष्णात असे ( पांच गृहस्थ ) एकत्र जमून, आमचा आत्मा कोणता, व ब्रह्म म्हणजे काय , याविषयीं चर्चा करूं लागले.

प्रस्तुत मंत्रांत पांच ऋषींचीं दुहेरी नांवें आलीं आहेत. या पांच गृहस्थांची समिति किंवा सभा असून त्या सभेंत आत्मा व ब्रह्म यांचें स्वरूप काय, हीं दोन तत्त्वें एक कीं भिन्न, याविषयीं चर्चा ( विचारविनिमय ) सुरू झाला. या पांचहि ऋषींना महाशाल व महाश्रोत्रिय अशीं विशेषणें दिलीं आहेत ती त्यांच्या संपन्नतेचीं व विद्वत्तेचीं निदर्शक आहेत. महाशाल हें विशेषण मुण्डकोपनिषदांतहि आलें आहे. ( उ. नि. र. प्र. मुण्डक १-१-३ पृ. ३ ते ५ ).

**ते ह संपादयांचक्रुरुद्दालको वै भगवन्तोऽयमारुणिः संप्रतीममात्मानं वैश्वानरमध्येति त॑ं हन्ताभ्यागच्छामेति त॑ं हाभ्याजग्मुः ॥ २ ॥**

**ते संपादयांचक्रुः ह। भगवन्तः अयम् आरुणिः उद्दालकः संप्रति इमम् वैश्वानरम् आत्मानम् अध्येति वै। हन्त तम् अभ्यागच्छाम इति । तम् ह अभ्याजग्मुः।**

( चर्चेंत समाधानकारक निर्णय होईना म्हणून, ) त्यांनीं असें सुचविलें कीं, सभ्य गृहस्थ हो! हा अरुणाचा मुलगा उद्दालक ऋषि सांप्रत वैश्वानरस्वरूप आत्म्याला जाणतो ( ह्मणजे तो वैश्वानरविद्येंत प्रवीण आहे ), म्हणून त्याच्याकडे आपण जाऊं या. ( असें ठरवून ) ते पांचही ऋषि त्या उद्दालक ऋषीकडे गेले.

वैश्वानरविद्या ही पंचाग्निविद्येसारखीच ब्रह्मविवेचन करण्याची एक रीति आहे. उद्दालक ऋषीनें वैश्वानरविद्या संपादन केली असल्याचें माहीत असल्यामुळेंच या प्राचीनशालादिक ऋषींनीं त्याच्याकडे जाण्याचें ठरविलें.

**स ह संपादयांचकार प्रक्ष्यन्ति मामिमे महाशाला महाश्रोत्रियास्तेभ्यो न सर्वमिव प्रतिपत्स्ये हन्ताहमन्यमभ्यनुशासानीति॥३॥**

सः संपादयांचकार ह । इमे महाशालाः महाश्रोत्रियाः माम् प्रक्ष्यन्ति। सर्वम् इव न प्रतिपत्स्ये ह । हन्त अहम् अन्यम् अभ्यनुशासानि इति ।

( त्यांना पाहून ) त्यानें ( उद्दालकानें ) मनाशीं ठरविलें कीं, श्रीमंत व महाविद्वान असे हे ऋषि मला प्रश्न करतील तर त्याचें उत्तर संपूर्णपणें मला कदाचित् देतां येणार नाहीं (तर ) आपण यांना दुसऱ्या ब्रह्मवेत्त्याकडून शिक्षण मिळेल असें करावें.

**तान्होवाचाश्वपतिर्वै भगवन्तोऽयं कैकेयः संप्रतीममात्मानं वैश्वानरमध्येति तꣳ हन्ताभ्यागच्छामेति तꣳ हाभ्याजग्मुः ॥ ४ ॥**

तान् उवाच ह । भगवन्तः अयम् कैकयः अश्वपतिः संप्रति इमम् वैश्वानरम् आत्मानम् अध्येति वै । हन्त तम् अभ्यागच्छाम ह । इति तम् अभ्याजग्मुः ह ।

( आलेल्या ऋषींचे वैश्वानरविद्येविषयींचे प्रश्न ऐकून घेतल्यावर ) उद्दालक ऋषि त्यांना ह्मणाला:—महाराज ! हा केकय देशाचा राजा अश्वपति सांप्रत वैश्वानररूप आत्मतत्त्व चांगलें

जाणतो ( वैश्वानरविद्येंत तो प्रवीण आहे ), म्हणून आपण सर्व त्या राजाकडे जाऊं या. ( असें ठरल्यावर ) उद्दालकासह ते सर्व ऋषि त्या अश्वपतीकडे गेले.

**तेभ्यो ह प्राप्तेभ्यः पृथगर्हाणि कारयांचकार स ह प्रातः संजिहान उवाच न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपो नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी स्वैरिणी कुतो यक्ष्यमाणो वै भगवन्तोऽहमस्मि यावदेकैकस्मा ऋत्विजे धनं दास्यामि वसन्तु भगवन्त इति॥५॥**

**प्राप्तेभ्यः तेभ्यः पृथक् अर्हाणि कारयांचकार ह । प्रातः संजिहानः सः उवाच ह । मे जनपदे न स्तेनः न कदर्यः न मद्यपः न अनाहिताग्निः न अविद्वान् न स्वैरी स्वैरिणी कुतः । भगवन्तः अहम् यक्ष्यमाणः अस्मि । एकैकस्मै ऋत्विजे यावत् धनम् दास्यामि । भगवन्तः वसन्तु इति ।**

त्या ऋषींचा त्यानें व्यक्तिशः वेगवेगळा सत्कार करविला. प्रातःकाळीं त्यांचेकडे येऊन तो राजा त्या ऋषींना म्हणाला कीं, माझ्या देशांत कोणी चोर नाहीं,म्हणजे कधींहि चोरी होत नाहीं, कोणी कृपण नाहीं, कोणी दारूबाज नाहीं, कोणीहि गृहस्थ अग्निहोत्रावांचून नाहीं, कोणीहि अशिक्षित नाही, कोणताहि पुरुष व्यभिचारी नाहीं, मग व्यभिचारिणी स्त्री कोठली ? महाराज ! सांप्रत मी यज्ञ करीत आहें त्या यज्ञांतील प्रत्येक ऋत्विजाला जितकें धन देईन तितकें धन तुमच्यापैकीं प्रत्येकाला देईन. तर आपण येथें खुशाल रहावें.

केकयदेशाचा राजा अश्वपति यानें आपल्या राज्यांतील देशस्थिति या मंत्रांत वर्णन केली आहे, ती प्रत्येकानें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. चोरीसारखे गुन्हे त्याच्या देशांत मुळींच होत नव्हते. दारूबाजीचें व्यसन तर कोणालाच नव्हतें. सर्व समाज सुशिक्षित असून स्त्रीपुरुषसंबंध अत्यंत धर्म-

शील असेच होते. यावरून उपनिषत्‌काळांतील समाजधर्माच्या कल्पना किती उन्नतावस्थेला पोंचल्या होत्या हें चांगलें दिसून येतें. प्रस्तुत मंत्रांतील वर्णन काल्पनिक आहे असें क्षणभर मानलें तरी देखील, समाजाची सुस्थिति म्हणजे काय, याविषयींचें वैदिक ऋषींचें विचार किती आदर्शरूप होते हें तरी निश्चित ठरवितां येतें. एकदम इतके ऋषि आलेले पाहून, आपल्या राज्यांतील कांहीं अव्यवस्था दूर करून घेण्याकरितां हे आले असावे अशी कल्पना करून, राजानें आपली राज्यव्यवस्था त्यांना सांगितली असावी असें दिसतें.

**ते होचुर्येन हैवार्थेन पुरुषश्चरेत्त्ँ हैव वदेदात्मानमेवेमं वैश्वानरँ संप्रत्यध्येषि तमेव नो ब्रूहीति ।। ६ ।।**

**ते ऊचुः ह । येन अर्थेन एव पुरुषः ह चरेत् तम् एव वदेत् ह । संप्रति इमम् वैश्वानरम् आत्मानम् अध्येषि तम् एव नः ब्रूहि इति ।**

ते म्हणाले कीं, ज्या हेतूनें मनुष्य आलेला असतो तोच हेतु मनुष्यानें सांगावा. सांप्रत तूं ह्या वैश्वानररूपी ब्रह्माचें अध्ययन केलें आहेस, म्हणजे सांप्रतकाळीं तूं या विद्येंत निष्णात आहेस तीच विद्या आम्हांला सांग.

**तान्होवाच प्रातर्वः प्रतिवक्तास्मीति ते ह समित्पाणयः पूर्वाह्णे प्रतिचक्रमिरे तान्हानुपनीयैवैतदुवाच ।। ७ ।।**

**प्रातः वः प्रतिवक्तास्मि इति तान् उवाच ह । ते समित्पाणयः पूर्वाह्णे प्रतिचक्रमिरे । तान् अनुपनीय एव एतत् उवाच ह ।**

उदयिक सकाळीं तुम्हांला ती विद्या सांगेन, असें अश्वपति राजा त्यांना म्हणाला. ( दुसरे दिवशीं ) ते ऋषि प्रातःकाळीं हातांत समिधा घेऊन राजाकडे गेले. त्या ऋषींचें उपनयन न करितांच त्यानें ती वैश्वानरविद्या त्यांना सांगितली.

ऋर्षीची विनंति मान्य करून राजानें दुसरे दिवशीं सकाळीं त्यांना वैश्वानरविद्या शिकविण्यास प्रारंभ केला. विद्या शिकण्याकरितां राजाकडे येतांना ऋर्षींनीं हातांतून समिधा आणल्या होत्या. कोणतीहि नवीन विद्या शिकविण्यास प्रारंभ करितांना प्रत्येकाला उपनयन संस्कार करावा लागत असे; परंतु अश्वपति राजानें त्या ऋर्षींचीं उपनयनें न करिताच वैश्वानर-विद्येच्या अध्यापनास प्रारंभ केला, असें 'अनुपनीय' हें पद घालून प्रस्तुत मंत्रांत स्पष्ट सांगितलें आहे. यावरून अध्यात्मविद्याध्ययनास उपनयन संस्काराची आवश्यकता नाहीं, असें त्या सर्वांचें मत होतें असें निश्चित ठरतें. विद्या ग्रहण करणारे ऋषि पूर्ण आचार्यनिष्ठ होते, असें 'समित्पाणयः' या विशेषणानें प्रस्तुत मंत्रांत दाखविलें आहे. अशा आचार्यनिष्ठ ऋर्षींना देखील वैश्वानरविद्येला उपनयन संस्काराची आवश्यकता वाटली नाहीं, त्या अर्थी सर्व विद्यांची विद्या अशी जी ब्रह्मविद्या तिचें ग्रहण करितांना उप-नयन संस्काराची गरज नाहीं असेंच सिद्ध होतें.

## ११ व्या खंडाचा सारांश.

प्रस्तुत खंडाचे सात मंत्र असून त्यांत वैश्वानरविद्येविषयीं झालेल्या गुरु-शिष्यसंवादाची प्रास्ताविक कथा आली आहे. प्राचीनशालादिकांची तत्त्वजिज्ञासा चांगलीच प्रशंसनीय होती. उद्दालक ऋर्षींची कीर्ति ऐकून ते त्याच्याकडे गेले; परंतु या विद्येचें शिक्षण देण्यास आपण पूर्ण समर्थ आहों असें उद्दालकाला वाटलें नाहीं; म्हणूनच त्यांना घेऊन तो अश्वपति राजा-कडे गेला. राजानें आढेवेढे न घेतां त्यांना वैश्वानरविद्येचा उपदेश करण्याचें मान्य केलें व ऋषि देखील प्रांजलपणें त्या क्षत्रियाचें शिष्यत्व पत्करून त्याच्यापासून उपदेश घेण्यास तयार झाले. यावरून उच्चनीचत्त्व जातिनिष्ठ नसून, तें गुणनिष्ठ आहे, असें उपनिषत्कालांत सर्वांनाच वाटत होतें असें दिसतें. या वेळीं जातिभेद असला तरी श्रेष्ठकनिष्ठपणाचा त्याच्याशीं मुळींच संबंध नव्हता, असें या खंडांतील कथेवरून निःसंशय सिद्ध

होतें. आरुणि वंशाचें घराणें त्या काळीं ब्रह्मविद्येंत चांगलेंच प्रवीण होतें असें दिसतें.

---

### अथ द्वादशः खण्डः ।

**औपमन्यव कं त्वमात्मानमुपास्स इति दिवमेव भगवो राजन्निति होवाचैष वै सुतेजा आत्मा वैश्वनरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्तव सुतं प्रसुतमासुतं कुले दृश्यते ॥ १ ॥**

**औपमन्यव त्वम् कम् आत्मानम् उपास्से इति । भगवः राजन् दिवम् एव इति उवाच ह । त्वम् यम् आत्मानम् उपास्से एषः वै सुतेजाः वैश्वानरः आत्मा । तस्मात् तव कुले सुतम् प्रसुतम् आसुतम् च दृश्यते ।**

( अश्वपतिराजा प्राचीनशालास म्हणाला ) हे उपमन्यु-पुत्रा ! तूं कोणत्या आत्म्याची ( तत्त्वाची ) उपासना करितोस ? भगवन् राजेश्वरा ! मी केवळ द्युलोकाचीच उपासना करितों असें प्राचीनशालानें उत्तर दिलें. ( राजा म्हणाला ) तूं ज्या तत्त्वाची उपासना करीत आहेस तो सुतेजा नांवाचा वैश्वानर-तत्त्वाचाच भाग आहे; म्हणून तुझ्या कुलामध्यें सुत ह्मणजे सोमयुक्त ज्योतिष्टोम, प्रसुत म्हणजे सोमरसानें होणारा सर्वपृष्ट नांवाचा यज्ञ, व आसुत म्हणजे वाजपेय असे यज्ञ दिसतात ( घडत आहेत ).

उपमन्यूचा पुत्र प्राचीनशाल हा पूर्वींपासूनच द्युलोकाची उपासना करीत होता. कोणत्याहि तत्त्वाची उपासना करावयाची म्हणजे त्या तत्त्वाचें ज्ञान संपादन करणें, त्या ज्ञानाचा प्रसार करणें, मानवी जीविताचा त्या तत्त्वाशीं ज्या स्वरूपानें ( प्रकारानें ) संबंध येत असेल तें स्वरूप किंवा तो प्रकार पवित्र व तेजस्वी राखणें, हीच तत्त्वोपासना होय. धातु, काष्ठ, पाषाण इत्यादिकांच्या मूर्तींच्या उपासनेसारखी तत्त्वोपासना नसते. या उपासनेंत ज्ञानाला व तदनुसार कर्तव्याचरणाला विशेष महत्त्व असतें.

औपमन्यवऋषीला द्युलोकरूपी तत्त्वाचें ज्ञान झालें होतें व तदनुसार त्याची ज्ञानोपासना चालू होती. परंतु या तत्त्वाचा इतर तत्त्वांशीं मेळ कसा घालावयाचा तें त्याला अद्यापि कळलेलें नव्हतें. अर्थात् त्याला वैश्वानरविद्या अद्यापि पूर्ण अवगत झाली नव्हती. तीच अश्वपति राजा त्याला समजावून देत आहे. या तत्त्वज्ञानाचें फल म्हणून श्रुतीनें सोमयागाचा निर्देश केला आहे. या निर्देशांत सोमरस काढणें अशा अर्थाच्या 'सु' धातूचीं तीन रूपें आलीं आहेत. त्यांवरून अग्निष्टोम ( ज्योतिष्टोम ), सर्वपृष्ट आणि वाजपेय हे तीन यज्ञ घेण्यास हरकत नाहीं. कारण या तीन यज्ञांमध्यें सोमसंस्थेंतील इतर सर्व प्रकारच्या यागांचा अंतर्भाव करितां येतो.

**अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते मूर्धा त्वेष आत्मन इति होवाच मूर्धा ते व्यपतिष्यन्मा नागमिष्य इति ॥ २ ॥**

**अन्नम् अत्सि प्रियम् पश्यसि । यः एतम् वैश्वानरम् आत्मानम् एवम् उपास्ते ( सः ) अन्नम् अत्ति प्रियम् पश्यति । अस्य कुले ब्रह्मवर्चसम् भवति । एषः तु आत्मनः मूर्धा एव । यत् माम् न आगमिष्यः ते मूर्धा व्यपातिष्यत् इति उवाच ह ।**

( त्याच उपासनेमुळें ) तूं अन्न भक्षण करीत आहेस ( धन व सामर्थ्य यांनीं संपन्न आहेस ) व तूं सुख पहात आहेस. ( पूर्ण सुखी आहेस. ) हें सर्व तुझ्या उपासनेचें फल होय. जो कोणी ह्या वैश्वानररूप ब्रह्माची याप्रमाणें उपासना करितो तो अन्न भक्षण करितो व सुख पाहतो. म्हणजे श्रीमान्, सामर्थ्यवान् व सुखी होतो; त्याच्या कुलामध्यें तेजस्वी विद्या असते. द्युलोक हाच या वैश्वानर ब्रह्माचा मूर्धा म्हणजे शिरोभाग होय. जर तूं माझ्याकडे आला नसतास तर तुझें मस्तक पतन पावलें असतें. म्हणजे

तूं जर ही वैश्वानर विद्या अपुरी ठेविली असतीस तर तुझी बुद्धि निष्फळ झाली असती.

प्राचीनशाल ( उपमन्युपुत्र ) जरी सुतेजस् या नांवाच्या तत्त्वाची उपासना करीत होता तथापि त्याची ही वैश्वानरविद्या अपुरीच होती. जर तूं ही वैश्वानरविद्या पुरी केली नसतीस तर तुझें हें अर्धवट ज्ञान फुकट गेलें असतें, किंबहुना असल्या अर्धवट ज्ञानानें केव्हां तरी तुझा बुद्धिभ्रंश झाला असता, असें राजा म्हणाला आहे. 'मूर्धा ते व्यपतिष्यत्' ही शब्दयोजना आतांपर्यंत अनेक ठिकाणीं आली आहे, ती बुद्धिभ्रंश या अर्थाचीच द्योतक आहे. विश्वव्यापी अशा वैश्वानर आत्म्याचा सुतेजा ( द्युलोक ) हा मूर्धा ( शिरोभाग ) आहे. वैश्वानर आत्म्याचे इतर भाग म्हणजे अंश समजले तरच ह्या उपासनेचें सार्थक होतें असें अश्वपतीनें म्हटलें आहे. सर्व तत्त्वांचें ज्ञान नसतांना त्यांपैकीं एकाद्याच तत्त्वाची उपासना केली तर, ती एकांगी उपासना निष्फळ होते. किंबहुना ती अपायकारक होण्याचाहि संभव असतो. वैश्वानरविद्येचें पूर्ण ज्ञान संपादन करून तदन्तर्गत या सुतेजा नामक तत्त्वाची उपासना केली तर तो उपासक व त्याचें कुळहि ब्रह्मतेजानें संपन्न होतें.

[ टीपः—या खंडांत दोनच मंत्र असून त्याचें विवरण पूर्णपणें झालें असल्यानें, या खंडाचा निराळा सारांश लिहिला नाहीं. ]

---

## अथ त्रयोदशः खण्डः ।

**अथ होवाच सत्ययज्ञं पौलुषिं प्राचीनयोग्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यादित्यमेव भगवो राजन्निति होवाचैष वै विश्वरूप आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्तव बहु विश्वरूपम् कुले दृश्यते ॥ १ ॥**

**अथ पौलुषिम् सत्ययज्ञम् उवाच ह। प्राचीनयोग्य त्वम् कम् आत्मानम् उपास्से इति । भगवः राजन् आदित्यम् एव इति उवाच ह । त्वम् यम् आत्मा-**

**नम् उपास्से एषः वै विश्वरूपः वैश्वानरः आत्मा। तस्माद् तव कुले विश्वरूपम् बहु दृश्यते।**

नंतर तो राजा पुलुषीचा पुत्र जो सत्ययज्ञ त्याला म्हणाला, हे प्राचीनयोग्या ! तूं कोणत्या आत्म्याची उपासना कारितोस ? भगवन् ! राजेश्वरा ! मी आदित्याचीच उपासना करितों, असें सत्ययज्ञ ह्मणाला. ( राजा म्हणाला ) तूं ज्या आत्म्याची उपासना करितोस, तोच विश्वरूप नांवाचा वैश्वानर आत्मा होय. या उपासनेमुळें तुझ्या कुलामध्यें सर्व प्रकारची संपत्ति पुष्कळ दिसते.

प्रस्तुत मंत्रांत सत्ययज्ञ पौलुषीला अश्वपतीनें प्रश्न केला आहे. या सत्ययज्ञालाच प्राचीनयोग्य असें या मंत्रांत म्हटलें आहे. परंतु अकराव्या खंडाच्या प्रारंभीं पांच ऋषींच्या नांवांची जी यादी दिली आहे तींत सत्ययज्ञाला प्राचीनयोग्य हें नांव दिलेलें नाहीं म्हणून, तें या मंत्रांत नवीन वाटतें. प्राचीनयोग्य हें नांव तैत्तिरीय उपनिषदातील शीक्षाध्यायाच्या सहाव्या अनुवाकाच्या शेवटीं आलें आहे. तेथें आलेला विषय हा प्राचीनयोग्याला करण्यांत आलेला उपदेश आहे, असें दिसतें; परंतु तो कोणीं केला आहे त्याचा तेथें खुलासा होत नाहीं. कदाचित् त्या अनुवाकांत प्रतिपादन करण्यांत आलेला विषय तात्त्विकदृष्ट्या वैश्वानरविद्येंतील असावा अशा अभिप्रायानें, ' इति प्राचीनयोग्योपास्स्व ' हें वाक्य अश्वपतीचें म्हणूनच तैत्तिरीय उपनिषदांत समाविष्ट करण्यांत आलें असावें, असा तर्क करण्यास हरकत नाहीं. ( उ. नि. र. प्र. तैत्ति. शी. अ. ६ मं. ६ पृ. ३० ). सत्ययज्ञ आदित्याची उपासना करीत होता. या आदित्याला अश्वपतीनें वैश्वानरविद्येच्या परिभाषेंतील विश्वरूप अशी संज्ञा दिली आहे.

**प्रवृत्तोऽश्वतरीरथो दासी निष्कोऽत्त्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानर-**

**मुपास्ते चक्षुष्ट्वेतदात्मन इति होवाचान्धोऽभविष्यो यन्मा नागमिष्य इति ॥ २ ॥**

**अश्वतरीरथः दासी निष्कः त्वाम् अनुप्रवृत्तः । अन्नम् अत्सि प्रियम् पश्यसि । यः एतम् वैश्वानरम् आत्मानम् एवम् उपास्ते सः अन्नम् अत्ति प्रियम् पश्यति । अस्य कुले ब्रह्मवर्चसम् भवति । आत्मनः तु एतत् चक्षुः । यत् माम् न आगमिष्यः ( तत् ) अन्धः अभविष्यः । इति उवाच ह ।**

तसेंच अश्वतरींनीं युक्त रथ ( इत्यादि वाहनें ), दासदासी व संपत्ति तुला प्राप्त झाली आहेत. तूं संपत्ति उपभोगितोस व सुख अनुभवितोस. ( श्रीमान्, सामर्थ्यवान् व सुखी आहेस. ) जो कोणी ह्या वैश्वानर ब्रह्माची याप्रमाणें उपासना करितो तो श्रीमान्, सामर्थ्यवान् व सुखी होतो. त्याच्या कुलामध्यें तेजस्वी ज्ञान असतें. आदित्य हा वैश्वानर ब्रह्माचा चक्षु आहे. जर माझ्याकडे आला नसतास तर, ( या एकांगी उपासनेच्या योगानें ) तूं अंध झाला असतास. म्हणजे तुझी दृष्टि निष्फळ झाली असती. असें राजा त्या सत्ययज्ञाला म्हणाला.

आदित्याच्या–विश्वरूपाच्या उपासनेचें फल पूर्वीसारखेंच आहे. येथें देखील अतिशय श्रीमंतीचा द्योतक म्हणूनच अश्वतरी--रथाचा उल्लेख आला आहे.

---

## अथ चतुर्दशः खण्डः ।

**अथ होवाचेन्द्रद्युम्नं भाल्लवेयं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इति वायुमेव भगवो राजन्निति होवाचैष वै पृथग्वर्त्मात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वां पृथग्बलय आयान्ति पृथग्रथश्रेणयोऽनुयन्ति ॥ १ ॥**

**अथ भाल्लवेयम् इन्द्रद्युम्नम् उवाच ह । वैयाघ्रपद्य त्वम् कम् आत्मानम् उपास्से इति । भगवः राजन् वायुम् एव इति उवाच ह । यम् आत्मानम् त्वम् उपास्से एषः वै पृथग्वर्त्मात्मा वैश्वानरः । तस्मात् त्वाम् पृथक् बलयः आयन्ति । पृथक् रथश्रेणयः अनुयन्ति ।**

नंतर भाल्लवपुत्र इन्द्रद्युम्नाला राजा म्हणालाः--हे वैयाघ्रपद्या ! तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस ? भगवन् ! राजेश्वरा ! मी फक्त वायूचीच उपासना करितों, असें इन्द्रद्युम्न म्हणाला. ( राजा म्हणाला ) ज्या आत्म्याची तूं उपासना करितोस तो वायु नानाप्रकारच्या गतिस्वरूपाचा वैश्वानर होय. या उपासनेमुळेंच चहूंकडून तुला अनेक प्रकारचे सत्कार मिळतात. तसेच नानाप्रकारचे रथसमूह तुझ्या मागून येतात ( तुझी श्रीमंती फार मोठी आहे ).

वैयाघ्रपद्य हें नांव बृहदारण्यकांतहि आहे. भाल्लवेय व इन्द्रद्युम्न हीं नावें अकराव्या खंडाच्या प्रारंभीं आलीं असून वैयाघ्रपद्य हें इन्द्रद्युम्नाचें तिसरें नांव येथें आलें आहे. समुदायाचा पुढारीपणा हा वायूपासनेच्या फलांतील विशेष आहे. पृथग्वर्त्मात्मा ही वैश्वानरविद्येंतील वायूची संज्ञा आहे. निरनिराळ्या मार्गांनीं जाणें हेंच ज्याचें स्वरूप आहे, अशा अर्थाची ही संज्ञा दिसते.

**अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते प्राणस्त्वेष आत्मन इति होवाच प्राणस्त उदक्रमिष्यद्यन्मां नागमिष्य इति ॥ २ ॥**

**अन्नम् अत्सि । प्रियम् पश्यसि । यः एतम् वैश्वानरम् आत्मानम् एवम् उपास्ते सः अन्नम् अत्ति प्रियम् पश्यति । अस्य कुले ब्रह्मवर्चसम् भवति । एषः आत्मनः प्राणः तु ( अस्ति ) । यत् माम् न आगमिष्यः ( तत् ) ते प्राणः उदक्रमिष्यत् ।**

(या उपासनेच्या योगानें तू) अन्न खात आहेस (संपत्तीचा उपभोग घेत आहेस) व आनंद अनुभवीत आहेस. जो या वैश्वानर ब्रह्माची अशी उपासना करितो तो संपत्तीचा उपभोग घेतो व आनंद अनुभावितो. त्याच्या कुलांत तेजस्वी विद्या असते. हा वायु वैश्वानर आत्म्याचा प्राण आहे. जर तूं माझ्याकडे आला नसतास तर तुझा प्राण उत्क्रमण पावला असता (प्राणाचा क्षय झाला असता).

**अथ पञ्चदशः खण्डः ।**

**अथ होवाच जनꣳ शार्कराक्ष्य कं त्वमात्मानमुपास्स इत्याकाशमेव भगवो राजन्निति होवाचैष वै बहुल आत्मा वैश्वनरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वं बहुलोऽसि प्रजया च धनेन च ॥१॥**

**अथ जनम् उवाच ह । शार्कराक्ष्य त्वम् कम् आत्मानम् उपास्से इति । भगवः राजन् आकाशम् एव इति उवाच ह । त्वम् यम् आत्मानम् उपास्से एषः वै बहुलः आत्मा वैश्वानरः। तस्मात् त्वम् प्रजया च धनेन च बहुलः असि ।**

नंतर तो राजा जन नामक ऋषीला म्हणाला—शार्कराक्ष्या ! तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस? भगवन् ! राजेश्वरा ! मी केवळ आकाशाचीच उपासना करितों, असें शार्कराक्ष्य म्हणाला. (राजा म्हणाला) तूं ज्या आत्म्याची उपासना करितोस तें आकाश म्हणजे व्यापक स्वरूपाचा वैश्वानरच होय. म्हणून तूं संतति व संपत्ति यांनीं परिपूर्ण आहेस.

**अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवात्मानं वैश्वानरमुपास्ते संदेहस्त्वेष आत्मन इति होवाच संदेहस्ते व्यशीर्यद्यन्मां नागमिष्य इति ॥ २ ॥**

अन्नम् अत्सि । प्रियम् पश्यसि । यः एतम् वैश्वानरम् आत्मानम् एवम् उपास्ते सः अन्नम् अत्ति प्रियम् पश्यति । अस्य कुले ब्रह्मवर्चसम् भवति । एषः तु आत्मनः संदेहः । यत् माम् न आगमिष्यः ( तत् ) ते संदेहः व्यशीर्यत् इति उवाच ह ।

( या उपासनेच्या योगानें तूं ) संपत्तीचा उपभोग घेतोस व आनंद अनुभवितोस. जो या वैश्वानर आत्म्याची अशी उपासना करितो तो संपत्तीचा उपभोग घेतो व आनंद अनुभवितो. त्याच्या कुलांत तेजस्वी विद्या असते. आकाश हाच वैश्वानर आत्म्याचा संदेह म्हणजे कमरेपासून मानेपर्यंतचा भाग ( धड ) आहे. जर तूं माझ्याकड आला नसतास तर तुझें शरीर गलित झालें असतें. म्हणजे तूं सामर्थ्यहीन झाला असतास.

प्रस्तुत मंत्रांत वैश्वानर आत्म्याच्या आकाशरूपाचें वर्णन आलें आहे. मनुष्याच्या देहापैकीं धड या भागास अनुलक्षून ' संदेह ' हें नांव श्रुतीनें योजिलें आहे. आकाश हा वैश्वानराचा संदेह आहे. आकाशाचें ज्ञान संपादन केल्यानें मनुष्याला आपल्या देहांतील पोट, इत्यादि अवयवांवर चांगलें लक्ष ठेवितां येतें व त्यायोगें ते चांगले सोज्वळ राखतां येतात. शरिराचा सोज्वळपणा व्यवहाराप्रमाणें परमार्थाला देखील अवश्यच आहे, असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

## अथ षोडशः खण्डः ।

**अथ होवाच बुडिलमाश्वतराश्विं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यप एव भगवो राजन्निति होवाचैष वै रयिरात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वꣳ रयिमान्पुष्टिमानसि ॥ १ ॥**

अथ आश्वतराश्विम् बुडिलम् उवाच ह । वैय्याघ्रपद्य त्वम् कम् आत्मानम् उपास्से इति । भगवः राजन् अपः एव इति सः उवाच ह । त्वम् यम्

**आत्मानम् उपास्से एषः वै रयिः आत्मा वैश्वानरः ( अस्ति )। तस्मात् त्वम् रयिमान् पुष्टिमान् असि।**

नंतर तो राजा अश्वतराश्वाचा पुत्र जो बुडिल त्याला म्हणाला, हे वैयाघ्रपद्या ! तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस ? भगवन् ! राजेश्वरा ! मी फक्त जलाची उपासना करितों, असें तो बुडिल म्हणाला. ( राजा म्हणाला ):–तूं ज्या आत्म्याची उपासना करितोस तो धनस्वरूप वैश्वानर होय. म्हणून तूं धनवान् आणि पुष्टियुक्त ( धष्टपुष्ट ) आहेस.

**अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते बस्तिस्त्वेष आत्मन इति होवाच बस्तिस्ते व्यभेत्स्यद्यन्मां नागमिष्य इति ॥ २ ॥**

**अन्नम् अत्सि । प्रियम् पश्यसि । यः एतम् आत्मानम् वैश्वानरम् एवम् उपास्ते सः अन्नम् अत्ति प्रियम् पश्यति । अस्य कुले ब्रह्मवर्चसम् भवति । एषः आत्मनः बस्तिः । यद् माम् न आगामिष्यः ( तत् ) ते बस्तिः व्यभेत्स्यत् । इति उवाच ह ।**

( या उपासनेच्या योगानें ) तूं संपत्तीचा उपभोग घेतोस व आनंद अनुभवितोस. जो या जलरूप वैश्वानराची अशी उपासना करितो तो संपत्तीचा उपभोग घेतो व आनंद अनुभवितो. त्याच्या कुलांत तेजस्वी विद्या असते. जल हा वैश्वानर आत्म्याचा बस्ति होय. ( बस्ति म्हणजे नाभीच्या खालच्या पोटांतील अवयव ). तूं जर माझ्याकडे आला नसतास तर तुझा बस्ति फुटला असता ( तुझें आरोग्य नष्ट झालें असतें. )

---

## अथ सप्तदशः खण्डः ।

अथ होवाचोद्दालकमारुणिं गौतम कं त्वमात्मानमुपास्स इति पृथिवीमेव भगवो राजन्निति होवाचैष वै प्रतिष्ठात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वं प्रतिष्ठितोऽसि प्रजया च पशुभिश्च॥१॥

अथ आरुणिम् उद्दालकम् उवाच ह । गौतम त्वम् कम् आत्मानम् उपास्से इति। भगवः राजन् पृथिवीम् एव इति सः उवाच ह । त्वम् यम् आत्मानम् उपास्से एषः वै प्रतिष्ठा आत्मा वैश्वानरः ( अस्ति ) । तस्मात् त्वम् प्रजया पशुभिः च प्रतिष्ठितः असि ।

नंतर अरुणपुत्र उद्दालकास राजा म्हणाला—गौतमा ! तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस ? भगवन ! राजेश्वरा ! मी पृथ्वीचीच उपासना करितों. असें तो उद्दालक म्हणाला. ( राजा म्हणाला ):—तूं ज्या आत्म्याची उपासना करितोस तो प्रतिष्ठारूप वैश्वानर होय. म्हणून तूं संतति आणि पशुरूप संपत्ति यांनीं सुस्थिर आहेस.

अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते पादौ त्वेतावात्मन इति होवाच पादौ ते व्यम्लास्येतां यन्मां नागमिष्य इति ॥ २ ॥

अन्नम् अत्सि । प्रियम् पश्यसि । यः एतम् वैश्वानरम् आत्मानम् एवम् उपास्ते सः अन्नम् अत्ति । प्रियम् पश्यति । अस्य कुले ब्रह्मवर्चसम् भवति । एतौ आत्मनः तु पादौ । यत् माम् न आगमिष्यः ( तत् ) ते पादौ व्यम्लास्येताम् । इति उवाच ह ।

( या उपासनेच्या योगानें ) तूं संपत्तीचा उपभोग घेतोस व आनंद अनुभवितोस. जो या पृथ्वीरूप वैश्वानराची उपासना करितो तो संपत्तीचा उपभोग घेतो व आनंद अनुभवितो.

त्याच्या कुलांत तेजस्वी विद्या असते. पृथ्वी हे वैश्वानर आत्म्याचे पाय होत. जर तूं माझेकडे आला नसतास तर तुझे पाय गेले असते म्हणजे ते सामर्थ्यरहित झाले असते.

## अथाष्टादशः खण्डः ।

**तान्होवाचैते वै खलु यूयं पृथगिवेममात्मानं वैश्वानरं विद्वाꣳसोऽन्नमत्थ यस्त्वेतमेवं प्रादेशमात्रमभिविमानमात्मानं वैश्वानरमुपास्ते स सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेष्वात्मस्वन्नमत्ति ॥ १ ॥**

तान् उवाच ह । एते यूयम् खलु इमम् वैश्वानरम् आत्मानम् वै पृथक् इव विद्वांसः अन्नम् अत्थ । यः तु एतम् अभिविमानम् वैश्वानरम् आत्मानम् प्रादेशमात्रम् एवम् उपास्ते स सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेषु आत्मसु अन्नम् अत्ति ।

राजा त्यांना म्हणाला, हे तुम्ही ( सहा जण ) हें वैश्वानर ब्रह्म वेगवेगळें असल्यासारखें जाणून अन्न खात आहां -म्हणजे आपला जीवनक्रम एकदेशीपणानें चालवीत आहां. परंतु जो कोणी ह्या द्युलोकादिरूपानें विशेष प्रकारें जाणला जाणाऱ्या वैश्वानर ब्रह्माची अंशरूपानें ( त्याच्या व्यापक स्वरूपाचें ज्ञान लक्षांत ठेवून ) उपासना करितो तो सर्व लोकांमध्यें, सर्व पदार्थांमध्यें व सर्व प्राण्यांमध्यें अन्न खातो म्हणजे आपला जीवनक्रम चालविण्यांत सर्वांचा उपयोग करून घेतो.

याप्रमाणें वैश्वानरविद्येनें ज्याला पूर्ण ज्ञान होतें तो सर्व प्रकारचे व्यवहार ( लोक ) सर्व पदार्थ व सर्व प्राणी यांचेवर आपलें प्रभुत्व चालवितो.

**तस्य ह वा एतस्यात्मनो वैश्वानरस्य मूर्धैव सुतेजाश्चक्षुर्विश्वरूपः प्राणः पृथग्वर्त्मात्मा संदेहो बहुलो बस्तिरेव रयिः पृथिव्येव पादावुर एव वेदिर्लोमानि बर्हिर्हृदयं गार्हपत्यो मनोऽन्वाहार्यपचन आस्यमाहवनीयः ॥ २ ॥**

**तस्य एतस्य वैश्वानरस्य आत्मनः वै सुतेजाः एव मूर्धा । विश्वरूपः चक्षुः। पृथग्वर्त्मात्मा प्राणः । बहुलः संदेहः । रयिः एव बस्तिः । पृथिवी एव पादौ । वेदिः एव उरः । बर्हिः लोमानि । गार्हपत्यः हृदयम् । अन्वाहार्यपचनः मनः । आहवनीयः आस्यम् ।**

त्या ह्या वैश्वानर ब्रह्माचें द्युलोक हेंच मस्तक होय. विश्वरूप आदित्य हा त्याचा नेत्र, भिन्न भिन्न मार्गांनीं वाहणारा वायु हा त्याचा प्राण, आकाश हें त्याचें उदर. संपत्ति हाच त्याचा बस्ति, वेदि हेंच त्याचें उरस्थल. दर्भ हे त्याचे केश. गार्हपत्याग्नि हें त्याचें हृदय. अन्वाहार्यपचन नांवाचा अग्नि हें त्याचें मन आणि आहवनीय नांवाचा अग्नि हें त्या वैश्वानर ब्रह्माचें मुख होय.

मागील खंडांतील दुसऱ्या मंत्रांत द्युलोकापासून पृथ्वीपर्यंत वैश्वानराचे अंश सांगितले आहेत व ते शारीरिक अवयवांच्या रूपकानें दर्शविले आहेत. या मंत्राच्या दुसऱ्या भागांत मनुष्याच्या उरस्थलादि अवयवांचें रूपक केलें आहे. त्यात वेदि, दर्भ इत्यादि सांगून तोंड हें आहवनीय अग्नि होय असें सांगितलें आहे. हीच अग्निहोत्राची रूपक कल्पना प्रस्तुत खंडांत पुढें चालविली आहे.

## अथैकोनविंशः खण्डः ।

**तद्यद्भक्तं प्रथममागच्छेत्तद्धोमीयꣳ स यां प्रथमामाहुतिं जुहुयात्तां जुहुयात्प्राणाय स्वाहेति प्राणस्तृप्यति ॥ १ ॥**

**तत् यत् भक्तम् प्रथमम् आगच्छेत् तत् होमीयम् । सः याम् प्रथमाम् आहुतिम् जुहुयात् ताम् प्राणाय स्वाहा इति जुहुयात् । ( तया ) प्राणः तृप्यति ।**

( याप्रमाणें अग्निहोत्राचें ज्ञान झालें असतां ), जें अन्न प्रथम प्राप्त होईल तें होमार्थ आहे असें समजावें; आणि ( तें खाणारा

मनुष्य ) जी पहिली आहुति देतो ( घास घेतो ) ती त्यानें ' प्राणाय स्वाहा ' ( प्राणाला अर्पण असो ) या मंत्रानें द्यावी. त्या आहुतीनें प्राण तृप्त होतो.

**प्राणे तृप्यति चक्षुस्तृप्यति चक्षुषि तृप्यत्यादित्यस्तृप्यत्यादित्ये तृप्यति द्यौस्तृप्यति दिवि तृप्यन्त्यां यत्किंच द्यौश्चादित्यश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानुतृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥**

प्राणे तृप्यति चक्षुः तृप्यति । चक्षुषि तृप्यति आदित्यः तृप्यति । आदित्ये तृप्यति द्यौः तृप्यति । दिवि तृप्यन्त्याम् यत् किम् च द्यौः च आदित्यः च अधितिष्ठतः तत् तृप्यति । तस्य तृप्तिम् अनु ( सः ) प्रजया पशुभिः अन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेन च तृप्यति इति ।

प्राण तृप्त झाला असतां दृष्टीची तृप्ति होते. दृष्टि तृप्त झाली असतां आदित्य ( ही चक्षूंची देवता ) तृप्त होतो. आदित्य तृप्त झाला असतां द्युलोक तृप्त होतो. द्युलोक तृप्त झाला असतां जें कांहीं द्युलोक व आदित्य यांच्या आधारानें असतें तें सर्व तृप्त होतें. या सर्वांची तृप्ति झाल्यानें तो अग्निहोत्रवेत्ता मनुष्य संतति, पशु ( संपत्ति ), उपभोगसामर्थ्य, तेजस्विता व बौद्धिकसामर्थ्य यांनीं तृप्त ( सुसंपन्न ) होतो.

## अथ त्रिंशः खण्डः ।

**अथ यां द्वितीयां जुहुयात्तां जुहुयाद्व्यानाय स्वाहेति व्यानस्तृप्यति ॥ १ ॥**

अथ याम् द्वितीयाम् ( आहुतिम् ) जुहुयात् ताम् व्यानाय स्वाहा इति जुहुयात् । ( तया ) व्यानः तृप्यति ।

नंतर दुसरी आहुति ' व्यानाय स्वाहा ' ( व्यानाला अर्पण असो ) या मंत्रानें द्यावी. त्या आहुतीनें व्यान तृप्त होतो.

**व्याने तृप्यति श्रोत्रं तृप्यति श्रोत्रे तृप्यति चन्द्रमास्तृप्यति चन्द्रमसि तृप्यति दिशस्तृप्यन्ति दिक्षुतृप्यन्तीषु यत्किं च दिशश्च चन्द्रमाश्चाधितिष्ठन्ति तत्तृप्यति तस्यानुतृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥**

व्याने तृप्यति श्रोत्रम् तृप्यति । श्रोत्रे तृप्यति चन्द्रमाः तृप्यति चन्द्रमसि तृप्यति दिशः तप्यन्ति । दिक्षु तृप्यन्तीषु यत् किम् च दिशः च चन्द्रमाः च अधितिष्ठन्ति तत् तृप्यति । तस्य तृप्तिम् अनु ( सः ) प्रजया पशुभिः अन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेन च तृप्यति इति ।

व्यान तृप्त झाला असतां श्रोत्र तृप्त होतें. श्रोत्र तृप्त झालें असतां चन्द्र तृप्त होतो. चन्द्र तृप्त झाला असतां दिशा तृप्त होतात. दिशा तृप्त झाल्या असतां जें कांहीं दिशा व चन्द्र यांच्या आधारानें असतें तें सर्व तृप्त होतें. या सर्वांची तृप्ति झाल्यानें ( तो अग्निहोत्रवेत्ता मनुष्य ) संतति, पशु ( संपत्ति ), उपभोगसामर्थ्य, तेजस्विता व बौद्धिक सामर्थ्य यांनीं तृप्त (सुसंपन्न) होतो.

---

## अथैकविंशः खण्डः ।

**अथ यां तृतीयां जुहुयात्तां जुहुयादपानाय स्वाहेत्यपानस्तृप्यति ॥ १ ॥**

अथ याम् तृतीयाम् ( आहुतिम् ) जुहुयात् । ताम् अपानाय स्वाहा इति जुहुयात् । ( तया ) अपानः तृप्यति ।

तिसरी आहुति 'अपानाय स्वाहा' (अपानाला अर्पण असो) या मंत्रानें द्यावी. त्या आहुतीनें अपान तृप्त होतो.

**अपाने तृप्यति वाक्तृप्यति वाचि तृप्यन्त्यामग्निस्तृप्यत्यग्नौ तृप्यति पृथिवी तृप्याति पृथिव्यां तृप्यन्त्यां यत्किं च पृथिवी चाग्निश्चाधितिष्ठतस्तत्तृप्याति तस्यानुतृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥**

अपाने तृप्यति, वाक् तृप्यति। वाचि तृप्यन्त्याम् अग्निः तृप्यति। अग्नौ तृप्यति पृथिवी तृप्यति। पृथिव्याम् तृप्यन्त्याम् यत् किम् च पृथिवी अग्निः च अधितिष्ठतः तत् तृप्यति। तस्य तृप्तिम् अनु ( सः ) प्रजया पशुभिः अन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेन च तृप्यति इति।

अपान तृप्त झाला असता वाचा तृप्त होते. वाचा तृप्त झाली असतां अग्नि ( ही वाचेची देवता ) तृप्त होतो. अग्नि तृप्त झाला असता पृथिवी तृप्त होते. पृथ्वी तृप्त झाली असतां जें कांहीं पृथ्वी व अग्नि याच्या आधारानें असतें तें सर्व तृप्त होतें. या सर्वांची तृप्ति झाल्यानें (तो अग्निहोत्रवेत्ता मनुष्य) संतति, पशु ( संपत्ति ). उपभोगसामर्थ्य, तेजस्विता व बौद्धिक सामर्थ्य यांनीं तृप्त (सुसंपन्न) होतो.

## अथ द्वाविंशः खण्डः ।

**अथ यां चतुर्थीं जुहुयात्तां जुहुयात्समानाय स्वाहेति समानस्तृप्यति ॥ १ ॥**

अथ याम् चतुर्थीम् जुहुयात् ताम् समानाय स्वाहा इति जुहुयात्। ( तया ) समानः तृप्यति।

चवथी आहुति ' समानाय स्वाहा ' ( समानाला अर्पण असो) या मंत्रानें द्यावी. त्या आहुतीनें समान तृप्त होतो.

**समाने तृप्यति मनस्तृप्यति मनसि तृप्यति पर्जन्यस्तृप्यति पर्जन्ये तृप्यति विद्युत्तृप्यति विद्युति तृप्यन्त्यां यत्किं च विद्युच्च पर्जन्यश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानुतृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥**

समाने तृप्यति मनः तृप्यति । मनसि तृप्यति पर्जन्यः तृप्यति। पर्जन्ये तृप्यति विद्युत् तृप्यति । विद्युति तृप्यन्त्याम् यत् किम् च विद्युत् च पर्जन्यः च अधितिष्ठतः तत् तृप्यति। तस्य तृप्तिम् अनु ( सः ) प्रजया पशुभिः अन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेन च तृप्यति इति ।

समान तृप्त झाला असतां मन तृप्त होतें. मन तृप्त झालें असतां पर्जन्य तृप्त होतो. पजन्य तृप्त झाला असतां वीज तृप्त होते. वीज तृप्त झालीं असतां वीज व पर्जन्य यांच्या आधारानें असतें तें सर्व तृप्त होतें. या सर्वांची तृप्ति झाल्यानें ( तो अग्निहोत्रवेत्ता मनुष्य) सतति. पशु (संपत्ति), उपभोगसामर्थ्य, तेजस्विता व बौद्धिक सामर्थ्य यांनीं तृप्त ( सुसंपन्न ) होतो.

## अथ त्रयोविंशः खण्डः ।

**अथ यां पञ्चमीं जुहुयात्तां जुहुयादुदानाय स्वाहेत्युदानस्तृप्यति ॥ १ ॥**

अथ याम् पञ्चमीम् जुहुयात् ताम् उदानाय स्वाहा इति जुहुयात्। ( तया ) उदानः तृप्यति ।

· पांचवी आहुति ‘ उदानाय स्वाहा ’ (उदानाला अर्पण असो ) या मंत्रानें द्यावी. त्या आहुतीनें उदान तृप्त होतो.

**उदाने तृप्यति त्वक्तृप्यति त्वचि तृप्यन्त्यां वायुस्तृप्यति वायौ तृप्यत्याकाशस्तृप्यत्याकाशे तृप्यति यत्किं च वायुश्चाकाशश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥**

**उदाने तृप्यति त्वक् तृप्यति । त्वचि तप्यन्त्याम् वायुः तृप्यति । वायौ तृप्यति आकाशः तृप्यति । आकाशे तृप्यति यत् किम् च वायुः च आकाशः च अधितिष्ठतः तत् तृप्यति । तस्य तृप्तिम् अनु ( सः ) प्रजया पशुभिः अन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेन च तृप्यति इति ।**

उदान तृप्त झाला असतां त्वक्–त्वचा तृप्त होते. त्वचा तृप्त झाली असता वायु ( त्वगिन्द्रियाची देवता ) तृप्त होतो. वायु तृप्त झाला असतां आकाश तृप्त होतें. आकाश तृप्त झालें असतां आकाश व वायु यांच्या आधारानें असतें तें सर्व तृप्त होतें. या सर्वांची तृप्ति झाल्यानें ( तो अग्निहोत्रवेत्ता मनुष्य ) संतति, पशु-( संपति ), उपभोगसामर्थ्य, तेजस्विता व बौद्धिक सामर्थ्य यांनीं तृप्त ( सुसंपन्न ) होतो.

## अथ चतुर्विंशः खण्डः ।

**स य इदमविद्वानग्निहोत्रं जुहोति यथाङ्गारानपोह्य भस्मनि जुहुयात्तादृक्तत्स्यात् ॥ १ ॥**

**यः इदम् अग्निहोत्रम् अविद्वान् जुहोति सः यथा अङ्गारान् अपोह्य भस्मनि जुहुयात् तत् तादृक् स्यात् ।**

जो हें अग्निहोत्र न समजतां आहुति देतो, तें त्याचें हवन, ज्याप्रमाणें विस्तव नाहींसा करून नुसत्या राखेंत हवन करावें, तशासारखेंच होतें.

**अथ य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति तस्य सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेष्वात्मसु हुतं भवति ॥ २ ॥**

**अथ यः एतत् अग्निहोत्रम् एवम् विद्वान् जुहोति तस्य सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेषु आत्मसु हुतम् भवति ।**

आतां जो हें अग्निहोत्र मागें वर्णन केल्याप्रमाणें संपूर्णपणें जाणून हवन करितो त्याचें तें हवन सर्व लोकांमध्यें (व्यवहारांमध्यें) सर्व पदार्थांमध्यें आणि सर्व प्राण्यांमध्यें सफल होतें.

**टीप**–वरील तीनही बाबतींत मनुष्याच्या भोजनाची सफलता सुचविली आहे.

**तद्यथेषीकातूलमग्नौ प्रोतं प्रदूयेतैवꣳ हास्य सर्वे पाप्मानः प्रदूयन्ते य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति ॥ ३ ॥**

**यः एतत् विद्वान् अग्निहोत्रम् एवम् जुहोति तत् यथा अग्नौ प्रोतम् इषीका-तूलम् प्रदूयते एवम् अस्य सर्वे पाप्मानः प्रदूयन्ते ह ।**

जो हें तत्त्व जाणता मनुष्य अग्निहोत्राचें याप्रमाणें हवन करितो, त्याचीं सर्व पातकें, ज्याप्रमाणें अग्नींत घातलेला मुंजगवताचा कापूस तात्काळ जळून जातो त्याप्रमाणें, जळून जातात.

**तस्मादु हैवंविद्यद्यपि चण्डालायोच्छिष्टं प्रयच्छेदात्मनि हैवास्य तद्वैश्वानरे हुतꣳ स्यादिति तदेष श्लोकः ॥ ४ ॥**

**तस्मात् उ ह एवंवित् यदि अपि चण्डालाय उच्छिष्टम् प्रयच्छेत् तत् अस्य वैश्वानरे आत्मनि एव हुतम् स्यात् । तत् एषः श्लोकः ( अस्ति ) ।**

यावरून वैश्वानरविद्यासंपन्न असून अग्निहोत्राचें तत्त्व जाणणाऱ्या मनुष्यानें जरी उरलेलें अन्न चांडालास दिलें तरी देखील त्याचें तें वैश्वानररूप ब्रह्माच्या ठिकाणीं हवनच होतें. त्याविषयीं हा ( पुढील ) श्लोक आहे.

प्रस्तुत मंत्रांतील उच्छिष्ट शब्दाचा अर्थ उष्टें नव्हे, हें सूक्ताच्या शेवटच्या श्लोकावरून लक्षांत येण्याजोगें आहे. चांडाळाच्या उल्लेखावरून असें दिसतें कीं, ब्रह्मवेत्त्यानें अस्पृश्यतेचा आचार चालविलाच पाहिजे असें नाहीं. अस्पृश्यता ही सर्वभूतहिताच्या दृष्टीला बाधक आहे हें दर्शविण्या–

करिताच चांडाळास दिलेलें अवशिष्ट अन्न देखील अग्निहोत्रांत समाविष्ट होतें असे स्पष्ट सांगितले आहे.

**यथेह क्षुधिता बाला मातरं पर्युपासत एवꣳ सर्वाणि भूतान्यग्निहोत्रमुपासत इत्यग्निहोत्रमुपासत इति ॥ ५ ॥**

**यथा इह क्षुधिताः बालाः मातरम् पर्युपासते एवम् सर्वाणि भूतानि अग्निहोत्रम् उपासते । इति ।**

ज्याप्रमाणें व्यवहारामध्यें भुकेलेलीं मुलें आईचा आश्रय करितात त्याप्रमाणें सर्व प्राणी अग्निहोत्राचा आश्रय करितात. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे ).

---

## पांचव्या अध्यायाचा उपसंहार

पांचव्या अध्यायाच्या पहिल्या खंडांत प्राणशक्ति ही सर्व इन्द्रियशक्तीपेक्षां श्रेष्ठ आहे असें ठरविणारी विस्तृत आख्यायिका आली आहे. ती निवळ आलंकारिक आहे, ऐतिहासिक नाहीं. प्राणतत्त्व हें सर्वशक्तींचें उगमस्थान असून सर्व इन्द्रियांना या प्राणतत्त्वापासूनच सामर्थ्य प्राप्त होते असं या कथेचें तात्पर्य आहे. हा प्राणसंवाद व दुसऱ्या खंडातील महत्त्वप्राप्तीकरितां सांगितलेलें अनुष्ठान, शिष्यपरंपरा इत्यादि विषय बृहदारण्यकोपनिषदांत देखील आले आहेत. तिसऱ्या खंडापासून पंचाग्निविद्येच्या प्रकरणास प्रारंभ होऊन, तें दहाव्या खंडाच्या अखेरीस समाप्त झालें आहे. दहाव्या खंडाच्या शेवटीं पंचाग्निविद्येचें सविस्तर विवरण केलें असल्यामुळें, त्याचें येथें विशेष विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. दहाव्या खंडाच्या नवव्या मंत्रांत 'स्तेनो हिरणस्य–' हा प्राचीन श्लोक आला आहे. त्यांत चार महापातकें सांगितली असून, त्या पातक्यांशीं जाणून बुजून संसर्ग करणें हें पांचवें महापातक होय, असें तेथें म्हटलें आहे. त्यावरून हिंदुधर्मातील हीं पंचमहापातकांची कल्पना अत्यंत प्राचीन आहे असें निःसंशय ठरतें.

असलीं पातकें करणारा मनुष्य श्वानसूकरादि योनीला–अधोगतीला जातो हाच जीवांच्या मरणोत्तरगतीचा तिसरा प्रकार–मार्ग होय, असें सिद्ध होतें. परंतु मायावादी ग्रंथकारांनीं सद्योमुक्ति व क्रममुक्ति (देवयान) हे दोन मार्ग असून सकामकर्मानें प्राप्त होणारा पुनरावृत्तिकारक स्वर्गलोक किंवा चन्द्रलोक हा तिसरा मार्ग ठरविला आहे. या सर्व प्रयत्नांचा उद्देश हाच कीं, सद्योमुक्तीचा मार्ग हाच सर्वाहून श्रेष्ठ असून तो केवळ सर्व-कर्म सन्यासानेंच प्राप्त होतो असें ठरवितां यावें. मायावादी संन्यासमार्गीयांची ही कल्पना श्रुतीच्या वर्णनांत कोठेंच बसत नाहीं, हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. वस्तुतः देवयान व पितृयाण हे दोनच मार्ग श्रुतीनें सांगितले आहेत. तिसरा मार्ग श्रुतीला अभिप्रेतच नाहीं. कारण अधोगतीला 'मार्ग' ही संज्ञा देणें बरोबर नाहीं व श्रुतीनें तशी ती स्पष्टपणें दिलेलीही नाहीं. दहाव्या खंडांतील नवव्या मंत्रांत पंचमहापातकें सांगून श्रुतीनें असें म्हटलें आहे कीं, पंचाग्निविद्येनें संपन्न असलेल्या ज्ञानी मनुष्याला या पंचमहापातकांचा संसर्गदोष लागत नाहीं. खऱ्या विद्वत्तेचें हें सामर्थ्य होय. कारण ज्ञानी मनुष्यानें अशीं महापातकें करणाऱ्या मनुष्याशीं संसर्ग केला तर, तो त्याच्या हिताकरितांच करील, कोणत्याही प्रकारच्या स्वार्थी हेतूनें करणार नाहीं. अशा रीतीनें संसर्ग घडल्यास तो ज्ञानी मनुष्याला बाधक होत नाहीं, असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

अकराव्या खंडाच्या पहिल्या मंत्रात प्राचीनशाल, औपमन्यव इत्यादि सहा ऋषींचीं नांवें देऊन ते ब्रह्मतत्त्वाचा विचार करण्याकरितां एकत्र जमत होते असें म्हटलें आहे. त्यावरून या सहा ऋषींनीं ब्रह्मविद्येच्या अभ्यासाकरितां आपली एक समितिच स्थापन केली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा समितीला किंवा सभेला देखील उपनिषद् ही संज्ञा देण्यांत येत होती, ही गोष्ट मुण्डकोपनिषदाच्या प्रस्तावनेंत दर्शविली आहे (उ. नि. र. प्र. मुंडकोपनिषद् उद्देश पृ. ४). औपमन्यव इत्यादि ऋषि राजाकडे जातांना समित्पाणी होऊन गेले असल्याचें सांगितलें आहे. त्यावरून

वैश्वानरविद्येवरील ग्रंथरचना झाली ती आचारनिष्ठेच्या काळांतच झाली असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. पंचाग्निविद्येंत उद्दालकाचा पिता गौतम यानें प्रवाहणाचें शिष्यत्व पतकरल्याचें वर्णन आलें आहे. पण त्यांत समिधेच्या आचाराचा मुळींच उल्लेख नाहीं, हें लक्षात ठेविले पाहिजे. या गोष्टीवरून देखील वैश्वानर विद्येचें संशोधन व ग्रंथरचना पंचाग्निविद्ये-नंतरची असावी असें दिसून येतें.

वैश्वानरविद्या व प्राणाग्निहोत्र हीं दोनही प्रकरणे एकमेकांशीं अत्यंत संबद्ध असून, हीं दोनही प्रकरणें प्राणविद्येंतूनच निघालीं आहेत. वैश्वानर-विद्येंत द्युलोकापासून तों पृथ्वीपर्यंत ब्रह्मांडांतील सहा तत्त्वांचें विराट्-पुरुषाच्या अवयवांच्या रूपकानें वर्णन केलें आहे. द्युलोक, आदित्य, वायु, आकाश, ओषधिवनस्पति व ( रयि ) पृथ्वी हीं सहा तत्त्वें म्हणजेच वैश्वान-राचें स्वरूप होय. या वैश्वानरस्वरूपाचें ज्ञान संपादन करून वैश्वानराची उपासना करावी असा या वैश्वानरविद्येंतील हेतु आहे. त्याचा तात्त्विक दृष्ट्या विचार केल्यास सर्वभूतहिताशींच या वैश्वानरविद्येचा मेळ घालावा लागतो. त्याशिवाय वैश्वानराची पूर्णोपासना व्हावयाची नाहीं. ज्ञानी मनु-ष्याला सर्वभूतहिताच्या व्यवहारांत वरील सहा तत्त्वांपैकीं एखाद्याच तत्त्वाचा किंवा त्याच्या ज्ञानाचा उपयोग करितां आला तरी, त्याला वैश्वानरविद्येंतील सर्व तत्त्वें व त्यांचा एकसूत्रीपणा यांचें पूर्णज्ञान असाव-यास पाहिजे; नाहींतर ती एकदेशी ( प्रादेशिक ) उपासना होते व अशा एकांगी उपासनेपासून मनुष्याचें खरें कल्याण होत नाहीं. हीं सर्वतत्त्वें मिळून तयार झालेली पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टि हें वैश्वानराचें स्वरूप असलें तरी, सृष्टि म्हणजेच वैश्वानर असा या वर्णनाचा अर्थ नसून, ज्या परमात्म्यापासून हें जग उत्पन्न झालें तो परमात्माच वैश्वानर शब्दानें विव-क्षित आहे. द्युलोक, आदित्य इत्यादि तत्त्वें हे परमात्म्याचे अवयव होत, असा या रूपकात्मक वर्णनांतील अभिप्राय आहे. ज्ञान व उपासना यांचा मुख्य संबंध अवयवांशींच येत असला तरी, तो अवयवांच्या मार्फतच येतो

हें विसरतां कामा नये. या वैश्वानरविद्येच्या विवेचनांत देखील श्रुतीनें ज्ञान-विज्ञानाचें संमेलनच घडवून आणिलें आहे. विज्ञानाच्या–सृष्टिज्ञानाच्या योगानेंच आत्मतत्त्वाचें ज्ञान संपादन केलें जावें असा वैदिक ब्रह्मविद्येचा उद्देश पंचाग्निविद्येप्रमाणेंच येथेंही उघड दिसून येत आहे.

भगवान् पिप्पलाद ऋषीनें प्रश्नोपनिषदामध्यें प्राणविद्येचें सविस्तर विवेचन केलें आहे; त्यांत रयि व प्राण या तत्त्वांपासून सर्व सृष्टि कशी उत्पन्न होते व हें सृष्टिचक्र प्राणतत्त्वाच्या सामर्थ्यानेंच कसें चालतें याचें प्रतिपादन करून ब्रह्माण्डांतील तत्त्वांना बाह्यप्राण असें म्हटलें असून शरिरांतील प्राण-शक्तींना आभ्यंतर प्राण अशी संज्ञा देण्यांत आली आहे. या बाह्यप्राणांचेंच वैश्वानरविद्येंत अवयवांच्या रूपकानें वर्णन केलें आहे. वैश्वानरविद्या खंड ११ ते १८ अखेरपर्यंत आली असून, खण्ड १९ ते २४ अखेरपर्यंत प्राणाहुतींचें विवेचन करण्यांत आलें आहे. उपनयनादि संस्कारानीं युक्त असा द्विज भोजनाच्या प्रारंभीं चित्राहुति व प्राणाहुति समर्पण करितो. भोजनपात्राच्या भोंवतीं पाणी फिरवून पात्राच्या बाहेर ज्या आहुति घातल्या जातात त्यांना चित्राहुति म्हणतात. या चित्राहुतींची पद्धति सार्वत्रिक नसावी असें वाटतें. पण प्राणाहुतींचा विधि मात्र सार्वत्रिक दिसतो. प्रस्तुत प्रकरणांत प्राणाहुतींचेंच विवेचन आहे. त्यावरून चित्राहुतींच विधि उत्तर-कालीन असावा असा तर्क करण्यास जागा आहे. खंड १९ ते २४ अखेरच्या प्रकरणांत प्राणाहुतींच्या निमित्तानें प्राणापानादि पांच तत्त्वांचें सविस्तर प्रतिपादन करण्यांत आलें आहे. प्राण, अपान, व्यान, उदान, व समान असा या पंचप्राणांचा अनुक्रम सर्वत्र प्रसिद्ध आहे; परंतु येथें मात्र तो थोडासा बदलल्याचें दिसून येतें. या प्राणाहुतींच्या विधीलाच प्राणाग्नि-होत्र असें म्हणण्यांत येतें. या प्राणाग्निहोत्राचें महत्त्व फारच सांगितलें आहे, तें केवळ आचाराचें नसून या प्रकरणांत प्रतिपादन केलेल्या प्राणतत्त्वाच्या ज्ञानाचें आहे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. प्राणतत्त्वांचें ज्ञान संपादन करून विषयसेवन करणारा ज्ञानी मनुष्य प्राणिमात्रांचें कल्याण करण्यास समर्थ

असतो. अशा ज्ञानी मनुष्याला अनुलक्षूनच श्रुतीनें माता व तिचीं मुलें या दृष्टान्ताची योजना केली आहे. श्रुतीनें दिलेला दृष्टान्त सर्वभूतहितामध्यें रत असलेल्या स्थितप्रज्ञालाच शोभण्यासारखा आहे हें येथें निराळें सांगावयास नको. उच्छिष्ट किंवा अवशिष्ट अन्न अस्पृश्यांना देऊं नये अशाविषयीं धर्मशास्त्राचा नियम छान्दोग्याच्या काळांत देखील रूढ होता; परंतु हा नियम प्राणाग्निहोत्र करणाऱ्या प्राणवेत्त्याला लागू नाहीं असें श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून स्पृश्यास्पृश्यांचे नियम सर्वभूतहिताकरितां प्रयत्न करणाऱ्या ज्ञानी मनुष्याला लागू नाहींत असें सिद्ध होतें. याप्रमाणें पंचाग्निविद्या, वैश्वानरविद्या व प्राणाग्निहोत्र–प्राणविद्या अशा तीन विद्यांचें या अध्यायांत प्रतिपादन झालें आहे. सृष्टि व परब्रह्म या दोहोंचेंहि ज्ञान संपादन करून सर्वभूतहिताच्या बुद्धीनें निष्काम कर्तव्याचरण करणारा मनुष्य देवयानमार्गानें अमृतत्व पावतो. म्हणून हा ज्ञानविज्ञानाचा मार्गच व्यक्तीला व समाजाला अत्यंत कल्याणकारक आहे असा बोध अभ्यासकांना व्हावा अशा उद्देशानेंच ज्ञानविज्ञानाचें निरनिराळें प्रतिपादन करून व शेवटीं सर्वभूतहिताचा उपदेश करून श्रुतीनें हा पांचवा अध्याय पूर्ण केला आहे.

---

## ॥ षष्ठोऽध्यायः ॥

### अथ प्रथमः खण्डः ।

**श्वेतकेतुर्हारुणेय आस तँ ह पितोवाच श्वेतकेतो वस ब्रह्मचर्यं न वै सोम्यास्मत्कुलीनोऽननूच्य ब्रह्मबन्धुरिव भवतीति ॥ १ ॥**

**आरुणेयः श्वेतकेतुः आस ह । तम् पिता उवाच ह । श्वेतकेतो ब्रह्मचर्यम् वस । सोम्य अननूच्य ब्रह्मबन्धुः इव अस्मत्कुलीनः न भवति इति ।**

आरुणि वंशांत श्वेतकेतु या नांवाचा एक ऋषिपुत्र होता. त्याला त्याचा पिता म्हणाला कीं, हे श्वेतकेतु ! ब्रह्मचर्याच्या व्रतानें रहा ( व्रतपूर्वक विद्याभ्यास कर ). अध्ययनाशिवाय शूद्राप्रमाणें (नांवाचा ब्राह्मण) आमच्या कुलांतील कोणीहि रहात नाहीं.

मागील अध्यायाच्या पंचाग्निविद्याप्रकरणांत गौतम व श्वेतकेतु या पितापुत्रांचीं नावें आलीं आहेत. तींच नांवें येथेंही आहेत; तथापि दोन्ही ठिकाणच्या व्यक्ति एकच असतील असें म्हणवत नाहीं. गौतम व श्वेतकेतु ही जोडी दोनहि प्रकरणांत एकच असेल तर, गौतमानें प्रवाहणापासून ब्रह्मविद्या संपादन केल्यानंतर आपला पुत्र जो श्वेतकेतु त्याला त्यानें ब्रह्मविद्या शिकविली असें समजण्यास हरकत नाहीं. गौतमाच्या आरुणि वंशाची ब्रह्मविद्या ही बाणीच असावी असें दिसतें. उपनिषदांतून या वंशाचा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतो. आणि येथें तर त्यानें आपल्या पुत्राला तसें स्पष्ट सांगितलें आहे. या मंत्रांतील ब्रह्मबन्धु या शब्दाचा अर्थ द्विजबन्धु या शब्दासारखा करावयास पाहिजे. कारण क्षत्रिय हे तर उपनिषत्कालीं ब्रह्मविद्येंत अग्रेसरच होते असें म्हणावयास हरकत नाहीं. अजातशत्रु, प्रवाहण जैवली, अश्वपति या क्षत्रियांना तर ब्रह्मविद्येचें गुरुत्वच प्राप्त झालें होतें. म्हणून केवळ शारीरिक कष्टांवर उपजीविका करणारा शूद्रतुल्य ब्राह्मणच येथें ब्रह्मबन्धु शब्दानें दर्शविला आहे असें निश्चित

समजावें. श्वेतकेतूला विद्वत्तेचें महत्त्व कळावयाचें होतें म्हणूनच विद्येचें अध्ययन करण्यासाठीं श्वेतकेतूला त्याचा पिता आग्रहानें सांगत आहे.

**स ह द्वादशवर्ष उपेत्य चतुर्विंशतिवर्षः सर्वान्वेदानधीत्य महामना अनूचानमानी स्तब्ध एयाय तं ह पितोवाच ॥२॥**

**द्वादशवर्षः सः उपेत्य चतुर्विंशतिवर्षः सर्वान् वेदान् अधीत्य महामनाः अनूचानमानी स्तब्धः एयाय । तम् पिता उवाच ह ।**

बारा वर्षांचा असलेला तो ( श्वेतकेतु ) ब्रह्मचर्यव्रत स्वीकारून चोवीस वर्षांचा होईपर्यंत सर्व वेदविद्या पूर्ण करून मानी, पंडितम्मन्य, व गर्विष्ठ असा बनून पित्याकडे आला. त्याला पिता म्हणाला—

**श्वेतकेतो यन्नु सोम्येदं महामना अनूचानमानी स्तब्धोऽस्युत तमादेशमप्राक्ष्यः येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातमिति कथं नु भगवः स आदेशो भवतीति ॥ ३ ॥**

**श्वेतकेतो यत् नु सोम्य इदम् महामनाः अनूचानमानी स्तब्धः असि उत तम् आदेशम् अप्राक्ष्यः येन अश्रुतम् श्रुतम् अमतम् मतम् अविज्ञातम् विज्ञातम् भवति इति । भगवः कथम् नु सः आदेशः भवति इति ।**

हे श्वेतकेतु,वत्सा,तूं असा अभिमानी,पंडितंमन्य व गर्विष्ठ झाल्यासारखा दिसतोस; पण जो आदेश समजल्यानें न ऐकलेलें ऐकलेंसें होतें, विचार करण्यास अशक्य अशा तत्त्वाचा विचार करितां येतो, व ज्याचें विशेष ज्ञान सहजीं होणें शक्य नाहीं, त्याचें ज्ञान होतें असा तो आदेश ( ज्ञानाचें ज्ञापक किंवा गमक ) गुरुला विचारला आहेस कां ? श्वेतकेतु म्हणाला, भगवन् ( आपण म्हणतां ) तो आदेश कसा आहे ?

श्वेतकेतु बारा वर्षें गुरुगृहीं राहून वेदविद्येचें पूर्ण अध्ययन करून पित्याकडे आला तेव्हां तो चोवीस वर्षांचा होता असें या मंत्रांत स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून श्वेतकेतु आपल्या वयाच्या १२ वे वर्षीं गुरुगृहीं अध्ययनास गेला असें ठरतें. अध्ययनाचे वेळींच उपनयनसंस्कार करण्याची चाल वैदिक कालांत रूढ होती. त्यावरून श्वेतकेतूचें मौंजीबंधन १२ वे वर्षी झालें कीं काय, अशी शंका आल्यावांचून राहात नाहीं. श्वेतकेतु अध्ययन पूर्ण करून परत आल्यावर तो बराच अभिमानी झाला आहे असें पाहून पित्यानें त्याची परीक्षा पाहण्याकरितां ब्रह्मज्ञानाविषयीं त्याला प्रश्न केला आहे. या प्रश्नांत आदेश हा शब्द आला असून तो फार महत्त्वाचा आहे. केनोपनिषद्, बृहदारण्यक इत्यादि ठिकाणीं या आदेश शब्दाचें सविस्तर विवरण करण्यात आलें आहे ( उ. नि. र. प्र. केन खंड ४, मं. ४ पृ. ७०–७१; उ. नि. र. प्र. बृह. अ. २ ब्राह्मण ३ मं. ६ पृ. ५० ते ५४ ). हा आदेश म्हणजेच ब्रह्मतत्त्वाचें ज्ञापक असें ब्रह्मज्ञानाचें शास्त्र होय. या शास्त्रज्ञानाच्या योगानेंच विज्ञानांत एकसूत्रीपणा येऊन मनुष्याचें ज्ञान पूर्ण होतें. मंत्रांतील ‘ येनाश्रुतं श्रुतं भवति ’ इत्यादि शब्दयोजना ज्ञानाच्या पूर्णतेचीच द्योतक आहे. ब्रह्मतत्त्व वाणी व मन यांना अगोचर असल्यामुळें, ब्रह्मवस्तु प्रत्यक्ष शब्दानीं सांगतां येत नाहीं किंवा समजावून देतां येत नाहीं. म्हणूनच तें अश्रुत किंवा अमत आहे असें म्हणावें लागतें. वैशिष्ट्य हें सृष्ट पदार्थांतच दाखवितां येतें तसें तें ब्रह्मवस्तूमध्यें दाखवितां येत नाहीं. म्हणून ब्रह्मवस्तूचें विशेष ज्ञान कोणतें हें सांगतां यावयाचें नाहीं. तथापि पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टीचे उत्पत्ति, स्थिति इत्यादि सर्व व्यापार या ब्रह्मवस्तूवरच अवलंबून असतात. कापसापासून अनेक प्रकारचीं वस्त्रें तयार व्हावीं त्याप्रमाणें ब्रह्मवस्तूपासूनच हें सर्व जग निर्माण झालें आहे व ब्रह्मवस्तूच्या सामर्थ्यानेंच तें चाललें आहे. याप्रमाणें जग व जगदीश्वर यांचें ज्ञान झाल्यावर त्यायोगें शुद्ध ब्रह्मवस्तूचें स्वरूप समजतें व आपल्याला ब्रह्मवस्तूचें विशेष ज्ञान झालें आहे असा ज्ञात्याला प्रत्यय येतो. हें ज्ञानसामर्थ्य ज्या शास्त्राच्या योगानें

प्रगट होतें तें तूं संपादन केलें आहेस काय ? असा पित्याचा श्वेतकेतूला प्रश्न आहे. त्यावर श्वेतकेतूनें ब्रह्मविद्येचें आपल्याला ज्ञान झालेलें नाहीं, तें आपणास समजावून सांगावें, अशा अर्थानें विनंति केली आहे. त्यावरून श्वेतकेतु फारसा मनांतून गर्विष्ठ नसावा असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

**यथा सोम्यैकेन मृत्पिण्डेन सर्वं मृण्मयं विज्ञातꣳ स्याद्वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥ ४ ॥**

**सोम्य यथा एकेन मृत्पिण्डेन सर्वम् मृण्मयम् विज्ञातम् स्यात् । विकारः नामधेयम् वाचारम्भणम् । मृत्तिका इति एव सत्यम् ।**

( पिता आरुणि म्हणाला ) वत्सा ! ज्याप्रमाणें एका मृत्पिंडाचें ( मातीच्या ढेकळाचें ) पूर्ण ज्ञान झाल्यानें मातीनें बनलेल्या सर्व पदार्थांचें ज्ञान होतें. विकार या नांवाचा हा एक शाब्दिक प्रकार आहे. (माती व तिच्यापासून बनलेले पदार्थ यांमध्यें तात्त्विक भेद मुळींच नाहीं. ) तात्त्विक दृष्ट्या मृत्तिका हेंच सत्य होय. म्हणजे कार्याला स्वतंत्र अस्तित्व नसून उपादान कारणालाच म्हणजे घटककारणालाच खरें अस्तित्व असतें. ( कार्यकारणांतील भेद व्यवहारिक आहे, तात्त्विक नव्हे. )

**यथा सोम्यैकेन लोहमणिना सर्वं लोहमयं विज्ञातꣳ स्याद्वाचारम्भणं विकारो नामधेयं लोहमित्येव सत्यम् ॥ ५ ॥**

**सोम्य ! यथा एकने लोहमणिना सर्वम् लोहमयम् विज्ञातम् स्यात् । विकारः नामधेयम् वाचारम्भणम् । लोहम् इति एव सत्यम् ।**

वत्सा ! ज्याप्रमाणें लोह धातूचें पूर्णज्ञान झाल्यानें लोखंडाच्या सर्व पदार्थांचें ज्ञान होतें. कार्य या नांवाचा हा शाब्दिक प्रकार आहे. लोखंड तेवढें ( तात्त्विक दृष्ट्या ) खरें आहे.

**यथा सोम्यैकेन नखनिकृन्तनेन सर्वं कार्ष्णायसं विज्ञातꣳ स्याद्वाचारम्भणं विकारो नामधेयं कृष्णायसमित्येव सत्यमेवꣳ सोम्य स आदेशो भवतीति ॥ ६ ॥**

**सोम्य ! यथा एकेन नखनिकृन्तनेन सर्वम् कार्ष्णायसम् विज्ञातम् स्यात् । विकारः नामधेयम् वाचारम्भणम् । कृष्णायसम् इति एव सत्यम् । सोम्य एवम् सः आदेशः भवति इति ।**

वत्सा ! ज्याप्रमाणें नखें इत्यादि कापण्याची क्रिया ज्याच्या योगानें होते तें एक पोलाद संपूर्ण रीतीनें समजल्यानें सर्व कार्ष्णायस पोलादाचे पदार्थ समजतात ( त्यांचें ज्ञान होतें ). कार्य या नांवाचा हा शाब्दिक प्रकार आहे. कृष्णायस ( पोलाद ) यासच खरें अस्तित्व आहे. वत्सा, याप्रमाणें तो आदेश ( ज्ञापक ) आहे.

ब्रह्मवस्तु व जग यांत कसा संबंध आहे हें दाखविण्याकरितां मंत्र ४ ते ६ या तीन मंत्रांत तीन दृष्टान्त दिले आहेत. मृत्तिका व मृण्मय पात्रें, यांचा दृष्टान्त तिसऱ्या मंत्रांत दिला आहे. निरनिराळ्या पात्रांचा व्यवहारांत निरनिराळ्या प्रकारांनीं उपयोग होतो. हा व्यवहार त्या त्या पात्रांच्या आकारांवर अवलंबून असतो. ही गोष्ट लोखंडाच्या दृष्टान्तावरून चांगली दाखवितां येईल. लोखंड किंवा पोलाद यांच्या असंख्य जिनसा सांप्रतकाळीं तयार होत आहेत. त्यांच्या आकारांवरून त्यांचे उपयोग-व्यवहार एकमेकांहून अत्यंत भिन्न होतात. तलवार व पाणी पिण्याचा पेला हे दोनही पदार्थ एकाच धातूचे बनलेले असले तरी, एक प्राणघात करितो तर दुसरा पाणी पाजून प्राणरक्षण करण्यास उपयोगी पडतो; इतका या दोन पदार्थांत आत्यंतिक विरोध असला तरी, ते दोनहि पदार्थ एकाच धातूचे बनलेले आहेत हें नाकबूल करिता येत नाहीं. त्याप्रमाणेंच सृष्ट-पदार्थ एकमेकांहून अत्यंत भिन्न असलें तरी, ते एकाच ब्रह्मवस्तूपासून उत्पन्न झालेले आहेत असें निश्चितपणें म्हणतां येतें. पदार्थांचे आकार व गुण-

धर्म हेच व्यवहाराला कारणीभूत असतात. व्यावहारिक सत्ता सृष्ट पदार्थांच्या आकारादि गुणधर्मांवरच अवलंबून असते. व्यावहारिक सत्तेनें पदार्थ भिन्न भिन्न आहेत असें ठरलें तरी, ते ज्या तत्त्वापासून बनलेले असतात त्या तत्त्वाशीं व्यावहारिक सत्तेचा संबंध प्रत्यक्षपणें येत नाहीं पण त्यांवरून, व्यवहारांत दिसणारे भेद मूळतत्त्वांत आहेत असें मानतां यावयाचें नाहीं. म्हणून व्यावहारिक दृष्ट्या सृष्टीमध्यें दिसून येणारें नानात्व तिच्या मूळतत्त्वांत आहे असें म्हणतां येत नाहीं. पदार्थांचें नामरूपादि गुणधर्म जेथें समाप्त होतात तेथें व्यावहारिक सत्तेचीहि समाप्ति होते. गुणधर्मांच्या पलीकडे तत्त्वाचा प्रांत लागतो; व तेथपासूनच तात्त्विक दृष्टीला आणि पारमार्थिक सत्तेला प्रारंभ होतो. तात्त्विक दृष्टीनें जगाचा विचार करूं लागल्यास असें समजून येईल कीं, ब्रह्मतत्त्वापासूनच जग उत्पन्न झालें असल्यामुळें माती व मातीचीं भांडीं, लोखंड किंवा पोलाद व त्यापासून बनलेले पदार्थ, हे जसे तत्त्वतः भिन्न नाहींत म्हणजे मातीचीं बनविलेलीं अनेक आकारांचीं भांडीं तात्त्विक दृष्ट्या मातीहून निराळीं नाहींत, किंवा तलवार, पेला, इत्यादि पदार्थ लोखंडाहून निराळे नाहींत, त्याप्रमाणें ब्रह्मवस्तूपासून उत्पन्न झालेलें जग ब्रह्माहून निराळें नाहीं असें निःसंशय सिद्ध होतें. जग हें विकारस्वरूप आहे. विकार म्हणजे कृत्रिम स्वरूप आणि वाचारंभण म्हणजे शाब्दिक व्यवहार, असे या दोन शब्दांचे अर्थ समजावे. सर्व सृष्टपदार्थ व्यावहारिक दृष्ट्या निराळे असले तरी, ते तात्त्विक दृष्ट्या ब्रह्मरूपच आहेत; म्हणून ब्रह्मतत्त्व हेंच पारमार्थिक सत्य होय. सृष्टि किंवा सृष्टपदार्थ कार्यरूप आहेत. कार्याला कारणाशिवाय स्वतंत्र अस्तित्वच नसल्यामुळें, तात्त्विकदृष्ट्या सृष्टि हा एक निराळा स्वतंत्र पदार्थ आहे ही सृष्टीविषयींची कल्पनाच खोटी ठरते.

श्रुतीनें दिलेले हे दृष्टान्त भ्रमरूप मायावादाला अनुकूल तर नाहींतच, पण उलट ते मायावादाला बाधकच आहेत. ब्रह्मवस्तूवर सृष्टीच्या मूळ प्रकृतीचा रज्जुसर्पाप्रमाणें भास झाला व त्यापासूनच या सर्व सृष्टिभ्रमाला सुरुवात झाली असें मायावादाचें म्हणणें आहे, तें या श्रुतीच्या दृष्टान्ताशीं

अगदींच विरुद्ध आहे. लोखंडावर तलवारीचा भास झाल्यानें ती तलवार प्राणघातक झाली किंवा मातीवर रज्जूसर्पासारखा भांड्याचा भ्रम झाला म्हणून ती माती भांड्यासारखी पाणी पिण्यास उपयोगी पडूं लागली असें म्हणणें कोणत्याहि दृष्टीनें संभवत नाहीं. म्हणून रज्जुसर्पासारखा भ्रमरूप मायावाद श्रुतीला येथें मुळींच अभिप्रेत नाहीं असें निर्विवाद सिद्ध होतें. परब्रह्माच्या लोकोत्तर शक्तीमुळें त्याच्या एका अंशांत विशेष व्यापार होऊन जगाची मूळप्रकृति किंवा सगुणब्रह्म प्रगट झालें. हाच सृष्टीचा आरंभ होय. तत्त्वामध्यें फरक न पडतां केवळ स्वरूपामध्यें जो बदल होतो त्यालाच विवर्त असें म्हणतात. या विवर्तपद्धतीनें सगुणब्रह्म प्रगट झालें व त्यापासून क्रमानें सर्व सृष्टि उत्पन्न झाली. म्हणूनच ब्रह्म व सृष्टि यांमध्यें भेद नसून जग हें ब्रह्मरूपच आहे असें ठरतें. ब्रह्मज्ञानाच्या योगानें जग हें ब्रह्मरूपच आहे असा प्रत्यय आला तरी, मनुष्याचा व्यवहार बंद पडण्याचें कांहीं कारण नाहीं. सर्व भांडीं मातीचीं आहेत असें मनुष्याला पूर्णपणें कळलें तरी, भांड्याच्या आकारानुसार घडणाऱ्या व्यवहाराला हें मातीचें ज्ञान बाधक होत नाहीं. तसेंच तलवार, पेला इत्यादि पदार्थ लोखंडापासून बनलेले आहेत असें ज्ञान झालें तरी, त्या ज्ञानानें त्या मनुष्याचा व्यवहार थांबत किंवा बदलत नाहीं. तद्वतच जग हें ब्रह्मापासून उत्पन्न झालें आहे असा प्रत्यय आला असला तरी, त्याचा जागतिक व्यवहार ब्रह्मज्ञानामुळें बंद पडतो असें म्हणणें अशास्त्रीय व निराधारच ठरतें. ब्रह्मज्ञानाच्या योगानें अंतःकरणांतील स्वार्थ, उपभोगवासना, अहंकार, व्यक्तिमाहात्म्य इत्यादि सर्व दोष अजिबात नष्ट होतात. त्यामुळें अज्ञानी मनुष्याच्या अंतःकरणांत पदार्थांविषयीं जसे राग, लोभ इत्यादि विकार ( दोष ) उत्पन्न होतात, तसे ते ज्ञानी मनुष्याच्या अंतःकरणांत उत्पन्न होत नाहींत. ब्रह्मज्ञानानें त्याची बुद्धि नितांत शुद्ध झालेली असते. अशा शुद्ध बुद्धीनेंच त्याचे सर्व व्यवहार चालतात. ते अव्यवस्थित होत नाहींत किंवा बंदही पडत नाहींत. मायावादाप्रमाणें औपनिषद विद्येतील या ब्रह्मप्रकृतिवादांत व्यवहार व तत्त्व हीं एकमेकांस विरुद्ध किंवा प्रतिकूल असत

नाहींत; तीं एकमेकास अनुकूल अशींच असतात. ब्रह्मज्ञान झाल्यावर सृष्टीची किंवा सृष्टपदार्थांची जाणीवच नष्ट होते असें मानण्याची पाळी मायावादावर येते, तशी ती श्रुतिप्रणीत विचारसरणीवर मुळींच येत नाहीं. मायावादांतील विचारसरणीचा हा दोष आहे. वस्तुस्थिति उपनिषदांतील विचारसरणीप्रमाणेंच आहे. म्हणूनच भ्रमरूप मायावादाचें प्रतिपादन करणाऱ्या साधुसंतांनीं किंवा आचार्यांनीं देखील ग्रंथरचना, ज्ञानोपदेश, ज्ञानप्रसार इत्यादि महत्कार्यें उत्कृष्ट रीतीनें पार पाडलीं. स्वप्नतुल्य मायावादानें, ज्ञानोत्तर प्राप्त होणाऱ्या स्थितींत जगताची जाणीव ( भान ) अजीबात नष्ट झाल्यावर. वरीलसारखीं कार्यें ज्ञानी मनुष्याच्या हातून घडणें सर्वथैव असंभवनीयच ठरतें; आणि म्हणूनच मायावादांत मानला जाणार व्यावहारिक सत्ता व पारमार्थिक सत्ता यांतील विरोध किंवा त्यांचा बाध्यबाधकसंबंध वस्तुस्थितीस अगदींच सोडून आहे असें म्हटल्यावांचून गत्यंतरच नाहीं. श्रुतीची विचारसरणी मायावादाच्या विरुद्ध असल्यामुळें, मायावादाला श्रुतिप्रामाण्याचा आधार मिळणें शक्य नाहीं असेंच ठरतें. ब्रह्मसूत्रकारांनीं देखील या दृष्टांतांच्या मंत्रांना अनुलक्षूनच जग व ब्रह्म यांचा अभेद ( अनन्यत्व ) प्रतिपादन केला आहे. ( ब्र. सू. अ. २ पा. १ सू. १४ ). भ्रमरूप मायावादाची विचारसरणी पतकरल्यावांचून अद्वैत सिद्ध व्हावयाचेंच नाहीं, अशी कित्येकांची गैरसमजूत झालेली असते; परंतु वरील सूत्राचा व प्रस्तुतचे तीन मंत्र आणि त्यांतील दृष्टांत याचा निर्विकार बुद्धीनें विचार केल्यास अद्वैतसिद्धीला मायावादाची मुळींच गरज नाहीं अशी कोणाचीही सहज खात्री पटेल. मृत्तिका व मृण्मय पात्रें, लोखंड व तज्जन्य पदार्थ इत्यादि दृष्टान्तांनीं श्रुतीनें हें अद्वैतच सिद्ध केलें आहे. या अद्वैतसिद्धीच्या कामीं रज्जुसर्प किंवा शुक्तिरजत यांसारखे भ्रमाचे दृष्टांत श्रुतीनें मुळींच स्वीकारलेले नाहींत दशोपनिषदांतील अद्वैतसिद्धांत मायावादावांचून श्रुतीनें निःसंदिग्ध सिद्ध केला आहे. पूर्वग्रह सोडून स्वतंत्र बुद्धीनें कोणीही या श्रौतसिद्धांताचा अभ्यास करील तर मायावादाचा भ्रांतिकृत चमत्कार न करितां तो या

अद्वैतसिद्धांतापर्यंत या बुद्धिवादाच्या श्रौतमार्गानें प्रत्यक्षपणें जाऊन पोंचेल यांत तिळमात्रही शंका नाहीं.

**न वै नूनं भगवन्तस्त एतदवेदिषुर्यद्ध्येतदवेदिष्यन्कथं मे नावक्ष्यन्निति भगवाꣳस्त्वेव मे तद्ब्रवीत्विति तथा सोम्येति होवाच ॥७॥**

**ते भगवन्तः नूनम् एतत् न वै अवेदिषुः । हि यत् एतत् अवेदिष्यन् कथम् मे न अवक्ष्यन् इति । तु भगवान् एव मे तत् ब्रवीतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।**

( श्वेतकेतु म्हणाला ) ते माझे गुरु हें तत्त्वज्ञान जाणत नव्हते जर त्यांना हें ज्ञान असतें तर त्यांनीं तें मला कसें सांगितलें नसतें ? म्हणून आपणच मला त्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करावा. ( तव्हां ) होय, असें ( आरुणि ऋषि ) म्हणाला.

पित्याचा मार्मिक प्रश्न ऐकून श्वेतकेतूची खातरी झाली कीं, आपण ज्यांचेजवळ अध्ययन केलें त्यांना ही ब्रह्मविद्या अवगत नव्हती. आपला पिता या ब्रह्मविद्येंत निष्णात आहे. हें ब्रह्मज्ञान आपण पित्यापासून संपादन केलें नाहीं तर आपली विद्वत्ता एकांगी व अपुरीच राहील. या विचारानें श्वेतकेतूची ब्रह्मजिज्ञासा जागृत झाली व त्यानें ब्रह्मोपदेश करण्याविषयीं आपल्या पित्याची प्रार्थना केली.

## अथ द्वितीयः खण्डः ।

**सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् । तद्धैक आहुरसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तस्मादसतः सज्जायत ॥ १ ॥**

**सोम्य इदम् अग्रे अद्वितीयम् एकम् एव सत् एव आसीत् । तत् एके आहुः ह । इदम् अग्रे अद्वितीयम् एकम् एव असत् एव आसीत् । तस्मात् असतः सत् ( अ ) जायत ।**

( आरुणि म्हणाला ), हे वत्सा, श्वेतकेतु ! हें सर्व कार्यरूप जगत् ( उत्पन्न होण्याच्या ) पूर्वीं अद्वितीय एकजिनसी असें

भावरूपच होतें. त्याविषयीं कांहीं लोक म्हणतात कीं, हें जग ( उत्पन्न होण्याचे ) पूर्वी अद्वितीय एक अभावरूपच होतें. असतापासून ( अभावापासून ) सत् म्हणजे भावरूपी जग उत्पन्न झालें.

**कुतस्तु खलु सोम्यैवꣳ स्यादिति होवाच कथमसतः सज्जायेतेति । सत्त्वेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥ २ ॥**

**सोम्य एवम् खलु कुतः तु स्यात् । कथम् असतः सत् जायेत इति । सोम्य इदम् तु अग्रे अद्वितीयम् एकम् एव सत् एव आसीत् । इति उवाच ह ।**

वत्सा ! असें खरोखर कोणत्या प्रमाणावरून ( पुराव्यावरून ) सिद्ध होईल ? ( प्रमाण नसल्यामुळें सिद्ध होणार नाहीं. ) कारण अभावापासून भाव कसा उत्पन्न होणार ? म्हणून वत्सा ! हें जग उत्पन्न होण्याचेपूर्वी अद्वितीय असें एकजिनसी, भावरूपी तत्त्वच होतें.

मागील खंडांत मंत्र ४, ५, ६ यांत तीन दृष्टांत देऊन जो सिद्धान्त दर्शविला आहे तोच सिद्धांत या दोन मंत्रांत श्रुतीनें सिद्ध केला आहे. सत् व असत् हे दोन शब्द उपनिषदांत देखील निरनिराळ्या अर्थांनीं आले आहेत. तैत्तिरीय आनंदवल्लींत ‘ असद्वा इदमग्र आसीत् ततो वै सदजायत ’ अशीं वाक्यें आलीं आहेत. ( उ. नि. र. प्र. तैत्ति. आनंदवल्ली अनुवाक ७ मं. १ पृ. ४५ ते ४७ ) या वाक्यांत सत् व असत् या शब्दांचे मूर्त, अमूर्त किंवा व्यक्त अव्यक्त असेच अर्थ कां स्वीकारावे लागतात याचें सविस्तर विवेचन त्या मंत्रांच्या विवरणांत केलें आहे. गीतेमध्यें देखील सत् असत् हे शब्द अनेक अर्थांनीं आले आहेत. भाव अभाव, कार्य कारण, व्यक्त अव्यक्त, मूर्त अमूर्त इत्यादि अर्थ सत् व असत् या शब्दांपासून निघतात. हे सर्वच अर्थ या मंत्रांत अभिप्रेत आहेत असें जरी म्हणतां आलें नाहीं तथापि, ते सर्व अर्थ परस्परबाधक नसल्यामुळें, निरनिराळ्या शास्त्र-

कारांनीं या खंडांतील सत् व असत् या शब्दांचे अर्थ आपआपल्या मतांस जुळवून घेतले आहेत. त्या सर्व अर्थापेक्षां भाव व अभाव हेच अर्थ येथें अधिक समर्पक दिसतात. ही सर्व सृष्टि उत्पन्न होण्याच्यापूर्वी भावरूप असें एकच तत्त्व सर्वत्र भरलेलें होतें; परंतु कित्येक असें म्हणतात कीं, सृष्टीच्यापूर्वी केवळ असत्च होतें. प्रस्तुत दोन्हीही मंत्रांत सत् व असत् या शब्दांना 'एकम् अद्वितीयम्' हीं दोन विशेषणें सारखींच दिलीं आहेत. वस्तुतः असत् या शब्दाचा अभाव हाच अर्थ विवक्षित असता तर त्याला एकम् अद्वितीयम् हीं विशेषणें देण्याचें मुळींच कारण नव्हतें म्हणून, असत् शब्दाचा कृत्रिम किंवा कार्यरूप वस्तु असाहि अर्थ घ्यावयास हरकत नाहीं. असतापासून सत् कसें उत्पन्न होईल, असा प्रश्न करून अर्थात् तें उत्पन्न होणार नाहीं असें अर्थापत्तीनें सिद्ध केलें आहे. यावरून श्रुतीनें हा मूळ सिद्धान्त प्रतिपादन करितांना देखील सर्वस्वीं बुद्धिवाद स्वीकारला आहे असें निःसंशय सिद्ध होतें.

**तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति तत्तेजोऽसृजत तत्तेज ऐक्षत बहु स्यां प्रजायेयेति तदपोऽसृजत । तस्माद्यत्र क्व च शोचति स्वेदते वा पुरुषस्तेजस एव तदध्यापो जायन्ते ॥ ३ ॥**

**तत् बहु स्याम् प्रजायेय इति ऐक्षत । तत् तेजः असृजत । तत् तेजः बहु स्याम् प्रजायेय इति ऐक्षत । तत् अपः असृजत । तस्मात् यत्र क्व च पुरुषः शोचति स्वेदते वा तत् तेजसः आपः अधिजायन्ते ।**

तें ( सत्तत्त्व ) मीं बहु म्हणजे विविध व्हावें ( आणि ) मीं प्रजा (सृष्टि) उत्पन्न करावी असें (मानितें) झालें. म्हणजे त्या सत्तत्त्वाला, आपण विविध सृष्टि उत्पन्न करावी असें वाटलें. त्या सत्तत्त्वानें तेज उत्पन्न केलें. त्या तेजाला मीं विविध व्हावें व सृष्टि उत्पन्न करावी असें वाटलें. त्या तेजानें जल ( द्रवरूप सृष्टि )

उत्पन्न केलें. म्हणून जेव्हां जेव्हां पुरुष अश्रू ढाळतो किंवा घामेजतो तेव्हां तेव्हां तें जल तेजोरूप उष्णतेपासूनच उत्पन्न झालेलें असतें.

मुण्डकोपनिषदांत ब्रह्मतत्त्वापासून प्रथम तपःसामर्थ्य उत्पन्न झालें व त्यापासून पुढें क्रमानें सृष्टि उत्पन्न झाली असें सांगितलें आहे. ( उ. नि. र. प्र. मुं. खं. १ मं ८ पृ. १४ ते १६. ) प्रस्तुत मंत्रांतील विवेचन मुण्डकांतील मंत्राशीं जुळण्यासारखेंच आहे. तप व तेज या दोन्ही शब्दांचें तात्पर्य एकच आहे. दशोपनिषदांमध्यें सृष्टिक्रमाविषयीं कांहींसा मतभेद आढळून येतो हें जरी खरें असलें तरी, या मतभेदाचा तात्त्विक-दृष्ट्या समन्वय करितां येण्याजोगा आहे हें विसरतां कामा नये.

**ता आप ऐक्षन्त बह्व्यः स्याम प्रजायेमहीति ता अन्नमसृजन्त तस्माद्यत्र क्व च वर्षति तदेव भूयिष्ठमन्नं भवत्यद्भ्य एव तदध्यन्नाद्यं जायते ॥ ४ ॥**

**ताः आपः बह्व्यः स्याम प्रजायेमहि इति ऐक्षन्त । ताः अन्नम् असृजन्त । तस्मात् यत्र क्व च वर्षति तत् एव भूयिष्ठम् अन्नम् भवति । अद्भ्यः एव तत् अन्नाद्यम् अधिजायते ।**

त्या जलाला आपण विविध व्हावें व सृष्टि उत्पन्न करावी असें वाटलें. त्यानें अन्न उत्पन्न केलें. म्हणून जेव्हां वृष्टि होते तेव्हां पुष्कळ अन्न उत्पन्न होतें; आणि पाण्यापासूनच उपभोगसामर्थ्य ( उपभोक्ते प्राणी ) देखील उत्पन्न होतें.

तेजापासून पाणी व पाण्यापासून अन्न उत्पन्न झालें. प्राणिमात्रांच्या ठिकाणीं दिसून येणारी उपभोगशक्ति पाण्यांतील जीवन-सामर्थ्यानें उत्पन्न झाली आहे. तेज, पाणी अन्न हींच सृष्टीचीं मूळ द्रव्यें होत, असा मंत्र ३ व ४ यांतील अभिप्राय आहे.

---

## अथ तृतीयः खण्डः।

**तेषां खल्वेषां भूतानां त्रीण्येव बीजानि भवन्त्याण्डजं जीवज-मुद्भिज्जमिति ॥ १ ॥**

**तेषाम् एषाम् भूतानाम् अण्डजम् जीवजम् उद्भिज्जम् इति त्रीणि एव बीजानि भवन्ति खलु ।**

त्या ह्या प्राणिमात्राची अण्डज ( अंड्यापासून उत्पन्न होणें ) जीवज ( जीवापासून उत्पन्न होणें ) व उद्भिज्ज ( भूमीपासून उत्पन्न होणें ) अशीं हीं तीन मूळ कारणरूपें आहेत.

ऐतरेय उपनिषदांत जरायुज, अण्डज, स्वेदज व उद्भिज्ज असे प्राण्यांचे चार प्रकार सांगितले आहेत. उत्तरकालीन वेदांतग्रंथांतहि हेच चार भेद स्वीकारण्यांत आले आहेत. परंतु येथें जरायुजाचा मुळींच उल्लेख नाहीं. जीवज, अण्डज व उद्भिज्ज या तीहींचाच उल्लेख येथें आला आहे.

**सेयं देवतैक्षत हन्ताहमिमास्तिस्रो देवता अनेन जीवेनात्म-नानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणीति ॥ २ ॥**

**सा इयम् देवता ऐक्षत । हन्त अहम् इमाः तिस्रः देवताः अनेन जीवेन आत्मना अनुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि इति ।**

त्या मूळ देवतेला इच्छा झाली कीं, आपण ( तेज, आप आणि अन्न–पृथ्वी ) या तीन देवतांमध्यें ह्या जीवाच्या स्वरूपानें प्रवेश करून ( त्यांचीं ) नांवें आणि रूपें ( गुणधर्म ) व्यक्त व विस्तृत करावीं.

सत्स्वरूप मूलतत्त्वापासून तेज, आप व पृथ्वी ( अन्न ) हीं तत्त्वें क्रमानें उत्पन्न झालीं. तीं केवळ जडरूप नसून, त्यांमध्यें चैतन्यस्वरूप देवही वास करीत आहे. म्हणूनच त्यांना देवता असें येथें म्हटलें आहे. या प्रत्येकांत ईक्षणशक्ति म्हणजे इच्छाशक्ति असून या देवतांचे व्यापार हेतुपुरस्सर चालले

आहेत. ज्या मूलतत्त्वापासून या देवता उत्पन्न झाल्या तें सत्तत्त्व शुद्ध चैतन्यस्वरूप आहे. ज्ञान, इच्छा, कृति हीं सामर्थ्यें चैतन्याचींच असतात. म्हणून हा सर्व सृष्टीचा व्यापार ईक्षणपूर्वक असल्यानें, या सर्व पदार्थांस केवळ जड असें म्हणतां येत नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तेज, आप इत्यादि शक्तींना जीवतत्त्वाची आणखी जोड देऊन त्यांचे गुणधर्म व कार्यें अधिक व्यक्त स्वरूपांत आणावीं असें मूळ सत्तत्त्वाला वाटलें; असा या मंत्राचा अभिप्राय आहे.

**तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकां करवाणीति सेयं देवतेमास्तिस्रो देवता अनेनैव जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरोत् ॥ ३ ॥**

**तासाम् एकैकाम् त्रिवृतम् त्रिवृतम् करवाणि इति च। सा इयम् देवता इमाः तिस्रः देवताः अनेन एव जीवेन आत्मना अनुप्रविश्य नामरूपे व्याकरोत्।**

आणि त्या तीन देवतांमध्यें प्रत्येकीस त्रिवृत् म्हणजे तिहींच्या मिश्रणानें युक्त करावें. ( त्रिवृत्करण म्हणजे—प्रधान द्रव्याचा एक द्वितीयांश व बाकीच्या दोन द्रव्यांचे प्रत्येकीं एकचतुर्थांश मिळून तें प्रधान द्रव्य त्रिवृत्‌रूप होतें. जसें पृथ्वी $\frac{1}{2}$ + आप $\frac{1}{4}$ + तेज $\frac{1}{4}$ = त्रिवृत् पृथ्वी. याप्रमाणेंच तेज व आप यांचें त्रिवृत्करण समजावें. ) ती ही सत्स्वरूप देवता या जीवस्वरूपानेंच तेज, आप व पृथ्वी या तीन देवतांमध्यें प्रवेश करून, त्यांचीं नांवें व रूपें ( गुणधर्म ) व्यक्त व विस्तृत करिती झाली.

**तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकामकरोद्यथा तु खलु सोम्येमास्तिस्रो देवतास्त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥ ४ ॥**

**तासाम् एकैकाम् त्रिवृतम् त्रिवृतम् अकरोत्। सोम्य यथा तु खलु इमाः तिस्रः देवताः त्रिवृत् त्रिवृत् एकैका भवति तत् मे विजानीहि इति।**

त्या तिहींपैकीं प्रत्येकीला त्रिवृत् त्रिवृत् ( वरीलप्रमाणें ) करिती झाली. ( आरुणि म्हणतो ), वत्सा ! त्या देवतांपैकीं प्रत्येक देवता त्रिवृत् कशी असते तें माझ्यापासून समजून घे. ( मी सांगतों तें ऐक. )

सर्व सृष्ट पदार्थांचीं पृथ्वी, आप व तेज हीं घटक द्रव्यें आहेत. हे पृथिव्यादि पदार्थ आपणास ज्या स्वरूपांत दिसतात तें त्यांचें स्वरूप शुद्ध नसून मिश्र आहे असें समजावें; या मिश्रणालाच त्रिवृत्करण असें म्हणतात. या तीन मूळ द्रव्यांत वायु व आकाश यांची भर घालून उत्तरकालीन वेदांतग्रंथ-कारांनीं पंचीकरणाची उपपत्ति बसविली आहे. पंचीकरण असो वा त्रिवृत्करण असो, द्रव्याच्या विशिष्ट संयोगानेंच व्यक्त अशा सृष्टिकार्यास प्रारंभ झाला आहे. द्रव्य जीवतत्त्वानें युक्त झाल्यावर मगच द्रव्या-द्रव्यांचा संयोग झाला असें या खंडांतील एकंदर विवेचनाचें तात्पर्य आहे. त्यावरून द्रव्यांचा रासायनिक संयोग हा त्यांच्या जिवंतपणाचा द्योतक आहे असें ठरतें.

---

## अथ चतुर्थः खण्डः ।

**यदग्ने रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादग्नेरग्नित्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ १ ॥**

**यत् अग्नेः रोहितम् रूपम् तत् तेजसः रूपम् । यत् शुक्लम् तत् अपाम् । यत् कृष्णम् तत् अन्नस्य । ( इति ) अग्नेः अग्नित्वम् अपागात् । विकारः नाम-धेयम् वाचारम्भणम् । त्रीणि रूपाणि इति एव सत्यम् ।**

अग्नीचा जो तांबडा रंग तें तेजाचें स्वरूप होय; जो पांढरा रंग तें पाण्याचें व जो काळा रंग तें पृथ्वीचें स्वरूप होय. या-प्रमाणें ( पाहिलें असतां ) अग्नीचें अग्नित्व ( स्वतंत्र स्वरूप )

नाहींसें होतें. विकार म्हणजे कार्य हें नांव शब्दोत्पादक (व्यवहारोपयोगी) आहे. पृथ्वी, आप व तेज हींच सत्य आहेत. (कार्य हें कृत्रिम आहे.)

प्रस्तुत मंत्रात अग्नीचें उदाहरण घेऊन त्यांत तेज आप व पृथ्वी यांचें कसें मिश्रण झालें आहे तें स्पष्ट दाखविलें आहे. त्यावरून कार्यरूप पदार्थाला स्वतंत्र आस्तित्व नसून घटककारणांनाच त्या पदार्थस्वरूपांत अस्तित्व असल्याचें सिद्ध केलें आहे. कार्याचें रूप कृत्रिम असून तें व्यवहारोपयोगी असतें हें खरें; पण कार्याला तात्त्विकदृष्ट्या स्वतंत्र अस्तित्व मुळींच नाहीं, असें पुढील तीन मंत्रांत तशाच उदहरणांवरून सिद्ध केलें आहे.

**यदादित्यस्य रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादादित्यादादित्यत्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ २ ॥**

**यत् आदित्यस्य रोहितम् रूपम् तत् तेजसः रूपम् । यत् शुक्लम् तत् अपाम् । यत् कृष्णम् तत् अन्नस्य । (इति) आदित्यात् आदित्यत्वम् अपागात् विकारः नामधेयम् वाचारम्भणम् । त्रीणि रूपाणि इति एव सत्यम् ।**

आदित्याचा जो तांबडा रंग तें तेजाचें स्वरूप होय; जो पांढरा रंग तें पाण्याचें स्वरूप व जो काळा रंग तें पृथ्वीचें स्वरूप होय. याप्रमाणें (पाहिलें असतां) आदित्याचें आदित्यत्व (स्वतंत्र स्वरूप) नाहींसें होतें. विकार म्हणजे कार्य हें नांव शब्दोत्पादक (व्यवहारोपयोगी) आहे. पृथ्वी आप व तेज हींच सत्य आहेत. (कार्य हें कृत्रिम आहे.)

**यच्चन्द्रमसो रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नास्यापागाच्चन्द्राच्चन्द्रत्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ ३ ॥**

**यत् चन्द्रमसः रोहितम् रूपम् तत् तेजसः रूपम् । यत् शुक्लम् तत् अपाम् । यत् कृष्णम् तत् अन्नस्य । ( इति ) चन्द्रात् चन्द्रत्वम् अपागात् । विकारः नामधेयम् वाचारम्भणम् । त्रीणि रूपाणि इति एव सत्यम् ।**

चन्द्राचा जो तांबडा रंग तें तेजाचें स्वरूप होय; जो पांढरा रंग तें पाण्याचें स्वरूप होय; व जो काळा रंग ते पृथ्वीचें स्वरूप होय. याप्रमाणें (पाहिलें असतां) चन्द्राचें चन्द्रत्व (स्वतंत्र स्वरूप) नाहींसें होतें. विकार म्हणजे कार्य हें नांव शब्दोत्पादक ( व्यवहारोपयोगी ) आहे. पृथ्वी, आप व तेज हींच सत्य आहेत. ( कार्य कृत्रिम आहे. )

**यद्विद्युतो रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाद्विद्युतो विद्युत्त्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ ४ ॥**

**यत् विद्युतः रोहितम् रूपम् तत् तेजसः रूपम् । यत् शुक्लम् तत् अपाम् । यत् कृष्णम् तत् अन्नस्य । ( इति ) विद्युतः विद्युत्त्वम् अपागात् । विकारः नामधेयम् वाचारम्भणम् । त्रीणि रूपाणि इति एव सत्यम् ।**

विजेचा जो तांबडा रंग तें तेजाचें स्वरूप होय; जो पांढरा रंग तें पाण्याचें स्वरूप होय; व जो काळा रंग तें पृथ्वीचें स्वरूप होय. याप्रमाणें ( पाहिलें असतां ) विजेचा वीजपणा ( स्वतंत्र स्वरूप ) नाहींसा होतो. विकार म्हणजे कार्य हें नांव शब्दोत्पादक ( व्यवहारोपयोगी ) आहे. पृथ्वी, आप व तेज हींच सत्य आहेत. ( कार्य हें कृत्रिम आहे. )

**एतद्ध स्म वै तद्विद्वाꣳस आहुः पूर्वे महाशाला महाश्रोत्रिया न नोऽद्य कश्चनाश्रुतममतमविज्ञातमुदाहरिष्यतीति ह्येभ्यो विदांचक्रुः ॥ ५ ॥**

**पूर्वे महाशालाः महाश्रोत्रियाः एतत् विद्वांसः तत् ह एतत् वै आहुः स्म। अद्य नः कश्चन अश्रुतम् अविज्ञातम् न उदाहरिष्यति हि एभ्यः विदांचक्रुः इति।**

प्राचीनकाळचे अत्यंत संपन्न, विद्वान् आणि हें तत्त्वज्ञान जाणणारे असें म्हणत होते कीं, 'आमच्यापैकीं कोणीहि अश्रुत ( न ऐकलेलें ) अमत ( विचार न केलेलें ) अविज्ञात ( विशेष प्रकारें न जाणलेलें ) असें बोलणार नाहीं; ( म्हणजे आम्हांला अश्रुत, अमत व अविज्ञात असें कांहीं नाहीं ). कारण वर सांगितलेल्या तत्त्वांचें त्यांना ( आम्हांला ) पूर्ण ज्ञान झालें होतें.

ज्या पदार्थाच्या घटकावयवांचें चांगलें ज्ञान झालेलें असतें तोच पदार्थ पूर्णपणें समजला असें म्हणतां येतें. ब्रह्मविद्येमध्यें जगताच्या घटकावयवांचाच विचार करावयाचा असल्यामुळें, त्या घटकतत्त्वांचें ज्ञान झालें असले तरच जगाचें पूर्ण ज्ञान झालें असें म्हणतां येईल. वरील प्रकरणांत तेज आप व पृथ्वी हींच जगताचीं घटकद्रव्यें ठरविलीं असल्यामुळें, त्यांचें ज्ञान झाल्यावर जगाचें पूर्ण ज्ञान झालें असें म्हणावयास हरकत नाहीं.

**यदु रोहितमिवाभूदिति तेजसतद्रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु शुक्लमिवाभूदित्यपाᳪं रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु कृष्णमिवाभूदित्यन्नस्य रूपमिति तद्विदांचक्रुः ॥ ६ ॥**

**यत् उ रोहितम् इव अभूत् तत् तेजसः रूपम् इति विदांचक्रुः। यत् उ शुक्लम् इव अभूत् तत् अपाम् रूपम् इति विदांचक्रुः। यत् उ कृष्णम् इव अभूत् तत् अन्नस्य रूपम् इति विदांचक्रुः।**

जें ( या जगांत ) तांबडें असें त्यांना दिसलें तें तेजाचें रूप होय, म्हणजे तें तेज आहे असें त्यांनीं जाणलें. जें पांढरें असें त्यांना दिसलें तें जलाचें रूप होय, म्हणजे तें जल आहे असें

त्यांनीं ओळखिलें. जें काळें असें त्यांना दिसलें तें पृथ्वीचें रूप होय, म्हणजे ती पृथ्वीच आहे असें त्यांनीं ओळखिलें.

प्रस्तुत मंत्रांत प्राचीन वैदिक ऋषींनीं भौतिक पदार्थांचा तात्त्विक विचार कसा केला होता त्याचें थोडक्यांत पण मार्मिक वर्णन केलें आहे. तांबडा, पांढरा व काळा या तीन रंगांचीं या मंत्रांत आलेलीं उदाहरणें अगदींच गांवढळ आहेत असें आधुनिक भौतिक शास्त्रवेत्त्याला सकृद्दर्शनीं वाटेल; परंतु शास्त्रीय संशोधनाच्या प्रारंभीं अशी स्थिति सर्वत्रच असते हें थोड्याशा विचाराअंतीं कोणालाही कबूलच करावें लागेल यांत शंका नाहीं. प्राचीन काळीं ऋषींनीं ब्रह्मतत्त्वाचें संशोधन सृष्टपदार्थांवरूनच केलें असें पूर्वी अनेक ठिकाणीं म्हटलें आहे, त्याला या मंत्रांतील विवेचन हें एक उत्कृष्ट गमकच होय. यावरून सृष्टिज्ञान हें ब्रह्मविद्येचें अद्वितीय साधन म्हणूनच त्याचें शास्त्रीयदृष्टया ठिकठिकाणीं सविस्तर विवेचन करण्यांत आलें आहे असें ठरतें. सृष्टीला आभास किंवा भ्रम समजणाऱ्या मायावादानें हीं सर्व विवेचनें त्याज्यच ठरविलीं आहेत, त्यामुळें मायावादानें श्रुतीचें प्रामाण्यच नाकबूल केल्यासारखें होतें. तेज, आप व पृथ्वी या तीन तत्त्वांचा प्रथम शोध लावून सर्व सृष्टपदार्थांत या तीन तत्त्वांचेंच कसें मिश्रण झालें आहे याचें वैदिक ऋषि काळजीपूर्वक परीक्षण करीत होते, असें या मंत्रांत स्पष्ट दर्शविलें आहे.

**यद्वविज्ञातमिवाभूदित्येतासामेव देवतानाꣳ समास इति तद्विदांचक्रुर्यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥ ७ ॥**

**यत् उ अविज्ञातम् इव अभूत् तत् एतासाम् देवतानाम् समासः इति तत् विदांचक्रुः। सोम्य यथा नु खलु इमाः तिस्रः देवताः पुरुषम् प्राप्य एका एका त्रिवृत् त्रिवृत् भवति तत् मे विजानीहि इति।**

जें विशेष न समजल्यासारखें होतें तें ह्या तीन देवतांचें (तेज, पाणी व पृथ्वी यांचें ) समुच्चयरूप होय, म्हणजे तो वरील तीन द्रव्यांचा समुच्चय आहे असें त्यांनीं ओळखिलें. वत्सा ! या तीन देवता प्राण्यांत समाविष्ट झाल्यावर प्रत्येकीं त्रिवृत्करण पद्धतीनें मिश्रस्वरूप कशा होतात तें माझ्यापासून ( पुढीलप्रमाणें ) समजून घे.

### अथ पञ्चमः खण्डः ।

**अन्नमशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तत्पुरीषं भवति यो मध्यमस्तन्मा्ँसं योऽणिष्ठस्तन्मनः ॥ १ ॥**

**आशितम् अन्नम् त्रेधा विधीयते । तस्य यः स्थविष्टः धातुः तत् पुरिषम् भवति । यः मध्यमः तत् मांसम् । यः अणिष्ट : तत् मनः ।**

भक्षण केलेल्या अन्नाचे ( पचनानंतर ) तीन प्रकार होतात. त्या अन्नाचा जो स्थूल अंश असतो त्याचा मळ बनतो; जो मध्यम अंश, त्याचें मांस होतें; व जो सूक्ष्म अंश असतो त्याचें मन बनतें.

**आपः पीतास्त्रेधा विधीयन्ते तासां यः स्थविष्ठो धातुस्तन्मूत्रं भवति यो मध्यमस्तल्लोहित योऽणिष्ठः स प्राणः ॥२॥**

**पीताः आपः त्रेधा विधीयन्ते । तासाम् यः स्थविष्ठः धातुः तत् मूत्रम् भवति। यः मध्यमः तत् लोहितम् । यः आणिष्ठः सः प्राणः ।**

प्राशन केलेल्या पाण्याचे ( पचनानंतर ) तीन प्रकार होतात. त्याचा जो अत्यंत स्थूल भाग त्याचें मूत्र होतें, जो मध्यम अंश असतो त्याचें रुधिर बनतें व जो सूक्ष्म अंश असतो त्याचा प्राण बनतो.

**तेजोऽशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तदास्थि भवति यो मध्यमः स मज्जा योऽणिष्ठः सा वाक् ॥ ३ ॥**

**अशितम् तेजः त्रेधा विधीयते । तस्य यः स्थविष्ठः धातुः तत् अस्थि भवति । यः मध्यमः सः मज्जा । यः अणिष्ठः सा वाक् ।**

भक्षण केलेलें तेज ( स्नेहमय तेल, तूप वगैरे पदार्थ ) याचे तीन प्रकार होतात. त्याचा जो अत्यंत स्थूल अंश त्याचीं हाडें बनतात; जो मध्यम अंश त्याचे मज्जातंतु होतात; व जो सूक्ष्म अंश त्याच्या योगानें वाणी तयार होते.

**अन्नमयँ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ४ ॥**

**सोम्य हि मनः अन्नमयम् प्राणः आपोमयः वाक् तेजोमयी इति । भगवान् मा भूय : एव विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।**

म्हणून वत्सा, मन हें अन्नाचें परिणत रूप होय; प्राण हें जलाचें परिणत रूप आहे; व वाणी हें तेजाचें परिणत रूप आहे. ( असें आरुणि म्हणाला ). ( श्वेतकेतु म्हणाला ) हे भगवन् ! मला आणखी बोध करा. वत्सा ! होय असें आरुणि म्हणाला.

मनुष्य जें पिष्टमय किंवा स्निग्ध असें अन्न खातो त्या अन्नाचे व प्राशन केल्या जाणाऱ्या पाण्याचे परिणाम शरीरामध्यें कसे घडतात व त्यायोगें शरीरांतील निरनिराळीं रसादि द्रव्यें कशीं तयार होतात याचें मार्मिक विवेचन या खंडांत केलें आहे. आधुनिक शारीरशास्त्राच्या दृष्टीनें या प्रकरणाचा विचार करून त्यांत अवश्य तितकी आधुनिक शास्त्रीय ज्ञानाची नवीन भर घातली तर, वैदिक ऋषींच्या संशोधनावर प्रकाश पडून श्रुतींतील हें विवेचन अधिक मनोरंजक व सुबोध होईल यांत शंका नाहीं. इतक्या प्राचीनकाळीं, आधुनिक शास्त्रीय उपकरणांच्या अभावीं, वैदिक

ऋषींनीं हीं तत्त्वें बिनचूक कशीं हुडकून काढलीं असतील याविषयीं कोणालाही आश्चर्यच वाटेल.

शरीरांतील तेजोमय तत्त्वानेंच मनुष्याची वाक्शक्ति प्रगट होते. जलांतून मनुष्याला प्राणवायु मिळतो. पाण्यांतील ऑक्सिजनचा आधुनिकांनीं चांगला शोध केला आहे. त्या ऑक्सिजनची कल्पना पांच हजार वर्षांपूर्वींच्या वैदिक ऋषींना आली होती. जलांतील प्राणतत्त्वाचा शोध करून त्याचा शरीरांतील प्राणशक्तीशीं असलेला संबंध त्यांनीं बरोबर हुडकून काढला आहे. त्याप्रमाणेंच स्निग्ध व सरस अशा अन्नापासूनच मानसिक शक्ति प्रगट होते असें सांगितलें आहे. ह्यावरून कसें तरी जिवंत राहण्यापुरतें अन्न खावयाचें हेंच खरें वैराग्य होय, असली अव्यवस्थित व अशास्त्रीय संन्यासमार्गी कल्पना वैदिक ऋषींना मुळींच अभिप्रेत नव्हती हें उघड दिसतें. मानसिक सामर्थ्य नेहमीं सतेज राहील असें सात्विक अन्न खाणें हेंच खरें वैराग्य होय, असा वैदिक ऋषींचा अभिप्राय आहे. मन, प्राण व वाणी हीं आत्म्याचीं अन्नेंच होत असें बृहदारण्यकाच्या पहिल्या अध्यायांतील पांचव्या ब्राह्मणांत या तीन तत्त्वाचें श्रुतीनें सविस्तर विवेचन केलें आहे.

---

## अथ षष्ठः खण्डः ।

**दध्नः सोम्य मथ्यमानस्य योऽणिमा स उर्ध्वः समुदीषति तत्सर्पिर्भवति ॥ १ ॥**

**सोम्य मथ्यमानस्य दध्नः यः अणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति । तत् सर्पिः भवति ।**

वत्सा ! घुसळल्या जाणाऱ्या दह्याचा जो सूक्ष्म सत्त्वांश असतो तो वर येऊं लागतो, तें सर्पि म्हणजे घृत असतें.

**एवमेव खलु सोम्यान्नस्याद्यमानस्य योऽणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति तन्मनो भवति ॥ २ ॥**

सोम्य एवम् एव खलु अश्यमानस्य अन्नस्य यः अणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति । तत् मनः भवति ।

वत्सा, त्याप्रमाणेंच भक्षण केल्या जाणाऱ्या अन्नाचा जो सूक्ष्म सत्त्वांश असतो तो वर येतो. तेंच मन होय.

**अपाꣳ सोम्य पीयमानानां योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति स प्राणो भवति ॥ ३ ॥**

सोम्य पीयमानानाम् अपाम् यः अणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति । सः प्राणः भवति ।

वत्सा ! प्राशन केल्या जाणाऱ्या पाण्याचा जो सूक्ष्म सत्त्वांश असतो तो वर येतो. तोच प्राण होय.

**तेजसः सोम्याश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति सा वाग्भवति ॥ ४ ॥**

सोम्य अश्यमानस्य तेजसः यः अणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति । सा वाक् भवति ।

वत्सा ! भक्षण केलेल्या तेजाचा ( तेल, तूप वगैरे स्निग्ध अन्नाचा ) जो सूक्ष्म अंश असतो तो वर येतो. तीच वाणी होय.

**अन्नमयꣳ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ५ ॥**

सोम्य हि मनः अन्नमयम् । प्राणः आपोमयः । वाक् तेजोमयी इति भगवान् मा भूयः एव विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।

म्हणून वत्सा, मन हें अन्नाचें परिणत रूप आहे; प्राण हें जलाचें परिणत रूप आहे; व वाणी हें तेजाचें परिणत रूप आहे ( असें आरुणि म्हणाला ). ( श्वेतकेतु म्हणाला. ) हे भगवन् मला आणखी बोध करा. वत्सा ! होय असें आरुणि म्हणाला.

## सहाव्या खंडाचा सारांश

प्रस्तुत खण्डांत मन, प्राण व वाणी यांची उत्पत्ति कशी होते हें दर्शविण्याकरितां दधिमंथनाचा दृष्टांत दिला आहे तो फारच मार्मिक आहे. त्यावरून मनुष्याच्या शरीरामध्यें प्राणशक्तीच्या योगानें निरनिराळ्या रस-धातूंचे घुसळल्याप्रमाणें एकसारखे व्यापार चालू असतात, ही गोष्ट वैदिक ऋषींनीं निश्चित केली होती असें उघड दिसून येतें. शुद्ध पाण्यापासूनच मनुष्याच्या प्राणशक्तीचें संवर्धन होतें आणि स्निग्ध अन्नाच्या योगानें वाणी सामर्थ्यसंपन्न होते. हीं तत्त्वें ज्यांच्या लक्षांत आलीं ते ज्ञानी पुरुष देखील मन वाणी व प्राण यांचा ऱ्हास होईल असे कोणतेही आचार जनतेला, किंबहुना साधकाला देखील, सांगणार नाहींत. कारण या तीनही शक्तींची सामान्य मनुष्याप्रमाणेंच मुमुक्षु साधकाला देखील अत्यंत आवश्यकता असते. ज्या आचारांपासून ( मग ते चैनीचे असोत किंवा वैराग्यवृत्तीचे असोत ) मन वाणी व प्राण या शक्ति क्षीण होतील ते त्याज्यच होत, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. मन वाणी व प्राण हीं ज्या ज्या घटकद्रव्यांचीं कार्यरूपें आहेत त्या घटकद्रव्यांच्या दृष्टीनें त्यांचा विचार करावयास पाहिजे. या अभिप्रायानेंच मन, प्राण व वाणी अनुक्रमें अन्नमय, जलमय व तेजोमय असल्याचें सांगितलें आहे. ज्याप्रमाणें मन हें अन्नापासून उत्पन्न होतें म्हणून तें अन्नमय, त्याप्रमाणेंच सत्तत्त्वापासून ( ब्रह्मतत्त्वापासून ) उत्पन्न होणारी सृष्टि देखील ब्रह्मरूपच आहे असें ठरतें.

### अथ सप्तमः खण्डः ।

**षोडशकलः सोम्य पुरुषः पञ्चदशाहानि माशीः काममपः पिबापोमयः प्राणो न पिबतो विच्छेत्स्यत इति ॥ १ ॥**

**सोम्य अयम् पुरुषः षोडशकलः ( अस्ति )। ( त्वम् ) पञ्चदश अहानि मा अशीः अपः कामम् पिब । अपः पिबतः ते प्राणः न विच्छेत्स्यते इति प्राणः आपोमयः ।**

वत्सा ! हा जीव सोळा कलांचा [ अंशांचा ] आहे. तूं पंधरा दिवस अन्न खाऊं नको, पाणी मात्र यथेच्छ पी. पाणी पिणाऱ्या तुझा प्राण नष्ट होणार नाहीं; कारण प्राण हा जलमय आहे.

**स ह पञ्चदशाहानि नाशाथ हैनमुपससाद किं ब्रवीमि भो इत्यृचः सोम्य यजूꣳषि सामानीति स होवाच न वै मा प्रतिभान्ति भो इति ॥ २ ॥**

**सः पञ्चदश अहानि न आश ह । अथ एनम् उपससाद । भोः किम् ब्रवीमि इति । सोम्य ऋचः यजूंषि सामानि ( ब्रूहि इति सः अब्रवीत् )। भोः मा न प्रतिभान्ति इति सः उवाच ह ।**

त्या श्वेतकेतूनें पंधरा दिवस कांहीं खाल्लें नाहीं. नंतर तो आरुणीकडे गेला आणि ' मी काय म्हणूं ? ' असें तो म्हणाला. तेव्हां आरुणि म्हणाला कीं, वेदांतील छन्दोबद्ध मंत्र किंवा गद्यें अगर सामगायन म्हण. महाराज ! मला तें कांहींच सुचत नाहीं [ म्हणतां येत नाहीं ], असें श्वेतकेतु म्हणाला.

**तꣳ होवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकोऽङ्गारः खद्योतमात्रः परिशिष्टः स्यात्तेन ततोऽपि न बहु दहेदेवꣳ सोम्य ते षोडशानां कलानामेका कलातिशिष्टा स्यात्तयैतर्हि वेदान्नानुभवस्यशानाथ मे विज्ञास्यसीति ॥ ३ ॥**

**तम् उवाच ह । सोम्य यथा अभ्याहितस्य महतः ( अग्नेः ) एकः खद्योतमात्रः अङ्गारः परिशिष्टः स्यात् । तेन ततः अपि बहु न दहेत् । एवम् सोम्य ते षोडशानाम् कलानाम् एका कला अतिशिष्टा स्यात् । तया एतर्हि वेदान् न अनुभवसि । अथ अशान मे विज्ञास्यसि इति ।**

आरुणि त्याला म्हणाला:—वत्सा ! ज्याप्रमाणें तयार केलेल्या प्रदीप्त केलेल्या ) मोठ्या अग्नीचा काजव्याएवढा बारीक निखारा शिल्लक राहतो व तो लहान असल्यामुळें त्याच्यापेक्षां मोठ्या

पदार्थाला जाळूं शकत नाहीं त्याप्रमाणें, हे वत्सा ! तुझ्या सोळा कलांपैकीं एकच कला अवशिष्ट राहिली आहे, म्हणून त्या एका कलेनें तुला वेद म्हणवत नाहीं. आतां अन्न भक्षण कर म्हणजे माझें म्हणणें तुला समजून येईल.

**स हाशाथ हैनमुपससाद तꣳ ह यत्किं च पप्रच्छ सर्वꣳ ह प्रतिपेदे ॥ ४ ॥**

अथ सः आश ह। एनम् उपससाद ह। यत् किम् च तम् पप्रच्छ सर्वम् प्रतिपेदे ह।

नंतर त्यानें भोजन केलें व तो पित्याकडे आला. ( तेव्हां ) पित्यानें त्याला जें कांहीं विचारलें तें सर्व त्यानें करून दाखविलें.

**तꣳ होवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकमङ्गारं खद्योतमात्रं परिशिष्टं तं तृणैरुपसमाधाय प्राज्वलयेत्तेन ततोऽपि बहु दहेत् ॥ ५ ॥**

तम् उवाच ह। सोम्य यथा अभ्याहितस्य महत ( अग्नेः ) परिशिष्टम् एकम् खद्योतमात्रम् तम् अङ्गारम् तृणैः उपसमाधाय प्राज्वलयेत् तेन ततः अपि बहु दहेत्।

आरुणि त्याला म्हणाला:—वत्सा ! ज्याप्रमाणें तयार केलेल्या मोठ्या अग्नीचा अवशिष्ट राहिलेला एक काजव्याएवढा लहानसा निखारा शुष्क गवत घालून प्रज्वलित करावा, म्हणजे तो आपल्याहून मोठ्या पदार्थालाही जाळतो;

**एवꣳ सोम्य ते षोडशानां कलानामेका कलातिशिष्टाभूत्साऽन्नेनोपसमाहिता प्राज्वाली तयैतर्हि वेदाननुभवस्यन्नमयꣳ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ६ ॥**

**सोम्य एवम् ते षोडशानाम् कलानाम् एका कला अतिशिष्टा अभूत् । सा अन्नेन उपसमाहिता प्राज्वाली । एतर्हि तया वेदान् अनुभवसि । सोम्य हि मनः अन्नमयम् । प्राणः आपोमयः । वाक् तेजोमयी इति । अस्य तत् विजज्ञौ ह इति ।**

वत्सा ! ह्याप्रमाणें तुझ्या सोळा अंशांपैकीं एक अंश अवशिष्ट राहिला होता; तो अंश अन्नाच्या योगानें संयुक्त हाऊन प्रदीप्त झाला, म्हणून तूं वेदपठणास आतां समर्थ होत आहेस. वत्सा ! म्हणूनच मन हें अन्नमय, प्राण आपोमय आणि वाणी ही तेजोमय आहे, असें सिद्ध होतें. याप्रमाणें हा ( या अध्यायाच्या दुसऱ्या खंडांतील पहिल्या मंत्रापासून येथपर्यंत आरुणि ऋषीचा ज्ञानविज्ञानविषयक ) उपदेश श्वेतकेतूला चांगला समजला. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे ).

पित्याच्या सांगण्याप्रमाणें श्वेतकेतु पंधरा दिवस केवळ पाण्यावरच राहिला. त्यामुळें तो इतका क्षीण झाला कीं, त्याला कांहीं सुचेना व कांहीं म्हणतांही येईना. तेव्हां पिता म्हणाला, वत्सा ! मनुष्याच्या शरीरांत सोळा कला असतात. त्यांपैकीं एक जीवनकला तेवढी जलप्राशनाच्या योगानें तुझ्या ठिकाणीं कायम राहिली असून, तुझ्यांतील बाकीच्या पंधरा कला नष्टप्राय झाल्या आहेत. त्यामुळें तुझी अशी स्थिति झाली आहे. ज्याप्रमाणें अग्नीच्या लहानशा ठिणगींत फारशी दाहकशक्ति नसते, पण ती तृणादिकांनीं प्रज्वलित केली असतां तिची दाहकशक्ति वाढते, त्याप्रमाणेंच अन्न भक्षण केल्यानें तुझी वाक्शक्ति व मनःशक्ति प्रगट झाली आहे. यावरून अन्न हेंच वाणी व मन यांचें घटकद्रव्य आहे असें ठरतें. म्हणूनच तेज, पाणी व अन्न या तत्त्वांच्या दृष्टीनें वाणी, प्राण व मन यांचा विचार करावयास पाहिजे. पित्याच्या या सप्रयोग उपदेशानें श्वेतकेतूला पूर्णपणें समजलें कीं, पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टींत परस्परविरुद्ध असे नाना

पदार्थ दिसत असले तरी, ते सर्व एकाच मूळ सत्तत्त्वापासून बनलेले असल्यामुळें, सर्व पदार्थ तत्त्वतः सत्स्वरूपच आहेत.

---

## अथाष्टमः खण्डः।

**उद्दालको हारुणिः श्वेतकेतुं पुत्रमुवाच स्वप्नान्तं मे सोम्य विजानीहीति यत्रैतत्पुरुषः स्वपिति नाम सता सोम्य तदा संपन्नो भवति स्वमपीतो भवति तस्मादेनᳪ स्वपितीत्याचक्षते स्वᳪ ह्यपीतो भवति ॥ १ ॥**

**आरुणिः उद्दालकः श्वेतकेतुम् पुत्रम् उवाच ह। सोम्य मे स्वप्नान्तम् विजानीहि इति। सोम्य यत्र एतत्पुरुषः स्वपिति नाम तदा सता संपन्नः भवति। स्वम् अपीतः भवति। तस्मात् एनम् स्वपिति इति आचक्षते। हि स्वम् अपीतः भवति।**

अरुण वंशांतील उद्दालक ऋषि आपल्या श्वेतकेतु नांवाच्या पुत्राला म्हणालाः—वत्सा! माझ्यापासून निद्रा समजून घे. वत्सा, जेव्हां हा जीव झोंपीं जातो तेव्हां तो मूळ सत्तत्त्वाच्या स्वरूपाशीं संयुक्त होतो. म्हणजेच स्वतःच्या मूळस्वरूपाला प्राप्त होतो. म्हणून त्याला स्वपिति असें म्हणतात. कारण तो स्वतःच्या मूळस्वरूपाला प्राप्त झालेला असतो.

सत्तत्त्व हेंच सृष्टीचें मूळ स्वरूप होय असें श्वेतकेतूला समजलें. त्यानंतर त्याचा पिता उद्दालक आरुणि मानवी जीवितांतील सत्तत्त्वाचा त्याला उपदेश करीत आहे. सुषुप्तीमध्यें जीवात्मा या सत्स्वरूपालाच प्राप्त होतो; 'स्व' शब्दानें हें सत्तत्त्वच विवक्षित असतें; म्हणून झोंपीं गेलेल्या जीवाला 'स्वपिति' असें म्हणतात. पाणिनि ऋषीनें झोंप घेणें या अर्थी स्वप् हा धातु दिला आहे. या धातूपासूनच स्वपिति असें संस्कृत क्रियापदाचें रूप तयार होतें; परंतु श्रुतीनें स्वपिति या शब्दाची व्युत्पत्ति येथें निराळयाच

रीतीनें दिली आहे. स्व+अपि+इ या अवयवांनीं स्वपिति हें रूप बनलें आहे असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

**स यथा शकुनिः सूत्रेण प्रबद्धो दिशं दिशं पतित्वान्यत्रायतनमलब्ध्वा बन्धनमेवोपश्रयत एवमेव खलु सोम्य तन्मनो दिशं दिशं पतित्वान्यत्रायतनमलब्ध्वा प्राणमेवोपश्रयते प्राणबन्धनꣳ हि सोम्य मन इति ॥ २ ॥**

**यथा सूत्रेण प्रबद्धः सः शकुनिः दिशम् दिशम् पतित्वा अन्यत्र आयतनम् अलब्ध्वा बन्धनम् एव उपश्रयते एवम् एव खलु सोम्य तत् मनः दिशम् दिशम् पतित्वा अन्यत्र आयतनम् अलब्ध्वा प्राणम् एव उपश्रयते । हि सोम्य मनः प्राणबन्धनम् ( अस्ति )।**

ज्याप्रमाणें दोऱ्यानें बांधलेला एखादा पक्षी सर्व दिशांकडे उड्डाण करून, दुसरीकडे स्थान न मिळाल्यामुळें, बंधनाचाच आश्रय करितो, त्याप्रमाणेंच, हे वत्सा ! तें मन सर्व दिशांकडे जाऊन, कोठेंहि आश्रयस्थान न मिळाल्यामुळें, प्राणाचाच आश्रय करितें. म्हणून, हे वत्सा, प्राणशक्ति हेंच मनाचें बंधन ( आधार ) आहे.

**अशनापिपासे मे सोम्य विजानीहीति यत्रैतत्पुरुषोऽशिशिषति नामाप एव तदशितं नयन्ते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तदप आचक्षतेऽशनायेति तत्रैतच्छुङ्गमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥ ३ ॥**

**सोम्य मे अशनापिपासे विजानीहि इति । यत्र एतत् पुरुषः अशिशिषति नाम आपः एव तत् अशितम् नयन्ते । यथा गोनायः अश्वनायः पुरुषनायः इति एवम् अशनाया इति तत् अपः आचक्षते । तत्र एतत् शुङ्गम् उत्पतितम् । सोम्य इदम् अमूलम् न भविष्यति इति विजानीहि ।**

वत्सा ! माझ्यापासून क्षुधा आणि तृषा ( हे विकार ) समजून घे. ज्या वेळीं हा जीव खाऊं इच्छितो ( म्हणजे त्याला क्षुधा

लागते ) तेव्हां भक्षण केलेलें अन्न जलच नेतें (आत्मसात् करितें). ज्याप्रमाणें गोनाय ( गाई नेणारा ), अश्वनाय ( घोडे नेणारा ) किंवा पुरुषनाय ( मनुष्यें नेणारा ) हे शब्द आहेत तसाच अशनाया ( खालेलें अन्न नेणारा ) हा शब्द आहे. यालाच आप असें म्हणतात. या ठिकाणीं हें ज्ञापक वर दिसणारें आहे. ( म्हणजे त्याविषयीं ही स्पष्ट दिसून येणारी खूण आहे. ) वत्सा ! हें ज्ञापक कारणरहित असणार नाहीं असें समज.

प्रस्तुत मंत्रांत अशनाया शब्दाचें स्पष्टीकरण केलें आहे; आणि त्या स्पष्टीकरणास गायी, घोडे व मनुष्यें यांच्या नेत्यांचे दृष्टांत दिले आहेत. गोनाय, अश्वनाय व पुरुषनाय हे शब्द छांदोग्याचे वेळीं भाषेंत चांगलेच रूढ होते असें दिसतें. गायी वळविणारा म्हणजेच गोनाय होय.असाच इतर दोन शब्दांचा अर्थ समजावा. पाणी हेंच भोजनाचें सूत्रचालक आहे, असें अशनाया या शब्दांतून श्रुतीनें तात्पर्य काढलें आहे. शुङ्ग या शब्दाचा अर्थ खूण किंवा ज्ञापक असाच होतो. मात्र हा शब्द उत्तरकालीन संस्कृत भाषेंत फारसा आढळून येत नाहीं.

**तस्य क्व मूलꣳ स्यादन्यत्रान्नादेवमेव खलु सोम्यान्नेन शुङ्गेनापो मूलमन्विच्छाद्भिः सोम्य शुङ्गेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ॥ ४ ॥**

**अन्नात् अन्यत्र क्व तस्य मूलम् स्यात्। सोम्य एवम् एव खलु अन्नेन शुङ्गेन आपः मूलम् अन्विच्छ। सोम्य अद्भिः शुङ्गेन तेजः मूलम् अन्विच्छ। सोम्य तेजसा शुङ्गेन सत् मूलम् अन्विच्छ। सोम्य इमाः सर्वाः प्रजाः सन्मूलाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ( सन्ति )।**

अन्नावांचून इतर कोणत्या ठिकाणीं त्याचें मूळ ( मूलकारण ) असणार ? वत्सा ! त्याचप्रमाणें अन्न ह्या कार्यावरून (खुणेवरून)

जल हें मूलकारण आहे असें ओळखून काढ. वत्सा ! जल कार्यावरून तेज या मूलकारणाचा शोध घे. वत्सा ! तेज या कार्यावरून सत् म्हणजे ब्रह्मतत्त्व हें मूलकारण ओळख. वत्सा ! ब्रह्म हें ज्यांचें मूलकारण आहे, सत् हेंच ज्यांचें आयतन म्हणजे आश्रयस्थान आहे व तें ब्रह्मतत्त्वच ज्यांचा आधार आहे अशा ह्या सर्व प्रजा आहेत.

पिंडब्रह्मांडात्मक सृष्टीवरून सत्तत्त्वाचें संशोधन कसें करावें याची रीति अत्यंत साधी पण समर्पक अशी या मंत्रांत दाखविली आहे. अन्नावरून म्हणजे ओषधि वनस्पति इत्यादि पदार्थांवरून त्याचें मूलतत्त्व जें जल त्याचें संशोधन करितां येतें. जलावरून तेजाचें संशोधन करितां येतें. याच क्रमानें सर्वांचें मूळ जें सत्तत्त्व त्याचें संशोधन करितां येईल. आणि अशा संशोधन-पद्धतीनें मूलभूत सत्तत्त्वाचें ज्ञान झाल्यावर, हे सर्व प्राणी–पदार्थ सत्तत्त्वा-पासूनच उत्पन्न झाले असून त्यावरच अवलंबून राहिले आहेत असें पूर्ण ज्ञान होतें.

**अथ यत्रैतत्पुरुषः पिपासति नाम तेज एव तत्पीतं नयते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तत्तेज आचष्ट उदन्येति तत्रैतदेव शुङ्गमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भवि-ष्यतीति ॥ ५ ॥**

**अथ यत्र एतत् पुरुषः पिपासति नाम तेजः एव तत् पीतम् नयते । यथा गोनायः अश्वनायः पुरुषनायः इति । एवम् तत् तेजः उदन्यम् इति आचष्टे । तत्र एतत् एव उत्पतितम् शुङ्गम् । सोम्य न इदम् अमूलम् भविष्यति इति विजानीहि ।**

आतां जेव्हां ह्या प्राण्याला तहान लागते तेव्हां त्याचा अर्थ इतकाच कीं, पूर्वीं प्यालेलें पाणी शरीरांतील तेज नेतें ( म्हणजे आत्मसात् करितें ). ज्याप्रमाणें गोनाय, अश्वनाय, पुरुषनाय, हे

शब्द आहेत त्याप्रमाणेंच नेणारें म्हणून उदन्य हा शब्द तेजाचा वाचक आहे. तेथें उत्पन्न झालेलें हें शुङ्ग म्हणजे बाह्य चिन्ह आहे. वत्सा ! हें बाह्य चिन्ह कारणाशिवाय असणार नाहीं हें समज.

**तस्य क्व मूलꣳ स्यादन्यत्राद्भ्योऽद्भिः सोम्य शुङ्गेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठा यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तदुक्तं पुरस्तादेव भवत्यस्य सोम्य पुरुषस्य प्रयतो वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायाम् ॥ ६ ॥**

**अद्भ्यः अन्यत्र क्व तस्य मूलम् स्यात् । सोम्य अद्भिः शुङ्गेन तेजः मूलम् अन्विच्छ । सोम्य तेजसा शुङ्गेन सत् मूलम् अन्विच्छ । सोम्य इमाः सर्वाः प्रजाः सन्मूलाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः । सोम्य यथा नु खलु इमाः तिस्रः देवताः पुरुषम् प्राप्य एका एका त्रिवृत् त्रिवृत् भवति तत् पुरस्तात् उक्तम् भवति एव । सोम्य अस्य प्रयतः पुरुषस्य वाक् मनसि मनः प्राणे प्राणः तेजसि तेजः परस्याम् देवतायाम् संपद्यते ।**

अन्नावांचून इतर कोणत्या ठिकाणीं त्याचें मूळ ( मूलकारण) असणार ? वत्सा ! त्याचप्रमाणें अन्न ह्या कार्यावरून ( खुणेवरून) जल हें मूल कारण आहे असें ओळखून काढ. वत्सा ! जल या कार्यावरून तेज या मूळ कारणाचा शोध घे. वत्सा ! तेज या कार्यावरून सत– ब्रह्मतत्त्व हें मूळ कारण ओळख. वत्सा ! ब्रह्म हें ज्यांचें मूळ कारण आहे व तें सत् हेंच ज्यांचें आयतन म्हणजे स्थान आहे, तें ब्रह्मतत्त्वच ज्यांचा आधार आहे, अशा या सर्व प्रजा आहेत. वत्सा, खरोखर या तीन देवता ( तेज, पाणी व अन्न हीं द्रव्यें ) प्राण्यांमध्यें प्राप्त होऊन एकेक

इतर दोहोंशीं कशीं मिश्र होतात, तें मागें सांगितलेंच आहे. वत्सा, या मृत्यु पावणाऱ्या मनुष्याची वाक्शक्ति मनामध्यें लीन होते; मन प्राणामध्यें लीन होऊन जातें; प्राण तेजांत समाविष्ट होतो; व तेज त्या परम देवतेमध्यें म्हणजे ब्रह्मतत्त्वामध्यें विरून जातें.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ७ ॥**

**यः एषः सः अणिमा । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । तत् सत्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् असि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।**

त्या तीनही देवता ज्या तत्त्वापासून उत्पन्न झाल्या तो हा सत्स्वरूप आत्मा अणिमा म्हणजे अत्यंत सूक्ष्म—अव्यक्त असून हा आत्मा ज्याचें मूळकारण आहे असें हें सर्व जग आहे व तेंच आत्मतत्त्व तूंही आहेस. म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विकदृष्ट्या आत्मरूप किंवा सत्स्वरूप आहे, त्याप्रमाणें हे श्वेतकेतो ! तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहेस ( असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला. ) श्वेतकेतु म्हणातोः—हे भगवन् पुनरपि मला आपण बोध करा. हे वत्सा ! ठीक आहे असें आरुणि त्याला म्हणाला.

सहाव्या मंत्राच्या उत्तरार्धांत वाणी मनांत लीन होते, मन प्राणामध्यें व प्राण सत्स्वरूप परमदेवतेमध्यें लीन होतो, असें म्हटलें आहे. याचा भावार्थ असा कीं, वाणीला मनाचा आधार असतो, मनाला प्राणाचा, व प्राणाला आत्मतत्त्वाचा आधार असतो. जलतत्त्व हे जरी प्राणाचें मूळ कारण असलें तरी, मनुष्याच्या जीवनव्यापारांत त्याचे आधाराधेयभाव-

संबंध किंचित् वेगळ्या प्रकारचे असतात ही एक महत्त्वाची गोष्ट श्रुतीनें येथें नमूद करून ठेविली आहे.

सातव्या मंत्रांत मूल सत्तत्त्व या अर्थानेंच आत्मा या शब्दाचा उल्लेख केला आहे. आत्मा हेंच सर्व सृष्टीचें मूळ कारण असल्यानें, सृष्टि आत्मरूप आहे असें ठरतें. त्याप्रमाणेंच व्यक्तीचा जीव हा देखील शुद्ध आत्मस्वरूपच होय, असें सांगितलें आहे. सहाव्या मंत्राच्या उत्तरार्धात जो लयाचा क्रम सांगितला आहे, तो किंचित् निराळ्या अर्थानें समजावयास पाहिजे. वाणीचा मनामध्यें लय होतो असें मोघम म्हटलें असतां, मन हेंच वाणीचें घटक-कारण आहे कीं काय, अशी शंका येते. कारण कार्याचा लय नेहमीं त्याच्या घटकावयवांमध्यें ( मूळ प्रकृतीमध्यें ) होतो, असा नियम आहे. मन हें वाणीचें घटककारण नव्हे. मग श्रुतीनें वाणीचा मनामध्यें लय होतो असें कसें सांगितलें ? या प्रश्नाचें उत्तर असें कीं, मन हें वाणीचें नियामक किंवा चालक आहे. वाणीचे सर्व व्यापार मनाच्या तंत्रानेंच चालतात. म्हणून वाणीच्या सर्व वृत्ति–व्यापार मनामध्यें लीन होतात असा त्याचा अर्थ समजावा. भाष्यकार श्रीमत्शंकराचार्यांनीं ब्रह्मसूत्रांत या विषयाचें सविस्तर स्पष्टीकरण केलें आहे ( ब्र. सू. अ. ४ पाद २ सू. १ ते ४ ). परंतु उपनिषदावरील शांकरभाष्यांत तसा स्पष्ट खुलासा नाहीं.

सर्व सृष्टि सत्स्वरूप आहे असें सांगितल्यावर सृष्टीमध्यें व्यापून असलेलें जें सत्तत्त्व तेंच तूं आहेस असें पित्यानें श्वेतकेतूला म्हटलें आहे. महावाक्य म्हणून प्रसिद्ध असलेलें ‘ तत्त्वमसि ’ हें तेंच वाक्य होय.

---

## अथ नवमः खण्डः ।

**यथा सोम्य मधु मधुकृतो निस्तिष्ठन्ति नानात्ययानां वृक्षाणाꣳ रसान्समवहारमेकताꣳ रसं गमयन्ति ॥ १ ॥**

**सोम्य यथा मधुकृतः नानात्ययानाम् वृक्षाणाम् मधु निस्तिष्ठन्ति । रसान् समवहारम् एकताम् रसम् गमयन्ति ।**

वत्सा ! ज्याप्रमाणें भ्रमर अनेक जातींच्या वृक्षांचा मध काढतात म्हणजे त्या सर्व प्रकारच्या रसांना समुच्चयानें एक रस या स्वरूपाप्रत पोंचवितात, म्हणजे त्यांचा एक रस बनवितात. ( अत्यय म्हणजे वर्ग किंवा जाति असा अर्थ कोशकारांनीं दिला आहे. )

**ते यथा तत्र न विवेकं लभन्तेऽमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्म्यमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्मीत्येवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः संपद्य न विदुः सति संपद्यामह इति ॥ २ ॥**

**यथा ते तत्र अहम् अमुष्य वृक्षस्य रसः अस्मि अहम् अमुष्य वृक्षस्य रसः अस्मि इति विवेकम् न लभन्ते । एवम् एव खलु सोम्य इमाः सर्वाः प्रजाः ( सति ) संपद्य सति संपद्यामहे इति न विदुः ।**

ज्याप्रमाणें त्या रसांना त्या मधामध्यें मी अमक्या वृक्षाचा रस आहे मी अमुक वृक्षाचा रस आहे, अशी निवड ( त्यांना अगर दुसऱ्यालाहि ) करितां येत नाहीं, त्याप्रमाणेंच, वत्सा ! हे सर्व प्राणी त्या सत्स्वरूपांत मिळून गेल्यावर, आम्ही पूर्वी वेगवेगळे असून आतां सत्स्वरूपांत मिळून गेलों आहों अशी संवेदना त्यांना रहात नाहीं. म्हणजे 'मी' या वैयक्तिक भावनेला अस्तित्व उरत नाहीं.

**त इह व्याघ्रो वा सिꣳहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतङ्गो वा दꣳशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥ ३ ॥**

**ते इह व्याघ्रः वा सिंहः वा वृकः वा वराहः वा कीटः वा पतङ्गः वा दंशः वा मशकः वा यत् यत् भवन्ति तत् आभवन्ति ।**

( मागील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें सत्तत्त्वापर्यंत गेलेले जीव ज्ञानशून्य असतील तर ) ते या जन्मीं वाघ, सिंह, लांडगा, डुकर, किडा, पतंग डांस किंवा मधमाशी अशा ज्या ज्या देहामध्यें असतात तेच पुनः होतात ( तेच जन्म पावतात ).

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ४ ॥**

यः एषः सः आणिमा । इदम् सवम् ऐतदात्म्यम्। तत् सत्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् आसि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।

तो हा सत्स्वरूप आत्मा अत्यंत सूक्ष्म आहे. हा आत्मा ज्याचें मूलकारण आहे असें हें सर्व जग आहे. तेंच आत्मतत्त्व तूंहि आहेस. ( म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्टया आत्मस्वरूप किंवा सत्स्वरूप आहे त्याप्रमाणें, हे श्वेतकेतो ! तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहेस ( असे आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला ). श्वेतकेतु म्हणाला कीं, हे भगवन् ! पुनरपि मला आपण बोध करा हे वत्सा ! ठीक आहे, असें आरुणि त्याला म्हणाला.

गाढ सुषुप्तीमध्यें जीवात्मा प्राज्ञस्वरूपाला प्राप्त होतो, असें बृहदारण्यकांतील चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या ब्राह्मणांत सविस्तर सांगितलें आहे. प्राज्ञ व सत् यांचें स्वरूप एकच आहे. म्हणून छान्दोग्याच्या भाषेनें गाढ सुषुप्तींत जीवात्मा सत्स्वरूपाला प्राप्त होतो असें म्हणतां येतें. नानाविध रसांच्या बनलेल्या मधांतील कोणता बिंदु कोणत्या वृक्षाच्या रसाचा आहे हें जसें सांगतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच सत्तत्त्वाशीं एकरूप झालेल्या जीवात्म्यांची, मी अमुक व्यक्ति आहे अशाविषयींची कल्पना नष्ट झालेली असते. मग तो व्याघ्रसिंहासारखा पशु असो किंवा किडामुंगीसारखा क्षुद्र प्राणी असो. सर्व प्राण्यांचा जीव या सताला़च जाऊन मिळतो. म्हणून सर्व जीवांचें सत् हेंच मूळस्वरूप होय व तूं देखील सत्स्वरूपच आहेस असा श्वेतकेतूला महावाक्याचा पुनः उपदेश या खंडाच्या चवथ्या मंत्रांत केला आहे.

## अथ दशमः खण्डः ।

**इमाः सोम्य नद्यः पुरस्तात्प्राच्यः स्यन्दन्ते पश्चात्प्रतीच्यस्ताः समुद्रात्समुद्रमेवापियन्ति स समुद्र एव भवति ता यथा तत्र न विदुरियमहमस्मीयमहमस्मीति ॥ १ ॥**

सोम्य इमाः प्राच्यः नद्यः पुरस्तात् स्यन्दन्ते । प्रतीच्यः पश्चात् । ताः समुद्रात् समुद्रम् एव अपियन्ति । सः समुद्रः एव भवन्ति । यथा तत्र ताः इयम् अहम् अस्मि इयम् अहम् अस्मि इति न विदुः ।

वत्सा ! या पूर्ववाहिनी नद्या पूर्वेकडे वहात जातात आणि पश्चिमवाहिनी नद्या पश्चिमेकडे वाहतात. त्या समुद्रांतूनच उत्पन्न झालेल्या असून समुद्रालाच जाऊन मिळतात. व त्या समुद्ररूपच होतात. ह्याप्रमाणें समुद्ररूप झाल्यावर त्यांच्या ठिकाणीं ही मी आहे, ही मी आहे अशी वैयक्तिक जाणीव उरत नाहीं.

**एवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सत आगम्य न विदुः सत आगच्छामह इति त इह व्याघ्रो वा सिꣳहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतङ्गो वा दꣳशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥ २ ॥**

सोम्य एवम् एव खलु इमाः सर्वाः प्रजाः सतः आगम्य सतः आगच्छामहे इति न विदु । इह व्याघ्रः वा सिंहः वा वृकः वा वराहः वा कीटः वा पतङ्गः वा दंशः वा मशकः वा यत् यत् भवन्ति तत् आभवन्ति ।

वत्सा ! त्याचप्रमाणें हे सर्व जीव सत्तत्त्वापासून झाले असून आपण सत्तत्त्वापासून आलों आहों असें जाणत नाहींत. या जन्मीं वाघ, सिंह, लांडगा, डुकर, किडा, पतंग, डांस किंवा माशी अशा ज्या ज्या देहामध्यें असतात तेच पुनः होतात.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

यः एषः सः अणिमा । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । तत् सत्यम् सः आत्मा। श्वेतकेतो तत् त्वम् असि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति। सोम्य तथा इति उवाच ह ।

तो हा सत्स्वरूप आत्मा अणिमा म्हणजे अत्यंत सूक्ष्म-- अव्यक्त असून, हा आत्मा ज्याचें मूळ कारण आहे असें हें सर्व जग आहे. तें आत्मतत्त्व तूंही आहेस. म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्ट्या आत्मस्वरूप किंवा सत्स्वरूप आहे त्याप्रमाणें, हे श्वेतकेतो ! तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहेस ( असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला ). श्वेतकेतु म्हणाला कीं, हे भगवन्, पुनरपि मला आपण बोध करा. हे वत्सा ! ठीक आहे असें आरुणि त्याला म्हणाला.

मागील खंडांतील भ्रमराच्या दृष्टांताप्रमाणेंच या खंडांतील पहिल्या मंत्रांत नद्यांचा दृष्टांत दिला आहे. दुसऱ्या मंत्रांत जीवाची प्राज्ञस्थिति वर्णन करून, शेवटच्या तिसऱ्या मंत्रांत महावाक्याचा उपदेश केला आहे.

---

## अथैकादशः खण्डः ।

**अस्य सोम्य महतो वृक्षस्य यो मूलेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेद्यो मध्येऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेद्योऽग्रेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेत्स एष जीवेनात्मनानुप्रभूतः पेपीयमानो मोदमानस्तिष्ठति ॥ १ ॥**

सोम्य अस्य महतः वृक्षस्य मूले यः अभ्याहन्यात् जीवन् स्रवेत् । यः मध्ये अभ्याहन्यात् जीवन् स्रवेत् । यः अग्रे अभ्याहन्यात् जीवन् स्रवेत् । सः एषः जीवन् आत्मना अनुप्रभूतः पेपीयमानः मोदमानः तिष्ठति ।

वत्सा ! ह्या मोठ्या वृक्षाच्या मुळावर जो ( कोणी ) प्रहार करील तर, तो वृक्ष जिवंत राहून त्यांतून रस मात्र वाहूं लागेल. कोणी मध्यभागावर आघात करील तर, तो जिवंत राहून रस मात्र वाहूं लागेल. कोणी शेंड्यावर प्रहार करील तर, तो जिवंत राहून रसच तेवढा वाहूं लागेल. असा तो वृक्ष ( वर वर पडलेल्या घावांनीं न मरतां ) जीवनरसानें म्हणजेच जीवात्म्यानें भरलेला असा पृथ्वींतून रस प्राशन करणारा अतएव प्रफुल्लित राहतो.

कोणताही प्राणी वनस्पति अगर पदार्थ अनेक प्रकारचे बाह्य आघात सोसून या जगांत टिकून राहतो, हें त्यामध्यें असलेल्या जीवशक्तीचेंच सामर्थ्य होय, असें दर्शविण्याकरितां या मंत्रांत वृक्षाचा दृष्टांत दिला आहे.

**अस्य यदेकाꣳ शाखां जीवो जहात्यथ सा शुष्यति द्वितीयां जहात्यथ सा शुष्यति तृतीयां जहात्यथ सा शुष्यति सर्वं जहाति सर्वः शुष्यति ॥ २ ॥**

**अस्य जीवः यद् एकाम् शाखाम् जहाति अथ सा शुष्यति । द्वितीयाम् जहाति अथ सा शुष्यति । तृतीयाम् जहाति अथ सा शुष्यति । सर्वम् जहाति सर्वः शुष्यति ।**

त्या वृक्षांतील जीव जेव्हां एक शाखा सोडतो, तेव्हां ती वठते; जेव्हां दुसरी सोडतो तेव्हां ती वठते; जेव्हां तिसरी सोडतो तेव्हां ती वठते व जेव्हां जीव सर्व वृक्ष सोडतो, तेव्हां सर्वच वृक्ष वाळतो.

**एवमेव खलु सोम्य विद्धीति होवाच जीवापेतं वाव किलेदं म्रियते न जीवो म्रियत इति स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं**

**तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवा-न्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**सोम्य । एवम् एव खलु इदम् इति विद्धि । जीवापेतम् किल म्रियते । जीवः वाव न म्रियते इति उवाच ह । यः एषः सः अणिमा । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । तत् सत्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् असि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।**

वत्सा ! त्याप्रमाणेंच हें सर्व आहे असें समज. कोणताही पदार्थ जीवरहित झाला म्हणजेच मरतो; जीवात्मा केव्हांही मरत नाहीं; असें आरुणि श्वेतकेतूला म्हणाला. तो हा सत्स्वरूप आत्मा अणिमा ह्मणजे अत्यंत सूक्ष्म अव्यक्त असून हा आत्मा ज्याचें मूळ कारण आहे असें हे सर्व जग आहे. तेंच आत्मतत्त्व तूंही आहेस; म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्ट्या आत्म-स्वरूप आहे किंवा सत्स्वरूप आहे त्याप्रमाणें, हे श्वेतकेतो ! तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) सत्स्वरूपच आहेस, ( असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला ). श्वेतकेतु म्हणाला कीं, हे भगवन् ! पुनरपि मला बोध करा. हे वत्सा ! ठीक आहे, असें आरुणि त्याला ह्मणाला.

अनुकूल गुणांचें आकर्षण व त्यांचें संघटन आणि प्रतिकूल गुणांचें उत्सारण या क्रिया जोंपर्यंत योग्य रीतीनें चालतात तोंपर्यंतच कोणताही पदार्थ टिकाव धरूं शकतो. जीवंतपणाला कारणीभूत असलेल्या या क्रिया ज्या शक्तीच्या आधारानें चालतात तीच जीवशक्ति होय. ही शक्ति सर्व पदार्थांत किंबहुना अणुरेणूंमध्यें देखील भरलेली असते. ही जीवशक्ति हें देखील सत्तत्त्वाचें स्वरूपच आहे. या जीवशक्तीला गीतेंत पराप्रकृति असें म्हटलें आहे. जीवशक्तीच्या रूपानें सर्व सृष्टींत भरलेलें सत्तत्त्व म्हणजेच

आत्मा होय. तेंच सर्वांचें मूळ असून तेंच तूंही आहेस, असा महावाक्याचा उपदेश येथेंही आला आहे.

---

## अथ द्वादशः खण्डः ।

**न्यग्रोधफलमत आहरेतीदं भगव इति भिन्द्धीति भिन्नं भगव इति किमत्र पश्यसीत्यण्व्य इवेमा धाना भगव इत्यासामङ्गैकां भिन्द्धीति भिन्ना भगव इति किमत्र पश्यसीति न किंचन भगव इति ॥ १ ॥**

**अतः न्यग्रोधफलम् आहर इति । भगवः इदम् इति । भिन्द्धि इति । भगवः भिन्नम् इति । किम् अत्र पश्यसि इति । भगवः अण्व्यः इव इमाः धानाः इति । अङ्ग आसाम् एकाम् भिन्द्धि इति । भगवः भिन्ना इति । अत्र किम् पश्यसि इति । भगवः न किंचन इति ।**

आरुणि म्हणाला, तिकडून वडाचें फळ घेऊन ये. श्वेतकेतु म्हणाला भगवन्, हें आणलें. आरुणिः—फोड, श्वेतकेतुः— भगवन्, फोडलें. आरुणिः—त्यांत तू काय पहात आहेस? ( तुला काय दिसतें ? ) श्वेतकेतुः —भगवन् ! ही अति बारीक परमाणू-सारखीं बींजें दिसत आहेत. आरुणिः—वत्सा ! त्यांपैकीं एक फोड. श्वेतकेतुः—( तसें करून ) भगवन् ! फोडलें. आरुणिः— त्यांत तुला काय दिसतें ? श्वेतकेतु—भगवन् ! त्यांत कांहीं दिसत नाहीं.

**तꣳ होवाच यं वै सोम्यैतमणिमानं न निभालयस एतस्य वै सोम्यैषोऽणिम्न एवं महान्न्यग्रोधस्तिष्ठति श्रद्धत्स्व सोम्येति ॥२॥**

**तम् उवाच ह । सोम्य यम् एतम् आणिमानम् न निभालयसे सोम्य एतस्य वै अणिम्नः एषः एवम् महान् न्यग्रोधः तिष्ठति । सोम्य श्रद्धत्स्व इति ।**

आरुणि श्वेतकेतूस म्हणाला कीं,वत्सा ! जो हा अतिसूक्ष्म पदार्थ तुला दिसत नाहीं, वत्सा ! त्याच सूक्ष्म अंशापासून हा प्रचंड वट वृक्ष उभा आहे म्हणजे या सूक्ष्म अंशांतूनच त्याची उभारणी झाली आहे. वत्सा या बीजांतील अव्यक्त अंशावर श्रद्धा ठेव. म्हणजे गृहीत कृत्याप्रमाणें तो गृहीत धर.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**यः एषः सः अणिमा । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । तत् सत्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् असि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।**

तो हा सत्स्वरूप आत्मा, अणिमा म्हणजे अत्यंत सूक्ष्म अव्यक्त असून, हा आत्मा ज्याचें मूळ कारण आहे असें हें सर्व जग आहे. तेंच आत्मतत्त्व तूंही आहेस. म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्टया आत्मस्वरूप किंवा सत्स्वरूप आहे त्याप्रमाणें, हे श्वेतकेतो, तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहेस. ( असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणला ). त्यावर श्वेतकेतु म्हणाला कीं, भगवन्! पुनरपि मला आपण बोध करा. हे वत्सा ठीक आहे असें आरुणि त्याला म्हणाला.

गुणधर्मांच्या संघटनादि क्रियाशक्तीप्रमाणेंच बीजशक्ति देखील पदार्थांमध्यें दिसून येते. ती समजावून देण्याकरितां आरुणि ऋषीनें श्वेतकेतूकडून एक प्रयोग करविला आहे. तो असाः–त्यानें वडाचें एक फळ आणवून त्यांतील बारीक कणासारखें बी फोडण्यास सांगितलें; व या सूक्ष्म बीजामध्यें तुला काय दिसतें, असा श्वेतकेतूला प्रश्न केला. तेव्हां तो

म्हणाला कीं, भगवन् मला यांत कांहीं दिसत नाहीं. त्यावर आरुणीनें सांगितलें कीं, तुला जरी या सूक्ष्म बीजांत कांहीं दिसलें नाहीं तरी, त्यांत कांहींच नाहीं असें समजूं नको. कारण त्या बीजांत जें दिसत नाहीं त्यापासूनच हा मोठा वटवृक्ष उत्पन्न झाला आहे. या वटवृक्षाचें कारणरूप त्या सूक्ष्म बीजांतच आहे. तें जरी दिसलें नाहीं तथापि, त्याचें कार्य जें वटवृक्ष त्यावरून तें कारणतत्त्व या सूक्ष्म बीजामध्यें आहे असें निःसंशय सिद्ध होतें. म्हणून जरी तें कारणतत्त्व डोळ्याला दिसलें नाहीं तरी, तेवढ्यावरून त्याचें अस्तित्त्वच नाहीं असें समजणें चूक आहे. याकरितां तूं हें कारणतत्त्वाचें अस्तित्व गृहीत धर ( खरें मान ). या खंडाच्या दुसऱ्या मंत्रांत 'श्रद्धत्स्व' असें पद आलें आहे. विश्वास ठेव असा त्याचा अर्थ आहे. कारणतत्त्वाचें अस्तित्व त्याचें कार्य दाखवून सिद्ध केलें आणि मगच त्यावर विश्वास ठेवावयास सांगितलें आहे, ही गोष्ट अवश्य लक्षांत ठेविली पाहिजे. यावरून श्रद्धा म्हणजे पोकळ विश्वास, अशा अर्थानें श्रद्धत्स्व हें पद आलेलें नाहीं, हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल. जीवशक्तीप्रमाणच उत्पादकशक्ति देखील सर्व पदार्थांत वास करीत आहे. तीही सताचीच आहे स्वतंत्र नव्हे असें दाखवून, शेवटीं पुनः महावाक्याचा उपदेश केला आहे.

## अथ त्रयोदशः खण्डः ।

**लवणमेतदुदकेऽवधायाथ मा प्रातरुपसीदथा इति स ह तथा चकार तꣳ होवाच यद्दोषा लवणमुदकेऽवाधा अङ्ग तदाहरेति तद्धावमृश्य न विवेद ॥ १ ॥**

एतत् लवणम् उदके अवधाय अथ प्रातः मा उपसीदथाः इति । सः तथा चकार ह । तम् उवाच ह । अङ्ग दोषा यत् लवणम् उदके अवाधाः तत् आहर । तत् अवमृश्य न विवेद ह ।

आरुणि म्हणाला—हें मीठ उदकांत टाक आणि सकाळीं माझ्याकडे घेऊन ये. श्वेतकेतूनें पित्याच्या सांगण्याप्रमाणें केलें.

त्याला आरुणि म्हणाला, वत्सा! रात्रीं जें मीठ पाण्यांत टाकलें आहेस तें आण. श्वेतकेतूनें पित्याच्या सांगण्याप्रमाणें मीठ ज्या पाण्यांत टाकलें होतें त्यांत हुडकून देखील त्याला तें मिळालें नाहीं.

**यथा विलीनमेवाङ्गास्यान्तादाचामेति कथमिति लवणमिति मध्यादाचामेति कथमिति लवणमित्यन्तादाचामेति कथमिति लवणमित्यभिप्रास्यैतदथ मोपसीदथा इति तद्ध तथा चकार तच्छश्वत्संवर्तते तँ होवाचात्र वाव किल सत्सोम्य न निभालयसेऽत्रैव किलेति ॥ २ ॥**

**अङ्ग यथा विलीनम् एव अस्य अन्तात् आचाम इति । कथम् इति । लवणम् इति । मध्यात् आचाम इति । कथम् इति । लवणम् इति । अन्तात् आचाम इति । कथम् इति । लवणम् इति । एतत् अभिप्रास्य अथ मा उपसीदथाः इति । तथा तत् चकार ह । तत् शश्वत् संवर्तते । तम् उवाच ह । सोम्य अत्र वाव किल सत् न निभालयसे । अत्र एव किल इति ।**

वत्सा! तें ज्या क्रमानें विरघळलें तदनुसार या पाण्याच्या तळांतून एक आचमन कर. ( तसें श्वेतकेतूनें केल्यावर ) आरुणि:—कसें लागतें? श्वेतकेतु:—खारट लागतें. आरुणि:—मध्यभागांतून आचमन कर. ( तसें श्वेतकेतूनें केल्यावर ) कसें लागतें? श्वेतकेतु:—खारट लागतें. आरुणि:—वरच्या भागांतून आचमन कर. ( तसें श्वेतकेतूनें केल्यावर ) कशी चव लागली? श्वेतकेतु:—खारटच लागली. आरुणि:—आतां हें सगळेंच पाणी टाकून माझ्याकडे ये. श्वेतकेतूनें तसें केलें व म्हणाला, तें पाणी सगळेंच सारखें खारट आहे. तेव्हां आरुणि म्हणाला:—वत्सा! त्या पाण्यांतच खरोखर असणारें तें लवण तुला वेगळें काढून दाखवितां येत नाहीं; परंतु तें त्यांतच आहे.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

यः एषः सः अणिमा । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् असि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।

तो हा सत्स्वरूप आत्मा अणिमा म्हणजे अत्यंत सूक्ष्म अव्यक्त असून, हा आत्मा ज्याचें मूळ कारण आहे असें हें सर्व जग आहे. तेंच आत्मतत्त्व तूंही आहेस म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्टया आत्मस्वरूप किंवा सत्स्वरूप आहे त्या प्रमाणें हे श्वेतकेतो, तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहे. असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला. श्वेतकेतु म्हणाला कीं, हे भगवन् ! पुनरपि मला आपण बोध करा. हे वत्सा ! ठीक आहे, असें आरुणि त्याला म्हणाला.

आरुणि ऋषीनें या खण्डांत श्वेतकेतूकडून मिठाचा प्रयोग करविला आहे. मीठ पाण्यांत विरून गेल्यानंतर त्याचें अस्तित्व वरवर पाहणाऱ्याला दिसून येणारें नाहीं, तथापि त्या पाण्याच्या रुचीवरून तें ओळखतां येतें. मिठाचा रंग, आकार, वजन यांपैकीं कोणताही गुण दिसत नसला तरी, पाण्यांतील त्याचें अस्तित्व निश्चयानें सांगतां येतें. तद्वतच सृष्ट पदार्थांच्या कोणत्याही गुणधर्मांवरून ब्रह्मतत्त्वाचें अस्तित्व निश्चित करितां आलें नाहीं, तथापि पदार्थांच्या आकर्षण, उत्सारण इत्यादि शक्तींवरून तें निश्चित करितां येतें. असें हें सद्रूप ब्रह्म सर्व जगाचें मूळ असून तूं देखील त्या मूळ तत्त्वाचाच बनला आहेस. अर्थात् तें सद्रूप ब्रह्मच तूं आहेस, असा शेवटीं महावाक्याचा उपदेश केला आहे.

---

## अथ चतुर्दशः खण्डः ।

**यथा सोम्य पुरुषं गन्धारेभ्योऽभिनद्धाक्षमानीय तं ततोऽतिजने विसृजेत्स यथा तत्र प्राङ्वोदङ्वाधराङ्वा प्रत्यङ्वा प्रध्मायीताभिनद्धाक्ष आनीतोऽभिनद्धाक्षो विसृष्टः ॥ १ ॥**

**सोम्य यथा अभिनद्धाक्षम् पुरुषम् गन्धारेभ्यः आनीय ततः अतिजने तम् विसृजेत् । सः यथा तत्र प्राङ् वा उदङ् वा अधराङ् वाप्रत्यङ्वा अभिनद्धाक्षः आनीतः अभिनद्धाक्षः विसृष्टः इति प्रध्मायीत ।**

वत्सा ! ज्याचे डोळे बांधले आहेत असा मनुष्य कंदाहार देशांतून आणून, पुढें त्याला ओसाड प्रदेशांत सोडावा. मग तो ज्याप्रमाणें त्या ओसाड जागीं पूर्व, उत्तर, दक्षिण किंवा पश्चिम या दिशेकडे तोंड करून, डोळे बांधलेल्या स्थितींत आणलेला आणि डोळे बांधलेल्या स्थितींतच सोडलेला असा मी आहे ! ( कोणीतरी साह्य करा ! ) असें मोठ्यानें ओरडेल.

**तस्य यथाभिनहनं प्रमुच्य प्रब्रूयादेतां दिशं गन्धारा एतां दिशं व्रजेति स ग्रामाद्ग्रामं पृच्छन्पण्डितो मेधावी गन्धारानेवोपसंपद्येतैवमेवेहाचार्यवान्पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्य इति ॥ २ ॥**

**यथा तस्य अभिनहनम् प्रमुच्य ‘ एताम् दिशम् गन्धाराः एताम् दिशम् व्रज ’ इति प्रब्रूयात् । सः मेधावी पण्डितः ग्रामात् ग्रामम् पृच्छन् गन्धारान् एव उपसंपद्येत । एवम् एव आचार्यवान् पुरुषः वेद । तस्य तावत् एव चिरम् यावत् न विमोक्ष्ये । अथ संपत्स्ये इति ।**

ज्याप्रमाणें त्याचें बंधन सोडून, या दिशेकडे गंधार देश आहे त्या दिशेकडे जा, असें कोणींतरी त्यास सांगितलें म्हणजे तो चतुर बुद्धिवान् मनुष्य या गांवाहून त्या गांवास विचारीत विचारीत नेमका कंदाहार प्रांताला जातो, त्याच रीतीनें गुरूचें

साह्य घेणारा मनुष्य ब्रह्मज्ञान संपादन करितो. त्याला तोंपर्यंतच विलंब असतो कीं, जोंपर्यंत तो मुक्त झालेला नसतो. ( बंध-निवृत्ति झाल्याबरोबर तो ब्रह्मस्वरूप होतो. )

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**यः एषः सः अणिमा। इदम् सर्वम् ऐतदात्म्यम्। तत् सत्यम्। सः आत्मा। श्वेतकेतो तत् त्वम् असि इति। भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति। सोम्य तथा इति उवाच ह।**

तो हा सत्स्वरूप आत्मा अणिमा म्हणजे अत्यंत सूक्ष्म अव्यक्त असून हा आत्मा ज्याचें मूळ कारण आहे असें हें सर्व जग आहे. तेंच आत्मतत्त्व तूंही आहेस. म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्ट्या आत्मस्वरूप किंवा सत्स्वरूप आहे त्याप्रमाणें, हे श्वेतकेतो ! तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहेस असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला. श्वेतकेतु म्हणाला कीं, हे भगवन्, पुनरपि मला आपण बोध करा. हे वत्सा ! ठीक आहे, असें आरुणि त्याला म्हणाला.

प्रस्तुत खण्डाच्या पहिल्या दोन मंत्रांत गंधार देशांतील एका मनुष्याची हकीकत दृष्टांतादाखल घेतली आहे. डोळे बांधून गंधार देशाच्या बाहेर एखाद्या निर्जन अरण्यांत सोडून दिलेला मनुष्य येथें अभिप्रेत आहे. असा प्रसंग चोरांनीं लुटल्यावर येण्याचा संभव असतो. सरहद्द प्रांतापलीकडील देशास जर गंधार असें म्हणत असतील तर, लुटालूट करून माणसांना नाहींसे करण्याचा प्रघात हल्लींसारखा प्राचीन काळींही तेथें चालू होता असें म्हणावें लागतें. तें कसेंही असलें तरी, आपल्याला येथें प्रस्तुत प्रक-

र्णी दृष्टांताचाच विचार करावयाचा आहे. वर सांगितल्याप्रमाणें ओसाड अरण्यांत सोडलेला मनुष्य डोळे सोडून मोकळा झाल्यावर, तो जर हुशार व प्रसंगावधानी असेल तर, भेटेल त्या मनुष्याकडून गंधार देशाची दिशा समजून घेऊन पत्ता विचारीत विचारीत आपल्या गंधार देशाला जाऊन पोहोंचल्यावेरीज राहणार नाहीं. त्याप्रमाणेंच श्रेयस्काम मनुष्यानें या परमार्थमार्गांत गुरूला ( तज्ज्ञ पुरुषाला ) विचारून मार्ग आक्रमण करण्याचा प्रयत्न केला तर तो देखील मोक्षपदाला प्राप्त झाल्यावांचून रहावयाचा नाहीं. ज्ञात्याच्या साह्यानें प्रयत्न करणाऱ्या मनुष्याला त्याच्यापासून सद्वस्तूचें ज्ञान प्राप्त होईल, असें सांगून शेवटीं महावाक्याचा पुनः उपदेश केला आहे.

या प्रकरणांत ' आचार्यवान् पुरुषो वेद ' असें वाक्य आलें आहे. ह्या श्रुतिवाक्याचा गुरुसंप्रदायी लोकांकडून नेहमीं उपयोग केला जातो, तथापि या खण्डांत गुरूची आवश्यकता दर्शाविली आहे, ती ज्ञानविज्ञानाचें अध्यापन–बोध–करणाऱ्या गुरूची आहे. कानांत मंत्र सांगणाऱ्या किंवा मस्तकीं हस्त ठेवून ब्रह्म दाखविणाऱ्या गुरूची नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

---

## अथ पञ्चदशः खण्डः ।

**पुरुषꣳ सोम्योतोपतापिनं ज्ञातयः पर्युपासते जानासि मां जानासि मामिति तस्य यावन्न वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायां तावज्जानाति ॥ १ ॥**

**सोम्य । उपतापिनम् पुरुषम् ज्ञातयः पर्युपासते । उत ' जानासि माम् । ' जानासि माम् ' इति । यावत् तस्य वाक् मनसि मनः प्राणे प्राणः तेजसि तेजः परस्याम् देवतायाम् न संपद्यते तावत् जानाति ।**

वत्सा ! एखाद्या रोगग्रस्त मनुष्याभोंवतीं त्याचे आप्तजन जमून बसतात व मला तूं ओळखतोस काय ? मला ओळखतोस

काय ? असे प्रश्न करितात. जोंपर्यंत त्या मुमूर्षु मनुष्याची वाणी मनामध्यें, मन प्राणामध्यें, प्राण तेजामध्यें व तेज सत्स्वरूपामध्यें लीन झालेलें नसतें तोंपर्यंत त्याला ते प्रश्न समजतात.

**अथ यदास्य वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायामथ न जानाति ॥ २ ॥**

**अथ यदा अस्य वाक् मनसि मनः प्राणे प्राणः तेजसि तेजः परस्याम् देवतायाम् संपद्यते अथ न जानाति ।**

परंतु जेव्हां वाणी मनामध्यें, मन प्राणामध्यें, प्राण तेजामध्यें, आणि तेज परमदेवतेमध्यें म्हणजे सत्स्वरूपामध्यें लीन होतें तेव्हां त्याला कांहीं कळत नाहीं. ( त्याचें व्यक्तित्व समाप्त होतें.)

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**यः एषः सः आणिमा । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । तत् सत्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् असि इति । भूयः एव भगवान् मा विज्ञापयतु इति । सोम्य तथा इति उवाच ह ।**

तो हा सत्स्वरूप आत्मा अणिमा म्हणजे अत्यंत सूक्ष्म, अव्यक्त असून हा आत्मा ज्याचें मूळकारण आहे असें हें सर्व जग आहे. तेंच आत्मतत्त्व तूंही आहेस. म्हणजे ज्याप्रमाणें सर्व जग तात्त्विक दृष्ट्या आत्मस्वरूप किंवा सत्स्वरूप आहे त्याप्रमाणेंच, हे श्वेतकेतो, तूं देखील ( एक व्यक्ति देखील ) तें सत्स्वरूपच आहेस. असें आरुणि ऋषि श्वेतकेतूला म्हणाला. श्वेतकेतु म्हणाला कीं, हे भगवन् ! पुनरपि मला आपण बोध करा. हे वत्सा, ठीक आहे असें आरुणि त्याला म्हणाला.

गाढ सुषुप्तीमध्यें जीवात्मा प्राज्ञाशीं एकरूप होतो, हा प्राज्ञ म्हणजेच सत् होय असें पूर्वी सांगितलें आहे. मरणोत्तर जीवाचा या देहाशीं संबंध सुटतो तेव्हां वाणी मनामध्यें, मन प्राणांमध्यें, प्राण सत्स्वरूपामध्यें लीन होतो. या सत् स्वरूपांत लीन झाल्यावर जीवाचें व्यक्तित्व समाप्त होतें. गाढ सुषुप्तीप्रमाणेंच जीव मरणोत्तर स्थितींत ज्या सताशीं एकरूप होतो त्या सत्स्वरूप ब्रह्मतत्त्वानेंच हें सर्व जग व त्यांतील प्रत्येक व्यक्ति बनली आहे, तेंच सत्स्वरूप ब्रह्म तूं आहेस असा महावाक्याचा शेवटीं येथेंही उपदेश केला आहे.

---

## अथ षोडशः खण्डः ।

**पुरुषꣳ सोम्योत हस्तगृहीतमानयन्त्यपहार्षीत्स्तेयमकार्षीत्परशुमस्मै तपतेति स यदि तस्य कर्ता भवति तत एवानृतमात्मानं कुरुते सोऽनृताभिसंधोऽनृतेनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स दह्यतेऽथ हन्यते ॥ १ ॥**

सोम्य । उत हस्तगृहीतम् पुरुषम् आनयन्ति । अपहार्षीत् स्तेयम् अकार्षीत् । अस्मै परशुम् तपत इति । यदि सः तस्य कर्ता भवति ततः आत्मानम् एव अनृतम् कुरुते । अनृताभिसंधः सः आत्मानम् अनृतेन अन्तर्धाय तप्तम् परशुम् प्रतिगृह्णाति । सः दह्यते अथ हन्यते ।

वत्सा! ज्याप्रमाणें मुसक्या बांधलेला मनुष्य पकडून आणितात व यानें धन घेतलें ,चोरी केली,(म्हणून) याला तप्त परशु द्या म्हणजे याचेकडून दिव्य करवा (म्हणतात). जरी तो चोरी करणारा असतो तरी स्वतःलाच खोटा करितो म्हणजे चोरी नाकबूल करितो. खोटें बोलणारा तो स्वतःला खोटेपणानें लपवून तो तापलेला परशु ग्रहण करितो ( त्यामुळें तो ) भाजतो व त्याला शिक्षा केली जाते.

**अथ यदि तस्याकर्ता भवति तत एव सत्यमात्मानं कुरुते स सत्याभिसंधः सत्येनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स न दह्यतेऽथ मुच्यते ॥ २ ॥**

अथ यदि तस्य अकर्ता भवति ततः आत्मानम् सत्यम् एव कुरुते । सः सत्यसंधः आत्मानम् सत्येन अन्तर्धाय तप्तम् परशुम् प्रतिगृह्णाति सः न दह्यते अथ मुच्यते ।

परंतु जर तो चोरी न करणारा असेल तर तो स्वतःलाच सत्य करितो. म्हणजे आत्मवंचना करीत नाहीं. तो सत्यवादी मनुष्य स्वतःला सत्यभाषणानें आच्छादित ( संरक्षित ) करून तापलेला परशु ग्रहण करितो. त्याचा हात भाजत नाहीं. म्हणून तो मुक्त केला जातो ( दोषमुक्त होऊन सुटतो ).

**स यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ३ ॥**

सः यथा तत्र न अदाह्येत । इदम् सर्वम् ऐतदात्म्यम् । तत् सत्यम् । सः आत्मा । श्वेतकेतो तत् त्वम् असि । अस्य तत् विजज्ञौ इति ।

तो त्या कामीं भाजला जात नाहीं. ( सत्यानेंच त्याचें संरक्षण होतें. ) हें सर्व जग ह्या सत्तत्त्वानेंच बनलें आहे. ज्या तत्त्वानें ही सृष्टि बनली आहे तेंच सत्य व तोच आत्मा होय. हे श्वेतकेतो, तें सद्रूप आत्मतत्त्वच तूं आहेस. याप्रमाणें त्या आरुणीनें उपदेशिलेलें तें आत्मज्ञान श्वेतकेतु जाणता झाला. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

प्राचीनकाळीं गुन्हेगारांकडून दिव्य करविण्याची पद्धति रूढच होती. ही वहिवाट छत्रपति शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीपर्यंत थोड्या फार प्रमाणांत चालू असून समाजाचा या पद्धतीवर विश्वासही होता. ज्याचेवर

चोरीसारख्या गुन्ह्याचा आरोप आला असेल त्याचेकडून तापलेली कुऱ्हाड ( परशु ) उचलवावयाची. त्यानें तसें केल्यावर जर त्याचा हात भाजला तर तो गुन्हेगार समजून त्याला शिक्षा द्यावयाची. आणि असें दिव्य करूनही जर त्याचा हात भाजला नाहीं तर तो निर्दोष आहे असें समजून त्याला सोडून द्यावयाचें. ज्या गुन्ह्यांत दर्शनी पुरावा मुळींच नसेल आणि आरोपीनें गुन्हा केला आहे असा लोकांना बळकट संशय असेल, अशा अपरिहार्य संशयाचे वेळीं या दिव्याचा उपयोग केला जात असावा असें दिसतें. कांहीं असलें तरी, सत्याचें आविष्करण व्हावयास पाहिजे, त्याखेरीज मनुष्याचें समाधान होत नाहीं; म्हणून दिव्य हा सत्यसंशोधनाचा अखेरचा उपाय मानला जात असे. अशा नानाविध प्रयत्नांनीं मनुष्याकडून शोधलें जाणारें सत्य हा देखील सताचाच अंश आहे. म्हणजे मनुष्याच्या वैयक्तिक व सामाजिक व्यवहारांतील निःसंशय व शुद्ध असें सत्य हें सत्स्वरूप होय. या सताचा आकाशादि सूक्ष्म तत्त्वापासून तों मानवी व्यवहारापर्यंत सारखा अनुस्यूत संबंध येतो. या खंडांत तप्त परशूचें उदाहरण दिलें आहे तें सत्यसंशोधनाविषयीं मनुष्याची कशी आतुरता असते, तें दाखविण्याकरितांच दिलें आहे. ज्या सत्याकरितां मनुष्याकडून प्रयत्नांची शिकस्त केली जाते, तें सत्य सतांपैकींच असून, ज्या सतापासून हें सर्व जग त्यांतील व्यक्तींसह बनलें आहे, तें सत्तत्त्व तूं आहेस असें महावाक्य येथें देखील शेवटीं आलें आहे. या खंडांत व्यवहारांतील सत्य हें सत्स्वरूप होय असें दाखवून सताचे सर्वव्यापित्व सिद्ध केलें आहे.

---

## सहाव्या अध्यायाचा उपसंहार.

प्रस्तुत अध्यायाचे प्रारंभीं श्वेतकेतु व त्याचा पिता उद्दालक आरुणि यांचा संवाद सुरू झाला आहे. पांचव्या अध्यायांतील पंचाग्निविद्येच्या प्रकरणांत याच पिता-पुत्रांचीं नांवें आलीं आहेत, परंतु आरुणि गौतम हीं नांवें वंशवाचक आहेत. श्वेतकेतु हें नांव मात्र व्यक्तिवाचक आहे.

नांव एकच असलें तरी व्यक्ति एकच असली पाहिजे असें निश्चित अनुमान करितां येत नाहीं. प्राचीनकाळीं देखील व्यक्तींचीं तींच तींच नांवें आढळून येतात. म्हणून श्वेतकेतु व आरुणि हे दोन्ही ऋषि पंचाग्निविद्येतील ऋषींहून वेगळे असावेत असा तर्क करणेंही सयुक्तिक वाटतें.

आरुणिऋषींच्या उपदेशाला पहिल्या खंडांतील चवथ्या मंत्रापासून प्रारंभ झाला आहे. हा उपदेशात्मक संवाद आध्यायाचे अखेरपर्यंत चालू आहे व शेवटच्या मंत्रांत श्वेतकेतूचें समाधान झालें आहे. येथें पिता आरुणि ऋषि हाच गुरु असून पुत्र श्वेतकेतु हा शिष्य आहे. या गुरुशिष्यांच्या संवादांत ब्रह्मविद्येंतील प्रधान सिद्धान्ताचें विवेचन झालें आहे. तें गृहीत• कृत्याच्या स्वरूपाचें नसून,अत्यंत सोपपत्तिक व पूर्ण बुद्धिवादाच्या पद्धतीनेंच झालें आहे. या सर्व प्रकरणांत अद्वैत सिद्धान्ताचेंच प्रतिपादन आहे. म्हणजे आरुणि ऋषीनें आपल्या पुत्राला-शिष्याला अद्वैत ब्रह्माचा उपदेश केला आहे. द्वैतवादी आचार्यांनीं या प्रकरणाचा द्वैतपर अर्थ लावल्याचें प्रसिद्धच आहे, परंतु या द्वैतवादी आचार्यांनीं आपआपले संप्रदाय स्वतंत्र स्थापन केले असल्यामुळें त्यांच्या कोटिक्रमाचा किंवा अर्थलापनेचा विचार करण्याची येथें मुळींच आवश्यकता नाहीं. अद्वैत वादांतच समाविष्ट असलेले मायावादी ग्रंथकार, भ्रमरूप मायावादाचा स्वीकार केल्यावांचून अद्वैत सिद्धांत सिद्ध करितांच यावयाचा नाहीं असें प्रतिपादन करितात; परंतु या आरुणिश्वेतकेतूच्या संवादाचा मूळ वाङ्मयावरूनच काळजीपूर्वक विचार केल्यास मायावाद्यांचें हें म्हणणें अज्ञानमूलक किंवा स्वमताचा बचाव करण्याच्या मतलबानें मांडलेलें आहे असें कोणाच्याही सहज लक्षांत येईल.

ब्रह्मज्ञान हें शास्त्रीय ज्ञान असल्यामुळें, तें गुरूवांचून केवळ स्वावलंबनानें सर्वांनाच मिळण्याजोगें नाहीं. कोणत्याही शास्त्राचें ज्ञान संपादन करावयाचें झाल्यास त्या त्या शास्त्रांत निष्णात असलेल्या गुरूची आवश्यकता सर्व काळीं सारखीच असते यांत शंका नाहीं. परंतु उत्तरकालीन वेदान्तांत

या कल्पनेला जें सांप्रदायिक रूप अधिकाधिक येत गेलें आहे, तें मात्र श्रुतीच्या मताशीं अगदींच विसंगत आहे. या अध्यायांतील १४ व्या खंडांत या विषयाचा स्पष्ट खुलासा झाला आहे. त्यावरून कानमंत्र सांगणारा गुरु श्रुतीला मुळींच अभिप्रेत नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. वैदिकधर्माची दीक्षा देण्याकरितां धर्मशास्त्रानें उपनयन हा मुख्य संस्कार सांगितला आहे. त्यांत गायत्रीमंत्राचा उपदेश यथाविधि करण्यांत येतो. मौंजीबंधन हा संस्कार व गायत्रीमंत्राचा उपदेश या दोहोंनीं मनुष्याला वैदिकधर्माची दीक्षा मिळते; व तो द्विज या संज्ञेस पात्र होतो. गायत्रीमंत्राचा उपदेश गुरूनें शिष्यास कानांत सांगावयाचा असतो म्हणजे, तो उपदेश उघड जाहीरपणें करावयाचा नाहीं, असा नियम आहे. म्हणूनच या मंत्रोपदेशाला दीक्षा, व तो उपदेश करणाऱ्या गुरूला दीक्षागुरु असें म्हणतात. ब्रह्मविद्येचें ज्ञान संपादन करणें, ही मंत्रदीक्षा नव्हे; किंवा या ब्रह्मविद्येचा उपदेश–बोध करणारा गुरु हा दीक्षागुरुही नव्हे. असें असतां, या ब्रह्मज्ञानाच्या व्यवहारास अर्वाचीन कालांत दीक्षेचें स्वरूप येऊन ब्रह्मज्ञान सांगणारा गुरु हा दीक्षागुरु होय असें मानण्यांत येऊं लागलें. अशा गुरूला ज्ञानगुरु असेंही म्हणतात. पण तेवढ्या शब्दभेदानें वरील दीक्षागुरूची कल्पना नष्ट होत नाहीं, इतकी ती बद्धमूल झाली आहे; ब्रह्मज्ञानाचा अनुभव केवळ वैराग्यावरूनच ओळखावयाचा, दुसरें त्याला साधनच नाहीं, अशी बहुजन समाजाची समजूत दृढ होण्याला मुख्यत्वेंकरून मायावादी संन्यासमार्गच कारणीभूत झाला आहे. समाजाला कर्मयोगाचें वळण लागलें असतें तर, वैराग्याबरोबरच निष्कामकर्तव्याचरण हा सद्गुण देखील ब्रह्मज्ञानाच्या अनुभवाचा निदर्शक ठरला असता. आणि वैराग्यशील व कर्तव्यतत्पर असा जो असेल तोच खरा ब्रह्मज्ञानाचा सद्गुरु होय अशी सद्गुरूची श्रुतिप्रतिपादित व्याख्या समाजाच्या मनांत साहजिकपणेंच बिंबली असती. परंतु मायावादी तत्त्वज्ञानाचें समाजाला पक्कें वळण लागल्यामुळें, या बाबतींत समाजाची भयंकर दिशाभूल झाली व हा गुरुसंप्रदाय समाजाला परिणामी अनर्थावहच

झाला. वस्तुतः गुरूची आवश्यकता श्रुतीनें कमी लेखिली आहे असें मुळींच नाहीं. ज्ञानविज्ञानसंपन्न सद्गुरूची आवश्यकता श्रुतीलाच काय पण वर्तमानकालीन सर्व विचारी लोकांना देखील मान्यच आहे. प्रश्न आहे तो कानमंत्र सांगणाऱ्या गुरूचा आहे, विद्यागुरूचा नव्हे. ब्रह्मविद्येचें शास्त्रीय ज्ञान संपादन करण्यास विद्यागुरूची आवश्यकता आहे. कारण मंत्राचा जप हें मोक्षप्राप्तीचें मुख्य साधन नव्हें, तें एक अंगभूत साधन आहे. या साधनाचें काम गायत्रीमंत्रानें उत्कृष्ट होतें. गायत्रीमंत्राची दीक्षा त्रैवर्णिकांना मिळणें अवश्य आहे. म्हणून सुसंस्कृत हिंदु मनुष्याला मौंजीबंधनांतील दीक्षागुरूवांचून दुसऱ्या कोणत्याही दीक्षागुरूची मुळींच आवश्यकता नाहीं. ब्रह्मज्ञान मिळविण्यास ज्ञानविज्ञानसंपन्न अशा ज्ञानी पुरुषाचें साह्य साधकानें अवश्य मिळवावें असें श्रुतीनें चौदाव्या खंडांत स्पष्ट दाखविलें आहे. ज्ञानी मनुष्याच्या उपदेशानें ब्रह्मज्ञान—ब्रह्मविद्या समजतें हें जरी खरें असलें तरी, सद्गुरु आपल्या शिष्याला हातीं धरून तत्काळ मोक्षपदावर अचानक नेऊन बसवितात, ही कल्पना औपनिषद्विद्येंत कोठेंही अभिप्रेत नाहीं. सद्गुरूपासून ब्रह्मविद्येचें शास्त्रीय ज्ञान प्राप्त झालें तरी, ब्रह्मविद्येविषयींचा नित्य स्वाध्याय ( नित्य व्यासंग ) ब्रह्मचर्य, निष्काम कर्तव्याचरण, ईश्वरोपासना इत्यादि साधनांनीं साधकाला आपल्या ज्ञानाचा परिपाक करावा लागतो; तरच त्याला मोक्षप्राप्तीचें अंतिम साध्य गाठतां येतें. ‘ स्वतः मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं, ’ या म्हणीप्रमाणें या मार्गांत स्वतः प्रयत्नांची शिकस्त केल्यावांचून ब्रह्म दिसावयाचें नाहीं अशी वस्तुस्थिति आहे व तीच या अध्यायाच्या चवदाव्या खंडांत स्पष्ट दाखविली आहे. चवदाव्या खंडांतील वर्णन दशोपनिषदांतील गुरूपदेशाच्या कल्पनेस सर्वत्र जुळण्यासारखें आहे. मुण्डक, प्रश्न, बृहदारण्यक, केन इत्यादि अनेक उपनिषदांत गुरु-शिष्यसंवाद आले असून, कित्येक ठिकाणीं ‘ गुरुमेवाभिगच्छेत्, आचार्यवान पुरुषो वेद’, इत्यादि वाक्यें आलीं आहेत. त्या सर्व विषयांचा विचार केल्यास, शास्त्रीय ज्ञान(ब्रह्मज्ञान) शिकविणारा गुरु तोच खरा सद्गुरु होय असें निर्वि-

वाद सिद्ध होतें. सत्यकाम जाबालानें तर पशुपक्ष्यांपासूनच ब्रह्मज्ञान संपादन केलें व तें त्याच्या गुरूनें मान्यही केलें. ही कथा पूर्वी चवथ्या अध्यायांत येऊन गेली आहे. त्यावरून देखील श्रुतीला विद्यागुरुच अभिप्रेत आहे. कानमंत्र सांगणाऱ्या सांप्रदायिक गुरूची कल्पना श्रुतीला मुळींच अभिप्रेत नाहीं, हें प्रत्येकानें लक्षांत ठेविलें पाहिजे.

दशोपनिषदांमध्यें सृष्टीच्या उत्पत्तिक्रमाचीं वर्णनें अनेक ठिकाणीं आलीं आहेत तीं सर्व एकच प्रकारचीं आहेत असें दिसत नाहीं. त्यांत थोडा फार फरक दिसून येतो. या अध्यायाच्या तिसऱ्या खंडांत देखील सृष्टीचा उत्पत्तिक्रम सांगितला आहे. त्यांत प्रथम तेज उत्पन्न झालें, नंतर आप व त्यापासून पुढें अन्न उत्पन्न झाल्याचें सांगितलें आहे. येथें अन्न शब्दाचा पृथ्वी असा अर्थ समजण्यास हरकत नाहीं. म्हणजे तेज, आप, पृथ्वी हीं तीन तत्त्वें क्रमानें उत्पन्न झालीं व त्यांच्या त्रिवृत्करणानें ही पिण्डब्रह्मांडात्मक सर्व सृष्टि उत्पन्न झाली. त्रिवृत्करण हें एक विशिष्ट प्रकारचें मिश्रण आहे. उदाहरणार्थ—पृथ्वी ही एक पूर्णांकासारखी घेतल्यास असें म्हणतां येईल कीं, तेज व आप यांतील एक एक चतुर्थांश व पृथ्वी एक द्वितीयांश हीं सर्व मिळून एक कार्यरूप पृथ्वी तयार झाली. याप्रमाणेंच तेज व आप यांचें मिश्रण समजावें. पदार्थांच्या घन, द्रव व बाष्प अशा तीन अवस्था आधुनिक भौतिक शास्त्रांत मानल्या जातात. छान्दोग्यांतील सृष्टिक्रमाचें वरील वर्णन आधुनिक भौतिक शास्त्रास बहुतांशीं जुळण्यासारखेंच आहे. पृथ्वी ( अन्न ), आप, तेज हीं तत्त्वें स्वतंत्र नसून पदार्थांच्या त्या तीन अवस्थाच होत असें मानलें तरी, तें छान्दोग्यश्रुतीशीं विरुद्ध होत नाहीं. पदार्थांच्या अवस्थात्रयाला अनुलक्षून वैदिक ऋषींनीं या तीन देवतांचें वर्णन केलें आहे. तैत्तिरीय उपनिषदांतील आनंदवल्लीच्या पहिल्या अनुवाकांत सृष्टीचा उत्पत्तिक्रम सांगितला आहे. त्यांत पंचभूतांचा क्रम सांगितला आहे. पंचभूतांचें वर्णन देखील पदार्थांच्या अवस्थाभेदांस अनुसरूनच असल्याचें दिसून येतें. छान्दोग्यांतील

उत्पत्तिक्रमाच्या वर्णनापेक्षां तैत्तिरीयांतील वर्णन नंतरच्या काळांतील असावें असें कोणालाही सहज दिसून येईल. त्यावरून छान्दोग्याच्या काळापासून तैत्तिरीयोपनिषदाच्या काळापर्यंत तरी वैदिक ऋषींचें पदार्थसंशोधन अव्याहत चालू होतें. म्हणूनच तैत्तिरीय श्रुतीच्या वैदिक ऋषींनें छान्दोग्यांतील सिद्धान्ताचें विशेष संशोधन करून हा सुधारलेला सृष्टिक्रम तैत्तिरीयोपनिषदांत प्रतिपादन केला आहे, असा तर्क करण्यास हरकत नाहीं.

आरुणि ऋषीनें सृष्टीचें मूलतत्त्व समजावून दिल्यानंतर ब्रह्माचें अद्वैत स्वरूप श्वेतकेतूला समजावून दिलें आहे. या उपदेशांत सत् व असत् हे शब्द मुख्यत्त्वेंकरून येतात. व्युत्पत्तीवरून पाहिल्यास सत् व असत् या शब्दांचे भाव व अभाव हेच अर्थ योग्य दिसतात. जग उत्पन्न होण्यापूर्वीं जें कांहीं असेल किंवा होतें तें सत् म्हणजे भावरूपच होतें, अभावरूप नव्हतें. जग हें ज्या अर्थीं भावरूप आहे त्या अर्थीं या जगाचें मूळ कारण देखील निःसंशय भावरूपच असलें पाहिजे, असा आरुणि ऋषीनें सिद्धान्त मांडिला आहे. कित्येक लोक जगाच्यापूर्वीं अभावच होता असें म्हणतात; पण अभावापासून ( असतापासून ) हें भावरूप सद्रूप जग उत्पन्न होईल काय ? कधींच होणार नाहीं. असा सापेक्ष प्रश्न विचारून त्यावरून आपल्या सिद्धान्ताला अनुकूल असें निश्चित उत्तर ऋषीनें सुचविलें आहे. यावरून श्रुतीनें गृहीत कृत्याचे बाबतींत देखील सर्वतोपरि बुद्धिवादाचा कसा स्वीकार केला आहे हें चांगलेंच दिसून येईल. ' असद्वा इदमग्र आसीत् ' इत्यादि वाक्यें तैत्तिरीयोपनिषदांत आलीं आहेत. तैत्तिरीयश्रुतीनें असत् या शब्दाची अर्थकल्पना वेगळ्या प्रकारें घेऊन त्या वाक्याचा अर्थ बसवून दाखविला आहे. अव्यक्त किंवा अमूर्त हाच असत् शब्दाचा अर्थ तेथें श्रुतीला विवक्षित आहे असें त्या अनुवाकांतील पहिल्या व दुसऱ्या मंत्रांवरून उघड दिसून येतें. परंतु छान्दोग्यश्रुतीनें ' कथमसतः सज्जायेत ' इत्यादि वाक्यांत असत् या शब्दाचा अभाव हाच अर्थ विवक्षित धरला आहे. म्हणून अभावापासून भाव उत्पन्न व्हाव-

याचा नाहीं आणि भावापासून अभावाची उत्पत्ति व्हावयाची नाहीं, हा नेहमींचा अनुभवसिद्ध नियम स्वीकारून, सृष्टीचें मूळतत्त्व सत्स्वरूपच आहे असें श्रुतीनें येथें सिद्ध केलें आहे. ' नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ' या श्लोकांत गीतेनें वरील सिद्धान्ताचाच अनुवाद केला आहे.

सतापासून उत्पन्न झालेली सर्व सृष्टि सत्स्वरूपच आहे. ज्या प्रमाणें मातीच्या भाड्यांत माती हा पदार्थच भरलेला असतो, किंवा लोखंडाच्या बनविलेल्या अनेक जिनसांत लोखंड हीच धातु भरलेली असते, त्यांत दुसरा कोणताही पदार्थ नसतो, त्याप्रमाणेंच जगांत सर्वत्र अन्तर्बाह्य सत् हेंच तत्त्व भरून राहिलें आहे. त्यांत दुसरें कोणतेंही तत्त्व स्वतंत्रपणें अस्तित्वांत नाहीं. तें सर्वव्यापी सत् हेंच ब्रह्म व आत्मा असून, हे श्वेत-केतु, तूं देखील तें सद्रूप ब्रह्मच आहेस; म्हणजे ह्या पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टींत अद्वैत, एकजिनसी, सदात्मक ब्रह्मच व्यापून राहिलें आहे, असा हा आरुणि ऋषीच्या उपदेशांतील ब्रह्माद्वैताचा सिद्धान्त आहे. तो समजा-वून देण्याकरितां आरुणि ऋषीनें खण्ड ८ ते १५ अखेरपर्यंत अनेक दृष्टान्त दिले आहेत. सताच्या नानाविध शक्ति सृष्ट पदार्थांतून कशा प्रगट होतात तें दाखविण्याकरितां ऋषीनें श्वेतकेतूकडून कांहीं प्रयोगही करविले आहेत. म्हणूनच हें नऊ खण्डांचें प्रकरण किंबहुना हा सर्वच अध्याय आजपर्यंत सर्वांना अत्यंत महत्त्वाचा वाटला आहे.

आठव्या खंडापासून सोळाव्या खण्डाचे अखेरपर्यंतच्या प्रत्येक खंडांत सिद्धान्ताचें निरनिराळ्या प्रकारें विवेचन करण्यांत आलें असून त्या विवेचनाचें पर्यवसान ' तत्त्वमसि ' या वाक्यांत झालें आहे. सद्रूप ब्रह्म-तत्त्व, चराचर सृष्टि, आत्मा व जीव या चार तत्त्वांत निर्भेळ ऐक्य दाख-विलें आहे. हेंच ब्रह्माचें अद्वैत स्वरूप होय. म्हणूनच प्राचीन व अर्वा-चीन सर्व प्रकारच्या ब्रह्माद्वैतवादी संप्रदायांमध्यें ' तत्त्वमसि ' या महा-वाक्यालाच अग्रस्थान देण्यांत आलें आहे. मूळ सत्तत्त्व, त्यापासूनच बन-लेली चराचर सृष्टि, या सर्व सृष्टीचा चालक परमात्मा आणि प्रत्येक

व्यक्तीमध्यें त्या व्यक्तीचा नियामक क्षेत्रज्ञ--जीवात्मा हीं सर्व एका सताचींच नांवें आहेत. सतापासूनच सगुण ब्रह्म प्रगट झालें. सताचेंच हें जग बनलें आहे व क्षेत्रज्ञ जीवात्मा देखील सतापासूनच निर्माण झाला आहे. सत् हेंच सर्वव्यापी आहे. हें निरतिशयानंद सताचें स्वरूप अनुभवाला येण्याजोगें आहे. गाढसुषुप्तींत जीव प्राज्ञाशीं एकरूप होतो म्हणजेच सत्स्वरूप होतो. तेव्हां या सत्स्वरूपाच्या परमानंदाचा त्याला अनुभव लाभतो. या स्थितींत स्थूलदेह व अंतःकरण यांच्या कोणत्याही गुणधर्माची त्याला जाणीव नसते. हें प्राज्ञस्वरूप देखील सताचेंच आहे. जगामध्यें प्रत्येक पदार्थांत दिसून येणारी जीवनशक्ति हा सताचाच अंश आहे. त्याप्रमाणेंच पदार्थमात्रांत असलेली बीजशक्ति, संघटक सामर्थ्य, प्रकाशनशक्ति इत्यादि सर्व सामर्थ्यांचें सत्तत्त्व हेंच उगमस्थान( उपादान )आहे. किंबहुना मानवी व्यवहारांत दिसून येणारें प्रभावशाली असें सत्य हें देखील सताचेंच स्वरूप होय. याप्रमाणें सर्वव्यापी, सर्वशक्तिमान्, सर्वनियामक, सर्वप्रकाशक व आनंदघन असें सद्रूप ब्रह्म हाच जीवात्मा असून या ज्ञानानें जीवास पूर्णता येऊन तो कृतार्थ होतो, असा या नऊ खंडातील प्रकरणांचा अभिप्राय आहे. हाच ब्रह्मविद्येंतील मुख्य अद्वैत सिद्धान्त होय.

अद्वैत सिद्धान्ताचें प्रतिपादन अध्यायाच्या प्रारंभापासूनच सुरू झालें असून तें अखेरपर्यंत चालू आहे म्हणून हा सहावा अध्याय सर्वच्या सर्व ब्रह्माद्वैताचा प्रतिपादक आहे असें ठरतें. यांतील दृष्टान्त, विषयविवेचन, अवांतर सिद्धान्त इत्यादि सर्व अंगांचा विचार केल्यास भ्रमरूप मायावादाला कोठेंही लेशमात्र जागा दिसत नाहीं. शिंपेवर रुप्याचा भास व्हावा त्याप्रमाणें, सतावर जगदाभास झाला आहे असें मानण्याला या अध्यायांतच काय पण दशोपनिषदांमध्यें कोठें काडीचाही आधार सांपडत नाहीं. अस असतां श्रुतीच्या आधारानेंच मायावादाची उत्पत्ति झाली आहे असें म्हणणें हाच खरोखर भ्रम म्हणजे मायावाद होय, असें म्हटल्यावांचून गत्यन्तरच नाहीं. जगताच्या बुडाशीं एकच एक 'असें सच्चिदानंद ब्रह्मतत्त्व

असून जीवासुद्धां सर्व सृष्टि त्याचीच बनली आहे. ब्रह्मतत्त्व हें सर्वशक्तिमान् असल्यामुळें, नामरूपात्मक सृष्ट पदार्थ व त्यांचे असंख्य गुणधर्म हे सर्व त्या सतापासूनच बनले आहेत. सृष्टपदार्थांच्या गुणभेदानें व्यवहार किंवा व्यावहारिक सत्ता उत्पन्न झाली म्हणजे व्यावहारिक सत्ता देखील सताच्या पारमार्थिक सत्तेतूनच निघाली आहे. म्हणून पारमार्थिक सत्ता व व्यावहारिक सत्ता या एकमेकांस बाधक किंवा विरोधी आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. व अनुभव किंवा वस्तुस्थिति देखील तशी नाहीं. व्यवहारांतील आधिभौतिक, आधिदैविक किंवा आध्यात्मिक दोषांनींच प्रातिभासिक सत्ता उत्पन्न होते, म्हणून ती व्यवहार किंवा परमार्थ या दोहोंशींही विरुद्धच असते; पण व्यवहारिक व पारमार्थिक सत्ता यांची गोष्ट तशी नाहीं. योग्य परिस्थितींत व्यावहारिक व पारमार्थिक सत्ता या एकमेकींशीं पूर्ण अनुकूल असतात, हें श्रुतीनें सताचा व्यावहारिक सत्तेपर्यंत संबंध दाखवून सिद्ध केलें आहे. यावरून अद्वैतसिद्धीला मायावादाची आवश्यकता तर नाहींच, पण उलट या आभासरूप मायावादाच्या विचारसरणीनें श्रुतिप्रतिपदित ब्रह्माद्वैतवाद अत्यंत घोटाळयाचा व दुर्ज्ञेय मात्र झाला आहे. श्रुतीनें विज्ञानांतूनच ब्रह्मज्ञानसंपादनाचा मार्ग दाखविला असल्यामुळें तो पूर्ण बुद्धिग्राह्य असून योग्य अभ्यासानें साध्य होणारा आहे. या मार्गात अद्भुत योगसामर्थ्य, अद्भुत गुरुप्रसाद इत्यादि जादुगिरीची मुळींच आवश्यकता नाहीं. आरुणि ऋषीनें या बुद्धिवादाच्या पद्धतीनेंच श्वेतकेतूला अद्वैत सिद्धान्त समजावून दिला आहे. मायावादाच्या जाळ्यांत न शिरतां श्रेयस्काम साधकानें श्रुतिप्रदर्शित विज्ञानमय व बुद्धिग्राह्य अशा या मार्गाचें अवलंबन केल्यास त्याचें ज्ञान पूर्ण होऊन तो कृतार्थ होईल असा श्रुतीचा उपदेश आहे.

———

## ॥ सप्तमोऽध्यायः ॥

---

### अथ प्रथमः खण्डः ।

**अधीहि भगव इति होपससाद सनत्कुमारं नारदस्तꣳ होवाच यद्वेत्थ तेन मोपसीद ततस्त ऊर्ध्वं वक्ष्यामीति स होवाच ॥ १ ॥**

**भगवः अधीहि इति नारदः सनत्कुमारम् उपससाद ह । तम् उवाच ह । यत् वेत्थ तेन मा उपसीद । ततः ऊर्ध्वम् ते वक्ष्यामि इति ।**

' भगवन् ! मला विद्येचा उपदेश करा,' असें म्हणून नारद सनत्कुमाराकडे गेला. सनत्कुमार ऋषि त्याला म्हणाला, तूं जें म्हणतोस, म्हणजे तुझी विद्या किती झाली आहे ती मला सांग. म्हणजे तुझा अभ्यास झाला असेल त्याच्यापुढें मी तुला शिक्षण देईन ( उपदेश करीन ).

प्रस्तुत मंत्रापासून छांदोग्याच्या सातव्या अध्यायास प्रारंभ होत आहे. या अध्यायांत सनत्कुमार व नारद यांचा संवाद असून, सनत्कुमार ऋषींनीं नारदऋषीला ब्रह्मोपदेश केला आहे. नारद व सनत्कुमार ऋषि पुराण ग्रंथांत विशेष प्रसिद्ध आहेत; तथापि वैदिक वाङ्मयांत देखील यांचीं नांवें आढळून येतात. गीतेमध्यें देवर्षि म्हणून नारदाचा उल्लेख आला आहे.

नारदानें आपणास ज्ञानोपदेश करण्याविषयीं सनत्कुमारांची प्रार्थना केल्यावर, तुझें अध्ययन काय काय झालें आहे तें अगोदर मला सांग म्हणजे तुला जें ज्ञान अद्यापि प्राप्त झालें नसेल तेंच समजावून देईन, असें सनत्कुमारांनीं सांगितलें. असाच प्रश्न याज्ञवल्क्यानें जनकाला केला आहे. याज्ञवल्क्यजनकाचा हा संवाद बृहदारण्यकोपनिषदांत आला आहे.

तेथें अशा तऱ्हेच्या प्रश्नोत्तरांचे पांचसहा मंत्र आले आहेत. 'यत्ते काश्चिदब्रवीत् तच्छृणवाम' असें याज्ञवल्क्यानें जनकाला म्हटलें आहे. ( उ. नि. र. प्र. बृह. अ. ४ ब्रा. १ मं २ पृ. ४६० ते ४६४. ) सनत्कुमारानें देखील नारदाला असाच मार्मिक प्रश्न केला आहे.

**ऋग्वेदं भगवोऽध्येमि यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पञ्चमं वेदानां वेदं पित्र्यꣳ राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यामेतद्भगवोऽध्येमि ॥ २ ॥**

**( सः उवाच ह )। भगवः ऋग्वेदम् यजुर्वेदम् सामवेदम् चतुर्थम् आथर्वणम् पंचमम् इतिहासपुराणम् वेदानाम् वेदम् पित्र्यम् राशिम् दैवम् निधिम् वाकोवाक्यम् एकायनम् देवविद्याम् ब्रह्मविद्याम् भूतविद्याम्, क्षत्रविद्याम् नक्षत्रविद्याम् सर्पदेवजनविद्याम् अध्येमि ।**

तो नारद ऋषि म्हणाला, भगवन् ! ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद चवथा अथर्ववेद, पांचवा इतिहासपुराणें, वेदांचा वेद म्हणजे मीमांसाविद्या, पितरांची विद्या म्हणजे वंशशास्त्र, गणितशास्त्र, भूकंपादि उत्पातविद्या, आकरविद्या म्हणजे खाणींचें शास्त्र, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र आधिदैविक विद्या, श्रौतविद्या ( यज्ञविद्या ), प्राणिशास्त्र, शासनशास्त्र, ज्योतिषशास्त्र, सर्पविद्या म्हणजे यंत्रादि शिल्पशास्त्र, देवजनविद्या म्हणजे कलाकौशल्याचें शास्त्र, हें सर्व मी शिकलों आहे.

स्मृत्यादि प्राचीन ग्रंथांतून चौदा विद्या सांगितल्या आहेत; परंतु नारदानें या मंत्रांत अठरा विद्यांची यादी दिली आहे, त्यावरून विद्यांची संख्या सर्व काळीं सारखीच नसते हें लक्षांत येईल. इतिहास व पुराण यांचा वेगवेगळा उल्लेख बृहदारण्यकामध्यें केला आहे. ( उ. नि. र. प्र. बृह. अ.

२, ब्रा. ४, मं. १०, पृ. ७४ते७६ ). इतिहास व पुराण यांच्या वेगवेगळ्या उल्लेखांवरून त्या दोनही विषयांचें एकीकरण करण्यांत आलेलें नव्हतें असें दिसतें. परंतु या मंत्रांत 'इतिहासपुराणम्' या पदानें त्या दोन विषयांचें एकीकरण दर्शविलें आहे. म्हणून बृहदारण्यकांतील उल्लेखापेक्षां या मंत्रांतील उल्लेख अर्वाचीन असावा असा तर्क करण्यास हरकत नाहीं. नारदानें दिलेल्या यादीवरून आर्यांचें विज्ञानशास्त्र कसें तपशीलवार होतें व वैदिक ऋषींनीं त्याला किती परिणत अवस्थेस आणिलें होतें याविषयीं कोणालाही चांगलीच अटकळ करितां येईल.

**सोऽहं भगवो मन्त्रविदेवास्मि नात्मविच्छ्रुतꣳ ह्येव मे भगवद्दृशेभ्यस्तरति शोकमात्मविदिति सोऽहं भगवः शोचामि तं मा भगवाञ्छोकस्य पारं तारयत्विति तꣳ होवाच यद्वै किंचैतदध्यगीष्ठा नामैवैतत् ॥ ३ ॥**

**भगवः सः अहम् मन्त्रवित् एव अस्मि आत्मवित् न । हि भगवद्दृशेभ्यः मे श्रुतम् एव आत्मवित् शोकम् तरति इति । भगवः सः अहम् शोचामि । तम् मा भगवान् शोकस्य पारम् तारयतु इति । तम् उवाच ह । यत् किम् च एतत् वै अध्यगीष्ठाः एतत् नाम एव ।**

नारद पुढें म्हणाला—भगवन् ! मी फक्त मंत्रवेत्ता ( विज्ञानवेत्ता ) आहे. अध्यात्मवेत्ता नाहीं. परंतु मी आपल्यासारख्यांकडून ऐकलें आहे कीं, आत्मविद्यासंपन्न मनुष्य शोकांतून तरतो म्हणजे दुःखमुक्त होतो. भगवन् ! तो मी दुःखी आहे; तरी मला आपण दुःखाच्या पलीकडे न्यावें. सनत्कुमार ऋषि त्याला म्हणाला कीं, जें कांहीं तूं जाणलें आहेस तें केवळ व्यावहारिक म्हणजे नाममात्र आहे ( तात्त्विक नव्हे ).

नारदानें आपण किती अध्ययन केलें आहे ते सांगून, मी मंत्रवेत्ता आहे आत्मवेत्ता नाहीं, असें स्पष्ट म्हटलें आहे. आधुनिक भाषेंत वाङ्मय

या शब्दासारखाच येथें मंत्र या शब्दाचा अर्थ समजावा. गुप्तपणें बोलणें असा मंत्र या शब्दांतील धात्वर्थ संस्कृत व्याकरणांत सांगितला आहे; परंतु नारदाच्या भाषणांत आलेला मंत्र हा शब्द तशा अर्थाचा दिसत नाहीं. वाङ्मयात्मक बहुतेक विषयांचा मीं अभ्यास केला आहे, पण तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला नाहीं, असा नारदाचा अभिप्राय आहे. सनत्कुमारानें देखील नारदाच्या अध्ययनाला नाम असें म्हटलें आहे. त्यावरूनही मंत्रविद् म्हणजे नारदानें वाङ्मय शाखेचा अभ्यास केला होता असाच अर्थ निश्चित होतो. या मंत्रांतील शोक या शब्दाचा अर्थ मनाची तळमळ असा समजावा. या स्वरूपाचा शोक आत्मज्ञानाच्या योगानेंच नाहींसा होतो. मनाची तळमळ नाहींशी करून तें नेहमीं प्रसन्न ठेवण्याचें सामर्थ्य मनुष्याला आत्मज्ञानाच्या योगानेंच प्राप्त होते. म्हणून मला हा शोक ( मनाची तळमळ ) नष्ट करणाऱ्या ज्ञानाचा उपदेश करा अशी नारदाची प्रार्थना आहे.

**नाम वा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेद आथर्वणश्चतुर्थ इतिहासपुराणः पञ्चमो वेदानां वेदः पित्र्यो राशिर्दैवो निधिर्वाकोवाक्यमेकायनं देवविद्या ब्रह्मविद्या भूतविद्या क्षत्रविद्या नक्षत्रविद्या सर्पदेवजनविद्या नामैवतन्नामोपास्स्वेति ॥ ४ ॥**

नाम वै ऋग्वेदः यजुर्वेदः सामवेदः चतुर्थः आथर्वणः पञ्चमः इतिहास पुराणः वेदानाम् वेदः पित्र्यः राशिः दैवः विधिः वाकोवाक्यम् एकायनम् देवविद्या ब्रह्मविद्या भूतविद्या क्षत्रविद्या नक्षत्रविद्या सर्पदेवजनविद्या एतत् नाम एव । नाम उपास्स्व इति ।

नाम म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, इतिहासपुराण, वेदांचा वेद म्हणजे मीमांसाविद्या, किंवा जय भारत ग्रंथ, पितरांची विद्या म्हणजे वंशशास्त्र, गणितशास्त्र, भूकंपादि उत्पातविद्या, आकर विद्या म्हणजे खाणींचें शास्त्र,

तर्कशास्त्र, अर्थशास्त्र, आधिदैविक विद्या, श्रौतविद्या ( यज्ञ विद्या ), ब्राह्मण धर्माचें शास्त्र, प्राणिशास्त्र, शासनशास्त्र, ज्योतिषशास्त्र, सर्पविद्या म्हणजे यंत्रादि शिल्पशास्त्र, देवजन विद्या म्हणजे कलाकौशल्याचें शास्त्र हें सर्व नाम म्हणजे वाङ्मयच होय. ( म्हणून ) तूं नामाची म्हणजे वाङ्मयाची उपासना कर.

दुसऱ्या मंत्रांतील यादीमारखीच या मंत्रांत विद्यांची यादि आली आहे. इतिहास-पुराण हा पांचवा वेद म्हणून सांगितलें आहे. 'वेदानाम् वेदः' हीं पदें इतिहासपुराण या विषयाचें विशेषण म्हणून घेण्यासारखीं आहेत. मीमांसाविद्या असा त्या पदांचा अर्थ दिला आहे; तथापि त्या पदांनीं स्वतंत्र विद्या न घेतां तें इतिहासपुराण या विषयाचें विशेषण आहे असें समजणें, 'वेदानध्यापयामास महाभारतपञ्चमान्' 'भारतं पञ्चमो वेदः' या पुराणवचनांना अनुसरूनच होईल. विशेषणासारखा अर्थ घेतल्यास वेदांचा वेद असें पांचवें इतिहास-पुराण म्हणजे भारत ग्रंथाचीच कल्पना निश्चित होते. या मंत्रांत नाम हा शब्द वाङ्मय अशा अर्थानेंच आला आहे.

**स यो नाम ब्रह्मेत्युपास्ते यावन्नाम्नो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो नाम ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो नाम्नो भूय इति नाम्नो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ ५ ॥**

**यः नाम ब्रह्म इति उपास्ते यावत् अस्य नाम्नः गतम् तत्र सः यथाकामचारः भवति। यः नाम ब्रह्म इति उपास्ते। भगवः नाम्नः भूयः अस्ति इति। नाम्नः भूयः अस्ति वाव। तत् मे भगवान् ब्रवीतु इति।**

जो शाब्दिक विद्येची बाह्य दृष्टीनें उपासना करितो ( म्हणजे, तीच सर्वांत श्रेष्ठ आहे असें समजून तिचा अभ्यास करितो ) तो भाषापंडित जितकी या शब्दविद्येची गति आहे तेथपर्यंत यथाकाम-

चार म्हणजे आपल्या इच्छेप्रमाणें संचार करणारा असतो, अर्थात् त्याची तेथपर्यंत गति अव्याहत असते. तो नामरूपी ब्रह्माची उपासना करितो. भगवन्, त्या नामविद्येपेक्षां अधिक कांहीं आहे काय? ( असें नारद विचारता झाला ) तेव्हां सनत्कुमार म्हणाले, नामविद्येपेक्षां अधिक असा विषय आहेच. ( नारद म्हणतो ), तें मला आपण सांगावें.

प्रस्तुत मंत्रांत वाङ्मयाचें महत्त्व फारच मार्मिक रीतीनें सांगितलें आहे. नारदानें जितक्या शास्त्रांचा उल्लेख केला आहे त्या सर्व शास्त्रांची रूप रेषा तरी ज्याला नीट समजली असेल तोच वाङ्मयांत खरा पंडित होऊं शकेल व त्यालाच खऱ्या अर्थानें भाषाकोविद् असें म्हणतां येईल, असा सनत्कुमार ऋषीचा अभिप्राय आहे. या मंत्रांत सांगितलेल्या शास्त्रांचें अध्ययन केलें असलें तरच त्या मनुष्याची बुद्धि वाङ्मयांत सर्वगामी संचार करूं शकेल, असें सनत्कुमाराच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. नाम-ब्रह्माचें--वाङ्मयाचें महत्त्व ऐकल्यावर या नामब्रह्मापेक्षां अधिक महत्त्वाचें ज्ञान आहे काय? असा नारदाचा प्रश्न आहे व त्याला सनत्कुमारानें होय असें उत्तर दिलें तेव्हां, तें ज्ञान आपणांला सांगावें अशी नारदानें सनत्कुमार ऋषीला विनंति केली आहे.

## पहिल्या खण्डाचा सारांश

प्रस्तुत खंडाच्या प्रारंभापासून नारद व सनत्कुमार यांच्या संवादरूप आख्यानास सुरुवात झाली आहे. सनकादि ऋषि पुराणग्रंथांत संन्यास-मार्गाचे प्रवर्तक म्हणून प्रसिद्ध आहेत; पण ते ऋषिच होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. येथें नारद किंवा सनत्कुमार यांना त्यांच्या पूर्ववृत्ताचें दर्शक असें कोणतेंही विशेषण दिलेलें नाहीं. त्यामुळें या दोघांची भेट कोठें व कशी झाली याविषयीं कांहींच तर्क करितां येत नाहीं.

आपणास आत्मज्ञानाचा उपदेश करावा अशी नारदानें प्रार्थना केल्यावर, तुझें अध्ययन किती झालें आहे तें अगोदर सांग, असा सनत्कुमारानें नारदाला प्रश्न केला आहे. त्यावरून नारद हा विद्याध्ययन करणारा विद्यार्थी असून सनत्कुमार हा अध्यापक होता म्हणजे अध्ययन-अध्यापन-रूप गुरुशिष्यसंबंध त्या दोघांत होता असें निःसंशय ठरतें. गुरूनें शिष्याच्या मस्तकावर हस्त ठेवून ब्रह्म दाखविण्याची क्लृप्ति वैदिक ब्रह्मविद्येंत कोठेंही स्वीकारलेली नाहीं, ही गोष्ट या उदाहरणावरून देखील चांगलीच लक्षांत येतें. नारदाचें पुष्कळ अध्ययन झालें होतें, असें त्यानें दिलेल्या यादीवरून दिसतें. या यादींत आठरा शास्त्रांचीं नांवें आलीं आहेत. इतक्या शास्त्रांचें अध्ययन एका व्यक्तीच्या हातून होणें शक्य कसें आहे, अशी शंका मनांत आल्यावांचून राहात नाहीं. या शंकेचें उत्तर भावनामय अशा जुन्या पद्धतीनें पुढीलप्रमाणें दिलें जातें:—नारद व सनत्कुमार हीं माणसेंच असलीं तरी, तीं पूर्वींच्या कल्पांतील-जगांतील होतीं; त्या वेळचीं माणसें वेगळ्या प्रकारचीं असून तीं एकपाठी होतीं; शिवाय त्यांचें आयुष्य दहादहा वीसवीस हजार वर्षांचें होतें; अशा अनेक कारणांनीं नारदासारख्यांना इतकीं शास्त्रें आत्मसात् करणें शक्य होतें असें मानण्यास हरकत नाहीं. हें उत्तर केवळ भावनेवरच अवलंबून दिलें जात असल्यामुळें, त्याचा बुद्धिवादाच्या दृष्टीनें विचार करण्याचें कारणच नाहीं. औपनिषद् विद्येंत अशी भावनामय दृष्टि कोठेंच स्वीकारली नाहीं. दशोपनिषदांतील वैदिक ब्रह्मविद्या भावनाप्रधान नसून बुद्धिप्रधान आहे, हें आतांपर्यंत अनेक ठिकाणीं निःसंदिग्धपणें सिद्ध झालें आहे. म्हणून या प्रश्नाचा विचार बुद्धिवादानेंच केला पाहिजे. नारद सनत्कुमारांचा संवाद ज्या काळात घडून आला त्या वेळीं नारदानें सांगितलेल्या यादींतील शास्त्रांचें स्वरूप अगदींच सूत्रमय असलें पाहिजे, यांत शंका नाहीं. कारण एक तर त्या वेळीं लेखनकलेचा प्रसार झालेला नसल्यामुळें, सर्व विद्यांचें अध्ययन-अध्यापन तोंडपाठी परंपरेनेंच चालू होतें. अशा परंपरेंत शास्त्रीय वाङ्मयाचें

स्वरूप शक्य तितकें थोडक्यांत बनविलेलें असतें, ही गोष्ट प्राचीन शास्त्र-ग्रंथांवरून सहज सिद्ध होण्याजोगी आहे. निरनिराळ्या शास्त्रांवरील आधुनिक काळांत झालेल्या ग्रंथरचनेचा विस्तार लक्षांत घेऊन नारदाच्या अध्ययनाचा विचार करणें बरोबर नाहीं. शास्त्रीय विचारांचे दर्शक असे कांहीं खुणेचे शब्द ( संज्ञा ) ठरवून शास्त्राची रूपरेषा अगदीं थोडक्यांत तयार करण्याची एक अजब तऱ्हा पूर्वींच्या ऋषींनीं बसविली होती. त्यामुळें एका मनुष्याला अनेक विद्या संपादन करणें शक्य झालें होतें. तथापि अशा रीतीनें अनेक शास्त्रांचें अध्ययन करणें शक्य असलें तरी, ती गोष्ट सहजासहजीं साध्य होण्याइतकी सुलभ होती असें समजूं नये. शास्त्रीय वाङ्मय थोडें असलें तरी, त्यांतील विचार अत्यंत खोल व गुंतागुंतीचे असल्यामुळें बुद्धींत अनेक शास्त्रांचा संग्रह करावयाचा झाल्यास बुद्धिमत्ता दिव्यच असावयास पाहिजे. अशा असाधारण बुद्धीला शिकस्तीचा प्रयत्न उत्कृष्ट तपश्चर्या इत्यादि सद्गुणांची जोड असेल तरच अनेक शास्त्रांचें अध्ययन होणें शक्य होतें. हे सर्व सद्गुण नारदाच्या ठिकाणीं पूर्णपणें वास करीत असल्यामुळें त्याला अनेक विद्यांचें अध्ययन करितां आलें. अशा अनेक विद्यांचा अभ्यास करून देखील नारदाच्या अंतःकरणाची तळमळ थांबली नाहीं. आपलें ज्ञान अपुरें आहे असें वाटून त्याची बुद्धि ज्ञानाच्या बाबतींत अतृप्तच राहिली. ही ज्ञानलालसा तृप्त होऊन आपल्या मनाला प्रसन्नता प्राप्त व्हावी या हेतूस्तव नारदानें सनत्कुमार ऋषींची प्रार्थना केली व ऋषीनें त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला उपदेश करण्याचें मान्य करून त्याच्याशीं चर्चा करण्यास प्रारंभ केला.

---

## अथ द्वितीयः खण्डः ।

**वाग्वाव नाम्नो भूयसी वाग्वा ऋग्वेदं विज्ञापयति यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पञ्चमं वेदानां वेदं पित्र्यꣳ राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां**

**क्षत्रविद्या॰ सर्पदेवजनविद्यां दिवं च पृथिवीं च वायुं चाकाशं चापश्च तेजश्च देवा॰श्च मनुष्या॰श्च पशू॰श्च वया॰सि च तृणवनस्पतीञ्श्वापदान्याकीटपतङ्गपिपीलकं धर्मं चाधर्मं च सत्यं चानृतं च साधु चासाधु च हृदयज्ञं चाहृदयज्ञं च यद्वै वाङ्नाभविष्यन्न धर्मो नाधर्मो व्यज्ञापयिष्यन्न सत्यं नानृतं न साधु नासाधु न हृदयज्ञो नाहृदयज्ञो वागेवैतत्सर्वं विज्ञापयति वाचमुपास्स्वेति॥१॥**

वाक् वाव नाम्नः भूयसी। वाक् वै ऋग्वेदम् यजुर्वेदम् सामवेदम् चतुर्थम् आथर्वणम् पञ्चमम् इतिहासपुराणम् वेदानाम् वेदम् पित्र्यम् राशिम् दैवम् निधिम् वाकोवाक्यम् एकायनम् देवविद्याम् ब्रह्मविद्याम् भूतविद्याम् क्षत्रविद्याम् नक्षत्रविद्याम् सर्पदेवजनविद्याम् दिवम् च पृथिवीम् च वायुम् च आकाशम् च आपः च तेजः च देवान् च मनुष्यान् च पशून् च वयांसि च, तृणवनस्पतीन् श्वापदानि आकीटपतङ्गपिपीलकम् धर्मम् च अधर्मम् च सत्यम् च अनृतम् च साधु च असाधु च हृदयज्ञम् च अहृदयज्ञम् च विज्ञापयति। यत् वै वाक् न अभविष्यत् न धर्मः न अधर्मः न सत्यम् न अनृतम् न साधु न असाधु न हृदयज्ञः न अहृदयज्ञः ( व्यज्ञापयिष्यत् )। वाक् एव एतत् सर्वम् विज्ञापयति । वाचम् उपास्स्व इति ।

वाणी हीच नामापेक्षां अधिक आहे. वाणी हीच ऋग्वेदाची बोधक आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, पांचवा इतिहासपुराणें, वेदांचा वेद म्हणजे मीमांसाविद्या किंवा जयभारतग्रंथ, पितरांची विद्या म्हणजे वंशशास्त्र, गणितशास्त्र, भूकंपादि उत्पातविद्या, खाणींचें शास्त्र, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र, आधिदैविक विद्या, यज्ञविद्या ब्राह्मणधर्माचें शास्त्र, प्राणिशास्त्र, शासनशास्त्र, ज्योतिषशास्त्र, यंत्रादि शिल्पशास्त्र, द्युलोक, पृथ्वी, वायु, आकाश, जल, तेज, देव, मनुष्य, पशु, पक्षी, औषधि, वनस्पति वगैरे, श्वापदें, किडा, माशी, मुंगीसुद्धां धर्म अधर्म ( पुण्य—पाप ), खरें खोटें,

चांगलें वाईट, मर्मज्ञ अमर्मज्ञ ( हें सर्व वाणीच्या योगानेंच मनुष्याला समजतें ). जर वाणी नसती तर, धर्म अधर्म, खरें खोटें, चांगलें वाईट, मर्मज्ञ अमर्मज्ञ, हे सर्व विषय समजले नसते. ( म्हणजे वाणी ही या सर्व विषयांची ज्ञापक, म्हणजे बोधक आहे. ) वाणीच हें सर्व समजाविते. म्हणून तूं वाणीचीच उपासना कर.

मनुष्याच्या वाक्शक्तीचें महत्त्व या मंत्रांत वर्णिलें आहे. विद्या व कला या सर्व वाङ्मयावरच अवलंबून असतात; आणि हीच वाङ्मयाची मूळशक्ति होय. आहारनिद्रादि सर्व व्यवहार प्राणिमात्रांचे सारखेच असले तरी, मानवी प्राण्यानें वाक्शक्तीच्या जोरावर आपलें वैशिष्ट्य प्रस्थापित केलें आहे. वाणीचे चार भेद कल्पून परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी अशीं नांवेंही देण्यांत आलीं आहेत. हे सूक्ष्म भेद सर्वांनाच कळण्यासारखे नसले तरी, वाणीचे व्यक्त व अव्यक्त हे दोन प्रकार प्रत्येकाला कळण्याजोगे आहेत. आवाज न काढतां व कोणताही आभ्यंतर किंवा बाह्य प्रयत्न न करितां केवळ मनांतल्या मनांत मनुष्याला बोलतां येतें. हेंच वाणीचें अव्यक्त स्वरूप होय. ज्ञानाचा कोणताही आकार शब्दावांचून–वाणीवांचून स्पष्ट होत नाहीं. म्हणूनच भाषाशास्त्रकारांनीं नाम व आकृति यांचा नित्य संबंध मानला आहे. अशा या वाक्शक्तीचें व्यापक स्वरूप श्रुतीनें या जन्मांत फारच उत्कृष्ट वर्णन केलें आहे.

**स यो वाचं ब्रह्मेत्युपास्ते यावद्वाचो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो वाचं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो वाचो भूय इति वाचो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २॥**

**सः यः वाचम् ब्रह्म इति उपास्ते वाचः यावत् गतम् अस्य तत्र यथाकामचारः भवति । यः वाचम् ब्रह्म इति उपास्ते । भगवः । वाचः भूयः अस्ति इति । वाचः वाव भूयः अस्ति इति । तत् मे भगवान् ब्रवीतु इति ।**

जो वाक्‌रूपी ब्रह्माची उपासना करितो तो, वाणीची जेथपर्यंत गति असते तेथपर्यंत जातो. ( त्याची गति अव्याहत असते ). जो वाक्‌रूपी ब्रह्माची उपासना करितो त्याला हें फळ मिळतें, ( नारद म्हणतो) भगवन् ! वाणीपेक्षां अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो ) वाणीपेक्षां अधिक आहे. ( नारद म्हणतो ) तें मला आपण सांगावें.

प्रस्तुत मंत्रांत वाणीरूप ब्रह्माच्या उपासनेचें फल सांगितलें आहे. ज्या देवतेची म्हणजे शक्तीची उपासना करावी ती देवता जितकी व्यापक असेल तेवढ्या क्षेत्रांत उपासकाची गति अव्याहत असते. म्हणून वाणीरूप ब्रह्माची उपासना करणारा मनुष्य वाणी देवतेच्या क्षेत्रांत सर्वगामी होतो.

## अथ तृतीयः खण्डः ।

**मनो वाव वाचो भूयो यथा द्वे वामलके द्वे वा कोले द्वौ वाक्षौ मुष्टिरनुभवत्येवं वाचं च नाम च मनोऽनुभवति स यदा मनसा मनस्यति मन्त्रानधीयीयेत्यथाधीते कर्माणि कुर्वीयेत्यथ कुरुते पुत्रा ँश्च पशू ँश्चेच्छेयेत्यथेच्छत इमं च लोकममुं चेच्छेयेत्यथेच्छते मनो ह्यात्मा मनो हि लोको मनो हि ब्रह्म मन उपास्स्वेति ॥ १ ॥**

**मनः वाव वाचः भूयः । यथा वै मुष्टिः द्वे वा आमलके द्वे वा कोले द्वौ वा अक्षौ अनुभवति एवम् मनः वाचम् च नाम च अनुभवति । सः यदा मनसा मनस्यति मन्त्रान् अधीयिय इति अथ अधीते। कर्माणि कुर्वीय इति अथ कुरुते। पुत्रान् च पशून् च इच्छेय इति अथ इच्छते । इमम् च अमुम् च लोकम् इच्छेय इति अथ इच्छते । मनः हि आत्मा । मनः हि लोकः । मनः हि ब्रह्म । मनः उपास्स्व इति ।**

मन हेंच वाणीहून श्रेष्ठ आहे. ज्याप्रमाणें एक मूठ, दोन आवळे, दोन बोरें किंवा दोन बेहडे अनुभविते म्हणजे एकदम धरते,

त्याप्रमाणें मन हें वाणी व नाम म्हणजे शब्द या दोहोंना एकाच वेळीं अनुभवितें. जेव्हां कोणी मनांत आणितो कीं, आपण मंत्र पठण करावेत म्हणजे तो पठण करितो. कर्में करावीं असा संकल्प करितो तेव्हां तीं करितो. पुत्र, पशु यांची इच्छा झाल्यास तीं इच्छितो. इहलोक व परलोक यांची इच्छा झाल्यास, ते इच्छितो. मन हा आत्मा आहे. मन हा व्यवहार आहे. मन हें ब्रह्म आहे. मनाची उपासना कर.

ममाचें क्षेत्र नाम व वाणी या दोहोंपेक्षांही मोठें आहे. वाणी व भाषा या दोहोंचें आकलन मनाला एकसमयावच्छेदानें करितां येतें. याविषयीं मंत्रांत दिलेले दृष्टान्त मंत्रकर्त्या ऋषीच्या अरण्यवासाचे सूचक दिसतात. ज्याप्रमाणें लहानशा दोन वस्तु मनुष्याला आपल्या हाताच्या मुठींत एकदम घेतां येतात, तद्वतच वाक्शक्ति व वाङ्मय यांचें मनाला एकदम आकलन करितां येतें. मनुष्याच्या ऐहिक व पारलौकिक इच्छा–संकल्प करण्याची शक्ति–मनामध्येंच असते व मनाचे हे संकल्पच मनुष्याच्या व्यवहाराला कारणीभूत होतात. म्हणून मनुष्याच्या सर्व व्यवहारांचें मन हेंच सूत्र-चालक असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच अभिप्रायानें कठोप-निषदांत मन हें मानवी शरीररूपी रथांतील बुद्धिरूप सारथ्याच्या हातांतील प्रग्रह ( लगाम ) आहे असें म्हटलें आहे ( उ. नि. र. प्र. कठोप. अ. १ वल्ली ३ मंत्र ३ पृ. ९९ व १०० ).

**स यो मनो ब्रह्मेत्युपास्ते यावन्मनसो गतं तत्रास्य यथाकाम-चारो भवति यो मनो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो मनसो भूय इति मनसो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

**यः मनः ब्रह्म इति उपास्ते सः मनसः यावत् गतम् अस्य तत्र यथा-कामचारः भवति । यः मनः ब्रह्म इति उपास्ते । भगवः मनसः भूयः अस्ति इति । मनसः वाव भूयः अस्ति इति । तत् मे भगवान् ब्रवीतु इति ।**

जो मनोब्रह्माची उपासना करितो तो, मनाची जेथपर्यंत गति असते तेथपर्यंत जातो ( त्याची गति अव्याहत असते ). जो मनाची ब्रह्मदृष्टीनें उपासना करितो ( त्याला वरीलप्रमाणें फल प्राप्त होतें ). ( नारद म्हणतो— ) भगवन् ! मनापेक्षां अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो— ) मनापेक्षां अधिक मोठें तत्त्व आहे. ( नारद म्हणतो— ) भगवन् ! तें मला सांगावें.

मनाची उपासना केल्यानें मनुष्याला कोणती फलप्राप्ति होते तें या मंत्रांत सांगितलें आहे. फलप्राप्तीचें स्वरूप जवळजवळ सर्वत्र सारखेंच आहे. वाव हा शब्द निश्चयार्थक समजावा. मराठींत त्याचा विशेष उपयोग नसल्यानें प्रत्येक ठिकाणीं त्या शब्दाचा अर्थ दिलेला नाहीं. भाषा, वाणी किंवा मन यांची ब्रह्मदृष्टीनें उपासना करावयास सांगितलें आहे. ब्रह्मदृष्टि म्हणजे अत्यंत श्रेष्ठ व व्यापक असें स्वरूप समजावें. मन इत्यादिकांना पूज्य समजूनच त्यांचा अभ्यास करावा असा ब्रह्मदृष्टि या शब्दांतील अभिप्राय आहे.

## अथ चतुर्थः खण्डः ।

**संकल्पो वाव मनसो भूयान्यदा वै संकल्पयतेऽथ मनस्यत्यथ वाचमीरयति तामु नाम्नीरयति नाम्नि मन्त्रा एकं भवन्ति मन्त्रेषु कर्माणि ॥ १ ॥**

**संकल्पः वाव मनसः भूयान् । यदा वै संकल्पयते अथ मनस्यति । वाचम् ईरयति । ताम् उ नाम्नि ईरयति । नाम्नि मन्त्राः मन्त्रेषु कर्माणि एकम् भवन्ति ।**

संकल्प हाच मनापेक्षां श्रेष्ठ आहे. ज्या वेळीं कोणी संकल्प करितो तेव्हां त्याच्या मनांत येतें आणि तो त्या संकल्पानें वाणी

उच्चारतो, ती नांवाचे ठिकाणीं म्हणजे शब्दस्वरूपांत उच्चारतो. शब्दांमध्यें मंत्र एकत्र होतात आणि मंत्रांमध्यें कर्में एकत्र होतात.

संकल्प हें इच्छाशक्तीचें स्वरूप आहे. या शक्तीचा मनाप्रमाणें बुद्धीशीं देखील संबंध असतो. म्हणून ती मनापेक्षां मोठी आहे, असें या मंत्रांत सांगितलें आहे. संकल्पानेंच वाणीला प्रेरणा मिळते. वाणींतून भाषा प्रगट होते. भाषेंतूनच मंत्र निर्माण होतात. आणि हे मंत्रच मनुष्याच्या चांगल्या व्यवहारांचे मार्गदर्शक असतात. श्रौतस्मार्त कर्मांमध्यें म्हणावीं लागणारीं वाक्यें एवढाच मंत्र शब्दाचा अर्थ येथें विवक्षित नाहीं. कर्म हा शब्द अगदींच विशेषणरहित असल्यानें तो व्यावहारिक कर्मांचाहि बोधक आहे. म्हणून मंत्रांचा व्यवहारांशीं संबंध जोडण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. वेदांत नुसतें याज्ञिक कर्मच सांगितलेलें नसून सर्व प्रकारचे मानवी व्यवहार त्यांत वर्णिले आहेत. म्हणून मंत्र म्हणजे श्रुतिवचनें घेतलीं तरी, तीं मानवी व्यवहारास मार्गदर्शक आहेत असेंच ठरतें. मनुष्यानें कोणतेंही कार्य करितांना मंत्रांचा विचार केल्यास ते त्याला अंगीकृत कार्यांत मार्गदर्शक होतील यांत शंका नाहीं. याप्रमाणें संकल्पाचा संबंध मनुष्याच्या व्यवहारापर्यंत कसा येऊन पोहोंचतो तें दाखवून, सनत्कुमाराने त्याचें महत्त्व सिद्ध केलें आहे.

**तानि ह वा एतानि संकल्पैकायनानि संकल्पात्मकानि संकल्पे प्रतिष्ठितानि समक्लृपतां द्यावापृथिवी समकल्पेतां वायुश्चाकाशं च समकल्पन्तापश्च तेजश्च तेषाँ संक्लृप्त्यै वर्षँ संकल्पते वर्षस्य संक्लृप्त्या अन्नँ संकल्पतेऽन्नस्य संक्लृप्त्यै प्राणाः संकल्पन्ते प्राणानाँ संक्लृप्त्यै मन्त्राः संकल्पन्ते मन्त्राणाँ संक्लृप्त्यै कर्माणि संकल्पन्ते कर्मणाँ संक्लृप्त्यै लोकः संकल्पते लोकस्य संक्लृप्त्यै सर्वँ संकल्पते स एष संकल्पः संकल्पमुपास्स्वेति ॥ २ ॥**

**तानि एतानि संकल्पैकायनानि संकल्पात्मकानि संकल्पे प्रतिष्ठितानि ह वै । द्यावापृथिवी समक्लृपताम् । वायुः च आकाशम् च समकल्पेताम् । आपः च तेजः च समकल्पन्त । तेषाम् संक्लृप्त्यै वर्षम् संकल्पते । वर्षस्य संक्लृप्त्यै अन्नम् संकल्पते । अन्नस्य संक्लृप्त्यै प्राणाः संकल्पन्ते । प्राणानाम् संक्लृप्त्यै मन्त्राः संकल्पन्ते । मन्त्राणाम् संक्लृप्त्यै कर्माणि संकल्पन्ते । कर्मणाम् संक्लृप्त्यै लोकः संकल्पते । लोकस्य संक्लृप्त्यै सर्वम् संकल्पते । सः एषः संकल्पः । संकल्पम् उपास्स्व इति ।**

तीं हीं सर्व ( कर्मे ) संकल्परूपी एका स्थानांतच वास्तव्य करणारीं असून संकल्पामध्यें स्थिर होणारीं आहेत. द्युलोक व भूलोक संकल्पयुक्त आहेत. वायु व आकाश हें देखील संकल्पयुक्त असतें. जल व तेज संकल्पयुक्त असतात. त्यांच्या संकल्पाकरितां पर्जन्यदेखील संकल्पयुक्त होतो. पर्जन्याच्या संकल्पाकरितां अन्न संकल्पयुक्त होतें. अन्नाच्या संकल्पाकरितां प्राण संकल्पयुक्त होतात. प्राणांच्या संकल्पाकरितां मंत्र ( मंत्रस्थ ज्ञानविज्ञान ) संकल्पयुक्त होतात. मंत्रांच्या संकल्पाकरितां कर्मे संकल्पयुक्त होतात. कर्मांच्या संकल्पाकरितां व्यवहार संकल्पयुक्त होतो. व्यवहारांच्या संकल्पाकरितां सर्व संकल्पयुक्त होतें. तो हा संकल्प इतका सर्वव्यापी आहे. त्या संकल्पाची उपासना कर.

पूर्वीच्या मंत्रांत संकल्पाचें प्रेरणासामर्थ्य मनापासून कर्मापर्यंत कसें व्यापून राहिलें आहे तें सांगितलें आहे. मनुष्याच्या सर्व व्यवहारांचें संकल्प हेंच मूळ आहे. त्या संकल्पशक्तीची व्यापकता नुसती मानवी जीवनक्रमापुरतीच नसून ती सर्व सृष्टीला व्यापून राहिली असल्याचें या मंत्रांत दर्शविलें आहे. मंत्राच्या पहिल्या वाक्यांत पूर्वीच्या विवेचनाचा अनुवाद केला आहे. त्यापुढें समक्लृपतां द्यावापृथिवी इत्यादि वाक्यांत द्युलोक, पृथ्वी, वायु, आकाश, जल व तेज हे सृष्टीचे मुख्य घटकावयव देखील

संकल्पयुक्त आहेत असें सांगितलें आहे. जगामध्यें ज्या भौतिक घडामोडी होतात त्या सर्वांच्या बुडाशीं ही संकल्पशक्ति-इच्छाशक्ति आहे. म्हणजे या घडामोडी निवळ निर्हेतुक किंवा यांत्रिक स्वरूपाच्या नाहींत. एकंदर सृष्टिव्यापाराचा हेतु काय, या गोष्टीची अटकळ जरी मनुष्याला नीटशी करिता आली नाहीं तरी, तेवढ्यावरून सृष्टिव्यापार निर्हेतुकच आहे असा निश्चित सिद्धान्त करणें बरोबर नाहीं. मनुष्याला जें समजत नाहीं तें जगांतच नाहीं असें म्हणणें अशास्त्रीय आहे. सृष्टीच्या मूळ कारणांतच इच्छाशक्तीचा संबंध असल्यामुळें तिचें सृष्टिकार्यांत अस्तित्व मानणें ओघानेंच प्राप्त होतें. म्हणून आकाशादिकांमध्यें संकल्पाचा संबंध असल्याचें श्रुतीनें येथें सांगितलें आहे. याप्रमाणें द्यावापृथिवी इत्यादि तत्त्वें संकल्पयुक्त आहेत असें ठरल्यावर, त्यांचे व्यापार त्या संकल्पाला अनुसरूनच होतात, हें म्हणणें क्रमप्राप्तच आहे. वृष्टि, अन्न, प्राण, मंत्र, कर्म, आणि व्यवहार या गोष्टी संकल्पपूर्वकच चालतात असें श्रुतीनें सांगितलें आहे. म्हणजे पंचमहाभूतांच्या संकल्पानेंच वृष्टि होते; वृष्टीच्या संकल्पानें अन्न उत्पन्न होतें; अन्नापासून प्राण व प्राणापासून मंत्र होतात; मंत्रांच्या योगानें कर्माला प्रेरणा मिळते व कर्माच्या योगानें सर्व मानवी व्यवहार घडून येतो. अशी ही संकल्पसामर्थ्यानें गुंफलेली पिण्डब्रह्माण्डाच्या व्यवहाराची सांखळी आहे. 'संक्लृप्त्यै' हें चतुर्थीचें रूप आहे. चतुर्थीचा अर्थ हेत्वर्थी पंचमी किंवा तृतीयेसारखा करण्यास हरकत नाहीं. अशीं उदाहरणें दशोपनिषदांत अनेक ठिकाणीं आलीं आहेत. या सर्व विवेचनावरून संकल्पशक्ति-इच्छाशक्ति कशी सर्वव्यापी आहे तें चांगलें लक्षांत येतें. म्हणून मनुष्यानें या संकल्पसामर्थ्याची उपासना अवश्य करावयास पाहिजे असा या मंत्राचा अभिप्राय आहे.

**स यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्ते संक्लृप्तान्वै स लोकान्ध्रुवान्ध्रुवः प्रतिष्ठितान्प्रतिष्ठितोऽव्यथमानानव्यथमानोऽभिसिध्यति यावत्संकल्पस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्ते-**

ऽस्ति भगवः संकल्पाद्भूय इति संकल्पाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ ३ ॥

सः यः संकल्पम् ब्रह्म इति उपास्ते सः वै संक्लृप्तान् लोकान् अभिसिध्यति। ध्रुवः ध्रुवान् प्रतिष्ठितः प्रतिष्ठितान् अव्यथमानः अव्यथमानान् अभिसिध्यति। यावत् संकल्पस्य गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति। यः संकल्पम् ब्रह्म इति उपास्ते ( तस्य सर्वम् भवति )। भगवः संकल्पात् भूयः अस्ति इति। संकल्पात् वाव भूयः अस्ति इति। भगवान् तत् मे ब्रवीतु इति।

जो कोणी संकल्पाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो तो खरोखर इच्छित लोकांना प्राप्त होतो. स्थिर संकल्पांचा उपासक स्थिर लोकांना प्राप्त होतो. प्रतिष्ठित संकल्पाचा उपासक प्रतिष्ठित ( आधाररूप ) सन्मानरूप लोकांना प्राप्त होतो. निर्दुःख संकल्पाचा उपासक दुःखरहित लोकांना जातो. संकल्पाची जेथपर्यंत गति असते तेथपर्यंत याची गति अव्याहत असते. जो संकल्पब्रह्माची उपासना करितो त्याला हें फल मिळतें. ( नारद म्हणतो— )भगवन् ! संकल्पाहून अधिक श्रेष्ठ कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो— ) संकल्पाहून अधिक श्रेष्ठ तत्त्व आहे. ( नारद म्हणतो— ) भगवन् ! तें मला सांगा.

संकल्पाच्या उपासनेचें फल या मंत्रांत सांगितलें आहे. या फलश्रुतीचें स्वरूप सर्व ठिकाणीं जवळजवळ सारखेंच आहे. फलाचें वर्णन सोपपत्तिक असून तें बुद्धिवादास जुळण्यासारखेंच आहे. मनुष्य स्थिरसंकल्प असेल तर त्याच्या सर्व व्यवहारांत स्थैर्य उत्पन्न होतें व संकल्पाचें स्थैर्य हेंच यशस्वी कर्तृत्वाचें मूळ असतें. अशा स्थिर संकल्पाला गीतेनें व्यवसात्मक बुद्धि असें म्हटलें आहे.

---

## अथ पञ्चमः खण्डः ।

**चित्तं वाव संकल्पाद्भूयो यदा वै चेतयतेऽथ संकल्पयतेऽथ मनस्यत्यथ वाचमीरयति तामु नाम्नीरयति नाम्नि मन्त्रा एकं भवन्ति मन्त्रेषु कर्माणि ॥ १ ॥**

**चित्तम् वाव संकल्पात् भूयः । यदा वै चेतयते अथ संकल्पयते अथ मनस्यति अथ वाचम् ईरयति । ताम् उ नाम्नि ईरयति । नाम्नि मन्त्राः एकम् भवन्ति । मन्त्रेषु कर्माणि ।**

चित्त हेंच संकल्पापेक्षां अधिक आहे. जेव्हां हृदयामध्यें चेतना उत्पन्न होते तेव्हां संकल्प उत्पन्न होतो. नंतर मनांत आणितो (इच्छितो). मग वाणीची क्रिया सुरू होते. त्या वाणीला शब्दरूपानें उच्चारतो. शब्दांमध्यें मंत्र एकत्र होतात. मंत्रांमध्यें कर्में एकत्र होतात.

प्रस्तुत मंत्रांत चित्ताचें महत्त्व सांगितलें आहे. यांतील चित्त शब्दाचा अर्थ बुद्धीची चेतना ( चलन ) असा समजावा. बुद्धींत इच्छा उत्पन्न झाल्यापासून तिला निश्चयाचें स्वरूप येईपर्यंत जी विचारांची चळवळ होते ती चेतना किंवा चित्त होय. या विचारानंतरच संकल्प तयार होतो. तेथपासून पुढें कर्मापर्यंत क्रमाक्रमानें वाक्शक्ति, भाषा, मंत्र इत्यादिकांची सांखळी बनते. तिचें वर्णन चवथ्या खण्डाच्या पाहिल्या मंत्रांत आलेंच आहे.

**तानि ह वा एतानि चित्तैकायनानि चित्तात्मानि चित्ते प्रतिष्ठितानि तस्माद्यद्यपि बहुविदचित्तो भवति नायमस्तीत्येवैनमाहुर्यदयं वेद यद्वा अयं विद्वान्नेत्थमचित्तः स्यादित्यथ यद्यल्पविच्चित्तवान्भवति तस्मा एवोत शुश्रूषन्ते चित्तꣳ ह्येवैषामेकायनं चित्तमात्मा चित्तं प्रतिष्ठा चित्तमुपास्स्वेति ॥ २ ॥**

**तानि ह वै एतानि चित्तैकायनानि चित्तात्मानि चित्ते प्रतिष्ठितानि। तस्मात् यदि अपि बहुविद् अचित्तः भवति। यत् अयम् वेद न अयम् अस्ति इति एनम् आहुः। यत् वै अयम् विद्वान् न इत्थम् अचित्तः स्यात्। अथ अल्पवित् चित्तवान् भवति तस्मै एव शुश्रूषन्ते। चित्तम् हि एषाम् एकायनम्। चित्तम् आत्मा। चित्तम् प्रतिष्ठा। चित्तम् उपास्स्व इति।**

ते हे सर्व विषय एका चित्तामध्येंच राहणारे आहेत. म्हणून जरी मोठा विद्वान् असला आणि तो जर चित्तशून्य असेल तर त्याला जें ज्ञान आहे तें त्याचे ठिकाणीं नाहीं म्हणजे त्याला समजलेलें नाहीं म्हणजे हा पढतमूर्ख आहे असें त्याला म्हणतात. जो खरा विद्वान् असतो तो चित्तशून्य असणार नाहीं. तो जर अल्पज्ञ असून चित्तवान् असेल तर त्याच्याजवळ श्रवण करण्याची इच्छा करितात. कारण, वरील सर्व विषयांचें चित्त हें अद्वितीय स्थान आहे. चित्त हा आत्मा आहे. चित्त हाच आधार आहे. म्हणून चित्ताचीच तूं उपासना कर ( असें सनत्कुमार ह्मणाला ).

चित्त म्हणजे चेतना आणि चेतना म्हणजे बुद्धीचा विचाररूप व्यापार असें मागील मंत्राच्या विवरणांत दाखविलें आहे. त्यावरून सदसद्विवेक म्हणजेच चित्त होय असा अर्थ निश्चित करितां येतो. कारण सदसद्विवेकरूप चेतनव्यापारानंतरच मनुष्याचा निश्चयरूप संकल्प होतो, हा अर्थच श्रुतीला या मंत्रांत विवक्षित आहे, असें या मंत्रांतील चित्ताच्या वर्णनावरून कोणाच्याही सहज लक्षांत येईल. मनुष्य कितीही विद्वान् असला आणि तो जर अविवेकी अविचारी असेल तर तो पढतमूर्खच ठरतो. आणि विचारशील असा अल्प विद्या असलेला मनुष्य देखील लोकांच्या आदरास पात्र होतो. यावरून श्रुतीनें वर्णिलेलें विवेकरूप चित्ताचें महत्त्व सयुक्तिक व अनुभवसिद्ध आहे असेंच ठरतें. योग्यायोग्य विचार केल्यावांचून केलेला संकल्प प्रायः श्रेयस्कर होत नाहीं. म्हणून संकल्पाचें मूळ जें

विवेकरूपी चित्त तेंच अधिक श्रेष्ठ आहे. आणि संकल्पादिकांना ह्या विवेकरूपी चित्ताचाच आधार असावयास पाहिजे. या हेतूनेंच सदसद्विवेक-शक्तीची—चित्ताची प्रत्येकानें अवश्य उपासना करावी असें येथें श्रुतीनें सांगितलें आहे.

**स यश्चित्तं ब्रह्मेत्युपास्ते चित्तान्वै स लोकान्ध्रुवान्ध्रुवः प्रतिष्ठितान्प्रतिष्ठितोऽव्यथमानानव्यथमानोऽभिसिध्यति यावच्चित्तस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यश्चित्तं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवश्चित्ताद्भूय इति चित्ताद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ ३ ॥**

**सः यः चित्तम् ब्रह्म इति उपास्ते सः वै चित्तान् लोकान् अभिसिध्यति। ध्रुवः ध्रुवान् प्रतिष्ठितः प्रतिष्ठितान् अव्यथमानः अव्यथमानान् अभिसिध्यति। यावत् चित्तस्य गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः चित्तम् ब्रह्म इति उपास्ते ( तस्य सर्वम् भवति )। भगवः चित्तात् भूयः अस्ति इति। चित्तात् वाव भूयः अस्ति इति। भगवान् तत् मे ब्रवीतु इति।**

जो कोणी चित्ताची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो तो खरोखर इच्छित लोकांना प्राप्त होतो. स्थिरचित्ताचा उपासक स्थिरलोकांना प्राप्त होतो, प्रतिष्ठित चित्ताचा उपासक प्रतिष्ठित लोकांना प्राप्त होतो. निर्दुःख चित्ताचा उपासक दुःखरहित लोकांना प्राप्त होतो. चित्ताची जेथपर्यंत गति असते तेथपर्यंत याची गति अव्याहत असते. जो चित्तब्रह्माची उपासना करितो त्याला हें सर्व फळ मिळतें. ( नारद म्हणतो— ) भगवन्! चित्ताहून अधिक कांहीं आहे काय? (सनत्कुमार म्हणतो—) चित्ताहून अधिक मोठें तत्त्व आहे. ( नारद म्हणतो—— ) भगवन्! तें मला सांगा.

प्रस्तुत मंत्रांत चित्ताच्या उपासनेचें फल सांगितलें आहे. स्थैर्य, प्रतिष्ठा व निर्दुःख म्हणजे सुख किंवा समाधान हे गुण किंवा धर्म विवेकात्मक

चित्ताच्या उपासनेपासून बुद्धीमध्यें प्रगट होतात. अशा प्रकारची बुद्धीच मनुष्याची ऐहिक व परमार्थिक उन्नति घडवून आणिते. म्हणून या चित्त-ब्रह्माची उपासना प्रत्येकानें करावी.

## अथ षष्ठः खण्डः ।

**ध्यानं वाव चित्ताद्भूयो ध्यायतीव पृथिवी ध्यायतीवान्तरिक्षं ध्यायतीव द्यौर्ध्यायन्तीवापो ध्यायन्तीव पर्वता ध्यायन्तीव देवमनुष्यास्तस्माद्य इह मनुष्याणां महत्तां प्राप्नुवन्ति ध्यानापादांशा इवैव ते भवन्त्यथ येऽल्पाः कलहिनः पिशुना उपवादिनस्तेऽथ ये प्रभवो ध्यानापादांशा इवैव ते भवन्ति ध्यानमुपास्स्वेति ॥१॥**

ध्यानम् वाव चित्तात् भूयः । पृथिवी ध्यायति इव । अन्तरिक्षम् ध्यायति इव । द्यौः ध्यायति इव । आपः ध्यायन्ति इव । पर्वताः ध्यायन्ति इव । देव-मनुष्याः ध्यायन्ति इव । तस्मात् मनुष्याणाम् ये इह महत्ताम् प्राप्नुवन्ति ध्यानापादांशाः इव एव ते भवन्ति । ये अल्पाः ते कलहिनः पिशुनाः उप-वादिनः । अथ ये प्रभवः ते ध्यानापादांशा इव एव भवन्ति । ध्यानम् उपास्स्व इति ।

ध्यान हें चित्तापेक्षां अधिक आहे. पृथ्वी जणूं काय ध्यान करीत आहे. अन्तरिक्ष जणूं काय ध्यान करीत आहे. द्युलोक जणूं काय ध्यान करीत आहे. जल जणूं काय ध्यान करीत आहे. पर्वत जणूं ध्यान करीत आहेत. श्रेष्ठ मनुष्यें जणूं ध्यान करितात. म्हणून मनुष्यांमध्यें जो या लोकीं मोठेपणा पावतात तो त्यांचा मोठेपणा हें ध्यानाचें अंशतः फल असतें. ( येथें ध्याना-चा आपाद म्हणजे फल असा अर्थ आहे. ) जे अल्प म्हणजे हीन असतात ते भांडखोर कपटी व निंदक असतात. परंतु

**जे श्रेष्ठ असतात ते ध्यानाच्या फलाचे अंशभागी होतात. म्हणजे ध्यानामुळेंच त्यांना मोठेपणा प्राप्त होतो. तूं ध्यानाची उपासना कर.**

पांचव्या खंडांत चित्ताचें म्हणजे विवेकाचें विवेचन झालें आहे. अंतःकरणांत सदसद्विवेकशक्ति उत्पन्न होण्यास ध्यानाची अत्यंत आवश्यकता असते. एकाग्रता, गांभीर्य, शान्ति इत्यादिकांचा ध्यानांतच अंतर्भाव होतो, असें या मंत्रांत पृथिवी, अंतरिक्ष, द्यौ, पर्वत इत्यादिकांच्या उदाहरणांवरून दर्शविलें आहे. विवेकशक्तीला ध्यान हेंच कारणीभूत असल्यामुळें तें विवेकरूप चित्तापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे असें दाखवून त्याची उपासना करावयास सांगितलें आहे. मनुष्याचा मोठेपणा त्याच्या विवेकशीलतेवरच अवलंबून असतो; आणि ही विवेकशक्ति ध्यानावर अवलंबून असते. ज्याना ध्यानधारणा साध्य होते ते आपलें अंतःकरण केव्हांहि विकारवश होऊं देत नाहींत. अशा गंभीर बुद्धीचे लोकच व्यवहारांत किंवा परमार्थांत पूर्ण यशस्वी होतात आणि खरें सुख त्यानांच मिळतें. हें तत्त्व गीतेनेंही प्रतिपादन केलें आहे ( गी. अ. ५ श्लो. २३ रहस्यदीपिका पृ. १६७, १६८ ).

**स यो ध्यानं ब्रह्मेत्युपास्ते यावद्ध्यानस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो ध्यानं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो ध्यानाद्भूय इति ध्यानाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

**सः यः ध्यानम् ब्रह्म इति उपास्ते अस्य यावत् ध्यानस्य गतम् तत्र यथाकामचारः भवति । यः ध्यानम् ब्रह्म इति उपास्ते तस्य सर्वम् भवति । भगवः ध्यानात् भूयः अस्ति इति । ध्यानात् वाव भूयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।**

जो कोणी ध्यानाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याची ध्यानाची जेथपर्यंत गति असते तेथपर्यंत गति अव्याहत असते. जो ध्यानब्रह्माची उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें.

( नारद म्हणतो— ) भगवन् ! ध्यानाहून अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो— ) ध्यानाहून विज्ञान अधिक आहे. ( नारद म्हणतो— ) भगवन् ! तें मला सांगा.

## अथ सप्तमः खण्डः ।

**विज्ञानं वाव ध्यानाद्भूयो विज्ञानेन वा ऋग्वेदं विजानाति यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पञ्चमं वेदानां वेदं पित्र्यꣳ राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यां दिवं च पृथिवीं च वायुं चाकाशं चापश्च तेजश्च देवाꣳश्च मनुष्याꣳश्च पशूꣳश्च वयाꣳसि च तृणवनस्पतीञ्श्वापदान्याकीटपतङ्गपिपीलकं धर्मं चाधर्मं च सत्यं चानृतं च साधु चासाधु च हृदयज्ञं चाहृदयज्ञं चान्नं च रसं चेमं च लोकममुं च विज्ञानेनैव विजानाति विज्ञानमुपास्स्वेति ॥ १ ॥**

विज्ञानम् वाव ध्यानात् भूयः । विज्ञानेन वै ऋग्वेदम् विजानाति । यजुर्वेदम् सामवेदम् चतुर्थम् आथर्वणम् पञ्चमम् इतिहासपुराणम्, वेदानाम् वेदम् पित्र्यम् राशिम् दैवम् निधिम् वाकोवाक्यम् एकायनम् देवविद्याम् ब्रह्मविद्याम् भूतविद्याम् क्षत्रविद्याम् नक्षत्रविद्याम् सर्पदेवजनविद्याम् दिवम् च पृथिवीम् च वायुम् च आकाशम् च आपः च तेजः च देवान् च मनुष्यान् च पशून् च वयांसि च तृणवनस्पतीन् श्वापदानि आकीटपतङ्गपिपीलिकम् धर्मम् च अधर्मम् च सत्यम् च अनृतम् च साधु च असाधु च हृदयज्ञम् च अहृदयम् च अन्नम् च रसम् च इमम् च अमुम् च लोकम् ( एतत् सर्वम् ) विज्ञानेन एव विजानाति । विज्ञानम् उपास्स्व इति ।

विज्ञान हेंच ध्यानापेक्षां श्रेष्ठ आहे. विज्ञानानेंच ( बुद्धीनेंच ) ऋग्वेदाचें ज्ञान होतें, यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, पांचवा इतिहासपुराण, मीमांसाविद्या किंवा जयभारत ग्रंथ, वंशशास्त्र, भू-

कंपादि उत्पातविद्या, खाणीशास्त्र, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र, आधिदैविक विद्या, यज्ञविद्या, ब्राह्मणधर्म, प्राणिशास्त्र, शासनशास्त्र, ज्योतिष-शास्त्र, यंत्रादि शिल्पशास्त्र, द्युलोक, पृथ्वी, वायु, आकाश, जल, तेज, देव, मनुष्य, पशु, पक्षी ओषधि वनस्पति वगैरे श्वापदें किडा, माशी, मुंगीसुद्धां, धर्मअधर्म ( पुण्य—पाप ) खरेंखोटें, चांगलें वाईट, मर्मज्ञ अमर्मज्ञ, अन्न, रस, इहलोक, व परलोक हें सर्व विज्ञानाच्या योगानेंच कळतें. म्हणून विज्ञानाची उपासना करावी.

प्रस्तुत मंत्रांत विज्ञानाचें वर्णन आलें आहे. येथें विज्ञान या शब्दाचा अर्थ बुद्धि असाच घ्यावयास पाहिजे. कारण विशेषज्ञान हें देखील बुद्धीचेंच विशिष्ट अंग आहे. विविधज्ञान किंवा सृष्टिज्ञान या अर्थानें विज्ञान हा शब्द जसा औपनिषद् वाङ्मयांत येतो, तसा तो बुद्धि या अर्थानेंही येतो. पंचकोशांच्या विवेचनांत बुद्धि हाच विज्ञानमय कोश होय असें ठरविलें आहे. विज्ञानाची व्यापकता दाखविण्याकरितां आलेल्या विषयांच्या यादीचें पूर्वी स्पष्टीकरण झालेंच आहे. विवेकाप्रमाणें ध्यान हें देखील बुद्धीचेंच अंग आहे. एकाग्रतेनें होणाऱ्या चिंतनासच ध्यान असें म्हणतात. धारणा व समाधि या ध्यानापेक्षां उच्च भूमिका योग-शास्त्रांत सांगितल्या आहेत. परंतु येथील ध्यान शब्दांत त्यांचा समावेश करण्याची आवश्यकता नाहीं.

**स यो विज्ञानं ब्रह्मेत्युपास्ते विज्ञानवतो वै स लोकाञ्ज्ञानवतोऽभिसिध्यति यावद्विज्ञानस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो विज्ञानं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो विज्ञानाद्भूय इति विज्ञानाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

सः यः विज्ञानम् ब्रह्म इति उपास्ते सः वै ज्ञानवतः विज्ञानवतः लोकान् अभिसिध्यति । विज्ञानस्य यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति ।

**यः विज्ञानम् ब्रह्म इति उपास्ते ( सः एतत् विन्दति ) । भगवः विज्ञानात् भूयः अस्ति इति । विज्ञानात् वाव भूयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।**

जो कोणी विज्ञानाची ब्रह्मदृष्टीनें उपासना करितो तोच ज्ञान-विज्ञानयुक्त व्यवहार सिद्ध करितो ( त्याचा ज्ञानविज्ञानयुक्त व्यवहार यशस्वी होतो ). विज्ञानाची जेथपर्यंत गति असते तेथ-पर्यंत ह्याची गति अव्याहत असते. जो विज्ञानब्रह्माची उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें. ( नारद म्हणतो— ) भगवन्, विज्ञानाहून अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो — ) विज्ञानाहून अधिक आहे. ( नारद म्हणतो— ) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

विज्ञानाच्या उपासनेचें फल या मंत्रांत सांगितलें आहे. विज्ञानाची उपासना केल्यानें बुद्धीचा पूर्ण विकास होतो व अशा ओजस्वी बुद्धीच्या योगानें मनुष्याला ज्ञानविज्ञानाचे व्यवहार यशस्वी रीतीनें करितां येतात. ज्ञानाचा व्यवहार म्हणजे पारमार्थिक आचरण आणि विज्ञानाचा व्यवहार म्हणजे ऐहिक आचरण असा अर्थ समजावा. ज्याची बुद्धि सर्वांगपरिपूर्ण झाली, त्याचे व्यवहार व परमार्थ यशस्वी होतात म्हणजे अभ्युदय व निः-श्रेयस यांचा मार्ग त्याला बिनचूक आक्रमितां येतो. असा 'ज्ञानवतो विज्ञानवतो लोकान् अभिसिध्यति' या वाक्याचा अभिप्राय आहे. फलश्रुति व नारद-सनत्कुमारांचीं प्रश्नोत्तरें पूर्वीसारखींच आहेत.

## अथाष्टमः खण्डः ।

**बलं वाव विज्ञानाद्भूयोऽपि ह शतं विज्ञानवतामेको बलवा-नाकम्पयते स यदा बली भवत्यथोत्थाता भवत्युत्तिष्ठन्परिचरिता भवति परिचरन्नुपसत्ता भवत्युपसीदन्द्रष्टा भवति श्रोता भवति मन्ता भवति बोद्धा भवति कर्ता भवति विज्ञाता भवति बलेन**

**वै पृथिवी तिष्ठति बलेनान्तरिक्षं बलेन द्यौर्बलेन पर्वता बलेन देवमनुष्या बलेन पशवश्च वयाँसि च तृणवनस्पतयः श्वापदा न्याकीटपतङ्गपिपीलकं बलेन लोकस्तिष्ठति बलमुपास्स्वेति ॥ १ ॥**

बलम् वाव विज्ञानात् भूयः। एकः बलवान् विज्ञानवताम् आकम्पयते। सः यदा बली भवति अथ उत्थाता भवति। उत्तिष्ठन् परिचरिता भवति। परिचरन् उपसत्ता भवति। उपसीदन् द्रष्टा भवति। श्रोता भवति। मन्ता भवति। बोद्धा भवति। कर्ता भवति। विज्ञाता भवति। बलेन वै पृथिवी तिष्ठति। बलेन अन्तरिक्षम्। बलेन द्यौः। बलेन पर्वताः। बलेन देवमनुष्याः। बलेन पशवः च वयांसि च तृणवनस्पतयः श्वापदानि आकीटपतङ्गपिपीलिकम् लोकः बलेन तिष्ठति। बलम् उपास्स्व इति।

बल हें खरोखर विज्ञानापेक्षां श्रेष्ठ आहे. एकटा बलवान् शंभर विद्वान माणसांना कंपित करितो ( भिववितो ). तो जेव्हां सामर्थ्यवान् असतो तेव्हांच उत्थानवान् होतो. असा उत्थानवान् मनुष्य पूज्य माणसाची सेवा करण्यास अगर कोणतेंही महत्कार्य करण्यास समर्थ असतो. सेवा करणारा मनुष्यच लोकप्रिय होतो. लोकप्रिय होणारा मनुष्य द्रष्टा म्हणजे दर्शनशक्तिमान् होतो. तोच श्रवणशक्तिसंपन्न होतो. तोच मनन करणारा होतो; तोच ज्ञानसंपन्न होतो; तोच कर्तृत्ववान् होतो व तोच विवेकशील होतो. बलानेंच पृथिवी स्थिर राहते. बलानें अंतरिक्ष, बलानें द्युलोक, बलानें पर्वत, बलानेंच देवमनुष्यें, बलानें पशु, पक्षी, गवत, वनस्पति वगैरे, किडा, मुंगी, माशीपर्यंत स्थिर राहतात. प्राणिमात्राचें अस्तित्व बलावरच अवलंबून आहे. म्हणून सामर्थ्याची उपासना कर. ( शारीरिक व मानसिक असें उभयविध बल येथें घेतलें पाहिजे. )

प्रस्तुत मंत्रांतील बल शब्दाचा अर्थ शारीरिक सामर्थ्य असाच करावयास पाहिजे, असें त्याच्या वर्णनावरून सहज सिद्ध होतें. शारीरिक बळाला मानसिक सामर्थ्याची मुळींच गरज नाहीं असें मात्र समजूं नये. कारण मानसिक सामर्थ्याच्या आधारानेंच शारीरिक बळ कार्यक्षम होतें. परंतु मानसिक सामर्थ्य असलें म्हणजे झालें, शारीरिक बळाला मुळींच किंमत नाहीं हें म्हणणें अव्यवहार्य, अशास्त्रीय व श्रुतीच्या अभिप्रायास विरुद्ध आहे. शारीरिक बळापुढें नुसत्या विज्ञानसामर्थ्याची म्हणजे मानसिक सामर्थ्याची कशी तारांबळ होते तें या मंत्रांतच स्पष्ट सांगितलें आहे. तितिक्षेप्रमाणें प्रतिकाराची देखील मानवी जीवनक्रमांत अत्यंत आवश्यकता असल्यामुळें, ज्ञानी मनुष्यानें देखील शारीरिक सामर्थ्याची उपेक्षा करणें बरोबर नाहीं. ज्ञानविज्ञानसंपादन करावयाचें झालें, तरी त्याला देखील शारीरिक सामर्थ्याची गरज असते. गुरुशुश्रूषा, किंवा अभ्यास या गोष्टी तरी शारीरिक सामर्थ्याशिवाय कशा होणार ? म्हणूनच विज्ञानाहून–बुद्धीहून शारीरिक सामर्थ्याचें महत्त्व अधिक असल्याचें श्रुतीनें सांगितलें आहे. विद्वत्ता, सदाचरण, तपश्चर्या इत्यादि पारमार्थिक गोष्टी देखील शारीरिक सामर्थ्यावरच अवलंबून असतात, मग व्यवहाराची गोष्ट तर बोलावयासच नको. आत्मज्ञानास किंवा मोक्षमार्गास शारीरिक सामर्थ्याची मुळींच गरज नाहीं असें कित्येक प्रतिपादन करितात, परंतु तें मत श्रुतीच्या विरुद्ध आहे असें या मंत्रावरून सहज सिद्ध होतें. ‘ नायमात्मा बलहीनेन लभ्यः ’ असें मुण्डकोपनिषदांतही सांगितलें आहे. ( उ. नि. र. प्र. मुण्डक–३·२-४ पृ. १०० ते १०२ ). मनुष्याचा व्यवहार व परमार्थ सर्वस्वीं ज्याच्यावर अवलंबून आहे अशा या शारीरिक बळाची प्रत्येकानें काळजीपूर्वक उपासना करावी असा श्रुतीचाच उपदेश आहे. सर्व प्राणी व वनस्पति, किंबहुना पृथ्वी इत्यादि भूतसृष्टि ह्यांचें अस्तित्व देखील या बळावरच अवलंबून आहे.

**स यो बलं ब्रह्मेत्युपास्ते यावद्बलस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो बलं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो बलाद्भूय इति बलाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

सः यः बलम् ब्रह्म इति उपास्ते बलस्य यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः बलम् ब्रह्म इति उपास्ते ( सः एतद्विन्दते ) । भगव. बलात् भुयः अस्ति इति । बलात् वाव भुयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।

जो कोणी बलाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो, त्याची, बलाची जितकी व्याप्ति आहे तेथपर्यंत गति अव्याहत असते. जो बलाची ब्रह्मबुध्दीनें उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें. ( नारद म्हणतो— ) भगवन् ! बलाहून अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो— ) बलाहून अधिक आहे. ( नारद ह्मणतो— ) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

## अथ नवमः खण्डः ।

**अन्नं वाव बलाद्भूयस्तस्माद्यद्यपि दश रात्रीर्नाश्नीयाद्यद्यु ह जीवेदथ वाद्रष्टाश्रोतामन्ताबोद्धाकर्ताविज्ञाता भवत्यथान्नस्यायै द्रष्टा भवति श्रोता भवति मन्ता भवति बोद्धा भवति कर्ता भवति विज्ञाता भवत्यन्नमुपास्स्वेति ॥ १ ॥**

अन्नम् वाव बलात् भूयः। तस्मात् यद्यपि दश रात्रीः न अश्नीयात् अथ यदि उ ह जीवेत् अद्रष्टा अश्रोता अमन्ता अबोद्धा अकर्ता अविज्ञाता वा भवति । अथ अन्नस्य आयै ( आये ) द्रष्टा भवति । श्रोता भवति । मन्ता भवति । बोद्धा भवति । कर्ता भवति । विज्ञाता भवति । अन्नम् उपास्स्व इति ।

अन्न हेंच बलापेक्षां श्रेष्ठ आहे. म्हणून जर दहा दिवस कोणी उपाशीं राहील आणि जर तो जिवंत राहील तर तो दर्शनाला

असमर्थ, श्रवणाला असमर्थ, मननास असमर्थ, समजण्यास असमर्थ, क्रियेला असमर्थ, व बुद्धिहीन होईल. ( म्हणजे त्याचीं अंतःकरणासुद्धां सर्व इंद्रियें सामर्थ्यहीन होतील ). याच्या उलट अन्न प्राप्त झालें असतां ( तृप्ति झाली असतां ) तो द्रष्टा, श्रोता, मन्ता, बोद्धा, कर्ता व विज्ञाता होतो (म्हणजे त्याचीं अंतःकरणासुद्धां सर्व इंद्रियें सामर्थ्यसंपन्न होतात ). म्हणून अन्नाची उपासना कर.

मागील खंडांत बलाचें महत्त्व सांगितलें आहे. तें बल उत्पन्न होण्यास व त्याचें संवर्धन होण्यास देखील अन्नाचीच आवश्यकता असते. साधकानें बलाची उपेक्षा करणें चांगलें नाहीं असें सांगितल्यावर बलाचें मुख्य साधन जें अन्न त्याचें महत्त्व सांगणें ओघानेंच प्राप्त होतें. म्हणून या मंत्रांत अन्नाचें महत्त्व सांगितलें आहे. मनुष्य दहा दिवस जर उपाशीं राहील तर तो कोणतीही गोष्ट पाहण्यास, ऐकण्यास, विचार करण्यास, किंबहुना समजून घेण्यास देखील असमर्थ होतो. कोणतेंहि शारीरिक अगर मानासिक कर्म करण्याची शक्ति त्याचे अंगीं राहत नाहीं. अर्थात् व्यवहार व परमार्थ या दोहोंनाही तो अपात्रच होतो. म्हणून ज्ञानी मनुष्यानें अन्नाचें महत्त्व ओळखून त्याच्याविषयीं योग्य ती काळजी घेतली पाहिजे. अन्न न खाण्यानें काय दशा होते याविषयींच्या प्रयोगासारखें वर्णन सहाव्या अध्यायातील सातव्या खंडांत सविस्तर आलें आहे. श्वेतकेतूनें पंधरा दिवस उपोषणें केल्यावर त्याची कशी अवस्था झाली तिचें वर्णन त्या खंडाच्या २ ऱ्या मंत्रांत स्पष्टपणें झालें आहे. तसेंच अन्न भक्षण केल्यानंतर श्वेतकेतूला पुनः सामर्थ्य कसें प्राप्त झालें तें देखील त्याच खंडाच्या ४थ्या मंत्रांत सांगितलें आहे. त्या सर्व विवेचनासारखेंच या मंत्रांत अन्नाचें वर्णन आलें आहे. मनुष्य योग्य रीतीनें अन्न सेवन करील तरच त्याच्या दर्शनादि शक्ति कायम राहतील व त्यांचा त्याला उपयोग करून घेतां येईल. ह्यावरून ज्ञानार्जनाचे कामीं,

किंबहुना मोक्षमार्गांत देखील अन्नाची उपेक्षा करूं नये, त्याची उपासना करावी म्हणजे त्या विषयीं योग्य काळजी घ्यावी, असें या मंत्रांत सिद्ध करून दाखविलें आहे.

**स योऽन्नं ब्रह्मेत्युपास्तेऽन्नवतो वै स लोकान्पानवतोऽभिसिध्यति यावदन्नस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति योऽन्नं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवोऽन्नाद्भूय इत्यन्नाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

सः यः अन्नम् ब्रह्म इति उपास्ते सः अन्नवतः पानवतः वै लोकान् अभिसिध्यति । अन्नस्य यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः अन्नम् ब्रह्म इति उपास्ते ( सः एतत् विन्दते ) । भगवः अन्नात् भूयः अस्ति इति । अन्नात् वाव भूयः अस्ते इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।

जो कोणी अन्नाची ब्रह्मदृष्टीनें उपासना करितो तो अन्नयुक्त व पानयुक्त असे लोक ( व्यवहार ) सिद्ध करितो ( म्हणजे त्याच्या व्यवहारांत खाद्यपेयाची कधींही कमतरता येत नाहीं ). जितकी अन्नाची व्याप्ति आहे तेथपर्यंत त्याची गति अव्याहत असते. जो अन्नाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें. ( नारद म्हणतो— ) अन्नापेक्षां अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो— ) अन्नाहून अधिक आहे ( नारद म्हणतो—) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

## अथ दशमः खण्डः ।

**आपो वावान्नाद्भूयस्तस्माद्यदा सुवृष्टिर्न भवति व्याधीयन्ते प्राणा अन्नं कनीयो भविष्यतीत्यथ यदा सुवृष्टिर्भवत्यानन्दिनः प्राणा भवन्त्यन्नं बहु भविष्यतीत्याप एवेमा मूर्ता येयं पृथिवी यदन्तरिक्षं यद्द्यौर्यत्पर्वता यद्देवमनुष्या यत्पशवश्च वयांसि च**

**तृणवनस्पतयः श्वापदान्याकीटपतङ्गपिपीलकमाप एवेमा मूर्ता अप उपास्स्वेति ॥ १ ॥**

**आपः वाव अन्नात् भूयः । तस्मात् यदा सुवृष्टिः न भवति अन्नम् कनीयः भविष्यति इति प्राणाः व्याधीयन्ते । अथ यदा सुवृष्टिः भवति अन्नम् बहु भविष्यति इति प्राणाः आनन्दिनः भवन्ति । आपः एव इमाः मूर्ताः । या इयम् पृथिवी यत् अन्तरिक्षम् यत् द्यौः यत् पर्वताः यत् देवमनुष्याः यत् पशवः च वयांसि च तृणवनस्पतयः श्वापदानि आकीटपतङ्गपिपीलिकम् आपः एव इमाः मूर्ताः। अपः उपास्स्व इति ।**

जल हेंच अन्नापेक्षां श्रेष्ठ आहे. म्हणून जेव्हां भरपूर पर्जन्यवृष्टि होत नाहीं ( तेव्हां ) प्राणी रोगग्रस्त होतात अन्न कमी होतें. आणि जेव्हां चांगली वृष्टि होते तेव्हां अन्न पुष्कळ होतें म्हणून प्राणी आनंदित होतात. हें व्यक्त असें जल सर्वांत श्रेष्ठ आहे. जी ही पृथ्वी, जें अन्तरिक्ष, जो द्युलोक, जे पर्वत, जे देव आणि जीं मनुष्यें, जे पशु व पक्षी, तृण, वनस्पति, जनावरें, किडा, माक्षिका, मुंगी इत्यादि क्षूद्र जंतूपर्यंतचे सर्व प्राणी हें मूर्तिमंत जलच आहे ( म्हणजे त्यांचें अस्तित्व या जलावरच अवलंबून आहे ). म्हणून जलाची उपासना कर.

अन्न हें प्राणिमात्रांच्या जीवनाचें मुख्य साधन आहे. खाल्लें जातें किंवा दुसऱ्याला खातें तें अन्न होय, ह्मणजे भक्ष्य व भक्षक हीं दोनही रूपें अन्नाचींच आहेत, अशा अर्थाची व्याख्या तैत्तिरीयोपनिषदांत आली आहे ( उ. नि. र. प्र. तैत्ति. आनंदवल्ली २. १ पृ. १४—१५ ). सर्व प्राण्यांना अन्नाची सारखीच आवश्यकता असते. पाणी हें अन्नाच्या उत्पत्तीचें मुख्य साधन आहे. म्हणून अन्नाप्रमाणेंच मनुष्याला जलाची किंवा जलवृष्टीची आवश्यकता वाटणें स्वाभाविकच आहे. या पाण्याच्या कमीजास्तपणावरच दुर्भिक्ष किंवा सुभिक्ष अवलंबून असल्यानें मनुष्याचें

स्वास्थ्य देखील मुख्यत्वें करून जलवृष्टीवरच अवलंबून राहतें. दुर्भिक्षापासून रोग वगैरे नानाप्रकारच्या पीडा उत्पन्न होतात आणि सुबत्ता झाल्यावर त्या नाहींशा होतात, हा अनुभव प्राचीनकाळीं देखील जशाचा तसाच दिसतो. कित्येक समाज किंवा देश शेतकीवर फारसे अवलंबून नसतात; कारखानें, किंवा व्यापार यावरच त्यांची उपजीविका चालते; हें जरी खरें असलें तथापि, श्रुतीनें सांगितलेलें जलवृष्टीचें महत्त्व कमी ठरत नाहीं. कारण या मंत्रातील वर्णन एकाद्या विशिष्ट देशाला अनुलक्षून नसून तें सर्वसाधारण मनुष्यप्राण्याला अनुलक्षून आहे. जगांतच वृष्टि कमी होऊन अन्नाची उत्पत्ति कमी झाली तर, तिचा अनिष्ट परिणाम कारखाने, व्यापार इत्यादिकांवर झाल्यावांचून राहत नाहीं. म्हणून श्रुतीनें सांगितलेला सामान्य नियम बरोबर आहे असेंच ठरतें. प्रश्नोपनिपनिषदांत देखील या सुवृष्टीचें महत्त्व असेंच वर्णिलेलें आहे ( उ. नि. र. प्र. प्रश्नोप. प्रश्न २ मं. १० पृ. ३६ ).

जलाचें महत्त्व सांगतांना त्याला मूर्त असें विशेषण या मत्रांत दिलें आहे तें विशेष लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण त्यावरून मूर्त व अमूर्त अशीं जलाचीं दोन स्वरूपें श्रुतीला अभिप्रेत आहेत असें निःसंशय सिद्ध होतें. अमूर्त जल म्हणजेच दिव्य आप ( ईथर ) होय. हें दिव्य आप सर्व सृष्टीचें मूळ कारण असलें तरी, या मंत्रांत त्याचें वर्णन करावयाचें नसून मूर्त आपाचें म्हणजे पाण्याचें वर्णन करावयाचें आहे. कारण तें पाणीच सर्व अन्नाचें उत्पादक असल्यामुळें, प्राणिमात्रांचें तेंच खरें जीवन होय. म्हणून जलाची उपासना करावी, म्हणजे शास्त्रीय दृष्टीनें जल या द्रव्याचा नीट अभ्यास करून त्याचें पूर्ण ज्ञान संपादन करावें; आणि त्याचा उपयोग सर्वांचे जीवित निर्दोष व तेजस्वी होण्याकडे कसा होईल याचा विचार करावा. हीच जलरूप ब्रह्माची उपासना होय.

**स योऽपो ब्रह्मेत्युपास्त आप्नोति सर्वान्कामाꣳस्तृप्तिमान्भवति यावदपां गतं तत्रास्य यथाकामचारो भवति योऽपो ब्रह्मेत्युपास्ते**

**ऽस्ति भगवोऽद्भ्यो भूय इत्यद्भ्यो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

सः यः अपः ब्रह्म इति उपास्ते ( सः ) सर्वान् कामान् आप्नोति । तृप्तिमान् भवति । अपाम् यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः अपः ब्रह्म इति उपास्ते ( सः एतत् विन्दते )। भगवः अद्भ्यः भूयः अस्ति इति। अद्भ्यः वाव भूयः अस्ति इति। भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।

जो कोणी जलाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात व तो तृप्तिमान् होतो. जेथपर्यंत जलाची व्याप्ति आहे तेथपर्यंत त्याची गति अव्याहत असते. जो जलाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याला हें सर्व फळ मिळतें. ( नारद म्हणतो–) जलापेक्षां अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो–) जलाहून अधिक आहे. ( नारद म्हणतो– ) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

## अथैकादशः खण्डः।

**तेजो वावाद्भ्यो भूयस्तद्वा एतद्वायुमागृह्याकाशमभितपति तदाहुर्निशोचति नितपति वर्षिष्यति वा इति तेज एव तत्पूर्वं दर्शयित्वाथापः सृजते तदेतदूर्ध्वाभिश्च तिरश्चीभिश्च विद्युद्भिराह्रादाश्चरन्ति तस्मादाहुर्विद्योतते स्तनयति वर्षिष्यति वा इति तेज एव तत्पूर्वं दर्शयित्वाथापः सृजते तेज उपास्स्वेति ॥ १ ॥**

तेजः वाव अद्भ्यः भूयः । तत् वै एतत् वायुम् उपगृह्य आकाशम् अभितपति । ( यदा ) निशोचति नितपति तदा वर्षिष्यति इति वै आहुः । तत् तेजः एव पूर्वम् दर्शयित्वा अथ अपः सृजते। ऊर्ध्वाभिः तिरश्चीभिः च विद्युद्भिः आह्रादाः चरन्ति । तत् एतत् विद्योतते स्तनयति ( तस्मात् ) वर्षिष्यति वै इति आहुः। तत् तेजः एव पूर्वम् दर्शयित्वा अथ अपः सृजते। तेजः उपास्स्व इति ।

तेज पाण्याहून श्रेष्ठ आहे. तें हें तेजच वायूचें अवष्टंभन करून असतें. म्हणजे वायूला घन करितें. ( त्यानें ) आकाश तप्त होतें. जेव्हां तें तेज अतिशय त्रासदायक होतें व तापतें ( म्हणजे उष्णता असह्य भासूं लागते ) तेव्हां वृष्टि होईल असें म्हणतात. त्यावरून तेजच प्रथम आपलें स्वरूप दाखवून नंतर पाणी उत्पन्न करितें. ऊर्ध्व आणि तिरकस ( उभ्या आणि आडव्या ) विजांनीं गर्जना होऊं लागतात, तें हें तेज चमकतें, गरजतें, म्हणून वृष्टि होईल असें म्हणतात. म्हणून तेजच प्रथम आपलें स्वरूप दाखवून नंतर जल उत्पन्न करितें. ( म्हणून ) तेजाची उपासना कर.

पाणी व तेज यांचा कार्यकारणभाव या मंत्रांत सांगितला आहे. प्रकाश व उष्णता हीं दोन्हीही तेजाचीं कार्येंच आहेत. विजेचें स्पष्ट स्वरूप हें देखील तेजाचें कार्य आहे. अशा या तैजस तत्त्वाचा वातावरणावर परिणाम होऊन वायूचें घनीभवन होतें. या प्रक्रियेंत किंवा व्यापारांत आकाशांत उष्णता उत्पन्न होते व या सर्वांचा परिणाम म्हणजेच विजेचें व्यक्त स्वरूप होय. आकाश, ( बाष्प ) वायु, विद्युत् इत्यादिकांच्या रासायनिक क्रियेनें आकाशांत ढग तयार होतात आणि त्यांपासून जलवृष्टि होतें. या सर्व व्यापारांचें तेज हेंच मूळ कारण आहे. तेजापासून पाणी उत्पन्न होईपर्यंत मध्यंतरीं जे रासायनिक व्यापार घडतात त्यांचा विद्युत, वायु व आकाश यांच्यांशीं संबंध असतो असें या मंत्रांत स्पष्ट दाखविलें आहे; त्यावरून वैदिक ऋषींची दृष्टि भौतिक शास्त्रांत कशी खोलपर्यंत गेली होती तें चांगलेंच कळून येतें. वैदिक ऋषींच्या संशोधानाची ही परंपरा पुढें चालू राहिली असती तर हिंदुसंस्कृतीचें स्वरूप जगाला वेगळ्याच प्रकारचें दिसलें असतें. औपनिषद् विद्येची ही शास्त्रीय कल्पना पुढच्या लोकांना माहीत नव्हती असें नाहीं; परंतु ऋषींनीं केलेल्या संशोधनांत वेळोवेळीं भर घालून तें वृद्धिंगत करण्याची प्रवृत्तिच पुढें अजिबात नष्ट झाली. या शास्त्रीय कल्पनेचा उल्लेख

कालिदासानें आपल्या मेघदूत काव्यांतही केला आहे. ' धूमज्योतिस्सलिलमरुतां सन्निपातः क्व मेघः ' ( मेघदूत पूर्वार्ध ). या वाक्यांत थोडासा फरक असला तरी कल्पना तीच आहे. अशा शास्त्रीय रीतीनें पाणी व तेज यांचा कार्यकारणभाव दर्शवून नेहमीं अनुभवास येणारीं पर्जन्यवृष्टिचीं पूर्वचिन्हेंही सांगितलीं आहेत. अशा या जलाला मूळ कारण होणाऱ्या तजाची उपासना करावयाची म्हणजे त्याच्या कार्यकारणभावाचें शास्त्रीय ज्ञान पूर्ण संपादन करणें व त्या ज्ञानाचा व्यवहार व परमार्थ यांच्याकडे उपयोग करून अमृतत्त्वाचा मार्ग सुकर करणें होय. याच अभिप्रायानें तेजाची उपासना करावयास श्रुतीनें सांगितलें आहे.

**स यस्तेजो ब्रह्मेत्युपास्ते तेजस्वी वै स तेजस्वतो लोकान्भास्वतोऽपहततमस्कानभिसिध्यति यावत्तेजसो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यस्तेजो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवस्तेजसो भूय इति तेजसो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

**सः यः तेजः ब्रह्म इति उपास्ते सः वै तेजस्वी (भवति) । सः अपहततमस्कान् भास्वतः तेजस्वतः लोकान् अभिसिध्यति । तेजसः यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः तेजः ब्रह्म इति उपास्ते ( सः एतत् विन्दते )। भगवः तेजसः भूयः अस्ति इति । तेजसः वाव भूयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।**

जो कोणी तेजाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो तो तेजस्वी होतो. तो तमोरहित, कांतिमान् व तेजोमय असे लोक म्हणजे व्यवहार सिद्ध करितो. तेजाची जेथपर्यंत व्याप्ति असते तेथपर्यंत त्याची गति अव्याहत असते. जो तेजाची ब्रह्मदृष्टीनें उपासना करितो त्याला हें सर्व फळ मिळतें. ( नारद म्हणतो— ) भगवन् ! तेजाहून अधिक कांहीं आहे काय ? (सनत्कुमार म्हणतो—) तेजाहून अधिक आहे. (नारद म्हणतो—) आपण तें मला सांगावें.

तेजाचा संबंध निरनिराळ्या रूपांनीं या पिण्डब्रह्मण्डात्मक सृष्टीमध्यें सर्वत्र येतो. शरीर व अंतःकरण यांत तेजस्वीपणाच्या रूपानें हें तेज मानवी जीवनांत वास करितें. बळ व पाणीदारपण या दोन गुणांनीं मानवी शरीराची तेजस्विता दिसून येते; आणि दृढनिश्चय, आक्रमणशक्ति, निर्भयता, निःस्पृहता, ज्ञानविज्ञान इत्यादि सद्गुणांनीं मनुष्याचें बौद्धिक तेज दिसून येतें. मागील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें तेजाची उपासना केल्यानें मनुष्यास शारीरिक व बौद्धिक तेजस्विता प्राप्त होते. मानवी जीवितांत तेजाच्या स्वरूपाप्रमाणेंच तमाचें स्वरूप देखील वेगळ्या प्रकारचें आहे. अज्ञान, मोह, जडत्व इत्यादि विकार हे तमोरूप होत. तेजाची उपासना करणाऱ्या मनुष्याच्या अंतःकरणांत अज्ञानादि विकाररूप तम अवशिष्ट रहात नाहीं; म्हणून त्याचे व्यवहार तमोरहित म्हणजे अज्ञानमोहरहित आणि पाणीदार व तेजस्वी असेच होतात. तेजाचें भौतिक स्वरूप गति, उष्णता, प्रकाश, आघात इत्यादिकांनीं जड सृष्टींत व्यक्त होतें. ह्याप्रमाणें आध्यात्मिक ( मानवी ) व आधिभौतिक तेजाचें पूर्ण ज्ञान संपादन करून, मागील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें उपासना करणाऱ्या मनुष्याचा ऐहिक व पारमार्थिक जीवनक्रम पूर्ण यशस्वी व स्वतंत्र होतो हेंच या उपासनेचें फल होय.

## अथ द्वादशः खंडः।

**आकाशो वाव तेजसो भूयानाकाशे वै सूर्याचन्द्रमसावुभौ विद्युन्नक्षत्राण्यग्निराकाशेनाह्वयत्याकाशेन शृणोत्याकाशेन प्रतिशृणोत्याकाशे रमत आकाशेन रमत आकाशे जायत आकाशमभिजायत आकाशमुपास्स्वेति ॥ १ ॥**

**आकाशः वाव तेजसः भुयान्। आकाशे वै उभौ सूर्याचन्द्रमसौ विद्युत् नक्षत्राणि अग्निः। आकाशेन आह्वयति। आकाशेन शृणोति। आकाशेन प्रति शृणोति। आकाशे रमते। आकाशेन रमते। आकाशे जायते। आकाशम् अभिजायते। आकाशम् उपास्स्व इति।**

आकाश हेंच तेजापेक्षां श्रेष्ठ आहे. आकाशांतच सूर्य चंद्र हे दोघे, वीज, नक्षत्रें, अग्नि असतात. आकाशामुळेंच हाक मारितां येते. आकाशाच्या योगानेंच ऐकूं येतें. आकाशानेंच प्रतिशब्द होतो. आकाशाचे ठिकाणीं क्रीडा करितां येतें. आकाशाचे योगानें क्रीडा करितां येते. आकाशांतच प्राणी जन्मतो व आकाशांतच वाढतो. म्हणून आकाशाची उपासना कर.

आकाश हा पदार्थ भावरूप आहे कीं अभावरूप आहे या विषयींची नीटशी कल्पना सामान्य मनुष्याला करितां येत नाहीं. आकाश म्हणजे निवळ पोकळपणा असेंही कित्येकांना वाटतें. नैयायिकांनीं आकाश हा भावरूप पदार्थ मानला आहे पण त्याला ' अवृत्तिमत् ' असें म्हटलें आहे. आकाशाचा भावपणा केवळ शब्दगुणापुरताच समजून येतो; त्यावांचून त्याचें अस्तित्व दर्शविणारें कोणतेंही व्यावहारिक कार्य त्याच्यावर घडत नाहीं; असा त्यांच्या ' अवृत्तिमत् ' या शब्दाचा आशय आहे. पृथ्वी आप, तेज, वायु, हे पदार्थ सावयव असून ते निरवयव अशा आकाशा-पासून उत्पन्न झालेले नाहींत, असें नैयायिकांचें मत आहे. परंतु पृथ्वी इत्यादि पदार्थांचें आकाश हेंच उत्पादक कारण असून, बीजांतील अंकुरा-प्रमाणें आकाशांतूनच वायु इत्यादिकांची उत्पत्ति क्रमाक्रमानें झाली असें औपनिषद् विद्येचें मत प्रसिद्धच आहे ( उ. नि. र. प्र. तैत्ति. आनंद-वल्ली अनु. १ मंत्र २ पृ. ६–८ ). या मंत्रांत देखील मनुष्याचें जीवित व त्याचे सर्व व्यवहार आकाशावरच कसे अवलंबून असतात तें उदा-हरणांसह दाखविलें आहे. सूर्य, चंद्र, नक्षत्रें इत्यादिकांना आकाशानेंच धारण केलें असून, भौतिक सृष्टीची उत्पत्ति देखील आकाशापासूनच होते, असें या मंत्रांत सांगितलें आहे. त्यावरून आकाश हा व्यापक व शक्तिमान् असा भावपदार्थ असल्याचें श्रुतीनेंही येथें स्पष्ट दर्शविलें आहे. अशा शास्त्रीय दृष्टीनें आकाशाचा अभ्यास करणें हीच त्याची उपासना होय.

**स य आकाशं ब्रह्मेत्युपास्त आकाशवतो वै स लोका-न्प्रकाशवतोऽसंबाधानुरुगायवतोऽभिसिध्यति यावदाकाशस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति य आकाशं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगव आकाशाद्भूय इत्याकाशाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवा-न्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

**सः यः आकाशम् ब्रह्म इति उपास्ते सः वै प्रकाशवतः असंबाधान् उरुगायवतः लोकान् अभिसिध्यति । आकाशस्य यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः आकाशम् ब्रह्म इति उपास्ते( सः एतत् विन्दते )। भगवः आकाशात् भूयः अस्ति इति । आकाशात् वाव भूयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।**

जो कोणी ब्रह्मबुद्धीनें आकाशाची उपासना करितो तो प्रकाश-वान्, पीडारहित व व्यापक अशा लोकांप्रत जातो. जेथपर्यंत आकाशाची व्याप्ति आहे तेथपर्यंत त्याची गति अव्याहत असते. जो आकाशाची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें. (नारद म्हणतो—) आकाशाहून अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो—) आकाशाहून अधिक आहे. ( नारद म्हणतो—) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

प्रस्तुत मंत्रांत आकाश व प्रकाश यांचा संबंध दर्शविला आहे तो शास्त्रीयदृष्ट्या फारच महत्त्वाचा आहे. आकाश हें प्रकाशकिरणांचें वाहक असून गति, उष्णता व प्रकाश यांचें देखील तें उत्पादक आहे. ही आधुनिक शास्त्रांनीं दर्शविलेली उपपत्ति या मंत्रांत अंशतः तरी दिसून येते, ही गोष्ट कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल ? उरुगाय हें पद कठोपनिषदांत आलें आहे. या पदाचा व्यापक किंवा स्तवनीय असाही अर्थ होतो. फलप्राप्तीचें इतर वर्णन पूर्वीप्रमाणेंच आहे.

## अथ त्रयोदशः खण्डः ।

**स्मरो वावाकाशाद्भूयस्तस्माद्यद्यपि बहव आसीरन्न स्मरन्तो नैव ते कंचन शृणुयुर्न मन्वीरन्न विजानीरन्यदा वाव ते स्मरेयुरथ शृणुयुरथ मन्वीरन्नथ विजानीरन्स्मरेण वै पुत्रान्विजानाति स्मरेण पशून्स्मरमुपास्स्वेति ॥ १ ॥**

**स्मरः वाव आकाशात् भूयः । तस्मात् यदि अपि न स्मरन्तः बहवः आसीरन् ते न एव कंचन शृणुयुः । न मन्वीरन् । न विजानीरन् । यदा वाव ते स्मरेयुः अथ शृणुयुः । अथ मन्वीरन् । अथ विजानीरन् । स्मरेण वै पुत्रान् विजानाति । स्मरेण पशून् । स्मरम् उपास्स्व इति ।**

स्मरणशक्ति ही आकाशापेक्षां श्रेष्ठ होय. म्हणून जर पुष्कळ लोक स्मरण करणारे नसतील (स्मरणशक्तिरहित असतील) तर ते कोणाचेंहि ऐकणार नाहींत, विचार करणार नाहींत, जाणणार नाहींत. जेव्हां स्मरणशक्ति त्यांना प्राप्त होईल तेव्हां ते ऐकतील, तेव्हां ते विचार करतील, तेव्हां ते जाणतील. स्मरणशक्तीनेंच प्राणी पुत्रांना ओळखतो, स्मरणशक्तीनेंच तो पशूंना ओळखतो. म्हणून स्मरणशक्तीचीच उपासना कर.

स्मरणशक्ति आकाशापेक्षां श्रेष्ठ असल्याचें या मंत्रांत सांगितलें आहे. मानवी जीवनक्रमाच्या दृष्टीनें स्मरणशक्तीचें हें श्रेष्ठत्व श्रुतीनें दाखविलें आहे. मनुष्याचें जीवित सर्वस्वी आकाशावर अलंबून आहे खरें, पण स्मरण-शक्तीला देखील मानवी जीवितामध्यें अत्यंत महत्त्व आहे. विचार करणें, विचारांची एकमेकांशीं देवघेव करणें, पदार्थांचें सामान्य व विशेप प्रकारानें ज्ञान होणें इत्यादि गोष्टी मानवी जीवनक्रमात मुख्य आहेत; आणि त्या सर्वस्वीं या स्मरणशक्तीवरच अवलंबून आहेत. पुत्र, मित्र, आप्त, इष्ट, संपत्ति, धनधान्य, इत्यादिकांविषयींचा मानवी व्यवहार स्मरणशक्तीवरच

चालतो. स्मरणशक्ति हेंच मानवी बुद्धीचें वैशिष्ट्य होय. ती नष्ट झाली तर मानवी बुद्धीचा नाशच होतो असें सांगितलें आहे ( भगवद्गीता अ. २ श्लोक ६३ ). म्हणून स्मरणशक्तीचा ऱ्हास होईल अशी कोणतीही गोष्ट करणें हें पाप आहे. तें आपल्या हातून कधींही न होऊं देण्याची खबरदारी घेऊन आपल्या स्मरणशक्तीचें संरक्षण व संवर्धन करण्यास प्रत्येकानें झटलें पाहिजे असा श्रुतीचा उपदेश आहे.

**स यः स्मरं ब्रह्मेत्युपास्ते यावत्स्मरस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यः स्मरं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवः स्मराद्भूय इति स्मराद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥**

**सः यः स्मरम् ब्रह्म इति उपास्ते स्मरस्य यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यः स्मरम् ब्रह्म इति उपास्ते ( सः एतत् विन्दते ) । भगवः स्मरात् भूयः अस्ति इति । स्मरात् वाव भूयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।**

जो कोणी स्मरणशक्तीची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याची गति जेथपर्यंत स्मरणाची व्याप्ति आहे तेथपर्यंत अव्याहत असते. जो स्मरणशक्तीची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें. ( नारद म्हणतो—) स्मरणाहून अधिक कांहीं आहे काय ? (सनत्कुमार म्हणतो—) स्मरणाहून अधिक आहे. ( नारद म्हणतो—) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

## अथ चतुर्दशः खण्डः ।

**आशा वाव स्मराद्भूयस्याशेद्धो वै स्मरो मन्त्रानधीते कर्माणि कुरुते पुत्रांश्च पशूंश्चेच्छत इमं च लोकममुं चेच्छत आशामुपास्स्वेति ॥ १ ॥**

**आशा वाव स्मरात् भूयसी । आशेद्धः वै स्मरः मन्त्रान् अधीते । कर्माणि कुरुते । पुत्रान् च पशून् च इच्छते । इमम् च अमुम् च लोकम् इच्छते । आशाम् उपास्स्व इति ।**

आशा हीच स्मरणशक्तीहून श्रेष्ठ आहे. ज्याची आशा प्रबल आहे असा पुरुष स्मरणशक्तीनें युक्त होऊन मंत्रांचें अध्ययन करितो, अनेक कर्में करितो, पुत्र आणि पशु ( संपत्ति ) यांची इच्छा करितो. इहलोक व परलोक इच्छितो. म्हणून आशेची उपासना कर.

आकांक्षा किंवा इच्छा असा या मंत्रातील आशा या शब्दाचा अर्थ आहे. आशा हें इच्छेचें मूळ स्वरूप आहे. या आशेमुळेंच मनुष्याची स्मरणशक्ति जागृत होते. म्हणून आशा हीच स्मरणशक्तीची उत्पादक किंवा उत्तेजक आहे असें ठरतें. स्मरणशक्तीप्रमाणेंच एकंदर मानवी व्यवहाराला आशा ही कारणीभूत असते. ह्या आशेमध्यें दोष उत्पन्न न होतील याविषयीं मनुष्यानें काळजी घेतली पाहिजे. चांगल्या किंवा वाईट वासना या आशेंतूनच प्रादुर्भूत होतात. म्हणून वाईट वासना उत्पन्न न होतां ( किंवा त्या तीव्र न होतां ) शुभ वासनांचा प्रवाहच या आशेच्या झऱ्यांतून वहात राहील असा प्रयत्न मनुष्यानें अवश्य करावयास पाहिजे. हीच आशेची उपासना होय.

**स य आशां ब्रह्मेत्युपास्त आशयास्य सर्वे कामाः समृध्यन्त्यमोघा हास्याशिषो भवन्ति यावदाशाया गतं तत्रास्य यथाकामचारो भवति य आशां ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगव आशाया भूय इत्याशाया वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ।। २ ॥**

सः यः आशाम् ब्रह्म इति उपास्ते अस्य सर्वे कामाः समृध्यन्ति । अस्य आशिषः अमोघाः भवन्ति ह । आशायाः यावत् गतम् तत्र अस्य यथाकामचारः भवति । यःआशाम् ब्रह्म इति उपास्ते ( सः एतत् विन्दते । भगवः आशायाः भूयः अस्ति इति । आशायाः वाव भुयः अस्ति इति । भगवान् तत् मे ब्रवीतु इति ।

जो कोणी आशेची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. आणि त्याचे आशीर्वाद सफल होतात. जेथपर्यंत आशेची व्याप्ति आहे तेथपर्यंत त्याची गति अव्याहत असते. जो आशेची ब्रह्मबुद्धीनें उपासना करितो त्याला हें सर्व फल मिळतें. ( नारद म्हणतो—) आशेहून अधिक कांहीं आहे काय ? ( सनत्कुमार म्हणतो—) आशेहून अधिक आहे. ( नारद म्हणतो—) भगवन् ! आपण तें मला सांगावें.

## अथ पञ्चदशः खण्डः ।

**प्राणो वाव आशाया भूयान्यथा वा अरा नाभौ समर्पिता एवमस्मिन्प्राणे सर्वꣳ समर्पितं प्राणः प्राणेन याति प्राणः प्राणं ददाति प्राणाय ददाति प्राणो ह पिता प्राणो माता प्राणो भ्राता प्राणः स्वसा प्राण आचार्यः प्राणो ब्राह्मणः ॥ १ ॥**

**प्राणः वाव आशायाः भूयान् । यथा वै अराः नाभौ समर्पिताः एवम् अस्मिन् प्राणे सर्वम् समर्पितम् । प्राणः प्राणेन याति । प्राणः प्राणम् ददाति । प्राणाय ददाति । प्राणः ह पिता । प्राणः माता । प्राणः भ्राता । प्राणः स्वसा । प्राणः आचार्यः । प्राणः ब्राह्मणः ।**

प्राण हाच आशेपेक्षां श्रेष्ठ आहे. ज्याप्रमाणें चाकाच्या अरा गड्यावर बसविलेल्या असतात, त्याप्रमाणें या प्राणावर सर्व अवलंबून असतें. प्राण प्राणानेंच चालतो म्हणजे त्याची गति दुसऱ्यावर अवलंबून नसते. प्राण प्राणाला देतो ( प्राणशक्ति अर्पण करितो ) प्राणशक्तीकरितां देतो. प्राण हाच पिता होय, प्राण माता, प्राण भाऊ, प्राण बहीण, प्राण गुरु, प्राण ब्राह्मण ( श्रेष्ठ ) होय.

उपनिषदांतून अनेक ठिकाणीं प्राणाचें महत्त्व सांगितलें आहे. आशेपेक्षां इच्छेपेक्षां देखील प्राण हा अधिक श्रेष्ठ असल्याचें या मंत्रांत

सांगितलें आहे. कारण इच्छादिक धर्म प्राणाच्या आधारानेंच प्रगट होतात. किंबहुना, तो सर्वाधार असून पूर्ण स्वतंत्र आहे. माता, पिता इत्यादि कौटुंबिक प्रेमसंबधाला देखील प्राणाचा आधार असतो. ब्राह्मण हा शब्द श्रेष्ठ समाजाचा निदर्शक म्हणून या मंत्रांत आला आहे, तो एका विशिष्ट जातीचा बोधक नव्हे, हें येथें लक्षांत ठेविले पाहिजे. ब्राह्मण शब्दानें सर्व वर्णांचा वैदिक समाज विवक्षित आहे. सामाजिक संबंध देखील प्राणशक्तीवरच अवलंबून आहे. मनुष्याचें प्राणसामर्थ्य सोज्ज्वळ असेल तरच तो कुटुंबावर किंवा समाजावर प्रेम करूं शकतो; आणि आपली कौटुंबिक व सामाजिक कर्तव्यें करण्यास समर्थ असतो. सारांश, मनुष्याचे वैयक्तिक व सामाजिक संबंध पिण्डब्रह्माण्डात्मक सर्व सृष्टि इत्यादिकांचा प्राण हाच मुख्य आधार होय असें या मंत्राचें तात्पर्य आहे.

**स यदि पितरं वा मातरं वा भ्रातरं वा स्वसारं वाचार्यं वा ब्राह्मणं वा किंचिद्भृशमिव प्रत्याह धिक्त्वास्त्वित्यैवैनमाहुः पितृहा वै त्वमसि मातृहा वै त्वमसि भ्रातृहा वै त्वमसि स्वसृहा वै त्वमस्याचार्यहा वै त्वमसि ब्राह्मणहा वै त्वमसीति ॥ २ ॥**

**सः यदि पितरम् वा मातरम् वा भ्रातरम् वा स्वसारम् वा आचार्यम् वा ब्राह्मणम् वा भृशम् इव किंचित् प्रत्याह एनम् त्वा धिक् अस्तु इति एव आहुः। पितृहा वै त्वम् असि। मातृहा वै त्वम् असि। भ्रातृहा वै त्वम् असि। आचार्यहा वै त्वम् असि। ब्राह्मणहा वै त्वम् असि इति।**

जर कोणी बाप, आई, भाऊ, बहीण, गुरु, पूज्य व्यक्ति यांस अयोग्य असें कांहीं उलट बोलला तर, त्याला, तुला धिःकार असो असें लोक म्हणतात. तूं पितृद्रोही, मातृद्रोही भ्रातृद्रोही, स्वसृद्रोही गुरुद्रोही, ब्रह्मद्रोही आहेस असेंहि ह्मणतात.

आप्त, इष्ट किंवा समाज यांची निंदा केल्यास ती पर्यायानें प्राणाचीच निंदा होते; करितां ती कोणींही करूं नये असा या मंत्राचा अभिप्राय आहे.

**अथ यद्यप्येनानुत्क्रान्तप्राणाञ्छूलेन समासं व्यतिषंदहेन्नैवैनं ब्रूयुः पितृहासीति न मातृहासीति न भ्रातृहासीति न स्वसृहासीति नाचार्यहासीति न ब्राह्मणहासीति ॥ ३ ॥**

**अथ यदि अपि एनान् उत्क्रान्तप्राणान् शूलेन समासम् व्यतिषंदहेत् एनम् पितृहा असि इति न ब्रूयुः। मातृहा असि इति न। भ्रातृहा असि इति न। स्वसृहा असि इति न। आचार्यहा असि इति न। ब्राह्मणहा असि इति न।**

जर कोणी वर सांगितलेल्यांपैकीं, मृत झालेल्या मनुष्यास शुलानें किंवा एकदम अग्नीमध्यें दग्ध करील तर त्याला तूं पितृद्रोही आहेस असें म्हणत नाहींत तूं मातृद्रोही आहेस असें म्हणत नाहींत. तूं भ्रातृद्रोही आहेस असें ह्मणत नाहींत. तूं स्वसृद्रोही आहेस असें म्हणत नाहींत. तूं आचार्यद्रोही आहेस असें म्हणत नाहींत. तूं ब्राह्मणद्रोही आहेस असें ह्मणत नाहींत.

जीवंतपणीं अपशब्द बोलण्याने देखील ज्याचा द्रोह होतो तोच मनुष्य मृत झाल्यावर त्याच्या मृत देहाला शूलानें किंवा एकदम जाळलें तरी, त्याचा द्रोह केला असें म्हणत नाहींत. या व्यावहारिक दृष्टान्तावरून असें सिद्ध होतें कीं, स्तुति किंवा निंदा, प्रेम किंवा शत्रुत्व, पुण्य अथवा पाप या सर्व गोष्टी प्राणावरच अवलंबून आहेत.

**प्राणो ह्येवैतानि सर्वाणि भवति स वा एष एवं पश्यन्नेवं मन्वान एवं विजानन्नतिवादी भवति तं चेद्ब्रूयुरतिवाद्यसीत्यतिवाद्यस्मीति ब्रूयान्नापह्नुवीत ॥ ४ ॥**

**हि प्राणः एव एतानि सर्वाणि भवति। सः एषः एवम् पश्यन् एवम् मन्वानः एवम् विजानन् अतिवादी भवति। तम् अतिवादी असि इति ब्रूयुः चेत् अतिवादी अस्मि इति ब्रूयात् न अपह्नुवीत।**

कारण प्राणाचींच हीं सर्व रूपें होत. तो याप्रमाणें प्राणाच्या सर्व ज्ञानानें संपन्न झालेला, याप्रमाणें विचार करणारा, याप्रमाणें

जाणणारा प्रभावशाली वक्ता होतो. त्याला जर तू अतिवादी ( बहुभाष ) आहेस असें कोणी म्हणतील तर, त्या प्राणविद्यासंपन्न मनुष्यानें, होय, मी अतिवादी आहे असें खुशाल सांगावें. आपलें अतिवादित्व लपवूं नये.

.मनुष्य प्राणविद्येच्या पूर्ण अध्ययनानें, ज्ञानविज्ञानसंपन्न व प्रभावशाली वक्ता होतो. विद्वत्ता व वक्तृत्व या दोन गुणांचा संयोग फारच अपूर्व असतो. या गुणांच्या योगानें मनुष्याची समाजावर उत्कृष्ट छाप बसते. तो कोणत्याही तत्त्वाचा यशस्वी रीतीनें समाजांत प्रसार करण्यास समर्थ असतो. अधमवृत्तीचे लोक कुत्सितपणानें त्याच्या प्रभावशाली वक्तृत्वाला अतिवादित्व म्हणजे वाचाळपणा असें म्हणतात. अशा निंदकांची निंदा ज्ञानी मनुष्यानें सहन करावी. पण त्यांच्या निंदेनें अज्ञ समाजाचा गैरसमज होऊं लागला तर मात्र तो दूर करण्याकरितां ज्ञानी मनुष्यानें निंदकांच्या कुत्सित शब्दांचें स्पष्टीकरण करावें एवढाच अभिप्राय या मंत्रात आला आहे. याचा उत्तरार्ध पुढील खंडात आहे.

वस्तुतः या पुढचें सोळावें खंड या पंधराव्या खंडांतच समाविष्ट करावयास पाहिजे होतें परंतु ग्रंथकारानें तसें केलेलें नाहीं. त्यावरून पंधराव्या खंडाचे शेवटचे मंत्र किंवा १६व्या खंडांतील कांहीं मंत्र अदृश्य झाले असावेत असा तर्क करण्यास जागा आहे. तें कसेंही असलें तरी, झालेली खंडांची व्यवस्था जशीच्या तशी कायम ठेवणें भाग असल्यामुळें, या मंत्रांतच पंधरावें खण्ड समाप्त झालें आहे. पण या मंत्राचा अर्थसंदर्भ मात्र पुढच्या खण्डांत पूर्ण झाला आहे हें वाचकांनीं लक्षांत ठेवावे.

## अथ षोडशः खण्डः।

**एष तु वा अतिवदति यः सत्येनातिवदति सोऽहं भगवः सत्येनातिवदामीति सत्यं त्वेव विजिज्ञासितव्यमिति सत्यं भगवो विजिज्ञास इति ॥ १ ॥**

**यः सत्येन अतिवदति एषः तु वै अतिवदति । भगवः सः अहम् सत्येन अतिवदामि। सत्यम् तु एव विजिज्ञासितव्यम् इति । भगवः सत्यम् विजिज्ञासे इति ।**

जो सत्याच्या हेतूनें अतिवाद करितो तो खरोखर अतिवादी आहे. नारद–भगवन्! तो मी सत्यहेतुनें अतिवाद करीत आहे. म्हणून सत्याचीच जिज्ञासा करावी ( असें सनत्कुमार म्हणाला ). नारद म्हणतो–) भगवन् ! मी सत्याचीच जिज्ञासा करीत आहे.

बहुभाष, तोंडाळ, किंवा फटकळ अशा अर्थानें छांदोग्यकालीं देखील अतिवाद शब्दाचा उपयोग होत असावा असें दिसतें. म्हणूनच ज्ञानी आणि सत्यनिष्ठ मनुष्यानें या अतिवाद शब्दाच्या निन्दापर अर्थास न भितां सत्य हेतूनें अतिवाद केलाच पाहिजे असें येथें सांगितलें आहे. समाजांत कोणत्याही तत्त्वाचा प्रसार करावयाचा झाल्यास आणि तें तत्त्व सामान्य लोकांना अपरिचित व कांहीं सांप्रदायिकांना अप्रिय असें असलें तर, अतिवादावांचून गत्यंतरच नाहीं, असा त्या वेळच्या लोकांचा देखील अनुभव होता. व तोच अनुभव श्रुतीनें या मंत्रांत सांगितला आहे. वक्तृत्व हें एकच साधन प्राचीन काळीं होतें. वर्तमानकाळात त्याला ग्रंथलेखनाची आणखी जोड मिळाली आहे. त्यावर देखील अतिवादाचा आरोप निंदकांकडून केला जाणार हें निश्चित आहे. तथापि तत्त्वाचा प्रसार करणाऱ्या सत्यनिष्ठ मनुष्यानें असल्या गोष्टींना मुळींच भितां कामा नये. कारण सत्याचा असा प्रभाव आहे कीं, अखेरीस त्याचाच विजय होतो. 'सत्यमेव जयति नानृतम्' असें मुण्डकोपनिषदांत म्हटलें आहे ( उ. नि. र. प्र. मुण्डकोप ३·१·६ पृ. ८४–८६ ). प्रथम स्वतः सत्याचें ज्ञान पूर्णपणें संपादन केलें पाहिजे, मग त्याच्या प्रसाराकरितां अतिवादाचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं, असा सनत्कुमार ऋषीचा अभिप्राय आहे. तो ओळखूनच नारदानें आपली सत्याविषयींची जिज्ञासा प्रगट केली आहे.

## अथ सप्तदशः खण्डः ।

**यदा वै विजानात्यथ सत्यं वदति नाविजानन्सत्यं वदति विजानन्नेव सत्यं वदति विज्ञानं त्वेव विजिज्ञासितव्यमिति विज्ञानं भगवो विजिज्ञास इति ।। १ ।।**

यदा वै विजानाति अथ सत्यम् वदति । अविजानन् सत्यम् न वदति । विजानन् एव सत्यम् वदति । विज्ञानम् एव विजिज्ञासितव्यम् । भगवः विज्ञानम् विजिज्ञासे इति ।

जेव्हां मनुष्य विज्ञानसंपन्न होतो तेव्हांच जो खरें बोलतो. विज्ञानयुक्त पुरुष नसेल तर त्याला सत्य भाषण करितां येत नाहीं. विज्ञानवान मनुष्यच सत्य बोलतो. म्हणून विज्ञानाचीच जिज्ञासा करावी. (असें सनत्कुमार म्हणाला). ( नारद म्हणतो–) भगवन् ! मला विज्ञानाची जिज्ञासा आहे.

सत्याचें संशोधन करावयाचें झाल्यास त्याला विज्ञानाची अत्यंत आवश्यकता असल्याचें या मंत्रांत स्पष्ट सांगितलें आहे. सृष्टीच्या मूळ तत्त्वाचें संशोधन करावयाचें झाल्यास सृष्टिज्ञान म्हणजे विज्ञान हेंच मुख्य साधन आहे असा वैदिक ब्रह्मविद्येचा निश्चित सिद्धान्त असून तो बुद्धिग्राह्य व सयुक्तिक आहे. पदार्थांचें स्थूळ व सूक्ष्म स्वरूप किंवा त्याचे अन्तर्बाह्य गुणधर्म नीट समजल्याखेरीज त्यांतील तत्त्वाचा निश्चय करितां येत नाहीं. हा नियम व अनुभव प्राचीन किंवा अर्वाचीन संशोधनांत अबाधितच आहे व तोच या मंत्रांत स्पष्ट सांगितला आहे.

## अथाष्टादशः खण्डः ।

**यदा वै मनुतेऽथ विजानाति नामत्वा विजानाति मत्वैव विजानाति मतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति मतिं भगवो विजिज्ञास इति ।। १ ।।**

यदा वै मनुते अथ विजानाति । अमत्वा न विजानाति । मत्वा एव विजानाति । मतिः तु एव विजिज्ञासितव्या इति । भगवः मतिम् विजिज्ञासे इति ।

जेव्हां कोणी विवेक ( मनन ) करितो तेव्हांच त्याला विज्ञान प्राप्त होतें. म्हणून विवेकशक्तीचीच जिज्ञासा करावी. ( नारद म्हणतो—) भगवन् ! मी विवेक शक्तीचीच जिज्ञासा करीत आहे.

प्रस्तुत मंत्रांत विज्ञानाचें साधन जें मनन त्याचें महत्त्व सांगितलें आहे. तुलना, पृथक्करण, तारतम्य इत्यादि विषयाचा मननांतच अंतर्भाव होतो. म्हणून मननाचा विवेक असा अर्थ करणें भाषेच्या दृष्टीनें सयुक्तिक ठरतें. मति हा शब्द बुद्धीचा वाचक असला तरी, विवेक किंवा विवेक-शक्ति असाच येथें त्याचा अर्थ समजावा. निरीक्षण व संकलन असे शब्द आधुनिक शास्त्रीय भाषेत रूढ झाले आहेत. त्यांच्या अर्थाचा देखील मननांत—विवेकांतच अंतर्भाव होतो. विज्ञानाला मननाची—विवेकाची जोड दिली तरच तें विज्ञान फलद्रूप होतें.

## अथैकोनविंशः खण्डः ।

**यदा वै श्रद्दधात्यथ मनुते नाश्रद्दधन्मनुते श्रद्दधदेव मनुते श्रद्धा त्वेव विजिज्ञासितव्येति श्रद्धां भगवो विजिज्ञास इति ॥१॥**

यदा वै श्रद्दधाति अथ मनुते । अश्रद्दधत् न मनुते । श्रद्दधत् एव मनुते । श्रद्धा तु एव विजिज्ञासितव्या इति । भगवः श्रद्धाम् विजिज्ञासे इति ।

मनुष्य जेव्हां श्रद्धावान होतो तेव्हां विवेक करण्यास प्रवृत्त होतो. श्रद्धाहीन मनुष्य विवेक करूं शकत नाहीं. श्रद्धावानच विवेक करितो. श्रद्धेचीच जिज्ञासा करावी. ( नारद म्हणाला ) भगवन् ! मी श्रद्धेची जिज्ञासा करितों.

श्रद्धेचें स्वरूप, तिचें महत्त्व व तिच्यांतील भेद या विषयांचें विवेचन करण्याकरितां गीतेचा सतरावा अध्याय सबंध खर्ची पडला आहे. आस्थे-वाईकपणा हा श्रद्धा या शब्दाचा मुख्य अर्थ आहे. व तोच या मंत्रांत विवक्षित आहे. कोणत्याही विषयाची अगर तत्त्वाची खरी आस्था हृदयांत नसेल तर, तत्त्वज्ञानाला अवश्य असणाऱ्या अभ्यासाचे बौद्धिक कष्ट मनुष्याच्या हातून व्हावयाचेच नाहींत. म्हणून मननादिकाला श्रद्धेची अत्यंत आवश्यकता आहे असें निःसंशय ठरतें.

## अथ विंशः खण्डः ।

**यदा वै निस्तिष्ठत्यथ श्रद्दधाति नानिस्तिष्ठञ्छ्रद्दधाति निस्तिष्ठ-न्नेव श्रद्दधाति निष्ठा त्वेव विजिज्ञासितव्येति निष्ठां भगवो विजि-ज्ञास इति ॥ १ ॥**

यदा वै निस्तिष्ठति अथ श्रद्दधाति ; अनिस्तिष्ठन् न श्रद्दधाति निस्तिष्ठन् एव श्रद्दधाति । निष्ठा तु एव विजिज्ञासितव्या इति । भगवः निष्ठाम् विजिज्ञासे इति ।

जेव्हां मनुष्य निष्ठावान् होतो तेव्हां त्याच्या मनामध्यें श्रद्धा उत्पन्न होते. निष्ठारहित मनुष्य श्रद्धावान् असत नाहीं. निष्ठावान् श्रद्धायुक्त असतो. निष्ठेचीच जिज्ञासा करावी. ( नारद म्हणतो ) मी निष्ठेचीच जिज्ञासा करितों.

## अथैकविंशः खण्डः ।

**यदा वै करोत्यथ निस्तिष्ठति नाकृत्वा निस्तिष्ठति कृत्वैव निस्तिष्ठति कृतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति कृतिं भगवो विजिज्ञास इति ॥ १ ॥**

यदा वै करोति अथ निस्तिष्ठति । अकृत्वा न निस्तिष्ठति । कृत्वा एव निस्तिष्ठति । कृतिः तु एव विजिज्ञासितव्या इति । भगवः कृतिम् विजिज्ञासे इति ।

जेव्हां मनुष्य कर्म करूं लागतो तेव्हांच त्याच्या अंतःकरणांत निष्ठा उत्पन्न होते. कर्म न केल्यानें निष्ठा उत्पन्न होत नाहीं. कर्म करण्यानेंच निष्ठा उत्पन्न होते. म्हणून प्रयत्नाची जिज्ञासा करावी. ( नारद म्हणतो– ) मी प्रयत्नाची जिज्ञासा करीत आहे.

कर्माचे देखील स्थूलमानानें दोन विभाग करावे लागतात. प्रश्नोपनिषद्कारांनीं तर बाह्य, मध्य व आभ्यंतर असे क्रियेचे तीन भाग पाडले आहेत ( उ. नि. र. प्र. प्रश्नोपनिषद् ५·६ पृ. ९५-९६ ). म्हणून 'स्थूलमानानें' असें वर म्हटले आहे. या मंत्रांत कर्माचें तात्त्विक स्वरूप ( आभ्यंतर ) सांगितलें आहे. नैयायिकांनीं कृति म्हणजे प्रयत्न हा एक गुण आहे असें मानलें आहे. वस्तुतः कृति हें क्रियाशक्तीचें स्वरूप आहे. व्यवहारांत तिलाच कर्तृत्वशक्ति असें म्हणतात. निष्ठेला या कर्तृत्वशक्तीची जोड असणें अत्यंत आवश्यक आहे. मंत्रांत ' कृ ' धातूच्या प्रयोगानेंच वर्णन झालें आहे म्हणून कर्म शब्दानें त्याचें भाषांतर केलें आहे. तरी कृति म्हणजे कर्तृत्वशक्ति हाच अर्थ तेथें विवक्षित आहे असें समजावें.

## अथ द्वाविंशः खण्डः ।

**यदा वै सुखं लभतेऽथ करोति नासुखं लब्ध्वा करोति सुखमेव लब्ध्वा करोति सुखं त्वेव विजिज्ञासितव्यमिति सुखं भगवो विजिज्ञास इति ॥ १ ॥**

**यदा वै सुखम् लभते अथ करोति । असुखम् लब्ध्वा न करोति । सुखम् लब्ध्वा एव करोति । सुखम् तु एव विजिज्ञासितव्यम् इति । भगवः सुखम् विजिज्ञासे इति ।**

जेव्हां खरोखर सुख मिळवितो तेव्हां कर्म करितो. सुख मिळत नसेल तर कर्म करणार नाहीं. सुख मिळाल्यानेंच कर्म

करितो. म्हणून सुखाची जिज्ञासा करावी. ( नारद म्हणतो– ) भगवन् ! मी सुखाची जिज्ञासा करीत आहे.

मनुष्याच्या अंगीं कर्तृत्वशक्ति असेल तरच त्याच्या हातून कर्म घडतें; परंतु नुसती क्रियाशक्ति हीच कर्माला प्रेरक असते असें नाहीं. त्याला दुसऱ्या एका कारणाची जरूर असते. सुखाची इच्छा हेंच तें कारण होय. ही इच्छाच मनुष्याला कर्माची प्रेरणा करिते. प्रेरणा म्हणजे प्रवृत्ति. आणि प्रवृत्तीला कारण तेंच प्रवृत्तिनिमित्त होय. सुख हेंच प्रवृत्तिनिमित्त आहे. या सुखांत सात्त्विक, राजस, तामस, म्हणजे उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे भेद पडतात. सुखाची इच्छा स्वाभाविक असली तरी, सर्व प्रकारचीं सुखें खरीं हितकर नसतात. म्हणून सुखाचें ज्ञान संपादन करणें अवश्य आहे असें ठरतें. याच उद्देशानें सुखाची जिज्ञासा करावी असें सनत्कुमार ऋषीनें सांगितलें आहे. गीताशास्त्रांत देखील सुख हें प्रवृत्तिनिमित्त असल्यानें त्याचे भेद सांगून श्रुतीचा हाच अभिप्राय स्पष्ट केला आहे. ( गी. अ. १८ श्लो. ३६ ते ३९ र. दी. पृ. ४०१ ते ४०२ ).

## अथ त्रयोविंशः खण्डः ।

**यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं भूमा त्वेव विजिज्ञासितव्य इति भूमानं भगवो विजिज्ञास इति ॥ १ ॥**

**यः वै भूमा तत् सुखम् । अल्पे न सुखम् । भूमा एव सुखम् । भूमा तु एव विजिज्ञासितव्यः इति । भगवः भूमानम् विजिज्ञासे इति ।**

जें व्यापक तत्त्व आहे तेंच सुखकारक असतें. अल्पामध्यें सुख नाहीं. भूमा ( व्यापक ) हेंच सुख होय. म्हणून व्यापक तत्त्वाचीच जिज्ञासा करावी. ( नारद म्हणतो– ) भगवन् ! मी व्यापक तत्त्वाचीच जिज्ञासा करीत आहे.

प्रस्तुत मंत्रांतील 'भूमन्' या शब्दाचा व्यापक असा अर्थ करण्यांत येतो. परंतु त्या शब्दाचा तेवढाच अर्थ आहे असें नाहीं. या शब्दाच्या अवयवांवरून पाहिल्यास सत्तावान् असाहि त्यांतून अर्थ निघतो. व्यापक व सत्तावान् असें तत्त्व सुखवृत्तीला उत्पादक असतें. अशा तत्त्वापासून जें सुख प्राप्त होतें तें मात्र हितकारक असतें. म्हणूनच खरें सुख अशा तत्त्वापासूनच प्राप्त होतें. अव्यापक व परतंत्र अशा विषयांपासून होणारें सुख हितपर्यवसायी नसल्यामुळें, तें खरें सुखच नव्हे. म्हणून ज्या ज्या विषयांपासून सुख होईल ते सर्वच विषय आणि तीं सर्व सुखें ग्राह्य आहेत असें समजूं नये. सुखाचें तारतम्य त्याच्या विषयावरूनच ठरवावयाचें असतें. म्हणून सुखाचा विषय होणारें व्यापक व श्रेष्ठ तत्त्व कोणतें त्याचें ज्ञान होणें अवश्य ठरतें असें ज्ञान असेल तरच सुखाची बरोबर निवड करितां येईल. याकरितां सुखाला तत्त्वविज्ञासेची आवश्यकता आहे व तीच येथें श्रुतीनें प्रतिपादन केली आहे.

## अथ चतुर्विंशः खण्डः

**यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमाथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तदमृतमथ यदल्पं तन्मर्त्यꣳ स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि यदि वा न महिम्नीति ॥ १ ॥**

यत्र अन्यत् न पश्यति अन्यत् न शृणोति अन्यत् न विजानाति सः भूमा । अथ यत्र अन्यत् पश्यति अन्यत् शृणोति अन्यत् विजानाति तत् अल्पम् । यः वै भूमा तत् अमृतम् । अथ यत् अल्पम् तत् मर्त्यम् । भगवः सः कस्मिन् प्रतिष्ठितः इति । स्वे महिम्नि यदि वा न महिम्नि इति ।

ज्या व्यापक तत्त्वामध्यें दुसरें कांहींच दिसत नाहीं, दुसरें ऐकूं येत नाहीं किंवा दुसरें कळतही नाहीं, म्हणजे ज्यामध्यें कोणत्याही प्रकारचा भेद नाहीं, तोच भूमा होय. आणि ज्यामध्यें दुसरें

दिसतें, दुसरें ऐकूं येतें किंवा दुसरें विशेषत्वानें कळतें, म्हणजे ज्यामध्यें भेद असतो,तें अल्प होय.जो भूमा तेंच अमृत अविनाशी; आणि जें अल्प तेंच मर्त्य म्हणजे नाशवंत होय. (नारद म्हणतो–) भगवन्!तो भूमा कशावर प्रतिष्ठित झाला आहे?(सनत्कुमार म्हणतो-) तो स्वतःच्या सामर्थ्यावर प्रतिष्ठित आहे. तो स्वयंप्रकाश आहे. किंवा तो सामर्थ्यावर प्रतिष्ठित नाहीं असेंही म्हणावें. ( कारण सामर्थ्य हा धर्म असून तो धर्मीहून म्हणजे आपल्या आश्रयाहून भिन्न असावा लागतो. तसला भेद भूमातत्त्वामध्यें नसल्यामुळें, सामर्थ्य हें देखील भूमा या तत्त्वाचें स्वरूपच होय असें समजावें. म्हणजे भूमा व महिमा यांमध्यें आधाराधेयभावसंबंध मानण्याचीहि आवश्यकता नाहीं. )

सर्वतंत्र स्वतंत्र आणि व्यापक असें एक ब्रह्मतत्त्वच आहे. त्यावांचून इतर कोणतीही वस्तु पूर्णपणें व्यापक व स्वतंत्र नाहीं. अशा ब्रह्मतत्त्वाला अनुलक्षूनच भूमा हा शब्द पूर्वीच्या मंत्रांत आला आहे. हें भूमारूप ब्रह्मतत्त्व जसें व्यापक व स्वतंत्र आहे तसेंच तें भेदशून्य आहे, असें या मंत्रांत सांगितलें आहे. ज्या तत्त्वामध्यें श्रवणमननादि बौद्धिक क्रिया देखील संभवत नाहींत त्या तत्त्वांत कोणत्याही दृष्टीनें भेदभाव अगर द्वैत सिद्ध करितां यावयाचें नाहीं. श्रवण-मननादि बौद्धिक क्रिया जेथपर्यंत संभवतात तेथपर्यंत द्वैताची कल्पना संभवते. जगांत दिसणारे भेद हे कार्यगत आहेत. त्यांचा आदिकारणाशीं संबंध यावयाचा नाहीं. जगांतील प्रत्येक पदार्थ कोणाच्या तरी आधारावर असतो असें ठरतें. परंतु ब्रह्मतत्त्वाला मात्र कोणाचाही आधार नाहीं. म्हणजे तें परावलंबी नाहीं. तें आपल्याच सामर्थ्यावर अवलंबून असतें. म्हणजे तें स्वयंप्रकाश, स्वतंत्र व स्वावलंबी आहे. ब्रह्मतत्त्व स्वतःच्याच सामर्थ्यावर अवलंबून ( प्रतिष्ठित ) आहे.

या वाक्यावरून देखील शाब्दिक भेदाची कल्पना करितां येईल, ती अशी कीं, सामर्थ्य हें एक आणि ब्रह्मतत्त्व हें निराळें, अशी भेदकल्पना करण्यास जागा राहूं नये म्हणूनच ' यदि वा न महिम्नि ' असें मंत्राचे शेवटीं म्हटलें आहे. शुद्ध ब्रह्मतत्त्वाविषयीं कोणतेही शब्द वापरले तरी ही भेदकल्पना अपरिहार्यच असते. हें ओळखूनच ब्रह्माचा शब्दानें उल्लेख करावयाचे वेळीं केवळ शब्दावरून भेदकल्पना करणें म्हणजे शब्दच्छल करणें होय. तो विचारी व अभ्यासी मनुष्य सहसा करीत नाहीं. परंतु एकादा वितंडवादी मात्र असा शब्दच्छल करण्यास प्रवृत्त होतो. तसा तो कोणीं केल्यास ज्ञानी मनुष्यानें त्याचा निषेधच करावा. म्हणून शास्त्रकारानीं असल्या प्रकाराला निग्रहस्थान असें नांव दिलें आहे. श्रुतीमध्येंदेखील शब्दांनींच ब्रह्माचें प्रतिपादन केलें जातें तथापि तें अनिर्वचनीय आहे ही गोष्ट श्रुतीनें मान्य केलेली असते. जिज्ञासु मनुष्याच्या अंतःकरणांत ही शाब्दिक भेदकल्पना उत्पन्न होऊं नये एवढ्याचकरितां श्रुतीनें निषेधपरवाक्य या मंत्राच्या शेवटीं घातलें आहे.

**गोअश्वमिह महिमेत्याचक्षते हस्तिहिरण्यं दासभार्यं क्षेत्राण्यायतनानीति नाहमेवं ब्रवीमि ब्रवीमीति होवाचान्यो ह्यन्यस्मिन्प्रतिष्ठित इति ॥ २ ॥**

**इह गोअश्वम् हस्तिहिरण्यम् दासभार्यम् क्षेत्राणि आयतनानि महिमा इति आचक्षते । एवम् अहम् न ब्रवीमि । हि अन्यः अन्यस्मिन् प्रतिष्ठितः इति ब्रवीमि । इति उवाच ह ।**

व्यवहारामध्यें गाई, घोडे, हत्ती, सोनें, दास व भृत्य, जमीनजुमला, घरदार या सर्वांना सामर्थ्य ( महिमा ) असें म्हणतात. ( वरील सर्व गोष्टी मोठेपणाच्या निदर्शक असल्याकारणानें त्या सर्वांना मोठेपणा असें समजतात. ) असल्या मोठेपणावर तो भूमा प्रतिष्ठित आहे असें मी म्हणत नाहीं ( असा माझ्या म्हणण्याचा

अर्थ नव्हे ). कारण कोणीहि एक आपल्याहून दुसऱ्यावर ( भिन्न असलेल्यावर ) प्रतिष्ठित म्हणजे अवलंबून असतो असें मी म्हणतों ( असें सनत्कुमार म्हणाला ).

मनुष्याचा मोठेपणा, त्याचें शारीरिक व बौद्धिक सामर्थ्य, इतरांवर चालणारी त्याची सत्ता, संपत्ति इत्यादिकांवर अवलंबून असतो. कारण ह्याच गोष्टी व्यवहारांत मोठेपणाच्या निदर्शक म्हणून मानल्या जातात. तात्त्विक दृष्ट्या विचार केल्यास, मनुष्याचा हा मोठेपणा पूर्ण स्वावलंबी नाहीं असेंच कबूल करावें लागतें. संपत्ति नष्ट झाली, परिवार कमी झाला किंवा अधिकार चालेनासा झाला म्हणजे या मोठेपणास धक्का बसतो. परब्रह्माचें श्रेष्ठत्व या परावलंबी मोठेपणासारखें नाहीं असें या मंत्रांत सांगितलें आहे.

## अथ पञ्चविंशः खण्डः ।

**स एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात्स पुरस्तात्स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदꣳ सर्वमित्यथातोऽहंकारादेश एवाहमेवाधस्तादहमुपरिष्टादहं पश्चादहं पुरस्तादहं दक्षिणतोऽहमुत्तरतोऽहमेवेदꣳ सर्वमिति ॥ १ ॥**

**सः एव अधस्तात् । सः एव उपरिष्टात् । सः एव पश्चात् । सः एव पुरस्तात् । सः दक्षिणतः । सः उत्तरतः । सः एव इदम् सर्वम् इति । अथ अतः एव अहंकारादेशः । अहम् एव अधस्तात् । अहम् उपरिष्टात् । अहम् पश्चात् । अहम् पुरस्तात् । अहम् दक्षिणतः । अहम् उत्तरतः । अहम् एव इदम् सर्वम् इति ।**

तो( भूमा )च खालीं आहे. तोच वर आहे. तोच मागें आहे. तोच पुढें आहे. तोच दक्षिणेस आहे. तोच उत्तरेस आहे. तोच हें सर्व ( विश्व ) भरून राहिला आहे. म्हणजे त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. आणि म्हणूनच अहम् या प्रत्ययाचा ( आत्मवाचक अहम् या शब्दाचा ) भूमा या शब्दाचे स्थानीं आदेश

**म्हणजे निवेश करून, मीच ( भूमा-आत्मा ) खालीं, वर, मागें, पुढें दक्षिणेस, उत्तरेस आहे ! मीच हें सर्व विश्व आहे.**

प्रस्तुत मंत्रांतील पहिल्या भागांत भूमारूप ब्रह्माचें सर्वव्यापित्व दर्शविलें आहे. भूमा या शब्दानें ब्रह्मतत्त्वच विवक्षित आहे हें आतां निराळें सांगावयास नको. हें ब्रह्मतत्त्व व आत्मा हीं तत्त्वें सुद्धा भिन्न नाहींत. ज्याप्रमाणें भूमा शब्दाचा ब्रह्म हा पर्यायशब्द आहे. त्याप्रमाणेंच आत्मा हा देखील त्या भूमातत्त्वाचा पर्याय शब्दच आहे असें या मंत्राच्या दुसऱ्या भागांत दर्शविलें आहे. अहंकार हा शब्द येथें मनोविकाराचा वाचक नसून तो अहंप्रत्ययाचा म्हणजे आत्म्याचा वाचक आहे असें समजावें. त्यावरून भूमा, ब्रह्म व अहम् शब्दानें दर्शविला जाणारा आत्मा हीं सर्व एकाच तत्त्वाचीं नांवें होत असा या मंत्राचा अभिप्राय आहे.

**अथात आत्मादेश एवात्मैवाधस्तादात्मोपरिष्टादात्मा पश्चादात्मा पुरस्तादात्मा दक्षिणत आत्मोत्तरत आत्मैवेदꣳ सर्वमिति स वा एष एवं पश्यन्नेवं मन्वान एवं विजानन्नात्मरतिरात्मक्रीड आत्ममिथुन आत्मानन्दः स स्वराड्भवति तस्य सर्वेषु लोकेषु कामचारो भवति अथ येऽन्यथातो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति तेषाꣳ सर्वेषु लोकेष्वकामचारो भवति ॥ २ ॥**

**अथ अतः आत्मादेशः एव । आत्मा एव अधस्तात् । आत्मा उपरिष्टात् । आत्मा पश्चात् । आत्मा पुरस्तात् । आत्मा दक्षिणतः । आत्मा उत्तरतः । आत्मा एव इदम् सर्वम् । सः वै एषः एवम् पश्यन् एवम् मन्वानः एवम् विजानन् आत्मरतिः आत्मक्रीडः आत्ममिथुनः आत्मानन्दः । स स्वराट् भवति । तस्य सर्वेषु लोकेषु कामचारः भवति । अथ अतः ये अन्यथा विदुः ते अन्यराजानः क्षय्यलोकाः भवन्ति । तेषाम् सर्वेषु लोकेषु अकामचारः भवति ।**

म्हणून आतां आत्मादेश म्हणजेच परमात्मा होय. आत्माच खालीं, वर, मागें, पुढें, दक्षिणेस, उत्तरेस वगैरे सर्व ठिकाणीं भरला

असून हें सर्व ( विश्व ) आत्मस्वरूप आहे. तो हा याप्रमाणें पाहणारा, याप्रमाणें विचार करणारा, याप्रमाणें जाणणारा, ज्ञानी मनुष्य आत्मस्वरूपाचे ठिकाणीं रममाण होणारा, आत्मस्वरूपामध्येंच विश्राम पावणारा, नेहमीं आत्मबुद्धि जागृत असलेला, ( आत्मसंयुक्त ) आत्मस्वरूपाच्या आनंदानें युक्त असतो. अशा स्वरूपाचा तो ज्ञानी मनुष्य स्वराट् म्हणजे स्वयंप्रकाश, स्वावलंबी व पूर्ण स्वतंत्र होतो. त्याची सर्व लोकांमध्यें अकुंठित गति असते. म्हणजे त्याच्यावर कोणाचाही ताबा चालत नाहीं. आतां जे लोक याहून दुसऱ्या रीतीनें जाणतात, म्हणजे त्यांना वर सांगितलेलें भूमातत्त्वाचें ज्ञान झालेलें नसतें, ते दुसऱ्याच्या आधिपत्याखालीं असणारे ( परतंत्र ) व ज्याचें स्थान अस्थिर आहे असें असतात. म्हणजे या अज्ञानी मनुष्यांची स्थिति नेहमीं डळमळीत असते. त्यांची गति सर्व लोकांत अकुंठित नसते.

पूर्वीच्या मंत्रांत ‘ अहम् ’ या शब्दाने भूमातत्त्वाचे वर्णन केले आहे. तसेंच या मंत्राच्या पूर्वार्धांत त्याच भूमातत्त्वाचे आत्मा या शब्दाने वर्णन केले आहे. ब्रह्म, अहम् व आत्मा या तीन संज्ञा भूमातत्त्वालाच लावून दाखविल्या आहेत. उद्देश हा की, नांवें किंवा शब्द निरनिराळे असले तरी, तत्त्व एकच आहे. या तत्त्वाचे ज्ञान संपादन केलेल्या ज्ञानी मनुष्याचे रति, क्रीडा, आनंद इत्यादि मनोधर्म आत्मतत्त्वाशीं किंवा त्याच्या ज्ञानाशीं संलग्न असतात. कारण त्याची आत्मतत्त्वाविषयींची बुद्धि नेहमीं जागृत असते. दर्शन, मनन व विज्ञान हीं तीन तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाचीं मुख्य साधनें होत. बृहदारण्यकांत याज्ञवल्क्याने हीच साधनें मैत्रेयीला सांगितलीं आहेत. त्यांत श्रवणाचा अधिक उल्लेख आहे. पिण्डब्रह्माण्डादि सृष्टीचें निरीक्षण, तत्त्वविषयक वाङ्मयाचे श्रवण(वाचन),मनन(विचार) व विज्ञान

म्हणजे सिद्धान्तनिश्चय अशा स्वरूपाचीं हीं साधनें आधुनिक तत्त्वेत्त्यांनीं देखील मान्य केलीं आहेत. ज्ञानी मनुष्य पूर्ण स्वतंत्र असून कोणत्याही व्यवहारांत अगर परिस्थितींत त्याची गति अव्याहत असते म्हणजे त्याच्या कार्याला कोणाकडूनही प्रतिबंध होऊं शकत नाहीं. अशा प्रकारच्या ज्ञानी मनुष्याचा सर्वश्रेष्ठ अधिकार धर्मशास्त्रकर्त्या ऋषींनींही मान्य केला आहे. असें ज्ञान ज्याला प्राप्त झालें नसेल तो परतंत्र, परप्रत्ययनेय, व संकुचित बुद्धीचा असतो. आत्मज्ञानानें बुद्धींतील सर्व सामर्थ्यांचा विकास होतो. म्हणूनच श्रुतीनें त्याला स्वराट् असें म्हटलें आहे. हेंच आध्यात्मिक स्वराज्य होय. स्व+राजू असे दोन भाग या शब्दांत आहेत. स्वतंत्र असा पहिल्या भागाचा अर्थ आहे. प्रकाशक किंवा सत्तावान् असा दुसऱ्या भागाचा अर्थ होतो. स्वतंत्र सत्ताधीश असा स्वराट् या सामासिक शब्दाचा अर्थ समजावा. अंतःकरण व इंद्रियें हीं ज्ञानविज्ञानसंपादक बुद्धीच्या पूर्ण ताब्यांत येणें हेंच आध्यात्मिक स्वराज्य किंवा स्वातंत्र्य होय असा या शब्दाचा अभिप्राय आहे.

## अथ षड्विंशः खण्डः ।

**तस्य ह वा एतस्यैवं पश्यत एवं मन्वानस्यैवं विजानत आत्मतः प्राण आत्मत आशात्मतः स्मर आत्मत आकाश आत्मतस्तेज आत्मत आप आत्मत आविर्भावतिरोभावावात्मतोऽन्नमात्मतो बलमात्मतो विज्ञानमात्मतो ध्यानमात्मतश्चित्तमात्मतः संकल्प आत्मतो मन आत्मतो वागात्मतो नामात्मतो मन्त्रा आत्मतः कर्माण्यात्मत एवेदꣳ सर्वमिति ॥ १ ॥**

एवम् ह वै पश्यतः एवम् मन्वानस्य एवम् विजानतः तस्य एतस्य आत्मतः प्राणाः। आत्मतः आशा। आत्मतः स्मरः। आत्मतः आकाशः। आत्मतः तेजः। आत्मतः आपः। आत्मतः आविर्भावतिरोभावौ। आत्मतः अन्नम्। आत्मतः बलम्। आत्मतः विज्ञानम्। आत्मतः ध्यानम्। आत्मतः चित्तम्।

**आत्मतः संकल्पः । आत्मतः मनः । आत्मतः वाक् । आत्मतः नाम । आत्मत मन्त्राः । आत्मतः कर्माणि । आत्मतः एव इदम् सर्वम् ।**

याप्रमाणेंच पाहणाऱ्या, याप्रमाणें विवेक करणाऱ्या व या प्रमाणें जाणणाऱ्या ब्रह्मज्ञानी मनुष्याच्या आत्म्यापासूनच या सर्वांचे अस्तित्व घडतें (म्हणजे त्याच्या बौद्धिक, मानसिक, शारीरिक व सार्वत्रिक गुणांस आत्मतत्त्वाचेंच अधिष्ठान असतें. हें पुढील यादीवरून दर्शविलें आहे ). आत्म्यापासूनच प्राण, आत्म्यापासून स्मरणशक्ति, आत्म्यापासून आशा, आत्म्यापासून आकाश, आत्म्यापासून तेज, आत्म्यापासून जल, आत्म्यापासून दृश्यपणा व अदृश्यपणा, आत्म्यापासून अन्न, आत्म्यापासून बल, आत्म्यापासून विवेकशक्ति, आत्म्यापासून ध्यान, आत्म्यापासून चित्त, आत्म्यापासून संकल्प, आत्म्यापासून मन, आत्म्यापासून वाणी, आत्म्यापासून शब्द, आत्म्यापासून मंत्र आणि आत्म्यापासून कर्म, आत्म्यापासूनच हें सर्व ( विश्व ) अस्तित्वांत येतें.

आत्मज्ञानाच्या योगानें मनुष्याचा जीवनक्रम पूर्णपणें निर्दोष व तेजस्वी कसा होतो तें दाखविण्याकरितां अनेक विषयांची यादी दिली आहे. ह्या सर्व विषयांचें पूर्वींच्या खण्डांतून विवेचन झालेंच आहे. आत्मज्ञानाच्या योगानें मनुष्याचा सर्व व्यवहार शुद्ध होत असल्यामुळें, तो मानवी जातीला आदर्शभूत होतो असा श्रुतीचा अभिप्राय आहे. या अभिप्रायाचा पंचदशीकारांनीं देखील अनुवाद केला आहे.

**तदेष श्लोको न पश्यो मृत्युं पश्यति न रोगं नोत दुःखताꣳ सर्वꣳ ह पश्यः पश्यति सर्वमाप्नोति सर्वश इति । स एकधा भवति त्रिधा भवति पञ्चधा सप्तधा नवधा चैव पुनश्चैकादशः स्मृतः शतं च दश चैकश्च सहस्राणि च विꣳशतिराहारशुद्धौ**

**सत्त्वशुद्धिः सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः स्मृतिलम्भे सर्वग्रन्थीनां विप्रमोक्षस्तस्मै मृदितकषायाय तमसस्पारं दर्शयति भगवान्सनत्कुमारस्तꣳ स्कन्द इत्याक्षते तꣳ स्कन्द इत्याचक्षते ॥ २ ॥**

तत् एषः श्लोकः । पश्यः मृत्युम् न पश्यति । रोगम् न । उत दुःखताम् न । पश्यः सर्वम् ह पश्यति । सर्वशः सर्वम् आप्नोति इति ।

सः एकधा भवति । त्रिधा भवति । पञ्चधा सप्तधा नवधा च एव । पुनः च एकादशः स्मृतः शत च दश च एकः च सहस्राणि च विंशतिः च इति ।

आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः । सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः । स्मृतिलम्भे सर्वग्रन्थीनाम् विप्रमोक्षः । भगवान् सनत्कुमारः मृदितकषायाय तस्मै तमसः पारम् दर्शयति । तम् स्कन्दः इति आचक्षते ।

त्याविषयीं हा (प्राचीन) मन्त्र आहे. भूमज्ञानसंपन्न ब्रह्मवेत्ता मृत्यु पहात नाहीं म्हणजे नाश पावत नाहीं, रोगग्रस्त होत नाहीं व दुःख पावत नाहीं. तो ज्ञानी सर्वदर्शी असून सर्वांपासून सर्व मिळवितो. म्हणजे सर्व जगाचा उपयोग करून घेण्यास समर्थ असतो.

तो ( मूलतत्त्वांच्या दृष्टीनें ) तीन प्रकारचा होतो. ( पञ्चमहाभूतांच्या दृष्टीनें ) पांच प्रकारचा असतो. ( ग्रहांच्या दृष्टीनें ) सात प्रकारचा होतो.( संख्याकांच्या दृष्टीनें ) नऊ प्रकारचा होतो. ( रुद्रांच्या दृष्टीनें ) अकरा प्रकारचा, ( शतरात्र नांवाच्या यज्ञबुद्धीनें ) शंभर प्रकारचा, ( दहा इंन्द्रियांच्या दृष्टीनें ) दहा प्रकारचा, ( मनाच्या दृष्टीनें ) एक व ( सृष्ट पदार्थांच्या कल्पनेप्रमाणें ) हजारों किंवा असंख्य प्रकारचा, ( शब्दादि पांच विषय, पांच ज्ञानेन्द्रियें, पांच कर्मेन्द्रियें, व पांच प्राण मिळून) वीस प्रकारचा होतो. हे सर्व प्रकार आत्मतत्त्वाचेच असल्यामुळें, ज्याच्या

ज्याच्याशीं संबंध येईल त्याच्याशीं त्या ज्ञानी पुरुषाची बुद्धि आत्मदृष्टीनें तादात्म्य पावते. हे या सर्व संख्यावाचक शब्दांनीं दाखविलें आहे, यावरून ज्ञानी मनुष्य सर्व समर्थ व सर्वांचा उपयोग करणारा कसा होतो तें दर्शविलें आहे.

( ही भूमविद्या प्राप्त होण्याचेंच साधन सांगतात):—आहारशुद्धि झाल्यानें अंतःकरणशुद्धि होते. अन्तःकरणशुद्धि झाल्यानें स्मरण-शक्ति अढळ राहते, स्मृति दृढतर झाल्यानें संशयाच्या सर्व गांठी सुटतात. भगवान् सनत्कुमार ऋषि, ज्याच्या अंतःकरणाचे दोष नाहींसे झाले आहेत त्या शुद्धचित्त नारद ऋषीला अज्ञानाच्या पलीकडे असलेलें ब्रह्मतत्त्व दाखवीत आहेत. त्यालाच स्कंद असे म्हणतात. ( द्विरुक्ति अध्यायसमाप्तिदर्शक आहे.)

प्रस्तुत मंत्र बराच मोठा असून त्यांत तीन श्लोक आहेत. पहिल्या श्लोकांत भूमातत्त्वाचें ज्ञान प्राप्त झालेल्या ब्रह्मवेत्त्याचा नाश होत नाहीं; त्याचा स्थूल देह मृत्युवश झाला तरी त्याच्या अहंप्रत्ययाचा त्या देहाशीं विशिष्ट संबंध नसल्यामुळें तो स्वतः अमरच असतो; अशा ज्ञानी मनुष्याला रोगादिकांची पीडा होत नाहीं; कारण व्रतस्थपणा हा त्याचा सहजस्वभाव बनलेला असल्यामुळें निरोगीपणा हा व्रतस्थत्वाचा सहजपरिणामच असतो ब्रह्मज्ञानी मनुष्याच्या बुद्धीमध्यें योजकतेचें सामर्थ्य पूर्ण प्रगट होत असल्या-मुळें, त्याला जगाचा वाटेल तसा उपयोग करून घेतां येतो असें सांगितलें आहे. या पहिल्या श्लोकांत सांगितलेल्या फलाचें स्वरूप सयुक्तिक आहे. तेथें अद्भुत कल्पना करण्याची आवश्यकता नाहीं.

दुसऱ्या श्लोकांत मन, इन्द्रियें, प्राण, पंचभूतें, तेज, आप, पृथ्वी हीं तीन तत्त्वें इत्यादि सर्व पदार्थांशीं त्याची बुद्धि तद्रूप होऊं शकते, तथापि त्याची अद्वैत ब्रह्मभावना अढळ असते असें सांगितलें आहे. तिसऱ्या

श्लोकांत ब्रह्मज्ञानाचा क्रम सांगितला आहे. आहारशुद्धि हें अंतःकरणशुद्धीचें बाह्य पण मुख्य साधन आहे. आहार हें एकंदर विषयांचें उपलक्षण मानण्यास हरकत नाहीं. शास्त्रविहित व परिमित असें विषयसेवन करावें हें आहार-शुद्धीचें तात्पर्य आहे. आहारशुद्धीच्या योगानें अंतःकरणशुद्धि होते. दृढतर स्मरणशक्ति हें अंतःकरणशुद्धीचें मुख्य लक्षण आहे. या अढळ स्मरणशक्तीच्या योगानें ज्ञानविज्ञान नेहमीं जागृत राहून सर्व व्यवहार शुद्ध धर्माच्या स्वरूपाचे होतात. त्यांत केव्हांही चूक होत नाहीं हेंच तत्त्व ईशावास्योपनिषदांतही सांगितलें आहे ( उ. नि. र. प्र. ईश. मंत्र ८ पृ. २१ ते २३ ). या दृढ-स्मृतीच्या योगानें ब्रह्मदृष्टि स्थिर होत असल्यामुळें सर्व संशयांची निवृत्ति होते. अज्ञान हेंच संशयांचें कारण असून ब्रह्मज्ञानाच्या योगानें अज्ञानाचा पूर्ण निरास होतो व अज्ञानजन्य संशयाच्या गांठी अजिबात नष्ट होतात. संशय अशा अर्थानें ग्रंथि हा शब्द मुण्डक व कठ या दोनही उपनिषदांत आला आहे. याप्रमाणें संशयरहित असा ज्ञानी मनुष्य कृतार्थ होऊन जन-तेला सन्मार्गदर्शक होतो. नारद ऋषींचें अंतःकरण शुद्ध होतें म्हणूनच भगवान् सनत्कुमार ऋषींच्या उपदेशानें त्याचें ज्ञान पूर्ण झालें व तो कृतार्थ झाला. भगवान् सनत्कुमाराला स्कन्द असें म्हणतात. सर्वश्रेष्ठ अशा अर्थाची स्कन्द ही एक पदवी असावी असें वाटतें.

---

## सातव्या अध्यायाचा उपसंहार

सनत्कुमार व नारद यांचा संवाद या अध्यायांत वर्णिला आहे. या संवादाची पूर्वपीठिका मुळींच दिलेली नाहीं; म्हणून संवादांतील व्यक्ति पुराणप्रसिद्ध असल्यामुळें संवादाच्या प्रसंगाचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार करण्याचें कारणच उरत नाहीं. याप्रमाणें संवादाची भूमिका ऐतिहासिक आहे असें निश्चित ठरवितां आलें नाहीं तरी, या संवादांत झालेल्या विषयविवेचनाचें महत्त्व मुळींच कमी होत नाहीं. मानवी जीवित हें एक

मोठें शास्त्र आहे असें अभ्यासकाला या सातव्या अध्यायाच्या परिशीलनानें खचित दिसून येईल. मानवी जन्मांत काय साधावयाचें आहे त्याची स्पष्ट कल्पना भगवान् सनत्कुमारानें सांगितली आहे. पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टीचें विवेचन श्रुतीनें सविस्तर व तपशीलवार केलें असलें तरी तें त्याज्यत्वाकरितां–हेयत्वाकरितां आहे असें समजून सृष्टिज्ञानाकडे लक्षच देण्याचें कारण नाहीं, असें मायावादी म्हणत असतात. भगवान् सनत्कुमार ऋषीला किंवा श्रुतीला मायावादाची कल्पना अभिप्रेतच नसल्यामुळें रज्जुसर्पाप्रमाणें किंवा शुक्तिरजताप्रमाणें भासमान् होणाऱ्या पिण्डब्रह्माण्डाचा विचारच करण्याचें कारण नाहीं, असें श्रुतीला किंवा भगवान् सनत्कुमारासारख्या मंत्रद्रष्ट्या ऋषींना मुळींच वाटत नव्हतें. किंबहुना पिण्डब्रह्माण्डाचा शास्त्रदृष्ट्या विचार करणें हें ब्रह्मज्ञानाचें मुख्य साधन होय अशा हेतूनेंच त्यांनीं त्या विषयाचें तपशीलवार सविस्तर विवेचन केलें आहे. त्यावरून विज्ञानशास्त्र हेंच ब्रह्मज्ञानाचें मुख्य साधन होय असा श्रुतीचा सिद्धांतच ठरतो.

नारद ऋषीनें पुष्कळ विद्यांचें अध्ययन केलें होतें, त्यांची संख्या जवळ जवळ अठरा भरते. नारदानें विद्वत्ता संपादन केली असली तरी, तिचा मानवी जीवनक्रमांत कसा उपयोग करावयाचा तें त्याला समजावयास पाहिजे होतें. भगवान् सनत्कुमार ऋषीनें त्याची जिज्ञासा तृप्त केली. निरनिराळीं तत्त्वें, त्यांचें महत्त्व, एकमेकांशीं त्यांचें तारतम्य, ऐहिक व परमार्थिक व्यवहारांत त्यांचा उपयोग इत्यादि विषयांचें विवेचन भगवान् सनत्कुमारानें फारच मार्मिकपणें केलें आहे. वाङ्मय ( नाम ), वाणी–वाक्शक्ति, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान, बल, अन्न, पाणी, तेज, आकाश, स्मरणशक्ति ( स्मर ), आशा आणि प्राण ह्या पंधरा तत्त्वांवर मनुष्याचा व्यवहार व परमार्थ अवलंबून असतो. मनुष्य ज्या मानानें त्यांचें ज्ञान त्यांचा सोज्ज्वळपणा व त्यांचें संवर्धन इत्यादि गोष्टी अमलांत आणील त्या

मानानें त्याचा जीवनक्रम पवित्र व तेजस्वी होईल. हीं तत्त्वें एकाहून एक श्रेष्ठ असल्याचें सांगितलें आहे. या श्रेष्ठत्वाचीं कारणें निरनिराळीं आहेत. कांहींचें श्रेष्ठत्व त्यांच्या व्यापकपणावर अवलंबून आहे. कित्येक तत्त्वांचें श्रेष्ठत्व त्यांच्या आवश्यकतेवर व कारणत्वावरही अवलंबून आहे. या पंधरा तत्त्वांपैकीं आकाश, तेज व जल या तत्त्वांचा पिण्डब्रह्माण्डाशीं सारखाच संबंध येतो. प्राण हें तत्त्व तर सर्वव्यापीच आहे. बाकीचीं अकरा तत्त्वें मुख्यत्वेंकरून मानवी जीविताशींच संबद्ध आहेत. तसेंच खण्ड १६ ते २३ अखेरपर्यंतच्या विवेचनांत अतिवाद, सत्य, विज्ञान, मनन, श्रद्धा, निष्ठा, कर्तृत्व आणि सुख या आठ विषयांचें विवेचन झालें आहे. आणि पुढील तीन खण्डांत व्यापक ब्रह्मतत्त्वाचें विवेचन करून एकंदर प्रतिपादनाचा उपसंहार केला आहे. सोळाव्या खण्डापासून ज्या आठ विषयांचें प्रतिपादन झालें आहे त्यांचा कार्यकारणभावसंबंध उघड दिसून येण्याजोगा आहे. ध्येयाचें स्वरूप निश्चित करितांना मनुष्यानें सुखाविषयीं चांगला खोल विचार करावयास पाहिजे. कारण हें सुख ध्येयांतच समाविष्ट असतें. सुखाची कल्पना मुळांतच मध्यम प्रतीची म्हणजे कांहींशी सदोष असेल तर त्याचे कर्तृत्वादि गुण देखील सदोषच राहतील म्हणून निर्दोष सुखाची कल्पना स्पष्टपणें करितां आली पाहिजे. असें पवित्र सुखस्वरूप ध्येय निश्चित झालें म्हणजे हा ध्येयनिश्चयच कर्तृत्वशक्तीला उत्तेजक होतो. ध्येयाचें पावित्र्य कर्तृत्वादि गुणांत संक्रमण होतें. कर्तृत्वशक्ति निष्ठेला उपयोगीं पडते. निष्ठेपासून श्रद्धा प्रगट होते. श्रद्धेनेंच मन चिंतन घडतें. चिंतनाच्या योगानें विज्ञान संशयरहित व स्थिर होतें. पूर्ण विज्ञानानेंच सत्याची प्राप्ति होते व सत्याकरितांच म्हणजे सत्यतत्त्वाच्या प्रसाराकरितांच अतिवाद अवश्य व योग्य ठरतो. या आठ गुणांनीं मनुष्याचें अंतरंग शुद्ध व ज्ञानपूर्ण होतें. अशा शुद्ध व ज्ञानविज्ञानसंपन्न अंतरंगालाच गीतेनें बुद्धियोग असें नांव दिलें आहे. गीताशास्त्राच्या १८ व्या अध्यायांत श्लोक १९ ते ४० पर्यंत ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति व सुख अशा सहा गुणांचें सात्त्विक, राजस,

तामस असे भेद सांगून या गुणांचें सात्त्विक स्वरूपच संपादननीय आहे असें प्रतिपादन केले आहे. त्याचप्रमाणें १७ व्या अध्यायांत श्रद्धा, आहार, यज्ञ, दान व तप यांचें सात्त्विक स्वरूपच श्रेष्ठ होय असें ठरविलें आहे. तसेंच अठराव्या अध्यायांतील श्लोक ७ ते १० पर्यंत त्यागाच्या सात्त्विक स्वरूपाचें श्रेष्ठत्व दर्शविलें आहे. गीतेंतील हें सर्व प्रतिपादन सनत्कुमार व नारद यांच्या संवादास अनुसरूनच आहे असें कोणालाही दिसून येईल. या अध्यायाच्या १५ व्या खण्डापर्यंत जीं १५ तत्त्वें प्रतिपादन केलीं आहेत तीं मनुष्याच्या ऐहिक व पारमार्थिक व्यवहारांत प्रगट होणारीं आहेत; व पुढील आठ तत्त्वें प्रायः बौद्धिक स्वरूपाचीं आहेत. या सर्व तत्त्वांच्या ज्ञानानें शरीर, मन व बुद्धि यांतील सद्गुणांचें संवर्धन होतें. हे सद्गुण निःश्रेयसाप्रमाणें अभ्युदयाला देखील अवश्यच आहेत. अभ्युदयाचा मार्ग किंवा साधनें निराळीं, आणि निःश्रेयसप्राप्तीचीं साधनें निराळीं, असें दशोपनिषदांत कोठेंही सांगितलें नाहीं. ती कल्पना श्रुतीला मान्य असती तर भगवान् सनत्कुमारानें या सर्व तत्त्वांचें एकसूत्री प्रतिपादन केलेंच नसतें; परंतु अभ्युदयनिःश्रेयसातील परस्परविरोधाविपर्यीची मायावादी कल्पना सनत्कुमार ऋषीला अभिप्रेतच नसल्यामुळें, त्यानें या सर्व तत्त्वांचा हार गुंफून भूमतत्त्वाच्या उपदेशानें त्यावर मेरुमणीच बसविला आहे. म्हणून भगवान् सनत्कुमार ऋषीचा हा उपदेश भ्रमरूप मायावादाला सर्वस्वीं बाधकच आहे यांत शंका नाहीं.

सर्व सृष्टीचें आद्यकारण नितांतशुद्ध, निर्विकार, एकजिनसी, सच्चिदानंदस्वरूप ( अद्वैत ) असें जें ब्रह्मतत्त्व त्याचें ' भूमा ' या शब्दानें २४ व्या खण्डापासून वर्णन केलें आहे. सृष्टींतील कोणतेही पदार्थ अगर तत्त्वें परिमाणबद्ध म्हणजे समर्याद आहेत, परंतु कोणतीच मर्यादा ब्रह्मतत्त्वाविषयीं सांगतां येण्याजोगी नाहीं. ब्रह्मतत्त्व हें ज्ञानमय व आनंदमय असल्यामुळें तेंच प्रत्येक साधकाचें मुख्य ध्येय होय. म्हणून प्रत्येकाला त्याचें ज्ञान अव-

श्यच ठरतें. परमार्थ व सद्व्यवहार हे सद्गुणांवरच अवलंबून असतात. पण सद्गुण देखील समर्याद आहेत. ब्रह्मज्ञानावांचून सद्गुणांची मर्यादा मनुष्याला कळत नाहीं. करितां ब्रह्मज्ञान हेंच सर्व सद्गुणांचें अधिष्ठान होय असें ठरतें. म्हणून अहंप्रत्यय व आत्मा या शब्दांनीं ब्रह्मतत्त्वाचें प्रतिपादन करून आहारशुद्धीसारख्या ब्रह्मज्ञानाच्या बाह्य साधनांचाही श्रुतीनें शेवटीं उल्लेख केला आहे. याप्रमाणें ब्रह्मज्ञानमूलक दैवीसंपत्तीनें युक्त असा जीवनक्रम संपादन करण्यास या अध्यायांत सनत्कुमारानें उपदेशिलेला मार्ग हेंच एक साधन आहे. म्हणून भगवान् सनत्कुमार ऋषीनें मानवी जीवनाचें अत्यंत उज्ज्वल असें शास्त्रच उपदेशिलें आहे. प्रत्येक कार्यकर्त्यानें या श्रुतिप्रतिपादित मानवी जीवनशास्त्राचें काळजीपूर्वक अध्ययन करणें अत्यंत अवश्य आहे.

---

# अष्टमोऽध्यायः



## अथ प्रथमः खण्डः ।

**अथ यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशस्तस्मिन्यदन्तस्तदन्वेष्टव्यं तद्वाव विजिज्ञासितव्यमिति॥ १॥**

**अथ अस्मिन् ब्रह्मपुरे यत् इदम् दहरम् पुण्डरीकम् वेश्म अस्मिन् दहरः अन्तराकाशः। तस्मिन् यत् अन्तः तत् अन्वेष्टव्यम्। तत् वाव विजिज्ञासितव्यम् इति।**

अथ हा शब्द अध्यायाचा प्रारंभदर्शक आहे. या ब्रह्माच्या नगरामध्यें—देहामध्यें जें हें सूक्ष्म हृत्कमलरूपी निवासस्थान आहे, त्या कमलरूपी गृहामध्यें ( सूक्ष्म ) दहराकाश आहे. त्या आकाशाचें जें अंतरंग तेंच शोधावयाचें असून, तेंच समजून घेण्याची इच्छा करावी.

सातव्या अध्यायांत मानवी जीवनक्रमांतील अनेक महनीय तत्त्वांचें वर्णन आलें आहे. या सर्व तत्त्वांना परब्रह्माचें ज्ञान हेंच आधारभूत आहे. या ब्रह्मज्ञानाच्या आधारानें विकास पावणारे सद्गुण आणि शारीरिक व बौद्धिक सामर्थ्यें योग्य मर्यादेंत राहून मानवी जीवित कृतार्थ करितात. असा ज्ञानी मनुष्य जगाला सन्मार्गदर्शक होतो. मनुष्याच्या सर्व शक्तींना किंवा सद्गुणांना ब्रह्मज्ञानाचाच आधार असल्यामुळें तेंच सर्वांत श्रेष्ठ होय असें ठरतें. हें ब्रह्म भूमा म्हणजे सर्वव्यापी असून तें आत्मा इत्यादि शब्दांनीं ओळखलें जातें. अहम् किंवा आत्मा हे शब्द व्यक्तिवाचक आहेत. ब्रह्माण्डाप्रमाणें मानवी शरीरांत देखील हें भूमब्रह्म व्यापून राहिलें आहे. ब्रह्माण्ड हें जसें ब्रह्मज्ञानाला उपयोगी पडतें, म्हणजे ब्रह्माण्डाचें ज्ञान हें विज्ञान म्हणून ब्रह्मज्ञानाचें साधन होतें, त्याप्रमाणेंच पिण्डज्ञान हें देखील विज्ञान म्हणून ब्रह्मज्ञानाचें साधन होय. ब्रह्माण्डाचा विचार

करितांना आकाश, विद्युत्, प्राण इत्यादि मुख्य तत्त्वें हींच ब्रह्मसंशोधनाचीं स्थानें होत, असें श्रुतीनें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. कोठें आकाश, कोठें विद्युत्, तर कोठें प्राण इत्यादि तत्त्वांपैकीं कोणतें तरी एक ब्रह्म-तत्त्वाच्या संशोधनाचें मुख्य स्थान असें ऋषींनीं मानलें आहे. पांचव्या अध्यायांतील पंचाग्निविद्या, अश्वपति व प्राचीनशालादि ऋषींचा संवाद इत्यादि-प्रकरणांवरून सृष्टिज्ञानाचा ब्रह्मज्ञानसंपादनाचे कामीं कसा उपयोग होतो हें स्पष्ट व सविस्तरपणें वर्णिलें आहे. ब्रह्माण्डाप्रमाणें मानवी शरीराचा देखील विचार करणें ब्रह्मज्ञानाच्या दृष्टीनें अगत्याचें आहे. या शरीरांत ब्रह्मतत्त्वाचें संशोधन कसें करावयाचें तें या अध्यायांत सांगावयाचें आहे.

प्रस्तुत मंत्रांत या देहालाच ब्रह्मपुर असें म्हटलें आहे. त्यावरून ब्रह्म-ज्ञानाच्या दृष्टीनें मानवी देहाचें अत्यंत महत्त्व दर्शविलें आहे. या शरीरांत हृदय या नांवाचें एक विशिष्ट स्थान असून त्यांतील आकाश ( दहराकाश ) हेंच ब्रह्माचें स्थान होय असें या मंत्रांत दर्शविलें आहे. येथें सूक्ष्मत्वाच्या कल्पनेची परमावधि झाली आहे असें दिसतें. ब्रह्माचा विचार पिण्ड किंवा ब्रह्मांड यांपैकीं कोणत्याहि एका विषयावरून केला तरी तो अत्यंत सूक्ष्मच असतो. त्यांत ब्रह्माण्डाच्या विचारापेक्षां पिण्डगत विचार कमी सूक्ष्म आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. शरीर, हृत्कमल व त्यांतील आकाश यांची नुसती शाब्दिक कल्पना करून भागावयाचें नाहीं. या तीनही विषयांचा शास्त्रीय दृष्ट्या अभ्यास करावयास पाहिजे; तरच या दहराकाशाचा बिनचूक विचार करितां येईल. या अभिप्रायानेंच ‘ तत् विजिज्ञासितव्यम् ’ म्हणजे त्या दहराकाशाचें किंवा दहराकाशांतील ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान संपादन कर-ण्याची अवश्य इच्छा करावी, असें शेवटीं श्रुतीनें सांगितलें आहे.

**तं चेद्ब्रूयुर्यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्त स्मिराकाशः किं तदत्र विद्यते यदन्वेष्टव्यं यद्वाव विजिज्ञासितव्यमिति स ब्रूयात ॥ २ ॥**

**आस्मिन् ब्रह्मपुरे यत् इदम् दहरम् पुण्डरीकम् वेश्म अस्मिन् दहरः अन्तराकाशः। अत्र किम् तत् विद्यते यत् अन्वेष्टव्यम् यत् वाव विजिज्ञासितव्यम्। इति तम् ब्रूयुः चेत् सः ब्रूयात्।**

या ब्रह्माच्या नगरामध्यें जें हें सूक्ष्म हृदयकमलरूपी गृह आहे त्या गृहामध्यें सूक्ष्म असें अन्तराकाश आहे. या आकाशामध्यें असें काय असणार, कीं जें शोधण्यासारखें किंवा जिज्ञासा करण्यासारखें असेल ? ( असा शिष्यांनीं ) त्याला ह्मणजे गुरूला जर प्रश्न केला तर त्या गुरूनें सांगावें कीं,—

मागील मंत्राच्या अर्थाचा अनुवाद करून मुख्य प्रश्नाचें विशेष स्पष्टीकरण या मंत्रांत केलें आहे.

**यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदय आकाश उभे आस्मिन्द्यावापृथिवी अन्तरेव समाहिते उभावग्निश्च वायुश्च सूर्याचन्द्रमसावुभौ विद्युन्नक्षत्राणि यच्चास्येहास्ति यच्च नास्ति सर्वं तदस्मिन्समाहितमिति ॥ ३ ॥**

**यावान् वै अयम् आकाशः तावान् एषः अन्तर्हृदये आकाशः । अस्मिन् उभौ अग्निः च वायुः च उभौ सूर्याचन्द्रमसौ विद्युत्नक्षत्राणि । अस्य इह यत् च अस्ति यत् च नास्ति तत् सर्वम् अस्मिन् समाहितम् ।**

जेवढें ( जें ) हें बाह्य आकाश आहे तेवढेंच ( तें ) हृदयाच्या अंतर्भागीं आकाश आहे. ह्या आकाशामध्यें अग्नि व वायु हे दोनही सूर्य व चंद्र हे दोघे, वीज व नक्षत्रें आहेत. या जगतांत जे भावरूप व अभावरूप आहे तें सर्व या आकाशामध्यें स्थित आहे.

प्रस्तुत मंत्रांत आकाशाचें सर्वाधारसामर्थ्य सांगितलें आहे. हृदयांतील आकाशाला दहराकाश अशी संज्ञा श्रुतीनें दिली आहे. हें दहराकाश अतिशय लहान असल्यामुळें बाहेरच्या आकाशाप्रमाणें सामर्थ्ययुक्त नसावें असें वाटण्याचा संभव आहे. ही शंका निरसन करण्याकरितांच दहराकाश व

बाह्याकाश हीं निरनिराळीं नसून एकच आहेत असें येथें श्रुतीनें सांगितलें आहे. यावान् व तावान् हे शब्द परिमाणदर्शक असले तरी, येथें या दोन आकाशाचें नुसतें परिमाण दाखवावयाचें नसून, बाहेरच्या आकाशांत जी शक्ति आहे तीच दहराकाशांतही आहे असें यावान् व तावान् या शब्दांनीं श्रुतीनें येथें दाखविलें आहे. पृथिवी, द्युलोक, अग्नि, वायु, विद्युत् व नक्षत्रें या सर्वांना धारण करण्याची जी शक्ति या बाह्याकाशांत आहे तीच या दहराकाशांतही वास करीत आहे. येथें आकाश म्हणजे आभाळ किंवा वातावरण असा अर्थ नसून आधुनिकांच्या ईथरप्रमाणें सर्व भौतिक सृष्टीचें मूळकारण असें जें 'दिव्य आप' त्यासारखेंच हें आकाश आहे. या आकाशाची उत्पत्ति प्रथम आत्म्यापासून झाली असें तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें आहे ( तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः). तेंच आकाश येथें विवक्षित आहे. हें आकाश म्हणजे ब्रह्मतत्त्वाचें अगदीं निकटवर्ती एक तत्त्व असून, तेंच दहराकाश होय असा श्रुतीचा अभिप्राय आहे. बृहदारण्यकांतील गार्गी व याज्ञवल्क्य यांच्या संवादांत पृथिव्यादि भूतसृष्टि या आकाशावरच आधारलेली असून त्यापासूनच उत्पन्न झालेली आहे, सर्वांचें आदिकारण असें हें आकाश अक्षरतत्त्वामध्यें–ब्रह्मतत्त्वांमध्यें ओत-प्रोत म्हणजे आधारलेलें व त्यापासून उत्पन्न झालें आहे, असें वर्णन आहे. याज्ञवल्क्याच्या म्हणण्याचें तात्पर्य असें कीं, सर्वव्यापी व सर्वाधार अशा या आकाशाच्या पलीकडील पायरी ब्रह्मतत्त्व हीच होय ( उ. नि. र. प्र. बृह. अ. ३ ब्रा. ८ मं. ११ पृ. ४०५-४०६ ). बृहदारण्यकांतील या विवेचनास अनुसरूनच या मंत्राचा अभिप्राय आहे. पृथिव्यादिकांना धारण करण्यास समर्थ असलेलें आकाश व दहराकाश हीं भिन्न नसून एकच आहेत असें दर्शविण्याकरितांच यावान् व तावान् हे शब्द या मंत्रांत आले असून, त्याच अभिप्रायानें इतर वर्णनही आलें आहे. हृदयाच्या लहान परिमाणामुळें दहराकाशाचें परिमाण अल्प असलें तरी, त्याच्या मूळ स्वरूपांत भेद नाहीं असा या मंत्रांचा भावार्थ आहे.

**तं चेद्ब्रूयुरस्मिꣳश्चेदिदं ब्रह्मपुरे सर्वꣳ समाहितꣳ सर्वाणि च भूतानि सर्वे च कामा यदैतज्जरा वाप्नोति प्रध्वꣳसते वा किं ततोऽतिशिष्यत इति ॥ ४ ॥**

अस्मिन् ब्रह्मपुरे सर्वम् समाहितम् सर्वाणि च भूतानि सर्वे कामाः चेत् यदा जरा एतत् आप्नोति प्रध्वंसते वा ततः किम् अतिशिष्यते इति तम् ब्रुयुः चेत्

या शरीरामध्यें व त्यांतील दहराकाशामध्यें सर्व समाविष्ट आहे. (त्याचप्रमाणें) सर्व भौतिक सृष्टि व सर्व काम (इच्छा) जर या ब्रह्मपुरांत समाविष्ट असतील तर, जेव्हां जरा या शरीराला प्राप्त होते व तें नाश पावतें तेव्हां त्यांतील काय अवशिष्ट राहतें? असें जर (शिष्यानें गुरूला) विचारिलें त्या गुरूनें सांगावें कीं:—

प्रस्तुत मंत्रांतील भाषेवरून सांकेतिक प्रश्न गृहीत धरला आहे असें दिसतें. दुसऱ्या मंत्रातील शब्दयोजना देखील अशाच प्रकारची आहे. त्यावरून गुरुशिष्यांची कल्पना करून त्यांची संगति लावली आहे. तथापि बाह्य आकाशाची सर्व शक्ति किंवा त्याचे गुण दहराकाशांत असतील तर, जरेनें क्षीण होऊन जेव्हां हा देह नाश पावतो तेव्हां या दहराकाशाचें काय होतें? असें जर त्याविषयीं कोणी विचारतील तर, त्यांना असें म्हणावें कीं, असा मोघम अर्थ करण्यास हरकत नाहीं.

**स ब्रूयान्नास्य जरयैतज्जीर्यति न वधेनास्य हन्यत एतत्सत्यं ब्रह्मपुरमस्मिन्कामाः समाहिता एष आत्मापहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पो यथा ह्येवेह प्रजा अन्वाविशन्ति यथानुशासनं यं यमन्तमभिकामा भवन्ति यं जनपदं यं क्षेत्रभागं तं तमेवोपजीवन्ति ॥५॥**

सः ब्रूयात् एतत् ब्रह्मपुरम् अस्य जरया न जीर्यति। अस्य वधेन एतत् न हन्यते। एतत् ब्रह्मपुरम् सत्यम्। अस्मिन् कामाः समाहिताः। एषः आत्मा

**अपहतपाप्मा विजरः विमृत्युः विशोकः विजिघत्सः अपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः। इह यथा हि एव प्रजाः यथानुशासनम् अन्वाविशन्ति यम् यम् अन्तम् यम् जनपदम् यम् क्षेत्रभागम् अभिकामाः भवन्ति तम् तम् एव उपजीवन्ति।**

या देहाच्या जरेनें हें ब्रम्हपुर ( दहराकाश ) जीर्ण होत नाहीं. या शरीराचा वध केल्यानें त्या ब्रम्हपुराचा वध होत नाहीं. हें ब्रह्मपुर म्हणजे दहराकाशरूप आत्मा हेंच सत्य होय. या दहराकाशामध्येंच इच्छा समाविष्ट असतात. हा आत्मा निर्दोष, जरारहित, नाशरहित, शोकरहित, क्षुधारहित, तृषारहित, सदिच्छावान्, संकल्पवान् ( असतो ). येथें व्यवहारांत ज्याप्रमाणें प्रजा राजशासनास अनुसरून राहतात, म्हणजे ज्या भागांत, ज्या देशांत किंवा ज्या क्षेत्रांत त्या प्रजा राहूं इच्छितात त्या ठिकाणीं राजशासनाला अनुसरूनच त्या उपजीविका करितात.

शरीराच्या क्षयाबरोबर किंवा नाशाबरोबर या दहराकाशाचा नाश होत नाहीं. हें दहराकाश हेंच खरें ब्रह्मपुर असून तेंच आत्म्याचें या देहांतील क्षेत्रज्ञस्वरूप होय. या दहराकाशांत अन्तर्यामीं वास करणाऱ्या आत्म्यालाच क्षेत्रज्ञ असें म्हणतात. क्षेत्रज्ञाच्या स्वरूपांत या दहराकाशाचा देखील समावेश होतो. वस्तुतः शुद्ध आत्मतत्त्व दहराकाशाहून वेगळें असलें तरी, साधक-बाधक रीतीनें त्याचा विचार करितांना हें दहराकाश अगदींच बाजूस ठेवतां येत नाहीं. म्हणून या दहराकाशयुक्त आत्म्याचें वर्णन या मंत्रांत केलें आहे. याच अभिप्रायानें दहराकाशाला आत्मा असें म्हटलें आहे. सत्यकाम, सत्यसंकल्प इत्यादि सद्गुण या आत्म्याच्या आधारानेंच बुद्धींत प्रगट होतात. त्यावरून गुणांची उत्पादकशक्ति बुद्धीला आत्म्यापासूनच मिळते असें सिद्ध झालें तरी, आत्मतत्त्व स्वतः निर्गुण, निर्विकार,

अविनाशी व निष्पाप आहे असें निःसंशय समजावें. बीजरूप सामर्थ्य किंवा शक्ति ही ब्रह्मस्वरूपांतच समाविष्ट असते, म्हणून तिला गुण, धर्म, विकार इत्यादि नांवें देतां येत नाहींत. ज्याप्रमाणें कोणताही अधिकार अगर अधिकारांचें काम स्वतः राजा करीत नाहीं पण सर्व अधिकारांचें बीज किंवा उगमस्थान राजाच्या ठिकाणींच असतें, त्याप्रमाणेंच आत्मा स्वतः निष्क्रिय व निर्विकार असून सर्व प्रकारच्या शक्तींचें उगमस्थान आहे, असें राजाच्या दृष्टान्तावरून श्रुतीनें या मंत्रांत दर्शविलें आहे. आत्मा हाच सर्व शारीरिक व बौद्धिक गुणाचें अधिष्ठान आहे. ज्ञानी मनुष्याची बुद्धि पूर्ण विकसित झालेली असते म्हणून तींत प्रगट होणारे सत्यकाम किंवा सत्यसंकल्प यांना देखील आत्म्याचाच आधार असतो. म्हणून आत्मज्ञान हें इच्छा किंवा संकल्प यांना बाधक असतें किंवा इच्छादिकांचा आत्मज्ञानाशीं विरोध असतो, ही मायावादांतील कल्पना श्रुतीच्या अभिप्रायाशीं मुळींच जुळण्यासारखी नाहीं, हें येथें लक्षांत ठेविलें पाहिजे.

**तद्यथेह कर्मजितो लोकः क्षीयत एवमेवामुत्र पुण्यजितो लोकः क्षीयते तद्य इहात्मानमननुविद्य व्रजन्त्येतांश्च सत्यान्कामांस्तेषांऽ सर्वेषु लोकेष्वकामचारो भवत्यथ य इहात्मानमनुविद्य व्रजन्त्येतांऽश्च सत्यान्कामांस्तेषांऽ सर्वेषु लोकेषु कामचारो भवति ॥ ६ ॥**

**तत् यथा इह कर्मजितः लोकः क्षीयते एवम् एव अमुत्र पुण्यजितः लोकः क्षीयते। तत् इह ये आत्मानम् एतान् सत्यान् कामान् च अननुविद्य व्रजन्ति तेषाम् सर्वेषु लोकेषु अकामचारः भवति। अथ ये इह आत्मानम् एतान् सत्यान् कामान् च अनुविद्य व्रजन्ति तेषाम् सर्वेषु लोकेषु कामचारः भवति।**

ज्याप्रमाणें कर्मांनीं संपादन केलेला ऐहिक उपभोग नाशिवंत असतो त्याप्रमाणेंच पुण्यानें संपादन केलेला पारलौकिक उपभोग ही नाशिवंत असतो. जे लोक या जन्मीं आत्मस्वरूपाला व ह्या

सत्यकामांना जाणल्यावांचून जातात, ते सर्व लोकांमध्यें अस्वतंत्र असतात ( म्हणजे त्यांचें सर्व ठिकाणीं पारतंत्र्य कायम राहतें ). उलट जे आत्मस्वरूप व सत्यकाम जाणून जातात, ते सर्व ठिकाणीं पूर्ण स्वतंत्र होतात, म्हणजे त्यांचें स्वातंत्र्य सर्वत्र कायम असतें.

प्रस्तुत मंत्रांतील पहिलें वाक्य उत्तरकालीन वेदान्तग्रंथांत फारच प्रसिद्ध आहे. कारण, इहलोकाप्रमाणेंच परलोक देखील नाशिवंत असल्याचें त्यांत दर्शविलें असून, ऐहिक व पारलौकिक या दोनही परिस्थिति अथवा व्यवहार कर्मानें संपादित असतात, म्हणून कर्म हें नाशिवंत फलांचें कारण असल्यानें तें स्वतः देखील नाशिवंतच ठरतें; याप्रमाणें कर्म व कर्मफल या दोनही गोष्टी परमार्थाला निरुपयोगी अतएव पारमार्थिक दृष्ट्या त्याज्य होत, असें मायावादाच्या विचारसरणीला हें वाक्य जुळविण्यांत येतें. प्रमाणादाखल अनेक ग्रंथकारांनीं या वाक्याचा उपयोग केला आहे. परन्तु हें वाक्य तुटक नसून त्याचा या मंत्रांतील पुढील भागाशीं संबंध जोडल्याखेरीज गत्यंतरच नाहीं, हें अभ्यासकानें प्रथम लक्षात ठेविलें पाहिजे. मायावादी ग्रंथकारांनीं कर्मांचें विषयभोगात्मक फल त्याज्य ठरविलें, तें श्रुतीच्या अभिप्रायास अनुसरूनच आहे. परंतु कर्मजन्य फलाबरोबर कर्म देखील पारमार्थिक दृष्ट्या त्याज्यच आहे असें म्हणणें श्रुतितात्पर्यास धरून होत नाहीं. कारण, आत्मज्ञान व आत्मज्ञानानें शुद्ध झालेल्या बुद्धीचे सत्यकाम या दोहोंचेंही महत्त्व आणि आवश्यकता याच मंत्रात सांगितली आहे. ज्याला आत्मतत्व आणि सत्यकाम हीं समजलीं नाहींत असा अज्ञानी व विषयोपभोगेच्छु मनुष्य सर्व ठिकाणीं अकामचार म्हणजे अस्वतंत्र होतो; याच्या उलट आत्मा व सत्यकाम यांच्या ज्ञानानें संपन्न असलेला पुरुष कोणत्याही परिस्थितींत पूर्ण स्वतंत्र असतो असें स्पष्ट सांगितलें आहे. कर्म निरपेक्षतया पारमार्थिक दृष्टीनें त्याज्यच आहे असा श्रुतीचा अभिप्राय असता तर, मंत्रांत ज्ञानी

मनुष्याच्या स्वातंत्र्याचा उल्लेख श्रुतीनें केला नसता. स्वातंत्र्य हा ज्ञानाचा सहज परिणाम असून, ज्ञानी मनुष्याचें हें स्वातंत्र्य कर्माच्याच रूपानें व्यक्त होतें, असें या मंत्रांतील 'कामचार' या शब्दावरून निःसंशय सिद्ध होतें. त्यावरून कर्मजन्य वैषयिक फलांचा उपभोग परमार्थांत त्याज्य असला तथापि तेवढ्यानें कोणत्याहि प्रकारचें कर्म देखील त्याज्य आहे असें म्हणणें श्रुतीच्या विरुद्ध आहे. कर्मांचा (अर्थात् निष्काम बुद्धीनें केल्या जाणाऱ्या सत्कर्मांचा) ज्ञानपरिपाक, सर्वभूतहित, लोकसंग्रह इत्यादि बाबतींत ज्ञानाच्या सहकार्यानें उपयोगच होतो. म्हणून पारमार्थिक दृष्ट्या अत्यंत उपयुक्त अशा कर्माला श्रुतीनें त्याज्य ठरविलेलें नसून त्याचा योग्य उपयोगच करून घेण्यास सांगितलें आहे. कामचार या शब्दाचा स्वैरवर्तन असा कांहीं ठिकाणीं अर्थ करण्यांत येतो. परंतु ती कल्पना येथें विवक्षित नाहीं. यशस्वी कर्तृत्व किंवा स्वातंत्र्य हाच अर्थ श्रुतीला अभि-प्रेत आहे असें निश्चित समजावें. हाच अभिप्राय मुण्डकोपनिषदांत देखील आला आहे. (उ. नि. र. प्र. मुण्डक ३ १.१० पृ. ९१-९२). 'सर्व-लोकेषु कामचारो भवति' या वाक्यांत ज्ञानविज्ञानसंपन्न स्थितप्रज्ञ पुरुषाला परिस्थितीचें प्रभुत्व व यशस्वी कर्तृत्व हीं प्राप्त होतात असेंच श्रुतीनें सांगि-तलें आहे. या विषयाचें सविस्तर विवेचन मुण्डकोपनिषदांतील वर दिलेल्या मंत्राच्या विवरणांत झालें आहे, तें अवश्य पहावें. तात्पर्य इतकेंच कीं, ज्ञानविज्ञानहीन (ब्रह्मज्ञानशून्य) अशा कर्मापासून प्राप्त होणारीं फलें त्याज्य आहेत. आत्मा व सत्यकाम यांचें म्हणजेच बुद्धियोगाचें ज्ञान संपादन केलें तर या कर्मांची खरी उपयुक्तता कळून येते व हा ज्ञान-विज्ञानसंपन्न कर्मयोगी परिस्थितीचा मालक व यशस्वी कार्यकर्ता होऊन तो आपला व समाजाचा उद्धार करण्यास पूर्ण समर्थ होतो, असा या मंत्राचा अभिप्राय आहे.

---

## अथ द्वितीयः खण्डः ।

**स यदि पितृलोककामो भवति संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति तेन पितृलोकेन संपन्नो महीयते ॥ १ ॥**

**सः यदि पितृलोककामः भवति अस्य संकल्पात् एव पितरः समुत्तिष्ठन्ति तेन पितृलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर पितृलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच त्याचे पितर उपस्थित होतील. त्या पितृलोकानें संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि मातृलोककामो भवति संकल्पादेवास्य मातरः समुत्तिष्ठन्ति तेन मातृलोकेन संपन्नो महीयते ॥ २ ॥**

**अथ यदि मातृलोककामः भवति अस्य संकल्पात् एव मातरः समुत्तिष्ठन्ति । तेन मातृलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर मातृलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच त्याच्या माता उपस्थित होतील. त्या मातृलोकानें संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि भ्रातृलोककामो भवति संकल्पादेवास्य भ्रातरः समुत्तिष्ठन्ति तेन भ्रातृलोकेन संपन्नो महीयते ॥ ३ ॥**

**अथ यदि भ्रातृलोककामः भवति अस्य संकल्पात् एव भ्रातरः समुत्तिष्ठन्ति । तेन मातृलोकेन संपन्नः महीयते**

तो जर भ्रातृलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच त्याचे बन्धु उपस्थित होतील. त्या भ्रातृलोकानें संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि स्वसृलोककामो भवति संकल्पादेवास्य स्वसारः समुत्तिष्ठन्ति तेन स्वसृलोकेन संपन्नो महीयते ॥ ४ ॥**

**अथ यदि स्वसृलोककामः भवति अस्य संकल्पात् एव स्वसारः समुत्तिष्ठन्ति । तेन स्वसृलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर स्वसृलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच त्याच्या भगिनी उपस्थित होतील. त्या स्वसृलोकानें संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि सखिलोककामो भवति संकल्पादेवास्य सखायः समुत्तिष्ठन्ति तेन सखिलोकेन संपन्नो महीयते ॥ ५ ॥**

**अथ यदि सखिलोककामः भवति अस्य संकल्पात् एव सखायः समुत्तिष्ठन्ति । तेन सखिलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर मित्रलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच त्याचे मित्र उपस्थित होतील. त्या मित्रलोकानें संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि गन्धमाल्यलोककामो भवति संकल्पादेवास्य गन्धमाल्ये समुत्तिष्ठतस्तेन गन्धमाल्यलोकेन संपन्नो महीयते ॥ ६ ॥**

**अथ यदि गन्धमाल्यलोककामः भवति अस्य संकल्पात् एव गन्धमाल्ये समुत्तिष्ठतः । तेन गन्धमाल्यलोकेन सपन्नः महीयते ।**

तो जर गन्धमाल्यलोकाची ( सुवासिक द्रव्यांची ) इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच गन्ध व माल्य उपस्थित होतील. त्या गन्ध व माल्य यांनीं संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यद्यन्नपानलोककामो भवति संकल्पादेवास्यान्नपाने समुत्तिष्ठतस्तेनान्नपानलोकेन सपन्नो महीयते ॥ ७ ॥**

**अथ यदि अन्नपानलोककामः भवति अस्य संकल्पात् एव अन्नपाने समुत्तिष्ठतः । तेन अन्नपानलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर अन्न व पान या लोकांची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच अन्न व पान उपस्थित होतील. त्या अन्न व पान यांनीं संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि गीतवादित्रलोककामो भवति संकल्पादेवास्य गीतवादित्रे समुत्तिष्ठतस्तेन गीतवादित्रलोकेन संपन्नो महीयते॥८॥**

**अथ यदि गीतवादित्रलोककामः भवति अस्य संकल्पात् एव गीत-वादित्रे समुत्तिष्ठतः । तेन गीतवादित्रलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर गीतवाद्यादिलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच गीत व वाद्य उपस्थित होतील. त्या गीत व वाद्य यांनीं संपन्न असा तो आनंद पावेल.

**अथ यदि स्त्रीलोककामो भवति संकल्पादेवास्य स्त्रियः समुत्तिष्ठन्ति तेन स्त्रीलोकेन संपन्नो महीयते ॥ ९ ॥**

**अथ यदि स्त्रीलोककामः भवति अस्य संकल्पात् एव स्त्रियः समुत्तिष्ठन्ति । तेन स्त्रीलोकेन संपन्नः महीयते ।**

तो जर स्त्रीलोकाची इच्छा करील तर त्याच्या इच्छेनेंच स्त्रिया उपस्थित होतील. त्या स्त्रीलोकानें संपन्न असा तो आनंद पावेल.

**यं यमन्तमभिकामो भवति यं कामं कामयते सोऽस्य संकल्पादेव समुत्तिष्ठति तेन संपन्नो महीयते ॥ १० ॥**

**यम् यम् अन्तम् अभिकामः भवति यम् कामम् कामयते सः अस्य संकल्पात् एव समुत्तिष्ठति । तेन संपन्नः महीयते ।**

तो ज्या ज्या प्रांताची ( देशाची ) इच्छा करितो व ज्या विषयाची इच्छा करितो तो तो देश व विषय या ज्ञानी मनुष्याच्या संकल्पानेंच उपस्थित होतो व त्यानें संपन्न असा तो ज्ञानी आनंद पावतो.

ब्रह्मवेत्ता पूर्णकाम होतो. त्याचे सर्व मनोरथ स्वतंत्रपणानें पूर्ण होतात. ते त्याला दुसऱ्यापासून मिळवावे लागत नाहींत. मनोरथसिद्धीच्या बाब-

तींत देखील त्याचें स्वातंत्र्य अढळ राहतें, असें दाखविण्याकरितां संकल्पानेंच त्याला हे सर्व विषय उपस्थित होतात असें श्रुतीनें सांगितलें आहे. आपले मनोरथ पूर्ण करण्याकरितां त्याला दुसऱ्याची ताबेदारी पत्करावी लागत नाहीं, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. या खंडांत एकंदर १० मनोरथ सांगितले आहेत; त्यांतील ९ वैयक्तिक स्वरूपाचे असून शेवटचा १० वा सार्वजनिक स्वरूपाचा आहे. ब्रह्मवेत्याचे वैयक्तिक व सामाजिक असे सर्व प्रकारचे मनोरथ पूर्ण होतात असें या वर्णनाचें तात्पर्य आहे.

## अथ तृतीयः खण्डः ।

**त इमे सत्याः कामा अनृतापिधानास्तेषाꣳ सत्यानाꣳ सतामनृतं पिधानं यो यो ह्यस्येतः प्रैति न तमिह दर्शनाय लभते ॥ १ ॥**

**ते इमे कामाः सत्याः अनृतापिधानाः । तेषाम् सत्यानाम् सताम् अनृतम् अपिधानम् । हि अस्य इतः यः यः प्रैति तम् इह दर्शनाय न लभते ।**

ते हे मनोरथ सत्य असून अशुद्धसंकल्परूपी झांकण ज्यांच्या वर आहे असे असतात. अशा प्रकारच्या त्या सत्यस्वरूप कामांचें अनृत हेंच झांकण असतें. म्हणून या अज्ञानी मनुष्याचा जो जो इष्ट जन येथून नष्ट होतो तो पुन्हा अज्ञानी मनुष्याला येथें पहावयास मिळत नाहीं.

ज्याप्रमाणें उत्तरकालीन वेदान्तांत शुभ व अशुभ या प्रकारांनीं वासनांचे भेद मानले आहेत, त्याप्रमाणेंच या मंत्रांत निर्भेळ सत्यसंकल्प व अनृतमिश्र सत्यसंकल्प असे संकल्पांचे किंवा कामांचे दोन प्रकार केले आहेत. ज्ञानी किंवा अज्ञानी यांच्या इच्छेचें सामान्य स्वरूप एकच असतें; परंतु अज्ञानी मनुष्याची इच्छा सदोष असते व ज्ञानी मनुष्याची निर्दोष असते. अज्ञानी मनुष्याच्या इच्छेवर अनृताचें म्हणजे दोषांचें अपिधान म्हणजे झाकण असतें म्हणून, त्याच्या ह्या सदोष इच्छा परमार्थाला प्रतिबंधक

होतात. या सदोष इच्छेनेंच त्याची दृष्टि म्हणजे विचारशक्ति देखील नष्ट होते. अशा अविवेकी-अज्ञानी मनुष्याला मरणोत्तर काय स्थिति होते ती समजत नाहीं. मनुष्य मरण पावला म्हणजे, तो जगांतूनच नाहींसा झाला असें त्याला वाटतें. हा त्याच्या अज्ञानाचा परिणाम होय.

**अथ ये चास्येह जीवा ये च प्रेता यच्चान्यदिच्छन्न लभते सर्वं तदत्र गत्वा विन्दतेऽत्र ह्यस्यैते सत्याः कामा अनृतापिधानास्तद्यथापि हिरण्यनिधिं निहितमक्षेत्रज्ञा उपर्युपरि संचरन्तो न विन्देयुरेवमेवेमाः सर्वाः प्रजा अहरहर्गच्छन्त्य एतं ब्रह्मलोकं न विन्दन्त्यनृतेन हि प्रत्यूढाः ॥ २ ॥**

**अथ अस्य ये च इह जीवाः ये च प्रेताः यत् च अन्यत् इच्छन् न लभते तत् सर्वम् अत्र गत्वा विन्दते। हि अत्र अस्य एते सत्याः कामाः अनृतापिधानाः। तत् यथा अक्षेत्रज्ञाः उपरि उपरि संचरन्तः निहितम् अपि हिरण्यनिधिम् न विन्देयुः एवम् एव इमाः सर्वाः प्रजाः अहः अहः ब्रह्मलोकम् गच्छन्त्यः एतम् न विन्दन्ति । हि अनृतेन प्रत्यूढाः ।**

आतां या मनुष्याचे या जगांत जे जिवंत असतात व जे परलोकीं गेलेले असतात आणि दुसरी कोणतीहि इष्ट वस्तु त्याला अप्राप्त असते तें सर्व या दहराकाशामध्यें गेल्यावर ज्ञानी मनुष्याला मिळतें. ( कारण या ब्रह्मपुरामध्यें त्या ज्ञानी मनुष्याचे सर्व मनोरथ सत्यस्वरूपाचे असतात. ) अज्ञानी मनुष्याचे मनोरथ अनृतानें अशुद्ध संकल्पानें झाकलेले असतात. ज्या प्रमाणें जागा माहीत नसलेले लोक वरवर फिरत असतांहि त्यांच्या पायाखालच्या जमिनींत ठेवलेला सुवर्णनिधि मिळवूं शकत नाहींत, त्याप्रमाणेंच हे सर्व लोक प्रतिदिवशीं त्या ब्रह्मपुरापर्यंत जात असून तें दहराकाश त्यांना प्राप्त होत नाहीं. कारण त्यांची बुद्धि अशुद्ध संस्कारांनीं आच्छादित झालेली असते.

दहराकाशांतील आत्मतत्त्वाचें ज्ञान नसलेला मनुष्य गाढ सुषुप्तीमध्यें तेथपर्यंत जात असून देखील त्याला त्याचा खरा फायदा होत नाहीं. त्यामुळें त्याच्या बुद्धीचा अशुद्धपणा कमी होत नाहीं. 'तुझें आहे तुजपाशीं परि तूं जागा चुकलासी' असें तुकाराममहाराजांचें उपमागर्भ वाक्य प्रसिद्धच आहे. या मंत्रांत आलेला दृष्टान्तच वरील वाक्यांत गर्भित आहे. आत्मज्ञानाच्या योगानें मनुष्याची बुद्धि शुद्ध होते व त्याच्या इच्छेंतील सर्व प्रकारचे दोष नाहींसे होतात, म्हणजे त्याच्या सत्यसंकल्पांवरील अनृताचें झांकण दूर होतें. परंतु अज्ञानी मनुष्याचे संकल्प दोषग्रस्त असल्यामुळे ते त्याच्या परमार्थाला किंवा ज्ञानदृष्टीला प्रतिबंधक होतात. म्हणून पुरलेला ठेवा माहित नसल्यामुळें जसा मनुष्य वर वर भटकत राहतो तशी या अज्ञानी मनुष्याची स्थिति होते.

**स वा एष आत्मा हृदि तस्यैतदेव निरुक्तꣳ हृदयमिति तस्माद्हृदयमहरहर्वा एवंवित्स्वर्गं लोकमेति ॥ ३ ॥**

**सः एषः वै आत्मा हृदि ( वर्तते ) । तस्य एतत् एव निरुक्तम्; हृद् अयम् तस्मात् हृदयम् । एवंवित् अहः अहः वै स्वर्गम् लोकम् एति ।**

तो हा आत्मा हृदयामध्यें आहे. त्याचें असें स्पष्टीकरण आहे, हृद् अयम् ( हृदयांत हा ) अशा अर्थानेंच हृदय असें म्हणतात. याप्रमाणें ब्रह्मज्ञान असलेला मनुष्य प्रतिदिवशीं स्वर्गसुखाचा ब्रह्मानंदाचा अनुभव घेतो.

ज्या मनुष्याला हृदयस्थ आत्मतत्त्वाचें ज्ञान झालेलें असतें त्यालाच मात्र शुद्ध आनंदाचा लाभ होतो. शुद्ध किंवा निरतिशय आनंद अशा अर्थानेंच या मंत्रांत स्वर्ग शब्द आला आहे. न कळत या हृदयस्थ ब्रह्माचें प्रतिदिवशीं सान्निध्य प्राप्त होत असलें तरी, त्याचें पूर्ण ज्ञान झाल्याखेरीज तो दुःखमुक्त होणार नाहीं. आत्मा हृदयांत वास करितो असें दर्शविणारी हृदयशब्दाची व्युत्पत्ति या मंत्रांत दिली आहे. हृद् + अयम् असे भाग हृदय शब्दाचे दाखविले आहेत.

**अथ य एष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुप-संपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यत एष आत्मेति होवाचैतदमृतमभ-यमेतद्ब्रह्मेति तस्य ह वा एतस्य ब्रह्मणो नाम सत्यमिति ॥ ४॥**

**अथ यः एषः संप्रसादः अस्मात् शरीरात् समुत्थाय परम् ज्योतिः उप-संपद्य स्वेन रूपेण अभिनिष्पद्यते एषः आत्मा इति उवाच ह। एतत् अभयम् अमृतम् एतत् ब्रह्म इति। तस्य ह वै एतस्य ब्रह्मणः नाम सत्यम् इति।**

आतां जो हा संप्रसाद म्हणजे प्राज्ञ तो या देहांतून समुत्थान झाल्यावर म्हणजे ह्या देहांतून बाहेर पड-ल्यावर ब्रह्मतेजाशीं एकरूप होऊन स्वतःच्या शुद्ध स्वरूपांत प्रकट होतो, तोच आत्मा होय असें ( सनत्कुमार ) म्हणाला. हेंच भयरहित अमृत, हेंच ब्रह्म होय. त्याच या ब्रह्माचें नामा-भिधान सत्य असें आहे.

आत्मज्ञान झाल्यानंतर जी बौद्धिक परिस्थिति उत्पन्न होते ती आत्य-न्तिक निर्दोष व दैवी संपत्तीनें संपन्न अशी असते. या परिस्थितींत कोण-त्याही प्रकारचा विकार अगर दुःख अवशिष्ट रहात नाहीं. ज्ञानी मनुष्याची ही परिस्थिति अक्षय्य-कायम असते. तिलाच गीतेनें ब्राह्मी स्थिति म्हटलें असून, या स्थितींतील आत्म्यालाच प्राज्ञ—संप्रसाद म्हणतात. ही प्रसाद-स्थिति जीवन्मुक्तावस्थेप्रमाणें देहपातानंतरही असते. या स्थितींत जीवात्मा ब्रह्मरूप झालेला असतो. या ब्रह्मालाच सत्य असें म्हणतात.

**तानि ह वा एतानि त्रीण्यक्षराणि सतीयमिति तद्यत्सत्तद-मृतमथ यत्ति तन्मर्त्यमथ यद्यं तेनोभे यच्छति यदनेनोभे यच्छति तस्माद्यमहरहर्वा एवंवित्स्वर्गं लोकमेति ॥ ५ ॥**

**तानि ह वै एतानि त्रीणि अक्षराणि स ती यम् इति। तत् यत् सत् तत् अमृतम्। अथ यत् ति तत् मर्त्यम्। अथ यत् यम् तेन उभे यच्छति। यत् अनेन उभे यच्छति तस्मात् यम् एवंवित् अहः अहः वै स्वर्गम् लोकम् एति।**

सत्य शब्दामध्यें स, ती, य, हीं तीन अक्षरें आहेत. जे 'स'(सत्) ते अमृत होय. नाशिवंत असा ' ति ' या अक्षराचा अर्थ आहे. व 'य' अक्षरानें वरील दोन अक्षरें जोडलीं आहेत. अशीं दोन अक्षरें यनें जोडलीं आहेत म्हणून या सत्यस्वरूप ब्रह्माचें याप्रमाणें ज्ञान असलेला मनुष्य प्रतिदिवशीं स्वर्गसुखाचा अनुभव घेतो.

सत्य शब्दाची व्युत्पत्ति या मंत्रांत दर्शविली आहे. ' स ' या अक्षरानें सत् असा शब्द ग्रहण करावा. अविनाशी असा त्याचा अर्थ आहे. ' ति ' या अक्षरानें नाशिवंत असा अर्थ अभिप्रेत आहे. नित्य व अनित्य यांचा संयोग ' य ' या अक्षरानें घडवून आणिला आहे. अशा रीतीनें सत्य या शब्दाचा अक्षरार्थ या मंत्रांत दर्शविला आहे. त्यावरून नित्यानित्याचा संयोग हच सृष्टीचें शास्त्रीय स्वरूप असून, या सृष्टीवरूनच निर्मळ ब्रह्मतत्त्व ओळखावें, असें श्रुतीनें सुचविलें आहे. कार्य व कारण यांचें स्वरूप बरोबर ओळखणें म्हणजेच सत्याचें स्वरूप ओळखणें होय. कार्यरूप सृष्टीचें ज्ञान संपादन केल्याशिवाय नुसतें ब्रह्मतत्त्व ओळखण्याचा प्रयत्न करणें चुकीचें आहे. म्हणून विज्ञानपूर्वक म्हणजे सृष्टिज्ञानपूर्वक ब्रह्मज्ञान संपादन करण्याचा जो प्रयत्न करितो त्याला सत्यस्वरूपाचें म्हणजे ब्रह्मस्वरूपाचें पूर्ण ज्ञान होतें व तोच या ब्रह्मानंदाला पात्र होतो.

## अथ चतुर्थः खण्डः ।

**अथ य आत्मा स सेतुर्विधृतिरेषां लोकानामसंभेदाय नैतꣳ सेतुमहोरात्रे तरतो न जरा न मृत्युर्न शोको न सुकृतं न दुष्कृतꣳ सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्तेऽपहतपाप्मा ह्येष ब्रह्मलोकः ॥ १ ॥**

**अथ यः आत्मा सः एषाम् लोकानाम् असभेदाय विधृतिः सेतुः । एतम् न अहोरात्रे न जरा न मृत्युः न शोकः न सुकृतम् न दुष्कृतम् तरतः अतः सर्वे पाप्मानः निवर्तन्ते । हि एषः ब्रह्मलोकः अपहतपाप्मा ।**

आणि ब्रह्मरूप असा हा आत्मा हे सर्व लोक विस्कळित न व्हावे म्हणून त्यांचें संघटन करणारा विधृति संघटक सेतु ( बंधारा ) आहे. सेतूच्या पलीकडे अहोरात्र म्हणजे दिवसरात्र ( काल ), जरा, मृत्यु, शोक, पुण्य, पाप हीं जाऊं शकत नाहींत. ( आत्मा ही सर्वांची अंतिम मर्यादा आहे. ) या ब्रह्मतत्त्वापासून सर्व दोष मागें फिरतात ( त्याला स्पर्श करूं शकत नाहींत ). कारण हें ब्रह्मतत्त्व निर्दोष ( दोषांच्या पलीकडील ) आहे.

सर्व सृष्ट पदार्थांत दिसून येणाऱ्या संघटक सामर्थ्याचें आत्मा हेंच उगमस्थान आहे. काल हा सर्वांच्या पलीकडचा आहे असें विचाराअंतीं वाटतें; परंतु या आत्मतत्त्वाचा विचार करितांना तो सर्वंकष काल देखील आत्म्याच्या अलीकडचाच ठरतो. कालासारखे सर्वव्यापी विषय ज्या आत्मतत्त्वापुढें मर्यादित ठरले, त्या आत्मतत्त्वाच्या पलीकडे कोणालाही जातां यावयाचें नाहीं, हें आता निराळें सांगावयास नको. जरा, मृत्यु इत्यादि प्राणिधर्म किंवा पुण्य, पाप, शोक, मोह इत्यादि मनोधर्म या आत्म्या-पर्यंत सुद्धा जाऊं शकणार नाहींत हें उघड आहे. सर्वसंघटक सेतु अशा अर्थाचें वर्णन बृहदारण्यकांतही आलें आहे. ( उ. नि. र. प्र. बृह. अ. ४ ब्रा. ४ म. २२. पृ. ५४८–५५२ ). आत्मा हीच सर्वांची अंतिम मर्यादा असून सर्व सामर्थ्यांचें उगमस्थान आहे. ब्रह्मतत्त्व हें स्वतः निष्पाप व निर्दोष असून त्याच्या ज्ञानानें बुद्धि देखील निर्दोष निष्पाप म्हणजे नितान्तशुद्ध होते.

**तस्माद्वा एतꣳ सेतुं तीर्त्वान्धः सन्ननन्धो भवति विद्धः सन्नविद्धो भवत्युपतापी सन्ननुपतापी भवति तस्माद्वा एतꣳ सेतुं तीर्त्वापि नक्तमहरेवाभिनिष्पद्यते सकृद्विभातो ह्येवैष ब्रह्मलोकः॥२॥**

**तस्मात् वै एतम् सेतुम् तीर्त्वा अन्धः सन् अनन्धः भवति। विद्धः सन् अविद्धः भवति। उपतापी सन् अनुपतापी भवति। तस्मात् वै एतम् सेतुम्**

**तीर्त्वा नक्तम् अपि अहः एव अभिनिष्पद्यते । हि एषः ब्रह्मलोकः सकृत् विभातः एव ।**

म्हणूनच सेतूसारख्या तारक अशा ब्रह्मतत्त्वाला प्राप्त झाल्यावर अन्ध असेल तर त्याचे अन्धत्व नष्ट होतें. ( म्हणजे अंधत्व हें ब्रह्मसाक्षात्काराचे बाबतींत आड येऊं शकत नाहीं. ) तो क्लेशयुक्त किंवा व्यंग असेल तर क्लेशरहित व निर्व्यंग होतो. तो पीडित असेल तर त्याची पीडा नष्ट होते. म्हणून या ब्रह्मतत्त्वाला प्राप्त झाल्यावर रात्रीचा देखील दिवस बनतो. ( म्हणजे अन्धकार ब्रह्मज्ञानाला प्रतिबंध करूं शकत नाहीं ). कारण हें ब्रह्मतत्त्व कायमचें प्रकाशवान् म्हणजे स्वयंप्रकाश आहे.

अन्धत्वादि व्यंगें कर्ममार्गात आड येतात पण तीं ब्रह्मज्ञानाला प्रतिबंध करूं शकत नाहींत. इतकेंच काय तर, ब्रह्मज्ञान झाल्यानंतर तीं व्यंगें असून नसल्यासारखीं होतात. म्हणजे तीं ज्ञानी मनुष्याला पीडा करूं शकत नाहींत. ब्रह्मज्ञानाच्या योगानें अज्ञान पूर्णपणें नष्ट झालें असल्यामुळें त्याला रात्रीचा दिवस होतो, असें या मंत्रांत सांगितलें आहे. ब्रह्मतत्त्व हाच ब्रह्मलोक होय. ब्रह्म या शब्दाला लोक शब्द जोडला असल्यामुळें त्या ब्रह्मामध्यें श्रुतीला किंचित् सगुणत्व दाखवावयाचें आहे, ब्रह्मलोक म्हणजे शुद्ध ब्रह्म नव्हे, असें कित्येक ठिकाणीं दर्शविलें जातें; परंतु ही कल्पना बरोबर नाहीं असें या मंत्रावरून स्पष्ट दिसून येईल. शिवाय ' तस्यलोकः स उ लोक एव ' असें बृहदारण्यकांत म्हटलें आहे ( उ. नि. र. प्र. बृह. अ. ४ ब्रा. ४ मं. १३. पृ. ५४२ ). या वाक्यावरून लोक शब्दाचा निराळा अर्थ करावयाचा नाहीं असें निःसंशय सिद्ध होतें. म्हणून ब्रह्म किंवा ब्रह्मलोक हे एकाच तत्त्वाचे बोधक शब्द होत. ब्रह्मसाक्षात्कारसंपन्न मनुष्य अज्ञान व तज्जन्य सर्व बंधनें यांतून मुक्त व कृतार्थ होतो. अशा या स्वयंप्रकाश

ब्रह्मतत्त्वाचें ज्ञान प्रत्येकानें अवश्य संपादन करावें हा या मंत्राचा अभिप्राय आहे.

**तद्य एवैतं ब्रह्मलोकं ब्रह्मचर्येणानुविन्दन्ति तेषामेवैष ब्रह्मलोकस्तेषाᳪ सर्वेषु लोकेषु कामचारो भवति ॥ ३ ॥**

**तत् ये एव एतम् ब्रह्मलोकम् ब्रह्मचर्येण अनुविन्दन्ति तेषाम् एव एषः ब्रह्मलोकः । तेषाम् सर्वेषु लोकेषु कामचारः भवति ।**

म्हणून जे हें ब्रह्मतत्त्व ब्रह्मचर्यानें म्हणजे ब्रह्मविद्येच्या उपासनेच्या योगानें मिळवितात त्यांनाच हें ब्रह्मतत्त्व प्राप्त होतें. त्यांचें सर्वलोकांमध्यें स्वातंत्र्य कायम असतें.

स्त्रीविषयक कामनेपासून परावृत्त होणें हा ब्रह्मचर्य शब्दाचा रूढ अर्थ आहे; परंतु या मंत्रांत ब्रह्मचर्य हा शब्द अगदीं वेगळयाच अर्थानें आला आहे. ब्रह्मप्राप्तीच्या उद्देशानें जें आचारण केलें जातें तेंच ब्रह्मचर्य होय, असा अर्थ ब्रह्मचर्य शब्दानें येथें विवक्षित आहे, हें पुढील खण्डांतील मंत्रांवरून उघड होईल. अशा ब्रह्मचर्यानें ब्रह्मतत्त्वाला प्राप्त झालेला ज्ञानी मनुष्य पूर्णकाम व पूर्णस्वतंत्र होतो.

## अथ पञ्चमः खण्डः ।

**अथ यज्ञ इत्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येव यो ज्ञाता तं विन्दतेऽथ यदिष्टमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येवेष्ट्वात्मानमनुविन्दते ॥ १ ॥**

**अथ यज्ञः इति यत् आचक्षते तत् ब्रह्मचर्यम् एव । हि ब्रह्मचर्येण एव यः ज्ञाता तम् विन्दते । अथ यत् इष्टम् इति आचक्षते तत् ब्रह्मचर्यम् एव । हि ब्रह्मचर्येण एव इष्ट्वा आत्मानम् अनुविन्दते ।**

म्हणून यज्ञ असें ज्याला म्हणतात. तें देखील ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्याच्या योगानेंच जो तें जाणतो त्याला तें मिळतें.

ज्याला इष्ट असें म्हणतात तें ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्यानेंच परमेश्वराची उपासना करून तो आत्मतत्त्वाला प्राप्त होतो.

प्रस्तुत मंत्रांत यज्ञ व इष्टकर्म या दोहोंचा ब्रह्मचर्यांत अंतर्भाव करून दाखविला आहे. वस्तुतः यज्ञ व इष्ट यांतील शब्दार्थ एकमेकांहून फारसे भिन्न नाहींत, तथापि श्रुतीनें हे दोन प्रकार वेगवेगळे दाखविले आहेत. अर्थात् ते इष्टापूर्ताच्या अभिप्रायानेंच दाखविले असले पाहिजेत यांत शंका नाहीं. यज्ञ म्हणजे पूर्त कर्म आणि इष्ट म्हणजे संध्योपासनादि वैयक्तिक कर्म. यावरून यज्ञ हा शब्द वर्णधर्माचा द्योतक असून इष्ट हा शब्द आश्रमधर्माचा बोधक आहे असें निःसंशय ठरतें. मनुष्य ब्रह्मप्राप्तीच्या हेतूनें आत्मसंयमनपूर्वक जीं वर्णधर्माचीं कर्तव्यें आचरण करितो त्यांचाहि ब्रह्मचर्यांतच समावेश होतो; याचप्रमाणें तो जीं आश्रमधर्माचीं कर्तव्यें आचरितो तीं देखील ब्रह्मचर्यांतच समाविष्ट होतात. तात्पर्य ज्ञान-विज्ञानपूर्वक वर्णाश्रमधर्मांचें निष्काम आचरण हा ब्रह्मचर्यांतीलच भाग समजावा. कारण ब्रह्मप्राप्तीच्या उद्देशानेंच मनुष्य हें निष्कामकर्तव्याचरण करितो.

**अथ यत्सत्त्रायणमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येव सत आत्मनस्त्राणं विन्दतेऽथ यन्मौनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्म-चर्येण ह्येवात्मानमनुविद्य मनुते ॥ २ ॥**

**अथ यत् सत्त्रायणम् इति आचक्षते तत् ब्रह्मचर्यम् एव । हि ब्रह्मचर्येण एव सतः आत्मनः त्राणम् विन्दते । अथ यत् मौनम् इति आचक्षते तत् ब्रह्मचर्यम् एव । हि ब्रह्मचर्येण एव आत्मानम् अनुविद्य मनुते ।**

त्याचप्रमाणें ज्याला सत्त्रायण असें म्हणतात तें ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्यानेंच सताचें म्हणजे सत्स्वरूप आत्म्याचें त्राण ( त्रायण ) म्हणजे संरक्षण होतें. आणि ज्याला मौन असें

म्हणतात, तें देखील ब्रह्मचर्यच आहे. कारण ब्रह्मचर्यानेंच आत्म्याचें ज्ञान संपादन करून त्याचें मनन करितां येतें.

सत्त्रायण हा शब्द सत्र शब्दावरून तयार झाला आहे. धार्मिक नीति किंवा दैवी संपत्ति हेंच सत्र होय. सत्रांत समाविष्ट असलेल्या प्रत्येक मनुष्याला हे नीतिधर्म अवश्य पाळावे लागतात. सत्रांत समाविष्ट असलेल्या मनुष्याला येथें सत्त्रायण असें म्हटलें आहे. सत्+त्रायण असे त्याचे दोन भाग करून, आत्म्याचें संरक्षण करणारा असा त्याचा अर्थ केला आहे. नीतिधर्मांच्या योगानें बुद्धि निर्मल राहून तिच्यांत आत्म्याविषयीं अज्ञान उत्पन्न होत नाहीं. हेंच आत्म्याचें संरक्षण होय असें समजावें. अनुविद्य व मनुते या पदांनीं श्रवण, मनन इत्यादि अभ्यास दर्शविला आहे. शुद्ध नीतीचें पालन करणें व ह्या विद्येचा अभ्यास करणें यांचा ब्रह्मचर्यांतच अंतर्भाव होतो असा या मंत्राचा अभिप्राय आहे.

**अथ यदनाशकायनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तदेष ह्यात्मा न नश्यति यं ब्रह्मचर्येणानुविन्दतेऽथ यदरण्यायनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तदरश्च ह वै ण्यश्चार्णवौ ब्रह्मलोके तृतीयस्यामितो दिवि तदैरं मदीयꣳ सरस्तदश्वत्थः सोमसवनस्तदपराजिता पूर्ब्रह्मणः प्रभुविमितꣳ हिरण्मयम् ॥ ३ ॥**

अथ यत् अनाशकायनम् इति आचक्षते तत् ब्रह्मचर्यम् एव । एषः आत्मा न नश्यति हि ब्रह्मचर्येण यम् अनुविन्दते । अथ यत् अरण्यायनम् इति आचक्षते तत् ब्रह्मचर्यम् एव । ह ब्रह्मलोके अरः च ण्यः च अर्णवौ वै । इतः तृतीयस्याम् दिवि तत् मदीयम् ऐरम् सरः । तत् सोमसवनः अश्वत्थः । तत् अपराजिता ब्रह्मणः पूः । प्रभुविमितम् हिरण्मयम् ।

आणि ज्याला अनाशकायन असें म्हणतात तेंहि ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्यानें ज्याची प्राप्ति होते तो आत्मा नाश पावत नाहीं. ( म्हणून त्याला अनाशकायन असें म्हणतात ). व ज्याला

अरण्यायन असें म्हणतात तेंहि ब्रह्मचर्यच होय. ब्रह्मतत्त्वामध्येंच अर = क्रियाशक्ति, व ण्य = ज्ञानशक्ति या दोन शक्तींचे अर्णव म्हणजे कायमचे झरे आहेत. येथून तिसऱ्या द्युलोकामध्यें तें आनंदकारक असें ऐर नांवाचें सरोवर आहे. तेथून पुढें अमृत-स्रावी असा अश्वत्थ वृक्ष आहे. तेथून पुढें अपराजिता नांवाची ब्रह्माची पुरी म्हणजे ब्रह्माचें स्थान आहे, तें परमेश्वरानें सुवर्णमय ( तेजोमय ) निर्माण केलें आहे.

ब्रह्मचर्याच्या दृष्टीनें अनाशकायन व अरण्यायन अशा दोन शब्दांचा विचार या मंत्रांत केला आहे. अन्+अशक म्हणजे उपभोग न घेणारा किंवा उपवास करणारा असा मूळ शब्दाचा अर्थ आहे; व हाच अर्थ वैदिक किंवा संस्कृत भाषेंतही रूढ आहे. व्रतस्थपणा हा त्या शब्दाचा अभिप्राय आहे. अनाशक असें स्थान किंवा अनाशकाचें स्थान असा अनाशकायन या शब्दाचा अर्थ होतो. श्रुतीनें येथें अनाशकायन हा शब्द ब्रह्मचर्याच्या अर्थाशीं जोडला आहे. अ+नाशकायन असे त्या शब्दाचे विभाग करून अविनाशी अशा आत्म्याची प्राप्ति करून देणारें हें ब्रह्म-चर्य असल्यामुळें तें देखील अनाशकायन आहे असा श्रुतीचा अभिप्राय आहे, म्हणजे ब्रह्मप्राप्तीच्या उद्देशानें केलेलें तपानुष्ठान किंवा व्रताचरण हें देखील ब्रह्मचर्यच होय, असें या मंत्राच्या पूर्वार्धांत सांगितलें आहे. त्यानंतर अरण्यायन या शब्दाचा विचार केला आहे. अरण्यांत राहून ज्ञानार्जन किंवा ज्ञानसंवर्धन करणारे वानप्रस्थ, यति इत्यादिकाना अरण्यायन असें म्हणतात. या अरण्यायनांचें वर्णन मुण्डक, बृहदार-ण्यक, छान्दोग्य इत्यादि ठिकाणीं आलें आहे. ' तपः श्रद्धे ये ह्युप-वसन्त्यरण्ये ' हा मन्त्र मुण्डकोपनिषदांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. मुण्डक १ खण्ड २ मं. ११ पृ. ३३ ). 'ते य एवमेतद्विदुर्ये चामी अरण्ये श्रद्धां सत्यमुपासते ' हा मंत्र बृहदारण्यकांत आला आहे ( उ. नि. र.

प्र. बृह. अ. ६ ब्रा. २ मंत्र १५ पृ. ६५२–६५४ ) ‘ तद्य इत्थं विदुर्ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते ’ हा मंत्र छान्दोग्यांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. छा. अ. ५ खण्ड १० मंत्र १ पृ. २७८।७९ ) या वर्णनांवरून अरण्यांत राहणाऱ्या ज्ञानी मनुष्यांच्या जीवनक्रमाला अनुलक्षूनच अरण्यायन हा शब्द वैदिक वाङ्मयांत रूढ झाला असला पाहिजे यांत शंका नाहीं. अनाशकायन व अरण्यायन या शब्दांत दिसून येणारा अयन हा शब्द प्रातिपदिक ( नाम ) म्हणूनच आला आहे. परंतु पाणिनी ऋषीनें अयन या शब्दासारखाच प्रत्यय किंवा प्रत्ययादेश म्हणून सांगितला आहे. मात्र हा आदेश ‘अकारान्त नसून हलन्त आहे ( पाणिनी ७. १. २ ) अरण्यायन या शब्दात अर+ण्य+अयन असे तीन भाग आहेत. अर हा शब्द गतिवाचक ऋ धातूपासून झाला आहे. अर या शब्दाचा कर्म असा अर्थ टीकाकारांनीं केला आहे. ण्य या शब्दाचा ज्ञान असा अर्थ आहे. ण्य हा शब्द नी धातुपासून तयार झाला असल्यामुळें, त्याचा ज्ञान असा अर्थ करणें योग्यच आहे. शब्दांच्या अर्थाची येथें तात्त्विक दृष्ट्या फोड करावयाची असल्यामुळें, कर्म व ज्ञान हा स्थूल अर्थ न घेतां, क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति असे तात्त्विक अर्थच स्वीकारणें अधिक सयुक्तिक आहे. या दोन्ही शक्तींचें पूरण ब्रह्मचर्याच्या योगानें होतें. म्हणून त्याला अरण्यायन ही संज्ञा प्राप्त झाली आहे. या अरण्यायन शब्दाच्या अर्थावरून श्रुतीनें ब्रह्मचर्याचें उत्कृष्ट लक्षणच दर्शविलें आहे. तें असें, क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति या दोहोंचीहि पूर्णता ज्याच्या योगाने होतें तें ब्रह्मचर्य होय. क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांची पूर्णता कर्मयोगांतच संभवते. मायावादी संन्यासमार्गात ती संभवनीयच नाहीं. या दोन्ही सामर्थ्यांनीं संपन्न झालेल्या ज्ञानी मनुष्याला ज्या ब्रह्मलोकाची प्राप्ति होते त्याचें वर्णन आलंकारिक रीतीनें करण्यांत आलें आहे.

**तद्य एवैतावरं च ण्यं चार्णवौ ब्रह्मलोके ब्रह्मचर्येणानुविन्दन्ति तेषामेवैष ब्रह्मलोकस्तेषाः सर्वेषु लोकेषु कामचारो भवति ॥४॥**

**तत् ये ब्रह्मलोके एतौ अरम् च ण्यम् च अर्णवौ ब्रह्मचर्येण अनुविन्दन्ति तेषाम् एव एषः ब्रह्मलोकः। तेषाम् सर्वेषु लोकेषु कामचारः भवति ।**

म्हणून जे ब्रह्मलोकांतील हे क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांचे कधींहि नाश न पावणारे संचय ( समुद्र ) ब्रह्मचर्यानें मिळवितात त्यांनाच या ब्रह्मतत्त्वाची प्राप्ति होते व असे ते ब्रह्मतत्त्ववेत्ते लोक सर्व जगांत पूर्ण स्वतंत्र होतात.

अर व ण्य या शब्दांनीं क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति हा अर्थ कसा दर्शविला जातो तें मागील मंत्राच्या विवरणांत सांगितलें आहे. या दोन शक्तींना अर्णव असें या मंत्रांत म्हटलें आहे. अर्णव हा शब्द समुद्राचा वाचक म्हणून प्रसिद्ध आहे. तथापि येथें समुद्र हा अर्थ अभिप्रेत नसून जीवंत झरा असा त्याचा अर्थ अभिप्रेत आहे. तो अर्णव या शब्दाच्या अवयवार्थाला धरूनच आहे. ज्या ज्या मार्गांनीं क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति परिपूर्ण होतील त्या सर्वांचा अंतर्भाव ब्रह्मचर्यांतच होतो असा श्रुतीचा अभिप्राय आहे. या दोन्ही शक्तींची परमार्थामध्यें सारखीच आवश्यकता असते. तुलनेच्या दृष्टीनें क्रियेपेक्षां ( कर्मापेक्षां ) ज्ञानाला श्रेष्ठत्व असलें आणि त्या मानानें कर्म हें कनिष्ठ आहे असें ठरलें तरी, परमार्थांत त्याची आवश्यकता कमी आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. कर्म व ज्ञान यांच्या सहकारितेनेंच मनुष्याच्या बुद्धीचा विकास पूर्ण होऊन त्याला ब्रह्मसाक्षात्कार होतो. क्रिया व ज्ञान हीं दोन्ही सामर्थ्यें परिपूर्ण व परस्परानुकूल अशीं झालीं म्हणजे त्यालाच यशस्वी कर्तृत्व असें म्हणतात. असा सामर्थ्यसंपन्न ब्रह्मवेत्ता कामचार म्हणजे पूर्ण स्वतंत्र होतो. क्रिया व ज्ञान यांचें मीलन घडवून आणणाऱ्या ब्रह्मचर्यालाच गीतेनें कर्मयोग असें नांव दिलें आहे. कर्मयोगांत तरी कर्म व ज्ञान यांच्या सहकारितेचाच पुरस्कार केला जातो. त्या

कर्मयोगाचें ब्रह्मचर्याच्या स्वरूपाचें प्रतिपादन या मंत्रांतच नव्हे तर, या सबंध खण्डांत श्रुतीनें निःसंदिग्ध असें केलें आहे.

'तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसानाशके नैतमेव विदित्वा मुनिर्भवति ' असें बृहदारण्यकांत म्हटलें आहे (उ. नि. र. प्र. बृह. अ. ४ मं. २२ पृ. ५४८–५५२ ). यज्ञ, दान, तप, निष्काम कर्म किंवा व्रतस्थपणा या साधनांनीं साधक ब्रह्मज्ञान संपादन करितात व त्या ब्रह्मज्ञानाच्या योगानें ते कृतार्थ होतात, असा बृहदारण्यकांतील या वाक्याचा आशय आहे. या पांचव्या खण्डांत आलेलें ब्रह्मचर्याचें प्रतिपादन देखील वरील वाक्यासारखेंच आहे. इष्टापूर्त किंवा वर्णाश्रमधर्म ( इष्ट म्हणजे आश्रमधर्म व पूर्त म्हणजे वर्णधर्म ), धार्मिक नीति, ब्रह्मविद्येचें अध्ययन, व्रतस्थपणा, क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांची पूर्णता इत्यादि सर्व साधनांचा ब्रह्मचर्यातच अन्तर्भाव केला आहे. या सर्व विवेचनाचें तात्पर्य असें कीं, ज्ञानविज्ञानपूर्वक उपासनाबुद्धीनें केलें जाणारें कर्तव्याचरण हेंच खरें ब्रह्मचर्य होय. या मार्गानेंच मनुष्याची क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति पूर्ण होऊन त्याला अभ्युदयनिःश्रेयसाची–अमृतत्वाची प्राप्ति होते. यावरून कर्म, उपासना व ज्ञान ह्या तीन तत्त्वांनीं सिद्ध होणारा कर्मयोग हेंच अमृतत्वाचें प्रत्यक्ष साधन असून तेंच सर्वांत श्रेष्ठ आहे, असें या खण्डांत श्रुतीनें सोपपत्तिक व निःसंदिग्ध शब्दांनीं प्रतिपादन केलें आहे.

## अथ षष्ठः खण्डः ।

**अथ या एता हृदयस्य नाड्यस्ताः पिङ्गलस्याणिम्नस्तिष्ठन्ति शुक्लस्य नीलस्य पीतस्य लोहितस्येत्यसौ वा आदित्यः पिङ्गल एष शुक्ल एष नील एष पीत एष लोहितः ॥ १ ॥**

**अथ याः एताः नाड्य ताः आणिम्नः पिङ्गलस्य शुक्लस्य नीलस्य पीतस्य लोहितस्य तिष्ठन्ति । असौ वै आदित्यः पिङ्गलः एषः शुक्लः एषः नीलः एषः पीतः एषः लोहितः**

ज्या ह्या हृदयाच्या नाडी आहेत त्या सूक्ष्म असून पिंगट, पांढऱ्या, निळ्या, पिवळ्या व लाल रंगाच्या असतात. तो आदित्यच पिंगट, पांढरा, निळा, पिवळा व लाल या रंगांचा असतो ( हे सर्व रंग सूर्यकिरणांत असतात. )

बृहदारण्यकांत नाड्यांचे रंग पांचच दिले आहेत. पण त्यांत पीत रंगाऐवजीं हिरव्या–हरित रंगाचा उल्लेख झाला आहे. (उ. नि. र. प्र. बृह. अ. ४ ब्रा. ३ मं. २७ . ५०६ ). या मंत्रांत पिंगल व पीत असे दोन शब्द स्वतंत्र असून हरित शब्दाचा उल्लेख नाहीं. म्हणून हरित व पीत हे दोन्हीही शब्द एकाच अर्थाचे आहेत असें मानल्यास या मंत्राचा बृहदारण्यकांतील मंत्राशीं मेळ घालतां येईल. तथापि छांदोग्यकाराला नाड्यांच्या पांच रंगांपैकीं हिरवा रंग अमान्य असून त्याऐवजीं तो पीत या शब्दानें हरित रंग दर्शवीत आहे आणि नाड्यांच्या पांच रंगांत हिरवा रंग असल्याचें बृहदारण्यककार सांगत आहे. या एका रंगाच्या बाबतींत या दोन ऋषींचा मतभेद आहे असें मानलें तरी हरकत नाहीं. या मंत्रांत नाड्यांचें मुख्यस्थान जें हृदय त्याचें स्थान मस्तकांतच असावें असें दिसतें. कारण हृदयांतील नाड्यांच्या रंगांचा सूर्यकिरणांशीं संबंध दाखविला आहे. मानवी शरीरांमध्यें चक्षुरिन्द्रियांतून दर्शनशक्तिद्वारा अनुभवास येणारी अक्षिपुरुष ही देवता व सूर्य यांचें एकीकरण उपनिषद्कर्त्या ऋषींना मान्य आहे. ह्या दोन देवतांच्या ऐक्याचा उल्लेख छान्दोग्यांत आतांपर्यंत अनेक ठिकाणीं आला आहे. नेत्राच्या द्वारानेंच सूर्य व हृदय यांचा संबंध येत असल्यामुळें, चक्षुरिन्द्रियाशीं संबद्ध असें हृदयाचें स्थान असलें पाहिजे असें ठरतें. सूर्यकिरणांतील नानाविध रंगांचें निरीक्षण वैदिक ऋषींनीं केलें असून त्यांचें वर्गीकरणही त्यांनीं निश्चित ठरविलें होतें. त्यावरून या वैदिक ऋषींची निरीक्षणशक्ति कशी लोकोत्तर होती हें चांगलेंच निदर्शनास येतें.

**तद्यथा महापथ आतत उभौ ग्रामौ गच्छतीमं चामुं चैवमेवैता आदित्यस्य रश्मय उभौ लोकौ गच्छन्तीमं चामुं चामुष्मादादित्यात्प्रतायन्ते ता आसु नाडीषु सृप्ता आभ्यो नाडीभ्यः प्रतायन्ते तेऽमुष्मिन्नादित्ये सृप्ताः ॥ २ ॥**

**तद् यथा आततः महापथः इमम् च अमुम् च उभौ ग्रामौ गच्छति एवम् एव आदित्यस्य एताः रश्मयः इमम् च अमुम् च उभौ लोकौ गच्छन्ति। अमुष्मात् आदित्यात् प्रतायन्ते ताः आसु नाडीषु सृप्ताः। आभ्यः नाडीभ्यः प्रतायन्ते ते अमुष्मिन् आदित्ये सृप्ताः।**

ज्याप्रमाणें अत्यंत दीर्घ असा मोठा मार्ग ह्या व त्या अशा दोन्ही गांवांना जातो, त्याप्रमाणेंच हीं सूर्याचीं किरणें इहलोक व परलोक या दोहोंनाही मिळतात. तीं किरणें सूर्यापासून विस्तार पावतात आणि तीं मागें वर्णिलेल्या नाडींमध्यें प्रविष्ट होऊन त्यांत पसरतात; आणि नाड्यांतून जीं किरणें निघतात तीं ह्या आदित्याच्या ठिकाणीं प्रविष्ट होतात.

मागील मंत्रांत ज्या नाडींचे रंग वर्णन केले आहेत त्या रंगांचा सूर्यकिरणांशीं कसा संबंध येतो तें या मंत्रांत सोपपत्तिक दाखविलें आहे. मागील मंत्रांत चक्षुरिन्द्रियाचा उल्लेख झाला असून त्याचा आदित्याशीं संबंधही दाखविला आहे. त्यावरून असें दिसतें कीं, डोळ्यांतील शिरांच्या रंगांवरून नाडींच्या रंगांचा शोध वैदिक ऋषींनीं केला असावा व त्याच कल्पनेवरून प्रकाशकिरणांतील रंगांचाही शोध त्यांनीं लाविला असला पाहिजे, असें अनुमान करण्यास जागा आहे. सृष्ट पदार्थांतील रंगांचा व प्रकाशकिरणांतील रंगांचा निकट संबंध असल्याचें आधुनिक शास्त्रानेंही मान्य केलें आहे. प्रकाशकिरणांतील पांच रंग प्राचीन ऋषींनीं निश्चित केलें होतें. या प्रकाशकिरणांतील रंगांचें वर्गीकरण करितांना त्यांनीं डोळ्यांतील सूक्ष्म शिरांच्या रंगांचा प्रारंभीं विचार केला होता.

सूर्यप्रकाशाची व्याप्ति सूर्यमंडळाच्या अलीकडे म्हणजे भूलोकावर आणि सूर्यमंडळाच्या पलीकडे म्हणजे द्युलोकामध्यें सारखीच आहे. अर्थात् हें आदित्यमंडळ प्रकाशकिरणांच्या द्वारानें पिण्डब्रह्माण्ड व्यापून राहिलें आहे व तेंच या नाडींच्या रंगांचेंही कारण आहे असें या मंत्रांत दर्शविलें आहे.

**तद्यत्रैतत्सुप्तः समस्तः संप्रसन्नः स्वप्नं न विजानात्यासु तदा नाडीषु सृप्तो भवति तं न कश्चन पाप्मा स्पृशति तेजसा हि तदा संपन्नो भवति ॥ ३ ॥**

**तत् यत्र एतत् समस्तः सुप्तः संप्रसन्नः स्वप्नम् न विजानाति तदा आसु नाडीषु सृप्तः भवति । कश्चन् पाप्मा तम् न स्पृशति। हि तदा तेजसा संपन्नः भवति ।**

जेव्हां हा जीव सुप्त--झोंपीं गेलेला व संप्रसन्न म्हणजे तींत निमग्न होतो, तेव्हां स्वप्न जाणत नाहीं. तेव्हां तो प्रसुप्त जीव त्या नाडींमध्यें प्रविष्ट झालेला असतो. त्या वेळीं कोणताही दोष त्याला स्पर्श करीत नाहीं. कारण त्या वेळीं तो जीव तेजाशीं संलग्न झालेला असतो.

पूर्वीच्या मंत्रांत ज्या नाडी सांगितल्या आहेत त्या नाडींमध्येंच प्रविष्ट झालेल्या जीवाला सुप्तावस्था प्राप्त होते. या नाडींपैकीं पुरितत् नांवाच्या एका नाडीमध्यें जीव सुप्त होतो असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे. ( उ. नि. र. प्र. बृ. अ. २ ब्रा. १ मत्र १९ पृ. २५–२६ ). परंतु ह्या मंत्रांत नाडी शब्दाचें बहुवचन घालून प्रविष्ट झालला जीव प्रसुप्त होतो असें मोघम सांगितलें आहे. या वेळीं जीवात्मा अंतःकरणयुक्त किंवा लिंग-देहयुक्त असतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. या सुप्तावस्थेमध्यें जीव तेजाशीं संपन्न झालेला असतो असें या मंत्रांत शेवटीं सांगितलें आहे. हें तेज म्हण-जेच उदान होय. या विषयाचें स्पष्टीकरण प्रश्नोपनिषदांत सविस्तर झालें आहे ( उ. नि. र. प्र. प्रश्नो. प्रश्न. ३ मं. ९ पृ. ५४–५५ ).

**अथ यत्रैतदबलिमानं नीतो भवति तमभित आसीना आहुर्जानासि मां जानासि मामिति स यावदस्माच्छरीरादनुत्क्रान्तो भवति तावज्जानाति ॥ ४ ॥**

अथ यत्र एतत् अबलिमानम् नीत भवति तम् अभितः आसीनाः माम् जानासि माम् जानासि इति आहुः। सः यावत् अस्मात् शरीरात् अनुत्क्रान्तः भवति तावत् जानाति।

आतां जेव्हां हा जीव दुर्बलता पावतो तेव्हां त्याच्या भोंवतीं बसलेले लोक मला ओळखतोस कां? मला ओळखतोस कां? असें म्हणतात. तो जोंपर्यंत या शरीरांतून अनुत्क्रांत असतो म्हणजे बाहेर गेलेला नसतो तोंपर्यंत ( त्यांना ) ओळखतो.

**अथ यत्रैतदस्माच्छरीरादुत्क्रामत्यथैतैरेव रश्मिभिरूर्ध्वमाक्रमते स ओमिति वा होद्वा मीयते स यावत्क्षिप्येन्मनस्तावदादित्यं गच्छत्येतद्वै खलु लोकद्वारं विदुषां प्रपदनं निरोधोऽविदुषाम् ॥५॥**

अथ यत्र एतत् अस्मात् शरीरात् उत्क्रामति अथ एतैः एव रश्मिभिः सः ॐ इति वा उर्ध्वम् उत मीयत। वा ह सः यावत् मनः क्षिप्येत् तावत् आदित्यम् गच्छति। एतत् वै खलु लोकद्वारम्। विदुषाम् प्रपदनम्। अविदुषाम् निरोधः।

नंतर जेव्हां हा जीव या शरीरांतून निघतो तेव्हां ( मागें वर्णन केल्याप्रमाणें ) नाडींशीं संबद्ध असलेल्या ह्या सूर्यकिरणांच्या योगानेंच ॐकाराचें स्मरण करीत ऊर्ध्व भागीं नेला जातो. तो जीव मनाची जशी शीघ्रगति असते तशा शीघ्रगतीनें सूर्यमंडळाला जातो. आदित्य हें खरोखर ब्रह्मलोकाचें द्वार आहे. हाच ज्ञानी मनुष्याचा ( ब्रह्मप्राप्तीचा ) मार्ग आहे. पण अज्ञानी मनुष्याचा तो निरोध आहे म्हणजे त्याला ही वाट बंद आहे.

नाडींच्या रंगांचा सूर्यकिरणांशीं संबंध असल्याचें पूर्वींच्या मंत्रांत सांगितलें आहे. मरणोत्तर जीवाचा या नाडींशीं संबंध सुटतो, तेव्हांच तो सूर्यकिरणांशीं संबद्ध होतो. या सूर्यकिरणांच्या मार्गानें तो आदित्यमंडळाच्या द्वारानें ब्रह्मलोकाला---ब्रह्माला प्राप्त होतो. ही गोष्ट ज्ञानी जीवालाच लागू आहे, अज्ञानी जीवाला नाहीं. कारण आदित्यमंडळ हें जसें ज्ञान्याला द्वारासारखें ब्रह्मप्राप्तीच्या कामीं उपयोगीं पडतें, तसेंच तें अज्ञानी जीवाला प्रतिबंधकही होतें. म्हणजे अज्ञानी जीवाला या आदित्यमंडळांतून मार्ग मिळत नाहीं. हा मार्ग सांपडणें केवळ ज्ञानावरच अवलंबून असतें. ज्ञानी जीवालाच हा आदित्यमण्डळाचा मार्ग सांपडतो; अज्ञानी जीवाला तो सांपडत नाहीं. प्रश्नोपनिषदांत निरोध हा शब्द आला आहे. पण तेथें त्याचा अर्थ नियम असा प्रकरणसंदर्भावरून करण्यांत आला आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

**तदेष श्लोकः । शतं चैका च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्न्या उत्क्रमणे भवन्त्युत्क्रमणे भवन्ति ॥ ६ ॥**

**तद् एषः श्लोकः । हृदयस्य शतम् च एका च नाड्यः । तासाम् एका मूर्धानम् अभिनिःसृता । तया ऊर्ध्वम् आयन् अमृतत्वम् एति । अन्याः विष्वक् उत्क्रमणे भवन्ति ।**

त्याविषयीं हा श्लोक ( प्राचीन मंत्र ) आहे. हृदयाच्या एकशें-एक नाडी आहेत. त्यांपैकीं एक मूर्धास्थानाकडे म्हणजे ब्रह्मरन्ध्राकडे गेली आहे. तिच्या योगानें वर जाणारा जीव अमृतत्व पावतो. इतर सर्व नाडी प्राणाच्या गतीस किंवा उत्क्रमणास म्हणजे निर्गमनास उपयोगीं पडतात. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे ).

हा मंत्र कठोपनिषदांत जशाचा तसाच आला आहे. तेथें त्याचें सविस्तर विवेचन करण्यांत आलें आहे तें अवश्य पाहावें. ( उ. नि. र. प्र.

कठ. अ. २ व. ३ मं. १६ पृ. १९२--१९३ ). या खंडाच्या पहिल्या मंत्रांत नाडींचे पांच रंग सांगितले आहेत, त्यांवरून नाडी देखील पांचच आहेत असें समजूं नये. पांच ही संख्या रंगांची आहे, नाडींची नव्हे. मुख्य नाडी एकशें एक असून शाखानाडी असंख्य आहेत.

## अथ सप्तमः खण्डः ।

**य आत्मापहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ह प्रजापतिरुवाच ॥ १ ॥**

**यः आत्मा अपहतपाप्मा विजरः विमृत्युः विशोकः विजिघत्सः अपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सः अन्वेष्टव्यः । सः विजिज्ञासितव्यः । यः तम् आत्मानम् अनुविद्य विजानाति सः सर्वान् लोकान् सर्वान् कामान् च अप्नोति इति प्रजापतिः उवाच ह ।**

जो आत्मा आहे तो निष्पाप, जरारहित, नाशरहित, शोकरहित, क्षुधारहित, तृषारहित असून सत्यकाम व सत्यसंकल्प असा आहे. त्याचें संशोधन करावें. त्याविषयीं जिज्ञासा ठेवावी. जो त्या आत्म्याला अनुक्रमानें प्राप्त होऊन विशेष रीतीनें जाणतो तो सर्व लोकांना व सर्व मनोरथांना प्राप्त होतो, असें प्रजापति ( ब्रह्मदेव? ) म्हणाला.

मुण्डकोपानिषदाच्या प्रारंभीं ‘ ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव ’ असें म्हटलें आहे. या मंत्रांतील प्रजापति हा शब्द व मुण्डकांतील ब्रह्मा शब्द हे दोन्ही सगुण परमेश्वर या एकाच अर्थाचे बोधक आहेत. त्या परमेश्वरानें आत्मतत्त्वाचें वर्णन केलें असून, त्याचें ज्ञान अवश्य संपादन करावें, म्हणजे मनुष्य पूर्णकाम व कृतकृत्य होतो, असें सांगितलें आहे. आत्मज्ञानाविषयींचा प्रजापतीचा – परमेश्वराचा उपदेश आहे. किंबहुना

परमेश्वराची ही जीवांना आज्ञाच आहे. अशा ईश्वरी आज्ञेला विधि असें म्हणतात. विधि म्हटला म्हणजे तो अवश्यकर्तव्यतेचा बोधकच असतो. अर्थात् आत्मज्ञान संपादन केलेंच पाहिजे असें ठरतें. या वाक्याला विधि-वाक्य असें म्हणतात. आत्मा हा विधीचा विषय होतो आणि अमर्याद-तत्त्वाला मर्यादित केल्यासारखें होतें असा दोष येईल म्हणून आत्म-विषयक वाक्यांत स्पष्ट विध्यर्थी क्रियापदें आलीं तरी, तो विधि नव्हे असें समजावें, अशा अनेक प्रकारच्या कोट्या मायावादी संन्यासमार्गीयांकडून काढल्या जातात; परंतु मायावादाचा हा कोटिक्रम बरोबर नाहीं. कारण कोणताही शब्द उच्चारला तरी, या अद्वैत ब्रह्मतत्त्वाविषयीं तो सविकल्पकच ठरतो; आणि श्रुतीला तर या अद्वैत ब्रह्मतत्त्वाचें शब्दांनींच प्रतिपादन करावयाचें असल्यामुळें, ' चोद्यं वा परिहारो वा क्रियतां द्वैतभाषया ' हाच न्याय आजपर्यंत सर्व शिष्ट लोकांना स्वीकारावा लागला आहे. प्रतिपाद्य-विषय अद्वैत आणि प्रतिपादनाची भाषा मात्र द्वैतरूप अशा स्थितींत द्वैत-भाषेनेंच अस्तिपक्षीं किंवा नास्तिपक्षीं बोलणें बोलावयास पाहिजे, असें वरील न्यायाचें तात्पर्य आहे. ब्रह्माची गोष्ट सोडून दिली तरी, व्यवहारांत देखील कोणताही शब्द आपल्या अर्थाचा सर्वांगीण बोधक नसतो असें भाषाशास्त्र-वेत्त्यांनाही कबूल करावें लागलें आहे. एकाद्या पदार्थाचें नांव उच्चारल्या-बरोबर त्या पदार्थासंबंधीं जितक्या कल्पना मनात येतात त्या सर्वच्या सर्व त्या एका शब्दांत सामावल्या जात नाहींत; म्हणून भाषेंतलि सर्व शब्द किंवा वाक्यें सापेक्ष किंवा एकांगी आहेत असेंच ठरतें. या दृष्टीनें विचार केल्यास ब्रह्माविषयींचीं श्रुतींतील विधिवाक्यें सापेक्ष किंवा एकांगी ठरलीं अगर त्या वाक्यांनीं ब्रह्मतत्त्वाला एकांगीपणा येतो असे भासलें तथापि, अशा वाक्यांचें विधित्व नाहींसें होतें किंवा तें कमी दर्जाचें ठरतें असें म्हणतां यावयाचें नाहीं.

अप्राप्त विषयाबद्दल जी श्रुतीची आज्ञा तिला अपूर्वविधि असें म्हणतात. ' सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः ' हीं विधिवाक्यें आहेत. ब्रह्मतत्त्वाचें संशोधन किंवा त्याची जिज्ञासा ही मनुष्याच्या अंतःकरणांत कधींच उत्पन्न

व्हावयाचीं नाहींत असें म्हणता यावयाचें नाहीं. म्हणजे त्यांची अत्यंत अप्राप्ति सिद्ध होत नाहीं. कोणत्या तरी कारणांनीं मनुष्याच्या अंतःकरणांत ब्रह्मजिज्ञासा उत्पन्न होणें शक्य आहे. हीच ब्रह्मजिज्ञासेची पाक्षिक प्राप्ति होय. म्हणून भाष्यकार श्रीमत् शंकराचार्यांनीं या मंत्रांतील वर दिलेल्या विधिवाक्यांत नियमविधि आहे असें स्पष्ट नमूद करून ठेविलें आहे. नियम-विधीमध्यें अंशतः अप्राप्ति असली तरी, अप्राप्त अंशामध्यें नियमविधि हा अपूर्वविधीच्या बरोबरीचाच असतो. तो अपूर्वविधीपेक्षां कमी दर्जाचा आहे असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. ब्रह्मवस्तूचें सगुण व निर्गुण स्वरूप, ब्रह्मज्ञानापासून जीवाला प्राप्त होणारी ब्राह्मी स्थिति इत्यादि विषयांचा स्पष्ट निर्देश या मंत्रांत झाला असल्यानें, त्यांतील विधिवाक्य सर्वांगपरिपूर्ण आहे असेंच ठरतें. अशा वाक्यांना आभासिकविधि किंवा विध्याभास असें म्हणणें अनुपपन्न व अशास्त्रीय आहे यांत शंका नाहीं.

**तद्धोभये देवासुरा अनुबुबुधिरे ते होचुर्हन्त तमात्मानमन्विच्छामो यमात्मानमन्विष्य सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामानितीन्द्रो हैव देवानामभिप्रवव्राज विरोचनोऽसुराणां तौ हासंविदानावेव समित्पाणी प्रजापतिसकाशमाजग्मतुः ॥ २ ॥**

**उभये देवासुराः तत् अनुबुबुधिरे ह। ते ऊचुः ह । हन्त यम् आत्मानम् अन्विष्य सर्वान् लोकान् सर्वान् कामान् आप्नोति तम् आत्मानम् अन्विच्छामः इति। देवानाम् इन्द्रः एव असुराणाम् विरोचनः अभिवव्राज ह । तौ असंविदानौ एव ह समित्पाणी प्रजापतिसकाशम् आजग्मतुः।**

तें देव व असुर हे दोघेही जाणते झाले. ते म्हणाले कीं, ज्या आत्म्याचें संशोधन केल्यानें सर्व लोक व सर्व मनोरथ प्राप्त होतात, त्या आत्म्याचा आपण शोध करूं या. देवांपैकीं इन्द्र व असुरांपैकीं विरोचन ( हे दोघे ) निघाले. ते एकमेकांच्या न कळत समिधा हातांत घेऊन प्रजापतीकडे गेले.

मागील मंत्रांत दर्शविलेली आत्मज्ञानविषयक परमेश्वरी इच्छा ( आज्ञा ) जेव्हां देवासुरांना समजली तेव्हां त्यांना अध्यात्मविद्येचें महत्त्व पूर्णपणें पटलें. आणि देवांचा पुढारी इन्द्र व असुरांचा पुढारी विरोचन हे दोघे यथाविधि अध्यात्मविद्या संपादन करण्याकरितां प्रजापति परमेश्वराकडे गेले. मात्र आपण प्रजापतीकडे जाणार आहों असें त्यांनीं एकमेकांशीं अगोदर विचार करून ठरविलेलें नव्हतें.

**तौ ह द्वात्रिंशतं वर्षाणि ब्रह्मचर्यमूषसुस्तौ ह प्रजापतिरुवाच किमिच्छन्ताववास्तमिति तौ होचतुर्य आत्मापहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति भगवतो वचो वेदयन्ते तमिच्छन्ताववास्तमिति ॥ ३ ॥**

तौ द्वात्रिंशतम् वर्षाणि ब्रह्मचर्यम् ऊषतुः। तौ प्रजापतिः उवाच ह। किम् इच्छन्तौ अवास्तम् इति। तौ ऊचतुः ह । यः आत्मा अपहतपाप्मा विजरः विमृत्युः विशोकः अविजिघत्सः अपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सः अन्वेष्टव्यः । सः विजिज्ञासितव्यः । यः तम् आत्मानम् अनुविद्य विजानाति सः सर्वान् लोकान् सर्वान् कामान् च आप्नोति इति भगवतः वचः वेदयन्ते तम् इच्छन्तौ अवास्तम् इति।

ते दोघे ( इंद्र व विरोचन ) ३२ वर्षे तेथें ब्रह्मचर्यानें म्हणजे विद्यार्थिरूपानें राहिले. त्यांना प्रजापति म्हणाला कीं, कोणती इच्छा करून तुम्ही राहिलां आहां ? ते म्हणाले कीं, जो आत्मा आहे तो निष्पाप, जरारहित नाशरहित, शोकरहित, क्षुधारहित तृषारहित असून सत्यकाम सत्यसंकल्प असा आहे, त्याचें संशोधन करावें; त्याविषयीं जिज्ञासा ठेवावी; जो त्या आत्म्याला क्रमानें प्राप्त होऊन विशेष रीतीनें जाणतो तो सर्व

**लोकांना व सर्व मनोरथांना प्राप्त होतो; असें आपलें वचन सर्वांस विदित आहे ( प्रसिद्ध आहे ). त्या ( आत्मज्ञानाच्या ) इच्छेनेंच आम्ही येथें राहिलों आहों.**

इन्द्र व विरोचन ३२ वर्षें ब्रह्मचर्यव्रतानें प्रजापतीच्या समीप राहिले, असें या मंत्रांत म्हटलें आहे. कोठें कोठें दिवस अशा अर्थानें वर्ष शब्द येतो. तथापि इन्द्रादिकांचा हा व्यवहार असल्यामुळें, वर्ष या शब्दाचा संवत्सर असाहि अर्थ धरण्यास हरकत नाहीं. मानवी एक वर्ष म्हणजे देवांचा एक दिवस होतो या कल्पनेनें पाहिल्यास, मनुष्यांच्या दृष्टीनें ती बत्तीस वर्षें असलीं, तरी देवांचे ते ३२ दिवसच होत, असें समजण्यास हरकत नाहीं. देवमानानें सरासरी महिनाभर राहिल्यावर त्या इन्द्रविरोचनांना प्रजापतीनें प्रश्न केला कीं, येथें राहण्यांत तुमचा उद्देश काय आहे ? तेव्हां विद्वान् लोकांत प्रसिद्ध असलेलें प्रजापतीचें आत्मज्ञानविषयक विधिवाक्य सांगून ते म्हणाले कीं, ज्या आत्मज्ञानाच्या योगानें मनुष्य कृतकृत्य होतो तें आत्मज्ञान आपल्यापासून संपादन करावें, या हेतूनेंच आम्ही येथें राहिलों आहोंत. इन्द्रविरोचनांच्या या भाषणावरून ‘ सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः ’ इत्यादि विधिवाक्यें नुसतीं प्रेरकच नसून तीं आकर्षक देखील ठरतात. जिज्ञासारहित मनुष्याला या अध्यात्मवाङ्मयाच्या श्रवणानें, नसलेली जिज्ञासाही उत्पन्न होते; म्हणून अशा प्रकारचीं विधिवाक्यें हे विध्याभास आहेत असें म्हणणें शास्त्रदृष्ट्या अयोग्यच ठरतें.

**तौ ह प्रजापतिरुवाच य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यत एष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेत्यथ योऽयं भगवोऽप्सु परिख्यायते यश्चायमादर्शे कतम एष इत्येष उ एवैषु सर्वेष्वन्तेषु परिख्यायत इति होवाच ॥ ४ ॥**

**प्रजापतिः तौ उवाच ह । यः एषः पुरुषः अक्षिणि दृश्यते एषः आत्मा । एतत् अमृतम् अभयम् । एतत् ब्रह्म । अथ भगवः यः अयम् अप्सु यः च अयम्**

**आदर्शे परिख्यायते कतमः एषः एतेषु। एषु सर्वेषु एषः उ एव परिख्यायते इति एषः उवाच ह।**

प्रजापति त्या दोघांना म्हणाला—जो हा पुरुष डोळ्यांमध्यें दिसतो तोच आत्मा, तेंच अभय, तेंच ब्रह्म होय. हे भगवन् जो हा पाण्यामध्यें किंवा जो आरशामध्यें दिसतो त्यापैकीं कोणता आत्मा? ह्या पदार्थांमध्यें किंवा कोणत्याही पदार्थांमध्यें हा आत्माच दिसतो, ( तो सर्वत्र भरलेला आहे ). असें प्रजापति म्हणाला.

अक्षिपुरुषाचें वर्णन पूर्वीं देखील आलें आहे. प्रजापतीनें ब्रह्म म्हणून त्याचाच येथें प्रथम निर्देश केला आहे. पाणी किंवा आरसा यांत प्रतिबिंबरूपानें दिसणारा पुरुष व हा अक्षिपुरुष एकच आहे, असें या मंत्राचें तात्पर्य आहे.

## अथाष्टमः खण्डः ।

**उदशराव आत्मानमवेक्ष्य यदात्मनो न विजानीथस्तन्मे प्रब्रूतमिति तौ होदशरावेऽवेक्षांचक्राते तौ ह प्रजापतिरुवाच किं पश्यथ इति तौ होचतुः सर्वमेवेदमावां भगव आत्मानं पश्याव आलोमभ्य आनखेभ्यः प्रतिरूपमिति ॥ १ ॥**

**उदशरावे आत्मानम् अवेक्ष्य यत् आत्मनः न विजानीथः तत् मे प्रब्रूतम् इति। तौ उदशरावे अवेक्षांचक्राते ह। किं पश्यथः इति प्रजापतिः तौ उवाच ह। भगवः आवाम् आलोमभ्यः आनखेभ्यः सर्वम् इदम् प्रतिरूपम् आत्मानम् पश्यावः इति तौ ऊचतुः ह।**

प्रजापति म्हणाला, उदकाच्या पात्रामध्यें स्वतःला पाहून जर तुम्हीं स्वतःला जाणलें नाहीं तर मला सांगा. ते उदकाच्या पात्रामध्यें स्वतःचें प्रतिबिंब पाहते झाले. तुम्हांला काय दिसतें? असें प्रजापति

त्या दोघांना म्हणाला. भगवन्! आम्ही केसांसुद्धां व नखांसुद्धां सर्व ह्या प्रतिबिंबांत स्वतःला पहात आहों असें ते दोघे (इंद्र व विरोचन) म्हणाले.

**तौ ह प्रजापतिरुवाच साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतौ भूत्वोदशरावेऽवेक्षेथामिति तौ ह साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतौ भूत्वोदशरावेऽवेक्षां चक्राते तौ ह प्रजापतिरुवाच किं पश्यथ इति ॥ २ ॥**

**प्रजापतिः तौ उवाच ह। साधु परिष्कृतौ अलंकृतौ सुवसनौ भूत्वा उदशरावे अवेक्षेथाम् इति। तौ साधु परिष्कृतौ अलंकृतौ सुवसनौ भूत्वा उदशरावे अवेक्षां चक्राते। किं पश्यथः इति प्रजापतिः तौ उवाच ह।**

प्रजापति त्या दोघांना म्हणाला, चांगले संस्कारयुक्त (स्वच्छ) होऊन चांगले अलंकार घालून, चांगलीं वस्त्रें परिधान करून उदक पात्रामध्यें पहा. ते दोघे चांगले संस्कारयुक्त (स्वच्छ) होऊन, चांगले अलंकार घालून, चांगलीं वस्त्रें परिधान करून पाण्याच्या पात्रांत पाहते झाले. काय दिसतें? असें प्रजापति त्यांस म्हणाला.

**तौ होचतुर्यथैवेदमावां भगवः साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतौ स्व एवमेवमौ भगवः साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतावित्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति तौ ह शान्तहृदयौ प्रवव्रजतुः ॥३॥**

**तौ ऊचतुः ह। भगवः यथा एव इदम् आवाम् साधु परिष्कृतौ अलंकृतौ सुवसनौ स्वः एवम् एव साधु परिष्कृतौ अलंकृतौ सुवसनौ इति। एषः आत्मा एतत् अमृतम् एतत् अभयम् एतत् ब्रह्म इति एषः उवाच ह। तौ शान्तहृदयौ प्रवव्रजतुः।**

ते म्हणाले कीं भगवन्! ज्याप्रमाणें आम्ही संस्कारयुक्त अलंकृत वस्त्रें परिधान केलेले आहों, तसेच दिसतों. हाच आत्मा, हेंच अमृत, हेंच अभय व हेंच ब्रह्म होय, असें प्रजापति त्यांना म्हणाला. ते शांतचित्त होऊन निघून गेले.

**तौ हान्वीक्ष्य प्रजापतिरुवाचानुपलभ्यात्मानमननुविद्य व्रजतो यतर एतदुपनिषदो भविष्यन्ति देवा वासुरा वा ते पराभविष्यन्तीति स ह शान्तहृदय एव विरोचनोऽसुराञ्जगाम तेभ्यो हैतामुपनिषदं प्रोवाचात्मैवेह महय्य आत्मा परिचर्य आत्मानमेवेह महयन्नात्मानं परिचरन्नुभौ लोकाववाप्नोतीमं चामुं चेति ॥ ४ ॥**

प्रजापतिः तौ अन्वीक्ष्य उवाच ह। आत्मानम् अननुविद्य आत्मानम् अनुपलभ्य व्रजतः। यतरे देवाः वा असुराः वा एतदुपनिषदः भविष्यन्ति ते पराभविष्यन्ति इति। सः विरोचनः शान्तहृदयः एव असुरान् जगाम ह। तेभ्यः एताम् उपनिषदम् प्रोवाच ह। इह आत्मा एव महय्यः। आत्मा परिचर्यः। इह आत्मानम् एव महयन् आत्मानम् परिचरन् इमम् च अमुम् च उभौ लोकौ अवाप्नोति।

प्रजापति त्या दोघांकडे पाहून ( आत्मगत ) म्हणाला, आत्मप्राप्ति झाल्यावांचून ( आत्मज्ञान संपादन केल्यावांचूनच ) हे इंद्र व विरोचन जात आहेत. जे कोणी देव किंवा असुर यांच्या तत्त्वज्ञानाचे अनुयायी होतील ते पराभूत होतील. तो विरोचन शांतचित्तानें असुरसमाजांत गेला आणि त्यांना त्यानें आपलें तत्त्वज्ञान सांगितलें. ( तें असें कीं, ) इहलोकीं देहरूपी आत्माच श्रेष्ठत्वास योग्य आहे. आत्म्याची-देहाचीच सेवा केली पाहिजे. जो देहाचें श्रेष्ठत्व मानतो व देहाची उपासना करितो त्याला इह व पर हे दोन्ही लोक प्राप्त होतात.

**तस्मादप्यद्येहाददानमश्रद्दधानमयजमानमाहुरासुरो बतेत्यसुराणाꣳ ह्येषोपनिषत्प्रेतस्य शरीरं भिक्षया वसनेनालंकारेणेति सꣳस्कुर्वन्त्येतेन ह्यमुं लोकं ज्येष्यन्तो मन्यन्ते ॥ ५ ॥**

तस्मात् अद्य अपि इह अददानम् अश्रद्दधानम् अयजमानम् बत असुरः इति आहुः। हि एषा असुराणाम् उपनिषत्। प्रेतस्य शरीरम् भिक्षया वसनेन अलंकारेण संस्कुर्वन्ति। एतेन हि अमुम् लोकम् जेष्यन्तः इति मन्यन्ते।

म्हणून आज सुद्धां व्यवहारांत दान किंवा परोपकार न करणाऱ्या श्रद्धाहीन अशा मनुष्याला अयजमान म्हणजे अनुपासक (अधार्मिक किंवा अभक्त) व असुर असें म्हणतात. ( देहात्मवादी ) तत्त्वविद्या असुरांची होय. ते प्रेताचें शरीर भिक्षा, वस्त्र व अलंकार यांनीं संस्कारयुक्त करितात. या संस्कारानें तीं मृत मनुष्यें परलोकाला जिंकतात असें ते असुर मानतात.

## आठव्या खंडाचा सारांश

प्रस्तुत खंडांतील पहिल्या दोन तीन मंत्रांत नुसती कथाच आली असल्यामुळें, वेगवेगळें विवरण न देतां, या खंडाचा सारांशच थोडक्यांत दिला आहे. इन्द्र—विरोचनांनीं आपणांला आत्मज्ञानाचा उपदेश करण्याविषयीं प्रार्थना केल्यावर, तुमचा देह हा आत्माच आहे असें समजावून देण्याकरितां प्रजापतीनें त्यांना उदकांत आपलें प्रतिबिंब पहावयास सांगितलें. त्यांनीं तसें केल्यावर, पुनः उत्तम प्रकारचीं वेषभूषणें धारण करून व आपल्या शरीराची चांगली सजावट करून आपलीं प्रतिबिंबें पहा, असें प्रजापतीनें त्यांना सांगितलें; तेव्हां त्यांनीं आपलीं सुंदर व सुशोभित प्रतिबिंबें उदकांमध्यें पाहिलीं व प्रजापतीस तसें निवेदन केलें. प्रजापतीनें सांगितलें कीं, तुम्हीं ज्या आपल्या सुशोभित देहांचीं प्रतिबिंबें पाहिलीं तोच तुमचा आत्मा होय. आणि आत्मा म्हटला कीं, तो अमृत, अभय व ब्रह्मस्वरूप आहे असें समजावें. प्रजापतीनें हा देहात्मवादच सांगितला आहे. तो सांगतांना त्याचे दुष्परिणाम त्याला माहित होते. जर यांनीं हा देहात्मवादच सत्य मानून आत्मसंशोधन बंद केलें तर हे फसल्याशिवाय राहणार नाहींत, हें देखील प्रजापतीला माहित होतें. परंतु आत्म्याविषयीं खरी जिज्ञासा उत्पन्न झाल्यावांचून आत्मज्ञानाचा उपदेश करणें बरोबर नाहीं; कारण जिज्ञासाहीन मनुष्याला अशा उपदेशाचा उपयोग व्हावा तसा होत नाहीं; म्हणून प्रजापतीनें त्यांना आत्मज्ञानाविषयीं पूर्ण उपदेश केला नसावा.

प्रजापतीच्या सांगण्याप्रमाणें इन्द्र व विरोचन यांनीं तो उपदेश ग्रहण केला व ते तेथून निघाले. विरोचनाचें अन्तःकरण शान्त होतें; कारण त्याच्या मनांत जिज्ञासेची तळमळच विशेष नव्हती. म्हणून आपण आत्मज्ञानी झालों असें समजून तो आपल्या असुरसमाजांत गेला व त्यानें त्या समाजांत देहात्मवादाचें तत्त्व प्रचलित केलें. स्थूल शरीराची जोपासना करणें, तें सुंदर व हृष्टपुष्ट करणें आणि विषयोपभोगादिकांनीं आनंद अनुभविणें हेंच जीवितकर्तव्य होय; देह हाच आत्मा म्हटल्यावर, मी म्हणजे देह हाच आत्मा होय अशी देहात्मबुद्धि उत्पन्न होणें क्रमप्राप्तच आहे; या देहाचे सोपस्कार करण्यांतच पुण्य आहे; असें या तत्त्वज्ञानाच्या योगानें विरोचनादि असुरांनीं ठरविलें. सौंदर्यसंपादन, वेषभूषादिकांची रचना इत्यादि नानाविध साधनांनीं देह सुशोभित ठेवला तर त्याला इहलोकीं व परलोकीं सद्गति मिळते, म्हणून मृत देहाला देखील ते असुर सुशोभित करितात. उद्देश हा कीं, या मृत देहाची सजावट पाहून परलोकीं त्याला उच्चस्थान दिलें जावें. मृत शरीराला सजविण्याची ही पद्धति छान्दोग्याच्या कालांत देखील कांहीं ठिकाणीं सुरू असावी असें यावरून दिसतें. विरोचनाच्या अंतःकरणांत जिज्ञासा जागृत असती तर त्यानें आत्मतत्त्वाचें संशोधन तेथेंच सोडून दिलें नसतें. परंतु त्याची जिज्ञासा मूळचीच मंद होती व विषयोपभोगांकडे त्याचा पहिल्यापासूनच ओढा होता त्यामुळें, प्रजापतीनें सांगितलेल्या आत्मज्ञानाच्या पहिल्या पायरीवरच तो थांबला; आणि त्यानें जीवितकर्तव्याची दिशा चुकीची ठरविली.

## अथ नवमः खण्डः ।

**अथ हेन्द्रोऽप्राप्यैव देवानेतद्भयं ददर्श यथैव खल्वयमस्मिञ्छरीरे साध्वलंकृते साध्वलंकृतो भवति सुवसने सुवसनः परिष्कृते परिष्कृत एवमेवायमस्मिन्नन्धेऽन्धो भवति स्रामे स्रामः परिवृक्णे परिवृक्णोऽस्यैव शरीरस्य नाशमन्वेष नश्यति नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥ १ ॥**

**अथ ह इन्द्रः देवान् अप्राप्य एव एतत् भयम् ददर्श । यथा एव खलु अस्मिन् शरीरे साधु अलंकृते अयम् साधु अलंकृतः भवति । सुवसने सुवसनः । परिष्कृते परिष्कृतः । एवम् एव अयम् अस्मिन् अन्धे अन्धः । स्रामे स्रामः । परिवृक्णे परिवृक्णः । अस्य एव शरीरस्य नाशम् अनु एषः नश्यति । अत्र भोग्यम् न पश्यामि इति ।**

इकडे इंद्र देवांकडे पोंचण्याच्या अगोदरच आपल्या तत्त्वज्ञानाबद्दल भय म्हणजे भीतिजनक शंका पाहता झाला ( त्याला शंका आली ). ती अशी कीं, ज्याप्रमाणें हें शरीर चांगलें अलंकृत केलें असतां, हा देहरूपी आत्मा चांगला अलंकृत होतो (दिसतो), चांगलें वस्त्र परिधान केलें असतां सुवसन दिसतो, सुसंस्कृत केला असतां सुसंस्कृत दिसतो, त्याप्रमाणेंच हा देह अन्ध असेल तर आत्मा अन्ध असा वाटतो, ( स्वेदादि ) मल स्रवूं लागले असतां तो मल स्रवणारा दिसतो, व्यंग असेल तर व्यंग असा वाटतो, आणि या शरीराच्या नाशाबरोबरच या देहरूपी आत्म्याचाही नाश होणार. यांत ग्राह्य असें कांहींच दिसत नाहीं.

इन्द्राची जिज्ञासा विरोचनासारखी मंद नव्हती, म्हणून त्यानें प्रजापतीच्या उपदेशाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार करण्यास प्रारंभ केला.तेव्हां त्याला असें आढळून आलें कीं, हा देह कितीही सौंदर्यसंपन्न केला तरी त्याचा नाश झाल्याखेरीज रहावयाचा नाहीं. यांत एकादें व्यंग उत्पन्न झालें तर त्या योगें आत्मा देखील व्यंग आहे असें म्हणावें लागतें. रोगादिकांनीं देह क्षीण झाला तर त्या क्षीणपणाचा आत्म्याशींही संबंध येणार ! मग अशा दोषांनीं युक्त आणि नाशिवंत देह हाच आत्मा असें मानिलें तर तो अमृत, अभय व ब्रह्मस्वरूप आहे असें कसें म्हणतां येईल ? ही बलवत्तर शंका त्याच्या मनांत उत्पन्न झाली; व या देहाचे ठिकाणीं भोग्य

म्हणजे अविनाशी सुखाच्या दृष्टीनें ग्राह्य असें कांहीं नाहीं असें त्याला दिसून आलें.

**स समित्पाणिः पुनरेयाय तँ᳖ ह प्रजापतिरुवाच मघवन्यच्छान्तहृदयः प्राव्राजीः सार्धं विरोचनेन किमिच्छन्पुनरागम इति स होवाच यथैव खल्वयं भगवोऽस्मिञ्छरीरे साध्वलंकृते साध्वलंकृतो भवति सुवसने सुवसनः परिष्कृते परिष्कृत एवमेवायमस्मिन्नन्धेऽन्धो भवति स्रामे स्रामः परिवृक्णे परिवृक्णोऽस्यैव शरीरस्य नाशमन्वेष नश्यति नाहमत्र भोग्यं पश्यामीति॥२॥**

**सः समित्पाणिः पुनः एयाय । तम् ह प्रजापतिः उवाच । मघवन् विरोचनेन सार्धम् शान्तहृदयः यत् प्राव्राजीः पुनः किम् इच्छन् आगमः । सः उवाच ह । यथा एव अस्मिन् शरीरे साधु अलंकृते अयम् साधु अलंकृतः भवति । सुवसने सुवसनः । परिष्कृते परिष्कृतः । एवम् एव अयम् अस्मिन् अन्धे अन्धः । स्रामे स्रामः । परिवृक्णे परिवृक्णः । अस्य एव शरीरस्य नाशम् अनु एषः नश्यति । अत्र भोग्यम् न पश्यामि इति ।**

तो समिधा हातीं घेऊन पुनः प्रजापतीकडे आला. त्याला प्रजापति म्हणाला, इन्द्रा! शांतचित्त होऊन ( समाधान पावून ) विरोचनासह गेला होतास, तो पुनः कोणत्या इच्छेनें परत आलास ? तो इन्द्र म्हणाला, ज्याप्रमाणें हें शरीर चांगलें अलंकृत केलें असतां, हा देहरूपी आत्मा चांगला अलंकृत होतो ( दिसतो ); चांगलें वस्त्र परिधान केलें असतां सुवसन दिसतो; सुसंस्कृत केला असतां सुसंस्कृत दिसतो; त्याप्रमाणेंच हा देह अन्ध असेल तर आत्मा अन्ध असा वाटतो; ( स्वेदादिक ) मल स्रवूं लागले असतां तो मल स्रवणारा दिसतो; व्यंग असेल तर व्यंग वाटतो आणि या शरीराच्या नाशाबरोबरच या देहरूपी आत्म्याचाही नाश होणार. यांत ग्राह्य असें कांहींच दिसत नाहीं.

मागील मंत्रांत सांगितल्याप्रमाणें देहात्मवादाविषयीं इंद्राला शंका उत्पन्न झाल्याबरोबर तो पुनः शिष्यबुद्धीनें प्रजापतीकडे गेला. तेव्हां प्रजापतीनें त्याला परत येण्याचें कारण विचारल्यावर इंद्रानें आपली शंका प्रजापतीला शब्दशः निवेदन केली.

**एवमेवैष मघवन्निति होवाचैतं त्वेव ते भूयोऽनुव्याख्यास्यामि वसापराणि द्वात्रिंशतं वर्षाणीति स हापराणि द्वात्रिंशतं वर्षाण्युवास तस्मै होवाच ॥ ३ ॥**

**सः उवाच ह। मघवन् एषः एवम् एव इति। एतम् तु एव भूयः अनुव्याख्यास्यामि। अपराणि द्वात्रिंशतम् वर्षाणि वस। सः अपराणि द्वात्रिंशतम् वर्षाणि उवास ह। तस्मै उवाच ह।**

तो प्रजापति म्हणाला इन्द्रा! हा देहरूप आत्मा असाच आहे. याच आत्म्याचें मी पुनः व्याख्यान करितों. आणखी बत्तीस वर्षें ( दिवस ) रहा. तो इन्द्र आणखी बत्तीस वर्षें ( दिवस ) राहिला. नंतर प्रजापति त्याला म्हणाला.

प्रजापतीनें इंद्राची शंका मान्य करून, आत्मतत्त्वाचें पुनरपि स्पष्टीकरण करितों, आणखी कांहीं दिवस येथें रहा, असें त्याला सांगितलें. या मंत्रांत देखील ३२ वर्षें अशा अर्थाचीं पदें आलीं आहेत. त्यांचा अभिप्राय पूर्वीप्रमाणेंच समजावा. या मंत्रानेंच हे नववें खंड समाप्त झालें आहे.

## अथ दशमः खण्डः।

**य एष स्वप्ने महीयमानश्चरत्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति स ह शान्तहृदयः प्रवव्राज स हाप्राप्यैव देवानेतद्भयं ददर्श तद्यद्यपीदꣳ शरीरमन्धं भवत्यनन्धः स भवति यदि स्राममस्रामो नैवैषोऽस्य दोषेण दुष्यति ॥ १ ॥**

**यः एषः स्वप्ने महीयमानः चरति एषः आत्मा । एतत् अमृतम् । एतत् अभयम् । एतत् ब्रह्म इति उवाच ह । सः शान्तहृदयः प्रवव्राज ह । सः देवान् अप्राप्य एव एतत् भयम् ददर्श । यदि अपि तत् इदम् शरीरम् अन्धम् भवति सः अनन्धः भवति । यदि स्रामम् अस्रामः । अस्य दोषेण एषः न दुष्यति वै ।**

जो हा स्वप्नामध्यें सामर्थ्यवान् होत्साता संचार करितो तो आत्मा होय. आणि तेंच अविनाशी, भयरहित ब्रह्म होय, असें प्रजापति म्हणाला. तो इन्द्र शांतचित्तानें तेथून निघाला. पण देवांकडे जाण्यापूर्वींच ( पूर्वींप्रमाणेंच ) त्याला भीतिजनक शंका उत्पन्न झाली. जरी हें शरीर अन्ध असलें तरी, तो ( स्वप्नस्थ ) आत्मा अन्ध नसतो. जरी हें स्रावयुक्त असलें तरी तो आत्मा स्रवत नाहीं. शरीराच्या दोषानें हा आत्मा दूषित होत नाहीं.

स्वप्नातील ( लिंग ) देहाविषयीं इन्द्र जेव्हां विचार करूं लागला; तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं, स्थूलदेहाचे विकार लिंगदेहाशीं संबद्ध, असतातच असें नाहीं. स्थूल देह अंध किंवा बधिर झाला असेल, पण जीवात्म्याला किंवा अंतःकरणाला ( अनुभवपूर्वक दर्शनशक्तीची किंवा श्रवणशक्तीची पूर्ण कल्पना आली असेल तर, ) स्वप्नामध्यें हे अंधत्वादि विकार नियमानें अनुवृत्त होतात असें म्हणता येत नाहीं. म्हणून स्थूल देहापेक्षां हा स्वप्नदेह–लिंगदेह स्वतंत्र असून स्थूलदेहाच्या नाशाबरोबर त्याचा नाश होतो असें म्हणतां येत नाहीं. म्हणून लिंगदेह हाच आत्मा होय, ही कल्पना इन्द्राला सकृद्दर्शनीं बरोबर वाटली.

**न वधेनास्य हन्यते नास्य स्राम्येण स्रामो घ्नन्ति त्वेवैनं विच्छादयन्तीवाप्रियवेत्तेव भवत्यपि रोदितीव नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥ २ ॥**

**अस्य वधेन न हन्यते । अस्य स्राम्येण न स्रामः । तु एनम् घ्नन्ति । विच्छादयन्ति इव । अप्रियवेत्ता इव भवति । अपि रोदिति इव । अत्र अहम् भोग्यम् न पश्यामि इति ।**

या देहाच्या वधानें स्वप्नस्थ आत्म्याचा वध होत नाहीं. याच्या स्रावानें तो स्रावयुक्त होत नाहीं. परंतु या स्वप्नांतील आत्म्याला मारतात, आच्छादित करितात, ( केव्हां केव्हां ) तो दुःखी होतो व ( केव्हां ) रडतोही. म्हणून स्वप्नांतील या आत्म्याचें ज्ञान मला पूर्ण किंवा ग्राह्य वाटत नाहीं.

स्थूलदेहाच्या मानानें लिंगदेह स्वतंत्र असला तरी, इन्द्राला विचारा-अंतीं त्यांतील दोषही दिसून आले. ' घ्नन्ति विच्छादयन्ति, ' इत्यादि पदें स्वप्नस्थितींतील वैशिष्ट्य दर्शविणारीं आहेत. बृहदारण्यकांत व छान्दोग्यांतही शुक्ल नील इत्यादि पांच रंगांच्या नाडींचें वर्णन आलें आहे. या नाडींच्या संबंधानेंच लिंग देहांत सुखदुःखकारक निरनिराळे आभास उत्पन्न होतात. या आभासांनीं हर्षशोक पावणारा हा स्वप्नस्थितींतील आत्माही अमृत व अभयस्वरूप आहे असें म्हणतां येत नाहीं. म्हणून शुद्ध आत्मतत्त्व याहून वेगळेंच असलें पाहिजे व तें समजल्यावांचून आपलें ज्ञान पूर्ण होणार नाहीं, असें इन्द्राला कळून आलें.

**स समित्पाणिः पुनरेयाय तꣳ ह प्रजापतिरुवाच मघवन्यच्छान्तहृदयः प्राव्राजीः किमिच्छन्पुनरागम इति स होवाच तद्यद्यपीदं भगवः शरीरमन्धं भवत्यनन्धः स भवति यदि स्राममस्रामो नैवैषोऽस्य दोषेण दुष्यति ॥ ३ ॥**

**सः समित्पाणिः पुनः एयाय । प्रजापतिः तम् उवाच ह । मघवन् यत् शान्तहृदयः प्राव्राजीः किम् इच्छन् पुनः आगमः इति । सः उवाच ह । भगवः यदि अपि तत् इदम् शरीरम् अन्धम् सः अनन्धः भवति । यदि स्रामम् सः अस्रामः भवति । अस्य दोषेण एषः न एव दुष्यति ।**

इन्द्र समिधा हातांत घेऊन पुनः परत आला. तेव्हां प्रजापति त्याला म्हणाला, इन्द्रा तूं शांत मनानें गेला होतास तो पुनः कां आलास? इन्द्र म्हणाला कीं, भगवन्! जरी तें हें स्थूल शरीर अन्ध असलें तरी हा स्वप्नांतील आत्मा अन्ध नसतो. जरी तें शरीर स्रामयुक्त–स्रावयुक्त असलें तरी, तो ( स्वप्नांतील आत्मा ) स्रावयुक्त होत नाहीं म्हणजे या स्थूल शरीराच्या दोषानें हा स्वप्नांतील आत्मा दोषयुक्त होत नाहीं.

**न वधेनास्य हन्यते नास्य स्रामेण स्रामो घ्नन्ति त्वेवैनं विच्छादयन्तीवाप्रियवेत्तेव भवत्यपि रोदितीव नाहमत्र भोग्यं पश्यामीत्येवमेवैष मघवन्निति होवाचैनं त्वेव ते भूयोऽनुव्याख्यास्यामि वसापराणि द्वात्रिꣳशतं वर्षाणीति स हापराणि द्वात्रिꣳशतं वर्षाण्युवास तस्मै होवाच ॥ ४ ॥**

**अस्य वधेन ( सः ) न हन्यते । अस्य स्रामेण न स्रामः ( भवति )। एनम् तु घ्नन्ति एव विच्छादयन्ति इव। ( सः ) अप्रियवेत्ता इव भवति रोदिति इव । अपि अहम् अत्र भोग्यम् न पश्यामि इति। मघवन् एषः एवम् एव इति उवाच ह। एतम् तु एव भूयः अनुव्याख्यास्यामि। अपराणि द्वात्रिंशतम् वर्षाणि वस। सः अपराणि द्वात्रिंशतम् वर्षाणि उवास । तस्मै उवाच ह।**

या स्थूल देहाच्या वधानें हा आत्मा वधिला जात नाहीं. त्याच्या स्रावादि दोषानें तो स्रावयुक्त होत नाहीं. परंतु स्वप्नजन्य श्रम याला जणूं काय मारतात, जणूं काय आच्छादन करितात. तो ( स्वप्नस्थ आत्मा ) दुःखी होतो, किंबहुना रुदन करितो. म्हणून, ( आत्मतत्त्वाच्या दृष्टीनें ) स्वाप्नदेहामध्यें मला ग्राह्यांश दिसत नाहीं, असें इन्द्र म्हणाला. प्रजापति म्हणाला, हें इन्द्रा!

हा स्वप्नांतील आत्मा तू म्हणतोस असाच आहे. या आत्मतत्त्वाचें मी पुनः स्पष्टीकरण करितों. आणखी ३२ वर्षें रहा. नंतर तो इन्द्र पुनः ३२ वर्षें राहिला.

स्वाप्नदेहाचा विचार करितांना इन्द्राला त्यांतील दोष आढळून आले. स्वप्नस्थितींतील हा आत्मा—लिंगदेह दुःखी व भ्रांत होत असल्यामुळें, तो अमृत ब्रह्मस्वरूप नाहीं, म्हणून त्यांत मला ग्राह्यांश दिसत नाहीं, असें इन्द्रानें पुनः प्रजापतिकडे येऊन सांगितल्यावर, त्यानें पुनः ३२ वर्षें ब्रह्म-चर्यानें राहण्यास इन्द्राला आज्ञा केली. ती मान्य करून ब्रह्मचर्यव्रतानें इन्द्र प्रजापतीजवळ राहिला. नंतर प्रजापतीनें त्याला आत्मतत्त्वाचा आणखी उपदेश करण्यास प्रारंभ केला, असें चवथ्या मंत्राच्या शेवटीं सांगितलें आहे व येथेंच हें १० वें खण्ड समाप्त झालें आहे.

## अथैकादशः खण्डः ।

**तद्यत्रैतत्सुप्तः समस्तः संप्रसन्नः स्वप्नं न विजानात्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति स ह शान्तहृदयः प्रवव्राज स हाप्राप्यैव देवानेतद्भयं ददर्श नाह खल्वयमेवꣳ संप्रत्यात्मानं जानात्ययमहमस्मीति नो एवेमानि भूतानि विनाशमेवापीतो भवति नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥ १ ॥**

तत् एतत् । यत्र सुप्तः समस्तः संप्रसन्नः स्वप्नम् न विजानाति एषः आत्मा एतत् अमृतम् अभयम् एतत् ब्रह्म इति उवाच ह । सः शान्त-हृदयः प्रवव्राज ह । सः देवान् अप्राप्य एव एतत् भयम् ददर्श । सम्प्रति अहम् अस्मि एवम् अयम् आत्मानम् खलु न अह जानाति । इमानि भूतानि न एव । विनाशम् अपीतः भवति । अत्र अहम् भोग्यम् न पश्यामि इति ।

तें हें असें ( आहे ). जेव्हां प्राणी सुषुप्ति अवस्थेमध्यें जातो तेव्हां प्रसन्न असा होऊन राहतो. तो स्वप्न जाणत नाहीं. तोच आत्मा, तेंच अभय व अमृतस्वरूप होय, असें प्रजापति म्हणाला.

तो इन्द्र शान्तचित्त होऊन निघाला. तो देवांकडे जाण्याच्या अगोदरच त्याला ही भीतिजनक शंका उत्पन्न झाली कीं, या सुषुप्तिकालीं हा ( झोंपेचा अनुभव घेणारा ) मी आहे, अशा-प्रकारें हा स्वतःला जाणत नाहीं. त्याचप्रमाणें हीं भूतें तो जाणत नाहीं. तो नाशालाच प्राप्त झालेला असतो. म्हणून या आत्मज्ञानामध्यें मला ग्राह्य असें कांहींच वाटत नाहीं.

प्रस्तुत मंत्रांत प्रजापतीनें सुषुप्तावस्थेंतील आत्मस्वरूपाचें वर्णन करून तोच आत्मा होय असें इन्द्राला सांगितलें. प्रजापतीच्या या उपदेशाचा इन्द्र जेव्हां विचार करूं लागला तेव्हां त्याला पुनः शंका आली. ती अशीः— गाढ सुषुप्तींत मी हा प्रत्यय देखील असतो असें वाटत नाहीं. मग इतरांची कथा काय ! म्हणून या अवस्थेंत आत्मा नाश पावतो. अभावस्वरूप होणाऱ्या आत्म्याला अमृत किंवा ब्रह्मस्वरूप तरी कसें म्हणावयाचें ? अर्थात् या सुषुप्तावस्थेंतील आत्मस्वरूपांत देखील मला कांहीं ग्राह्यांश वाटत नाहीं.

**स समित्पाणिः पुनरेयाय तँ ह प्रजापतिरुवाच मघवन्य-च्छान्तहृदयः प्राव्राजीः किमिच्छन्पुनरागम इति स होवाच नाह खल्वयं भगव एवँ संप्रत्यात्मानं जानात्ययमहमस्मीति नो एवेमानि भूतानि विनाशमेवापीतो भवति नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥ २ ॥**

**सः समित्पाणिः पुनः एयाय । प्रजापतिः तम् उवाच ह । मघवन् यत् शान्तहृदयः प्राव्राजीः किम् इच्छन् पुनः आगमः इति । सः उवाच ह । भगवः अयम् संप्रति आत्मानम् अहम् अस्मि एवम् खलु न जानाति अह । इमानि भूतानि नो एव जानाति । विनाशम् एव अपीतः भवति । अहम् अत्र भोग्यम् न पश्यामि इति ।**

समित्पाणी होऊन तो इन्द्र प्रजापतीकडे परत आला. हे इन्द्रा! तूं शांत मनानें गेला होतास तो कोणत्या इच्छेनें पुनः परत

आलास, असें प्रजापति त्याला म्हणाला. तो इन्द्र म्हणाला कीं, भगवन् हा आत्मा या सुषुप्तावस्थेंत स्वतःला मी असें जाणत नाहीं. त्याप्रमाणेंच या भूतांना देखील तो जाणत नाहीं. (म्हणून) तो नाशालाच पावतो. मला यांत ग्राह्यांश दिसत नाहीं.

इन्द्रानें प्रजापतीकडे जाऊन पूर्वीप्रमाणेंच आपली शंका निवेदन केली.

**एवमेवैष मघवन्निति होवाचैतं त्वेव ते भूयोऽनुव्याख्यास्यामि नो एवान्यत्रैतस्माद्वसापराणि पञ्च वर्षाणीति स हापराणि पञ्च वर्षाण्युवास तान्येकशतँ संपेदुरेतत्तद्यदाहुरेकशतँ ह वै वर्षाणि मघवान्प्रजापतौ ब्रह्मचर्यमुवास तस्मै होवाच ॥ ३ ॥**

**(सः) उवाच ह। मघवन् एषः एवम् एव इति। एतम् तु एव ते भूयः अनुव्याख्यास्यामि। एतस्मात् अन्यत्र नो एव। अपराणि पञ्च वर्षाणि वस। सः अपराणि पञ्च वर्षाणि उवास ह। तानि एकशतम् संपेदुः। तत् एतत् आहुः यत् एकशतम् वर्षाणि वै मघवान् प्रजापतौ ब्रह्मचर्यम् उवास ह। तस्मै उवाच ह।**

तो प्रजापति म्हणाला, इंद्रा! हा आत्मा असाच आहे. या आत्म्याचेंच तुला पुनः व्याख्यान करून सांगतों. या स्वरूपाहून दुसरीकडे आत्मतत्त्व शोधितां यावयाचें नाहीं. आणखी पांच वर्षें रहा. तो आणखी पांच वर्षें राहिला. तीं एकंदर १०१ वर्षें झालीं म्हणून ह्याविषयीं असें म्हणतात कीं, " इंद्र एकशेंएक वर्षें प्रजापतीकडे ब्रह्मचर्यानें राहिला होता. " त्याला प्रजापति म्हणाला.

इन्द्राची जिज्ञासा पाहून प्रजापतीनें ज्ञानोपदेश पूर्ण करण्याचें ठरविलें. इन्द्राची शंका मान्य करून, मी तुला पुनः उपदेश करितों, पण आणखी पांच वर्षें येथें राहिलें पाहिजे, असें प्रजापतीनें इन्द्राला सांगितलें. 'नो एवान्यत्रैतस्मात्' या वाक्याचें तात्पर्य असें कीं, सर्वत्र आत्मतत्त्व भरून राहिलें असलें तरी देखील, गाढ झोंपेमध्यें जीवात्मा ज्या संप्रसाद स्थितींत

प्राप्त होतो तेंच आत्मतत्त्व संशोधनाला महत्त्वाचें स्थान आहे. यावांचून इतर ठिकाणीं इतक्या सुलभ रीतीनें आत्मतत्त्वाचें संशोधन करितां याव-याचें नाहीं. इन्द्र पांच वर्षें प्रजापतीजवळ राहिल्यावर प्रजापतीनें त्याला उपदेश करण्यास प्रारंभ केला. इन्द्राचीं एकंदर प्रजापतीकडे राहण्याचीं वर्षें १०१ होतात. इन्द्र १०१ वर्षें प्रजापतीकडे राहिला होता, ही कल्पना छान्दोग्यकर्त्यांनीं अत्यंत प्राचीन म्हणून दिली आहे. त्यावरून ती ऐतिहासिकदृष्ट्या बरीच अर्थपूर्ण असावी असें वाटतें. उत्तरध्रुववादां-तील १०१ काळोख्या रात्रीं हा एक वर्षाचा विशिष्ट भाग समजला जात होता; व त्यावरूनच शतरात्रादिकांचीं अनुष्ठानें ( याग ) सुरू झालीं ती कल्पनाच उपनिषद्कारांनीं तत्त्वज्ञानास जुळवून घेतली असावी असा तर्क करण्यास हरकत नाहीं. इन्द्र म्हणजे सूर्य १०० दिवस नाहींसा झाला होता तो प्रजापतीकडे ब्रह्मविद्येचें अध्ययन करावयास गेला होता, अशी उपनिषदकारांनीं या अंधकाराच्या शतरात्रींची उपपत्ति लाविली असल्यास त्यांत फारसें आश्चर्य नाहीं.

## अथ द्वादशः खण्डः ।

**मघवन्मर्त्यं वा इदꣳ शरीरमात्तं मृत्युना तदस्यामृतस्याशरीर-स्यात्मनोऽधिष्ठानमात्तो वै सशरीरः प्रियाप्रियाभ्यां न वै सशरी-रस्य सतः प्रियाप्रिययोरपहतिरस्त्यशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः ॥ १ ॥**

**मघवन् इदम् मर्त्यम् शरीरम् वै मृत्युना आत्तम् । तत् अस्य अमृतस्य अशरीरस्य आत्मनः अधिष्ठानम् । सशरीरः प्रियाप्रियाभ्याम् आत्तः । सशरी-रस्य सतः प्रियाप्रिययोः अपहतिः न वै अस्ति । अशरीरम् सन्तम् वाव प्रिया-प्रिये न स्पृशतः ।**

हे इन्द्रा ! हें मर्त्य शरीर मृत्यूनें ग्रासलेलें आहे. परंतु हें मर्त्य शरीर अविनाशी व अशरीरी आत्म्याचें अधिष्ठान आहे. तो ( आत्मा ) शरीरयुक्त असेपर्यंत प्रिय व अप्रिय यांनीं युक्त असतो.

**शरीरयुक्त अशा त्याचें प्रिय व अप्रिय यांचा विनाश असतच नाहीं. ( परंतु ) ज्याचा शरीराशीं संबंध असत नाहीं त्याला प्रिय व अप्रिय यांचा स्पर्श होत नाहीं.**

इन्द्रानें सुषुप्तावस्थेंतील आत्मस्वरूपाबद्दल शंका विचारली होती. कोणत्याही प्रकारचें ज्ञान या अवस्थेंत आत्म्याला असत नाहीं, म्हणून तो विनाश पावतो असें कां म्हणूं नये, असें इन्द्राचें म्हणणें होतें. इन्द्राच्या या शंकेचा उलगडा प्रजापतीनें या खंडांत केला आहे. या मंत्रांत आत्म्याचा शरीराशीं संबंध असणें किंवा नसणें या अर्थानेंच सशरीर व अशरीर हीं पदें आलीं आहेत. शरीर हें नाशिवंत असून केव्हांतरी तें मृत्युवश व्हावयाचेंच आहे, हें जरी खरें असलें तथापि, तेंच आत्म्याचें अधिष्ठान आहे. या शरीराशीं आत्म्याचा संबंध असतो तेव्हाच तो उपभोक्ता होतो. शरीराशीं आत्म्याचा संबंध असेपर्यंत त्याचे प्रियाप्रिय हे धर्म कायमच असतात. भोक्तृत्व, प्रिय, अप्रिय इत्यादि धर्म शरीरसंयोगानेंच उत्पन्न होणारे आहेत. प्रिय व अप्रिय या शब्दांचे आवड नावड असे अर्थ आहेत; सुख दुःख हे त्यांचे परिणाम आहेत. प्रिय व अप्रिय या शब्दांच्या ऐवजीं राग व द्वेष हे शब्द गीतेंत आले आहेत. या प्रियाप्रियांचा मुख्यत्वेंकरून इंद्रियांशींच संबंध येतो. त्यांचा धर्माधर्माशीं संबंध जोडण्याचें कांहींच कारण नाहीं. सुषुप्तावस्थेंत जीवात्मा मूळ स्वरूपांत जातो, तेव्हां अंतःकरण देखील जीवात्म्याबरोबर त्याच स्थितींत असतें. आत्मा व शरीर यांचा संबंध जोडणारा अंतःकरण हा मधला दुवा आहे. हें अंतःकरण प्रसुप्त झाल्यामुळें आत्म्याचा शरीराशीं संबंध तेवढ्या अवस्थेपुरता सुटतो; म्हणून शरीराबरोबर असलेले प्रियाप्रिय हे धर्म देखील त्याला स्पर्श करूं शकत नाहींत. ब्रह्मज्ञानाच्या योगानें आत्म्याचें शुद्ध स्वरूप ज्याला समजलें तो ज्ञानी मनुष्य या प्रियाप्रिय स्पर्शांनीं व्यथित किंवा विकारवश होत नाहीं. विकारवश होण्याला प्रियाप्रियांचे स्पर्शच कारणीभूत असतात. हे विकार जेथें उत्पन्न

होत नाहींत तेथें प्रियाप्रियांचा स्पर्शच नसतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. गाढ झोपेच्या संप्रसादस्थितींत आत्मा असतांना त्याला या प्रियाप्रियांचा संबंध घडत नाहीं. कारण तो संबंध शरीरद्वारां घडावयाचा असतो आणि या वेळीं आत्म्याचा संबंध शरीराशीं प्रत्यक्ष नसतो. कार्याच्या अभावावरून कारणाचा अभाव ठरविणें तर्कशास्त्रदृष्ट्या चुकीचें आहे. म्हणून सुषुप्ताव-स्थेंत प्रियाप्रियज्ञान होत नसल्यामुळें आत्म्याचें अस्तित्वच नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं. या स्थितींत आत्मा असतो पण तो आपल्या मूळच्या स्वरू-पांत असल्यानें अशरीर म्हणजे शरीरसंबंधरहित असतो.

**अशरीरो वायुरभ्रं विद्युत्स्तनयित्नुरशरीराण्येतानि तद्यथैतान्य मुष्मादाकाशात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभि-निष्पद्यन्ते ॥ २ ॥**

**तत् वायुः अशरीरः । अभ्रम् विद्युत् स्तनयित्नुः एतानि अशरीराणि । यथ एतानि अमुष्मात् आकाशात् समुत्थाय परम् ज्योतिः उपसंपद्य स्वेन रूपेण अभिनिष्पद्यन्ते ।**

त्याविषयीं दृष्टांत—वायु शरीररहित आहे. ढग विद्युत् व गर्जनायुक्त मेघ हेही शरीररहित आहेत. ज्याप्रमाणें हे ( सूर्याच्या ) परम तेजाशीं संयुक्त होऊन या आकाशापासून उत्पन्न होऊन आपआपल्या रूपानें प्रगट होतात.

दुसऱ्या मंत्रांत वायु इत्यादिकांचा दृष्टांत दिला आहे. प्राणिमात्रांना दृग्गोचर होणारा सूर्य ही एक प्रचंड तेजःशक्ति आहे तथापि त्या सूर्या-च्याही मागें सूर्यापेक्षां असंख्य पटीनें प्रचंड असें एक महत्तेज आहे. तोच द्युलोक, किंवा तें महत्तेज या द्युलोकामध्यें असतें असें वैदिक ऋषींचें मत आहे. या प्रचंड तेजःशक्तीच्या प्रेरणेनेंच आकाशांतून वाय्वादिकांची उत्पत्ति होते. सर्व सृष्ट पदार्थांचें आदिकारण जें दिव्य आप तेंच येथें आकाश शब्दानें विवक्षित आहे. द्युलोकांतील महत्तेज व आकाश यांच्या संयोगाला

इतरही सहकारी कारणें असतात. त्या सर्वांच्या सामुदायिक क्रियेनेंच विद्युत्, बाष्प, मेघ, वायु, इत्यादिकांची उत्पत्ति होते; व त्या पदार्थांचा लय त्यांच्या मूळ कारणांत म्हणजे आकाशांतच होतो. या विषयाचें विशेष स्पष्टीकरण पूर्वी पंचाग्निविद्येच्या विवेचनांत झालें आहे तें अवश्य पहावें.

**एवमेवैष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते स उत्तमपुरुषः स तत्र पर्येति जक्षन्क्रीडन्रममाणः स्त्रीभिर्वा यानैर्वा ज्ञातिभिर्वा नोपजनꣳ स्मरन्निदꣳ शरीरꣳ स यथा प्रयोग्य आचरणे युक्त एवमेवायमस्मिञ्छरीरे प्राणो युक्तः ॥ ३ ॥**

एवम् एव एषः संप्रसादः अस्मात् शरीरात् समुत्थाय परम् ज्योतिः उपसंपद्य स्वेन रूपेण अभिनिष्पद्यते । सः उत्तमपुरुषः । सः इदम् उपजनम् शरीरम् न स्मरन् स्त्रीभिः रममाणः वा ज्ञातिभिः वा यानैः वा क्रीडन् जक्षन् तत्र पर्येति । सः यथा प्रयोग्यः आचरणे युक्तः एवम् एव अयम् प्राणः अस्मिन् शरीरे युक्तः ।

त्याप्रमाणें हा संप्रसादस्थितींत सुषुप्तावस्थेंत असलेला आत्मा या शरीरांतून उठून परम तेजःस्वरूपाला प्राप्त होऊन आपल्या मूळ रूपांत लीन होतो. तो उत्तम पुरुष होय. तो ह्या उत्पन्न झालेल्या ( स्थूल ) शरीराचें भान नसतांना, स्त्रिया वाहनें किंवा आप्तेष्ट यांच्यासह क्रीडा करणारा किंवा भक्षणादि व्यवहार करणारा संचार करितो. ज्याप्रमाणें कोणत्याही कार्यामध्यें प्रयोज्य ह्मणजे हाताखालील सहकारी नेमलेला असतो त्याप्रमाणेंच हा प्राण या शरीरामध्यें आत्म्यानें नेमलेला म्हणून कार्यकारी असतो.

तिसऱ्या मंत्रांत वरील दृष्टान्ताप्रमाणेंच संप्रसाद स्थितीचें वर्णन करण्यांत आलें आहे. मूळ आत्मतत्त्वापासूनच जीवात्म्याचें स्वरूप व्यक्त झालेलें

असतें. गाढ सुषुप्तीचे वेळीं हा जीव उदानाच्या तेजोरूप सामर्थ्याशीं संलग्न होऊन आपल्या मूळस्वरूपांत लीन होतो. ब्रह्मांडांतील तेजाप्रमाणें पिंडांतील उदान हा तेजोरूप आहे. म्हणून या मंत्रांतील ' परं ज्योतिः ' या पदानें विद्युत्–उदान हाच अर्थ ग्रहण करावयास पाहिजे. या संप्रसाद· स्थितीस जातांना जीवात्म्याचा स्थूल शरीराशीं संबंध रहात नाहीं. ( त्याला स्थूल शरीराचें स्मरण नसतें). त्या वेळीं प्राण हा जीवात्म्याच्या हाताखालचा अधिकारी म्हणून, या शरीराची सर्व व्यवस्था ठेवीत असतो. प्राणाच्या या कार्याचें सविस्तर विवेचन प्रश्नोपनिषदांत आलें आहे. ( उ. नि. र. प्र. प्रश्न. ४ मंत्र ४ पृ. ६८–७२; आणि बृहदारण्यक अ. ४ ब्रा. ३ मं. १२ पृ. ४९८ ). पूर्वीच्या मंत्रांतील ' अभिनिष्पद्यते ' या क्रियापदाचे उत्पन्न होणें व्यक्त होणें व लय पावणें असे दोन्ही अर्थ घेऊन श्रुतीनें दृष्टान्ताची योजना केली आहे. कार्यरूप पदार्थांचा लय त्यांच्या कारणरूपांतच होत असल्यामुळें ही योजना योग्य व सयुक्तिक आहे असें ठरतें.

**अथ यत्रैतदाकाशमनुविषण्ण चक्षुः स चाक्षुषः पुरुषो दर्शनाय चक्षुरथ योवेदेदं जिघ्राणीति स आत्मा गन्धाय घ्राणमथ यो वेदेदमभिव्याहराणीति स आत्माभिव्याहाराय वागथ यो वेदेद॑ शृणवानीति स आत्मा श्रवणाय श्रोत्रम् ॥ ४ ॥**

**अथ यत्र एतत् चक्षुः आकाशम् अनुविषण्णम् सः चाक्षुषः पुरुषः । दर्शनाय चक्षुः। अथ यः इदम् जिघ्राणि इति वेद सः आत्मा । गन्धाय घ्राणम् । अथ यः इदम् अभिव्याहराणि इति वेद सः आत्मा अभिव्याहाराय वाक् । अथ यः इदम् शृणवानि इति वेद सः आत्मा । श्रवणाय श्रोत्रम् ।**

आतां जें हें चक्षुरिंद्रिय आहे तें आकाशांत समाविष्ट आहे. या चक्षुरिंद्रियाच्या ठिकाणीं असणारा अंशरूप आत्मा हा चाक्षुष पुरुष होय; आणि अवलोकनक्रियेला उपयोगीं पडणारें तें चक्षुरिंद्रिय होय. आतां जो मी वास घेत आहे असें समजतो तो

**आत्मा होय; आणि गंधग्रहण करण्याच्या क्रियेला उपयोगीं पडणारें तें घ्राणेंद्रिय होय. आतां मी हें बोलतों असें जो जाणतो तो आत्मा; व बोलण्याच्या क्रियेला उपयोगीं पडणारें तें वागिंद्रिय होय. जो मी ऐकतों असें समजतो तो आत्मा; आणि श्रवणाला उपयोगीं पडणारें जें इन्द्रिय तें कर्णेंद्रिय होय.**

प्रस्तुत मंत्रांतील क्रियापदें विध्यर्थी ( लोटाचीं ) आहेत. त्यांचा संकेतार्थ केल्यास पुढीलप्रमाणें होतो. आत्म्याला अवलोकनाची इच्छा झाली, तेव्हां चक्षुरिंद्रिय व्यक्त झालें. मीं वास घ्यावा असें आत्म्याला वाटलें तेव्हां घ्राणेंद्रिय प्रगट झालें. बोलावें असें वाटल्याबरोबर वागिंद्रियाची क्रिया सुरू झाली; आणि श्रवणाची इच्छा उत्पन्न झाल्याबरोबर कर्णेंद्रिय उत्पन्न झालें. हा अर्थ देखील शास्त्रशुद्ध व सयुक्तिकच ठरतो. तथापि, प्राणिशरीरांत इंद्रियें उत्पन्न झाली, तीं केवळ जीवात्म्याच्या इच्छेनेंच झालीं नसून, बाह्य पंचमहाभूतांचे व्यापार देखील त्यांच्या उत्पत्तीस कारणीभूत झाले आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. इन्द्रियें निर्माण होण्यास जीवात्म्याची इच्छा व बाह्यसृष्टीचा व्यापार हीं दोन्हीं कारणें आहेत. केवळ निसर्गाचा व्यापार किंवा केवळ जीवात्म्याची इच्छा हें एकच कारण नाहीं. बाह्य विषयांच्या किरणांच्या आघातांना जीवात्म्याच्या इच्छेचें सहकार्य झाल्यावर तीं तीं इन्द्रियें उत्पन्न झालीं. जीवात्म्याची इच्छा इन्द्रियांच्या उत्पत्तीला कारणीभूत होत असल्यानें त्या इंन्द्रियांचें चालकत्व जीवात्म्याकडे येणें साहजिकच ठरतें. इन्द्रियांच्या उत्पत्तीचा हा विषय कठोपनिषदांत आला आहे. ( उ. नि. र. प्र. कठ. २-१-१ पृ. १२६--१२८ ). कठश्रुतीनें निसर्गाच्या व्यापाराचें महत्त्व दर्शविलें आहे; आणि छान्दोग्यश्रुतीनें इंन्द्रियांच्या उत्पत्तीला जीवात्म्याची इच्छा कारणीभूत आहे, असें दर्शविलें आहे. या दोन्ही कारणविवेचनांत एक गौण व दुसरें मुख्य असा अभिप्राय आहे; तथापि कारण या नात्यानें त्यांची एकवाक्यता होण्यास मुळींच अडचण येणार नाहीं.

**अथ यो वेदेदं मन्वानीति स आत्मा मनोऽस्य दैवं चक्षुः स वा एष एतेन दैवेन चक्षुषा मनसैतान्कामान्पश्यन्रमते य एते ब्रह्मलोके ॥ ५ ॥**

**अथ यः इदम् मन्वानि इति वेद सः आत्मा । अस्य मनः दैवम् चक्षुः । सः एषः एतेन दैवेन चक्षुषा मनसा वै ये एते ब्रह्मलोके एतान् कामान् पश्यन् रमते ।**

आतां जो हें मी समजतों असें जाणतो तो आत्मा होय. अन्तःकरण ही त्याची दैवी दृष्टि होय. तो आत्मा या दैवी दृष्टीनें जे हे (विषय) ब्रह्मलोकांत आहेत त्या विषयांना पहात रममाण होतो.

प्रस्तुत मंत्रांत मनाचें—अंतःकरणाचें वर्णन केलें आहे. विचार करणें, इच्छा करणें इत्यादि धर्म अंतःकरणाचे आहेत. इतर इन्द्रियांप्रमाणेंच अंतःकरणाचा देखील आत्मा हा प्रेरक किंवा चालक आहे. इन्द्रियांपेक्षां अंतःकरण श्रेष्ठ आहे, म्हणून त्याला दैवी चक्षु असें या मंत्रांत म्हटलें आहे. बाह्य चक्षु निर्दोष व सतेज असणें जसें अत्यंत अवश्य आहे तसेंच अंतःकरण देखील अत्यंत शुद्ध व सतेज असावयास पाहिजे. अंतःकरण नितान्त शुद्ध झाल्यानें जीवात्म्याला आपले ऐहिक व पारमार्थिक सर्व व्यवहार बिनचूक करितां येतात. सदसद्विवेकशक्ति शुद्ध व पूर्ण जागृत असली म्हणजे जीवाचे हातून कोणतेंही पापाचरण घडत नाही. त्याचें प्रत्येक कर्म पुण्यमयच होतें. म्हणून अशा शुद्ध अंतःकरणाच्या साहाय्यानें जीवात्म्याला अमृतत्व म्हणजे अभ्युदय व निःश्रेयस संपादन करितां येतें.

**तं वा एतं देवा आत्मानमुपासते तस्मात्तेषाꣳ सर्वे च लोका आत्ताः सर्वे च कामाः स सर्वाꣳश्च लोकानाप्नोति सर्वाꣳश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ह प्रजापतिरुवाच प्रजापतिरुवाच ॥ ६ ॥**

**देवाः तम् वै एतम् आत्मानम् उपासते । तस्मात् तेषाम् सर्वे लोकाः च सर्वे कामाः च आत्ताः । यः तम् आत्मानम् अनुविद्य विजानाति सः सर्वान् लोकान् च सर्वान् कामान् च आप्नोति । इति प्रजापतिः उवाच ह ।**

देव त्या आत्म्याचीच उपासना करितात. त्या उपासनेच्या योगानें त्यांना सर्व लोक व सर्व मनोरथ प्राप्त झालेले असतात. जो त्या आत्म्याला समजून घेऊन विशेष प्रकारें जाणतो म्हणजे त्याचा साक्षात्कार संपादन करितो तो सर्व लोक व सर्व मनोरथ पावतो. म्हणजे त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात, असें प्रजापति म्हणाला. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

इन्द्रियांसह मनाचा चालक आत्माच आहे. म्हणजे तोच एक मानवी जीविताचा मुख्य सूत्रचालक होय. म्हणून त्या आत्म्याचीच उपासना करणें अवश्य आहे. देवांना देखील या आत्मोपासनेच्या योगानेंच देवत्व प्राप्त झालें आहे. इन्द्रियनिग्रहपूर्वक अंतःकरण पवित्र करणें व त्यांतील दैवीसंपत्तीचें, ज्ञानविज्ञान सदाचरण इत्यादिकांनीं संवर्धन करणें हीच आत्म्याची उपासना होय. या उपासनेच्या योगानें मनुष्याचा देव म्हणजे नराचा नारायण होतो, असें प्रजापतीनें इन्द्राला सांगितलें.

## अथ त्रयोदशः खण्डः ।

**श्यामाच्छबलं प्रपद्ये शबलाच्छ्यामं प्रपद्येऽश्व इव रोमाणि विधूय पापं चन्द्र इव राहोर्मुखात्प्रमुच्य धूत्वा शरीरमकृतं कृतात्मा ब्रह्मलोकमभिसंभवामीत्यभिसंभवामीति ॥ १ ॥**

**श्यामात् शबलम् शबलात् श्यामम् प्रपद्ये । अश्वः रोमाणि (विधूय) इव चन्द्रः राहोः मुखात् प्रमुच्य इव पापम् विधूय शरीरम् धूत्वा कृतात्मा अकृतम् ब्रह्मलोकम् अभिसंभवामि इति ।**

गाढ अज्ञान अवस्थेंतून ( मनुष्येतर योनींतून ) ज्ञान व अज्ञान यांच्या मिश्र अवस्थेंत ( मनुष्य योनींत ), त्याचप्रमाणें

मिश्र स्थितींतून गाढ अज्ञानांत, ( याप्रमाणें आजपर्यंत ) मी फिरत राहिलों आहे. ( आतां यापुढें ) घोडा ज्याप्रमाणें आपलें केस झाडून ( मळांतून मुक्त होतो ), किंवा चंद्र जसा राहु-मुखांतून म्हणजे ग्रहणांतून मुक्त होतो, त्याप्रमाणें पापाचा त्याग केल्यावर व शरीर शुद्ध केल्यावर शुद्धात्मा: ( बुद्धियोगसंपन्न ) असा मी क्रियारहित अशा ब्रह्मस्वरूपामध्यें मिळून जाईन. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

मागील मंत्रांत आत्मोपासना सांगितली असून त्या आत्मोपासनेची प्रवृत्ति ज्यामुळें उत्पन्न होतें तें ध्येय या मंत्रांत स्पष्ट केलें आहे. असाच ध्येयनिर्देश गीताशास्त्रात आला आहे ( गी. र. दी. अ. १५ श्लो. ४ पृष्ठ ३४१-३४२ ). आत्मोपासनेच्या योगानें मनुष्यानें आपलें अंतःकरण निर्मल करावें असें मागील मंत्रांत सांगितलें आहे. त्याप्रमाणें अंतःकरणाचा मळ म्हणजे पाप पूर्णपणें नष्ट झाल्यावर बुद्धीचें जें शुद्ध स्वरूप प्रगट होतें त्याला ग्रहण सुटलेल्या चन्द्राची उपमा दिली आहे ती फारच हृदयंगम आहे. ' शरीरं धूत्वा ' अशीं पदें या मंत्रांत आलीं आहेत, त्यांचा अर्थ शरीर शुद्ध करून असा वर दिला आहे. शरीर शुद्ध करणें म्हणजे सर्व शारीरिक दोष नष्ट करणें असा समजावा; किंवा ' धूञ् कम्पने ' या पाणिनीय अर्थाप्रमाणें शरीर त्यागानंतर, असाही अर्थ होईल. निष्क्रिय अशा अर्थानें अकृत हें ब्रह्माचें विशेषण आलें आहे. कर्म उपासना व ज्ञान यांच्या योगानें सर्व पातकें नष्ट करून म्हणजे शुद्ध होऊन मी शरीरत्यागानंतर पूर्ण ब्रह्मस्वरूप होईन, अशी ध्येयनिष्ठा असावयास पाहिजे, तरच मनुष्याचे हातून आत्मोपासना घडेल, असा या मंत्राचा अभिप्राय आहे. हें एकाच मंत्राचें खंड आहे.

---

## अथ चतुर्दशः खण्डः ।

**अकाशो वै नाम नामरूपयोर्निर्वहिता ते यदन्तरा तद्ब्रह्म तदमृतꣳ स आत्मा प्रजापतेः सभां वेश्म प्रपद्ये यशोऽहं भवामि ब्राह्मणानां यशो राज्ञां यशो विशां यशोऽहमनुप्रापत्सि स हाहं यशसां यशः श्येतमदत्कमदत्कꣳ श्येतं लिन्दु माभिगां लिन्दु माभिगाम् ॥ १ ॥**

आकाशः वै नामरूपयोः निर्वहिता नाम । ते यदन्तरा तत् ब्रह्म । तत् अमृतम् । सः आत्मा । प्रजापतेः सभाम् वेश्म प्रपद्ये । अहम् यशः भवामि । ब्राह्मणानाम् यशः राज्ञाम् यशः विशाम् यशः यशसाम् यशः अहम् अनुप्रापत्सि । सः अहम् ह श्येतम् २ अदत्कम् २ लिन्दु मा अभिगाम् ।

आकाश हें खरोखर नामरूपात्मक सर्व सृष्टीचें धारक—निर्वाहक आहे. तीं नामरूपें ( नामरूपात्मक सृष्टि ) ज्यामध्यें समाविष्ट आहे तें ब्रह्म, तें अमृत आणि तोच आत्मा होय. प्रजापतीच्या म्हणजे सगुण परमेश्वराच्या सभेप्रत किंवा निवासस्थानाप्रत अधिष्ठानाप्रत (शुद्धब्रह्मतत्त्वाप्रत) मीं प्राप्त व्हावें. मीं यशोरूप व्हावें, ब्राह्मणांचें यश, क्षत्रियांचें यश, वैश्यांचें यश, किंबहुना सर्व यशांचें यश म्हणजे सर्वोत्तम यश मला प्राप्त व्हावें. असा ( अमृतत्त्वाची इच्छा करणारा ) मी लोहित, तेजोहानिकारक आणि दोषयुक्त जन्माला ( गर्भवासाला ) प्राप्त न व्हावें. ( द्विरुक्ति समाप्तिदर्शक आहे. )

नाम व रूप या दोहोंमध्यें एकंदर कार्यरूप सृष्ट पदार्थांचा अंतर्भाव होतो. गुण व्यक्त झाले कीं नामरूपाला प्रारंभ होतो. म्हणून नामरूप या शब्दयोजनेंत एकंदर कार्यप्रपंच अभिप्रेत आहे असें समजावें. या नामरूपात्मक सृष्टीचें उत्पादक, धारक, पोषक, प्रकाशक इत्यादि सर्व नात्यांनीं ज्या आदितत्त्वाचा निर्देश केला जातो, त्या आदितत्वालाच येथें आकाश असें म्हटलें आहे. आकाश शब्दानें ब्रह्माचा निर्देश अनेक ठिकाणीं आला आहे.

हें आकाशच नामरूपात्मक सृष्टीचें निर्वाहक आहे. 'निर्वहिता' या शब्दांत वर दिलेलीं सर्व नातीं विवक्षित आहेत असें समजावें. पिण्डाचें निर्वाहक या अर्थानेंच या आकाशाला आत्मा हा शब्द लाविला जातो. यालाच श्रीमत् भगवद्गीतेनें क्षेत्रज्ञ असें म्हटलें आहे ( गीता १३-२ ). तसेंच सृष्टीची कल्पना सोडून देऊन सृष्टीचें आदिकारण अशा या आकाशाचा निर्देश करावयाचा झाल्यास तो ब्रह्म या शब्दानें केला जातो. म्हणून ही नामरूपात्मक सृष्टि ज्या तत्त्वाच्या अन्तर्भागांत आहे म्हणजे ज्याच्या एका अंशांमध्यें हीं सर्व अनंत कोटि ब्रह्माण्डें सामावलीं आहेत तेंच ब्रह्म, तेंच अमृत व तोच आत्मा होय.

प्रस्तुत मंत्राच्या उत्तरार्धांत पुनः ध्येयस्वरूपाचा निर्देश केला आहे. या मंत्रांत दर्शविलेलें ध्येयस्वरूप स्पष्ट असून विशेष महत्त्वाचें आहे. ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य यांचा उल्लेख एकंदर समाज किंवा राष्ट्र या अभिप्रायानेंच आला आहे यांत शंका नाहीं. उपनिषद्कालांत सर्वसमाज द्विजमय म्हणजे त्रैवर्णिकांनींच भरलेला होता. शूद्र किंवा निषाद ( अतिशूद्र ) यांची संख्या फारच अल्प होती. ती इतकी कीं, समाजदृष्ट्या त्यांचा उल्लेख करण्याची आवश्यकताच नव्हती. म्हणून या मंत्रांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य म्हणजेच सर्व समाज असें निर्विवाद सिद्ध होतें. समाजाचें-राष्ट्राचें यश मीं व्हावें, असें वाक्य या मंत्रांत आलें आहे. त्याचा अर्थ असा कीं, समाज यशस्वी होईल असेंच कार्य माझ्या हातून घडावें. गीतेच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, माझ्या हातून लोकसंग्रह घडावा; किंबहुना ज्याच्या योगानें समाजाला यशस्वी सन्मार्गाचें वळण लागेल अशा तत्त्वांचा प्रसार माझ्या हातून व्हावा. समाज यशस्वी होणें हा अभ्युदयाचा मुख्य भाग आहे व त्याचा येथें ध्येय-रूपानें निर्देश केला आहे. त्यावरून समाज हेंच अभ्युदयाचें मुख्य क्षेत्र होय असें येथें श्रुतीनें स्पष्ट दर्शविलें आहे. या अभ्युदयाला अनुकूल अशा निःश्रेयसाचा निर्देशही याच मंत्रांत केला आहे. औपनिषद् वाङ्मयांत

परमेश्वर अशा अर्थानें प्रजापति हा शब्द बऱ्याच ठिकाणीं येतो. निदान चार तोंडाचा ब्रह्मदेव अशा अर्थाचा प्रजापति हा शब्द दशोपनिषदांत आढळत नाहीं. म्हणून येथें देखील सगुण परमेश्वर हाच प्रजापति शब्दाचा अर्थ आहे. सभा व वेश्म अशीं दोन पदें या मंत्राच्या उत्तरार्धांत आलीं आहेत त्यांचे अर्थ स्वरूप व अधिष्ठान असे समजावे. मीं परमेश्वराच्या सगुण स्वरूपास प्राप्त व्हावें व तद्द्वारा या सगुण ब्रह्माचें अधिष्ठान जें शुद्ध ब्रह्मतत्त्व तत्स्वरूप व्हावें हा ध्येयांतील निःश्रेयसाचा भाग होय. अभ्युदय हें या ध्येयाचें बहिरंग असून निःश्रेयस हें त्याचें अंतरंग होय. याप्रमाणें जन्ममरणाच्या चक्रांतून मुक्त होऊन अभ्युदय-निःश्रेयसप्राप्ति व्हावी हेंच मानवी जीविताचें अंतिम साध्य होय. प्रत्येक कल्याणेच्छु मनुष्याची दृष्टि या उत्कर्षबिंदूवर अढळ असली पाहिजे असा श्रुतीचा उपदेश आहे.

## अथ पञ्चदशः खण्डः ।

**तद्धैतद्ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः प्रजाभ्य आचार्यकुलाद्वेदमधीत्य यथाविधानं गुरोः कर्मातिशेषेणाभिसमावृत्य कुटुम्बे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानो धार्मिकान्विदधदात्मनि सर्वेन्द्रियाणि संप्रतिष्ठाप्याहिँसन्सर्वभूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः स खल्वेवं वर्तयन्यावदायुषं ब्रह्मलोकमभिसंपद्यते न च पुनरावर्तते न च पुनरावर्तते ॥ १ ॥**

**ॐ आप्यायन्तु ममाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च सर्वाणि । सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणं मेऽस्तु । तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥**

**॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

तत् एतत् ब्रह्मा प्रजापतये प्रजापतिः मनवे मनुः प्रजाभ्यः उवाच ह । आचार्यकुलात् यथाविधानम् वेदम् अधीत्य गुरोः कर्मातिशेषेण अभि-

**समावृत्य शुचौ देशे कुटुम्बे स्वाध्यायम् अधीयानः धार्मिकान् विदधत् आत्मनि सर्वेन्द्रियाणि संप्रतिष्ठाप्य तीर्थेभ्यः अन्यत्र सर्वभूतानि अहिंसन् एवम् यावदायुषम् वर्तयन् सः खलु ब्रह्मलोकम् अभिसम्पद्यते न च पुनः आवर्तते ।**

तें हें ( आत्मज्ञान ) ब्रह्मा प्रजापतीला, प्रजापति मनूला आणि मनु सर्व लोकांना उपदेशिता झाला. गुरुकुलांत शास्त्रोक्त रीतीनें वेदाचें अध्ययन करून, गुरुसंबंधीं कर्तव्य पूर्णपणें समाप्त केल्यानंतर समावर्तन करून–ब्रह्मचर्याश्रम समाप्त करून, शुद्ध प्रदेशांत कुटुंबामध्यें ( कुलामध्यें ) राहून, वेदशास्त्रांचें अध्ययन करीत, धर्माचें आचरण करीत, आत्म्याचे ठिकाणीं सर्व इन्द्रियें स्थापन करून ( पूर्णपणें आत्मसंयमन करून ) योग्य प्रसंगा-खेरीज कोणत्याही प्राण्याची हिंसा न करितां याप्रमाणें सर्व आयुष्यक्रम चालविणारा पुरुष ब्रह्मलोकाला प्राप्त होतो; आणि तेथून तो पुनः जन्ममरणाला प्राप्त होत नाहीं.

मागील मंत्रांत प्रजापति या शब्दाचा सगुण परमेश्वर असा अर्थ केला आहे; परंतु येथें परमेश्वराचा वाचक ब्रह्मा हा शब्द वेगळा आला असल्यामुळें, प्रजांचा अधिपति धर्मप्रवर्तक मुख्य ऋषि असा येथें प्रजापति शब्दाचा अर्थ समजावा. गीतेच्या ४ थ्या अध्यायाच्या प्रारंभीं आलेल्या परंपरेशीं या परं-परेची एकवाक्यता करितां येते, ती अशीः—परमेश्वर, विवस्वान् व मनु अशीं तीन नावें तेथें आहेत; व येथें विवस्वानाच्या ऐवजीं प्रजापति हा शब्द आला आहे. म्हणून प्रजापति या शब्दानें विवस्वान् हा अर्थ घ्यावा, म्हणजे या दोनही परंपरांचा बरोबर मेळ बसतो. इक्ष्वाकूच्या ऐवजीं प्रजा हा मोघम शब्द आला असला तरी तेवढ्यानें या दोन परंपरांत विरोध येतो असें मानण्याचें कारण नाहीं. या मंत्रांत मनुष्याच्या पवित्र अशा जीवनक्रमाची रूपरेषा दिली आहे. या मंत्रांत ज्याचा वर्तनक्रम दर्शविला आहे तो ज्ञानी

पुरुष आहे. अशा शुद्ध चारित्र्याचें मोक्ष हेंच पर्यवसान होय असें श्रुतीनें शेवटीं स्पष्ट सांगितलें आहे. हा मंत्र मायावादी संन्यासमार्गाला सर्वस्वीं नडला आहे. या मंत्राला बाह्य महत्त्व देखील अतिशय आहे. मंत्र या नात्यानें ईशावास्योपनिषदाचें प्रामाण्य जसें सर्वश्रेष्ठ आहे, तसें छान्दोग्य उपनिषद् अत्यंत प्राचीन असल्यामुळें त्याचें प्रामाण्य देखील सर्वांहून अधिक मानलें जातें. त्यांतल्यात्यांत छान्दोग्योपनिषदाचा हा शेवटचा मंत्र असल्यामुळें, तें निर्णयवाक्य किंवा सिद्धान्तवाक्य होय असें ठरतें. या मंत्रांत आलेलें वर्णन संन्याशाला अंशतः जरी अनुकूल असतें तरी गोष्ट निराळी होती. पण हा मंत्र मायावादाला अनुकूल तर नाहींच, उलट तो सर्वस्वी बाधकच आहे. ही आपत्ति टाळण्याकरितां मायावादाची ठराविक कल्पना पुढें करण्यांत आली आहे. ती अशी कीं, या मंत्रांतील वर्णन ब्रह्मवेत्त्याचें नसून अज्ञानी कर्मठ मनुष्याचें आहे. या कोटीनें अनेक स्थळांप्रमाणें या स्थळीं देखील श्रुतीचा विरोधच केला आहे. असल्या श्रुतिविरुद्ध कोटिक्रमाचा आतां विचार करण्याचें प्रयोजनच नाहीं. कारण दशोपनिषदांतील इतर नऊ उपनिषदांप्रमाणें हे छान्दोग्योपनिषद देखील मायावादाच्या किंवा मायावादी कर्मसंन्यासाच्या अगदीं विरुद्ध आहे. म्हणून शेवटच्या मंत्रांत आलेलें छान्दोग्याचें सिद्धांतपर विवेचन मायावादी संन्यासमार्गाला सर्वतोपरि बाधकच आहे हें आतां निराळें सांगावयास नको.

गुरुसंनिध सांगोपांग वेदविद्येचें अध्ययन करून गुरुशुश्रूषादिकांनीं ब्रह्मचर्य आश्रम पूर्ण करावा व आपल्या कुलासह किंवा कुटुंबासह एकाद्या पवित्रस्थळीं रहावें. अभ्यासलेल्या वेदविद्येचें अध्यापन, संशोधन, संवर्धन ( उपबृंहण ) इत्यादिकांनीं वाङ्मययज्ञ करावा. अध्ययनामध्यें अंगांसहित वेदाचा उल्लेख आहे. त्यांतच औपनिषद् विद्येचाहि अंतर्भाव होतो. कारण या मंत्राच्या प्रारंभीं औपनिषद विद्येचीच परंपरा दिली आहे. तिला लागूनच वेदाध्ययनाचा उल्लेख असल्यामुळें त्यांत ब्रह्मविद्येचा अंतर्भाव विवक्षित असला पाहिजे यांत शंका नाहीं. ‘ सर्व इन्द्रियांची आत्म्याचे

ठिकाणीं संस्थापना करून ' असें वाक्य या मंत्रांत आलें आहे. त्यावरून देखील हेंच सिद्ध होतें. पूर्ण आत्मज्ञानावांचून इन्द्रियांची स्थापना आत्म्याचे ठिकाणीं करितां यावयाची नाहीं. तसेंच योग्य कारणांवाचून 'अन्यत्र तीर्थेभ्यः' कोणत्याही प्राण्याची हिंसा करावयाची नाहीं, असा या ज्ञानी पुरुषाचा नियम असतो. ' अहिंसन् सर्वभूतान्यन्यत्रतीर्थेभ्यः ' हें वाक्य कार्याकार्य व्यवस्थितीचें द्योतकच आहे. आत्मज्ञानाशिवाय बुद्धीचें शुद्ध सात्त्विक स्वरूप प्रगट होत नाहीं. त्यावरून देखील या मंत्रात वर्णन केलेला जीवनक्रम ज्ञानी मनुष्याचाच आहे असें निर्विवाद सिद्ध होतें. ज्ञानविज्ञानयुक्त अशी वेदविद्या, पूर्ण आत्मसंयमन, निष्काम कर्तव्याचरण, अहिंसा इत्यादि गुणांनीं युक्त असा आपला जीवनक्रम जो सर्व आयुष्यभर चालवितो तो ब्रह्मपदाला प्राप्त होतो. ' ब्रह्मलोकमभिसंपद्यते ' असें या मंत्राच्या शेवटच्या भागांत म्हटलें आहे, त्यांतील लोक शब्दावर कोटी करून ब्रह्मलोक म्हणजे ब्रह्मस्वरूप नव्हे असे भासविण्याचा प्रयत्न केला जातो परंतु त्याचा देखील कांहींच उपयोग होत नाहीं. कारण ब्रह्मलोक हा शब्द दशोपनिषदांत अनेक ठिकाणीं आला असून, त्याच्या अर्थाचा श्रुतीनेंच खुलासा केला आहे. ' स विश्वकृत् स हि सर्वस्य कर्ता तस्य लोकः स उ लोक एव ' असें बृहदारण्यकांत म्हटलें आहे. ( उ. नि. र. प्र. अ. ४ ब्राह्मण ४ मंत्र १३ पृ. ५४३ ). बृहदारण्यकांत प्रमाणादाखल घेतलेल्या प्राचीन मंत्रांपैकीं हें वाक्य आहे, एवढें सांगितलें म्हणजे त्याच्या प्रामाण्याबद्दल निराळें विवेचन करावयास नको. ब्रह्मस्वरूप या शब्दासारखाच ब्रह्मलोक या शब्दाचा अर्थ समजावा, असें श्रुतीनें वरील वाक्यांत सांगितलें आहे. एवंगुणविशिष्ट ज्ञानी पुरुष स्वतःच्या वर्तनानें जगाला सन्मार्ग दाखवून शेवटीं ब्रह्मस्वरूपांत लीन होतो, त्याला पुनरावृत्ति पुनर्जन्म घडत नाहीं. या शेवटच्या मंत्रांतील सर्व विवेचनावरून छान्दोग्य उपनिषदाचें तात्पर्य कर्मयोगपरच कसें आहे तें कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. याप्रमाणें

अभ्युदयनिःश्रेयसकारक अशा कर्मयोगाचा उपदेश करून श्रुतीनें हें छान्दोग्याचें शेवटचें खंड समाप्त केलें आहे.

---

## आठव्या अध्यायाचा उपसंहार

सातव्या अध्यायांत नारद व सनत्कुमार त्यांचा संवाद आला आहे. त्या संवादांतील विवेचनच या अध्यायांत पुढें चालू केलें असावें असें दिसतें. पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टीचा विचार शुद्ध ब्रह्मतत्त्वापासून सुरू होतो; व क्रमाक्रमानें हा विचार या नामरूपात्मक सृष्टिरूप वृक्षाच्या शेंड्याकडे जाऊन सृष्ट पदार्थांचे बाह्य आकार व त्यांचे व्यावहारिक उपयोग येथपर्यंत येतो. त्यावरून मूळ तत्त्वापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदृष्टीनें हें स्थूल, सूक्ष्म कारण या स्वरूपांत विभागलें जाणारें सर्व जग ब्रह्ममयच आहे असें ठरतें. ही जशी मूळांतून शेंड्याकडे जाणारी ब्रह्मविचाराची रीति आहे, तशीच शेंड्यापासून प्रारंभ करून मूळतत्त्वापर्यंत विचार करीत जावयाचें, ही दुसरी रीति देखील वेदान्तांत प्रसिद्ध आहे. पहिल्या पद्धतींत कारण व कार्य यांच्या अभेदानें, कारणच कार्यरूपानें प्रगट होतें असें सिद्ध होतें. शुद्ध ब्रह्मांतून सगुण ब्रह्म प्रगट झालें, म्हणून सगुण हें कार्यब्रह्म असलें तरी, तें शुद्ध ब्रह्माहून निराळें नाहीं असें ठरतें. हीच तात्त्विक दृष्टि सर्व कार्यप्रपंचाला लागू होते. वर सांगितलेल्या दुसऱ्या पद्धतींत देखील कार्य कारणांचा अभेद मान्य करूनच अवशिष्ट या नात्यानें कारणाचा विचार करावयाचा असतो. एकाद्या वस्त्राचें पृथक्करण केल्यास त्या वस्त्रांत तन्तु–सूतच अवशिष्ट राहतो. या रीतीनें पदार्थाच्या अवयवांचें पृथक्करण करीत गेल्यास अखेरीस ज्याचें पृथक्करण करितां येत नाहीं असें निरवयव तत्त्व अवशिष्ट राहतें. तेंच ब्रह्म होय. पृथक्करणांतून अवशिष्टत्वानें प्राप्त झालेली ब्रह्मदृष्टि कार्यकारणाच्या अभेदामुळें सर्व सृष्टीला लागू पडते. अवशिष्ट राहिलेलें मूळतत्त्व सर्व विकारांहून, किंबहुना सर्व गुणधर्मांहून अलिप्त असतें. उत्पन्न होणें, वाढ होणें, परिपक्व होणें, झिजणें, नाश पावणें इत्यादि कोणतेही विकार या मूळ

तत्त्वाला स्पर्श करूं शकत नाहींत. निर्विकार, निरामय, अशा या ब्रह्म-तत्त्वापासूनच ही पिण्डब्रह्माण्डात्मक सृष्टि विस्तारली आहे. म्हणून मूल-तत्त्वाचें ज्ञान संपादन करण्याचे कामीं या पिण्डब्रह्माण्डाचा विचार केल्या-वांचून गत्यंतरच नाहीं. मागील अध्यायांत ब्रह्माण्डाचा विचार करून तें ब्रह्ममय कसें आहे हें दाखविलें आहे. विज्ञानाच्या उपपत्तीच्या दृष्टीनें ब्रह्मा-ण्डाच्या विचाराला जसें महत्त्व असतें, तसेंच अनुभवाच्या दृष्टीनें पिण्डगत विचाराला महत्त्व द्यावें लागतें. सृष्टींतील एकाद्या गवताच्या काडीचा विचार करूं लागल्यास असें कबूल करावें लागतें कीं, अत्यंत दीर्घ अशा कारणपरंपरेनें कां होईना, ही काडी देखील तात्त्विकदृष्ट्या ब्रह्ममयच आहे. यःकश्चित् एकाद्या गवताच्या काडीला जर ब्रह्ममयत्व येतें तर, मानवी शरीरांत जिचा अधिकार सर्वंकप आहे ती बुद्धि देखील ब्रह्ममयच ठरेल हें निराळें सांगावयास नको. या बुद्धींत प्रगट होणारे गुणधर्म हे कार्यधर्म असले तरी, त्यांनाही त्या ब्रह्माचेंच अधिष्ठान आहे असें निःसंशय ठरतें.

मनुष्याला ब्रह्मसाक्षात्कार होऊन जीवब्रह्मैक्याचा सिद्धान्त पटला व त्याचा त्याला पूर्ण अनुभवहि आला म्हणजे तो मुक्त झाला असें सिद्ध होतें. हीच सद्यो-मुक्ति होय. परंतु येथें एक वादग्रस्त प्रश्न उत्पन्न होतो तो असा कीं, ब्रह्मसाक्षा-त्कारानंतर सर्व अज्ञानांचा नाश झालेला असतो; पिण्डांतील आत्म्याची जीव-दशाहि समाप्त झालेली असते; परंतु ही जीवन्मुक्तावस्था ज्या क्षणीं सुरू होते त्याच क्षणीं या जीवन्मुक्ताचा देहपात होतो असा अनुभव नाहीं. कदाचित् जीवन्मुक्तावस्थेंत पुष्कळ वर्षें त्याला काढावीं लागतात. ब्रह्मसाक्षात्काराबरोबर देहपात झाला तर हा प्रश्नच उरत नाहीं; परंतु ज्याची देहयात्रा ब्रह्मसाक्षा-त्कारानंतरही बरींच वर्षें चालू असते, त्याच्या या जीवनन्मुक्तावस्थेविषयींचा प्रश्न मुख्य आहे. ब्रह्मसाक्षात्काराच्या अगोदर अहंप्रत्यय, बुद्धि, मन, ज्ञानेन्द्रियें व कर्मेन्द्रियें हे पांच मुख्य अधिकारी ही देहयाला चालवीत अस-तात. जीवात्मा मुक्त झाल्यानंतर जी जीवन्मुक्तावस्था सुरू असते, तींत वर सांगितलेल्या अधिकाऱ्यांची व्यवस्था काय होते ? ते सर्वच अधिकारी

नाहींसे होतात कीं काय ? किंवा त्यांपैकीं कांहीं नष्ट होतात व कांहीं शिल्लक असतात असें समजावयाचें ? हे व अशाच प्रकारचे अनेक प्रश्न या जीवन्मुक्तावस्थेविषयीं उत्पन्न होतात. या सर्वांना मिळूनच वादग्रस्त प्रश्न असें आम्हीं मागें म्हटलें आहे. या प्रश्नांवर मायावादी संन्यासमार्गाचें उत्तर असें आहे कीं, जीवन्मुक्ताच्या जीवनयात्रेचीं सर्व कार्यें प्रारब्धावर चालतात. खाणें, पिणें, निजणें, बसणें, हिंडणें, फिरणें, बोलणें, चालणें, इत्यादि सर्व क्रिया प्रारब्धाधीन असतात. हें प्रारब्ध म्हणजे देहप्रारब्ध होय. जीवात्मा ब्रह्मरूप झाल्यानंतर त्याचा या क्षेत्राशीं, म्हणजे अहंकार ( अहंप्रत्यय ), बुद्धि इत्यादिकांशीं संबंध राहत नाहीं; तीं सर्व प्रारब्धाधीन असतात; म्हणून जीवन्मुक्ताच्या जीवनयात्रेचें कर्म चालू असलें तरी तें आत्म्याच्या दृष्टीनें कर्म नव्हे किंवा ती जीवनयात्राहि नव्हे. इतरांच्या दृष्टीला मात्र तें कर्म किंवा ती जीवनयात्रा होय असें दिसतें. तात्पर्य, ब्रह्मसाक्षात्कार झाल्यानंतर आत्म्याचें जीवत्वच नष्ट होतें व त्याबरोबर त्याचा पिण्डाशीं असलेला संबंध तुटतो, असें मायावादी संन्यासमार्गाचें म्हणणें आहे.

मायावादांतील ही प्रारब्धाची कल्पना अगदींच मोघम व युक्तिशून्य आहे. कारण या कल्पनेचा विचार करीत असतां, प्रारब्ध म्हणजे काय, याची स्पष्ट व निश्चित व्याख्या करितां येत नाहीं. अहंकार, बुद्धि इत्यादि मानवी जीविताचे अवयव प्रारब्धाधीन आहेत असें म्हणतां आलें तरी त्यांची बुद्धिग्राह्य अशी उपपत्ति मायवादाला सांगतां येत नाहीं. ब्रह्मसाक्षात्कारानंतर आत्म्याचा बुद्ध्यादिकांशीं असलेला संबंध तुटतो असें मानल्यावर बुद्धि इत्यादिकांचें कर्तृत्वही बंद पडलें पाहिजे. कारण आत्मा हाच त्यांच्या कर्तृत्वासारख्या स्वभावसिद्ध धर्मांचा उत्थापक आहे. आत्म्याच्या संबंधानेंच बुद्धींतील कर्तृत्वशक्ति प्रगट होत असते. तो संबंध तुटल्यावर कर्तृत्वशक्तीचा प्रवाहच बंद पडला पाहिजे; परंतु तसें होत नाहीं. बुद्धि इत्यादिकांतील गुणधर्म जीवन्मुक्तावस्थेंत केवळ प्रारब्धाच्या योगानेंच प्रगट होतात असें मानलें तर, प्रारब्धाशीं जोडलेला हा कार्यकारणभाव जीवनमुक्तावस्थेंतच

उत्पन्न झाला आहे किंवा त्यापूर्वी उत्पन्न झाला आहे, असा प्रश्न उत्पन्न होतो. जीवन्मुक्तावस्थेच्या पूर्वी बुद्धयादिकांशीं प्रारब्धाचा संबंध नव्हता पण जीवनन्मुक्तावस्थेंत मात्र त्याचा प्रारब्धाशीं संबंध उत्पन्न होतो, असें मानणें बरोबर नाहीं. कारण मनुष्य ज्ञानी असो वा अज्ञानी असो, त्याच्या जीवितांतील कार्यकारी अवयवांना आत्म्याची प्रेरक शक्तीच उपयोगीं पडते. हें प्रेरणासामर्थ्य प्रारब्धामध्यें कधींही यावयाचें नाहीं. त्यामुळें प्रारब्धाची कल्पना अगदींच निरर्थक आहे. प्रयत्नावांचून अवश्य भोगावीं लागणारीं सुखःदुखें प्रारब्धीन आहेत असें मानणें निराळें आणि जीवन्मुक्तावस्थेंतील सर्व व्यवहार प्रारब्धाधीन आहे हें म्हणणें निराळें. प्रारब्ध ही स्वतंत्र शक्ति नाहीं. मनुष्याचें कर्म आणि आधिभौतिक व आधिदैविक परिस्थिति या कारणांनीं मनुष्याला जो भोग घडतो, तो भोग व त्याची अनिवारता एवढाच अर्थ प्रारब्ध या शब्दानें दर्शविला जातो. यापेक्षां प्रारब्धाला अधिक महत्त्व देणें हें शास्त्रीय दृष्टया युक्तिशून्य व दशोपनिषदांच्या दृष्टीनें अगदींच निराधार आहे. ब्रह्मसाक्षात्काराच्या पूर्वी किंवा अज्ञानावस्थेंत मानवी जीवितांतील बुद्धि इत्यादि अवयव सदोष आणि म्हणूनच विकारवश होणारे असतात. बुद्धयादिकांतील हा सदोषपणा ज्या मानानें कमी होतो त्या मानानें मनुष्य ब्रह्मसाक्षात्काराजवळ जवळ येतो. साक्षात्कार हीं आध्यात्मिक उन्नतीची परमावधि होय. या वेळीं बुद्धि, इन्द्रियें इत्यादि नितान्त निर्मळ झालेलीं असतात. म्हणून साक्षात्कारानंतरच्या जीवन्मुक्तावस्थेंत अहंप्रत्यय, बुद्धि, मन इत्यादि शक्ति किंवा अवयव शुद्ध देवतारूप होतात. त्यांचें अत्यंत शुद्ध स्वरूप म्हणजेच देवत्व होय. याच अभिप्रायानें मानवी जीवितांतील प्रत्येक अवयवाची वेगवेगळी देवता शास्त्रकारांनीं सांगितली आहे. बृहदारण्यकांत व ऐतरेयोपनिषदांत या विषयाचें विवेचन सविस्तर करण्यांत आलें आहे. ( उ. नि. र. प्र. बृह० अ. १ ब्रा. ५ मं. १२ ते १३ पृ. १२८ ते १३२ ). तसेंच दशोपनिषदांत अनेक ठिकाणीं इन्द्रियादिकांचें देवतारूपानें वर्णन करण्यांत आलेलें आहे. त्या सर्व वर्णनावरून असें निर्विवाद सिद्ध

होतें कीं, जीवन्मुक्तावस्थेंत ब्रह्मवेत्त्याचा जीवनक्रम शुद्ध देवतामय झालेला असतो. अर्थात् त्याच्या जीवितांतील कोणताहि अधिकारी नष्ट होत नाहीं व तो प्रारब्धाधीनही असत नाहीं. या सर्व शक्ति ( देवता ) या सृष्टिकर्त्या परमेश्वराच्या मूळ हेतूस अनुसरून आपआपलीं कार्यें निर्दोषपणें बजावीत असतात, म्हणून त्यांचा मूळ स्वभाव किंवा सामर्थ्य कायमच असतें; पण ते रागद्वेषादि विकारांच्या स्वाधीन होत नाहींत. अहंप्रत्ययांतील मी ही संवेदना, बुद्धींतील सत्यकाम, मनाचे सत्यसंकल्प आणि बुद्धीच्या विवेकानुसार इन्द्रियांचे व्यापार या सर्व गोष्टी प्रमाणशीर चालू असून यशस्वी कर्तृत्व, शाश्वत् नीति, प्रभुत्व किंवा पराक्रम, मनोरथपूर्ति इत्यादि सद्गुण जीवन्मुक्ताच्या चारित्र्यांत यथावकाश पूर्ण प्रगट होतात; व तेच जगाला मार्गदर्शक होतात. या जीवन्मुक्तावस्थेंत उन्मत्त किंवा पिशाचवत् वृत्ति असूं शकते असें कित्येकांना वाटतें; परंतु ती कल्पना दशोपनिषदें व भगवद्गीता यांच्या विरुद्ध असून अगदींच युक्तिशून्य आहे; म्हणून त्या कल्पनेचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. जीवन्मुक्तावस्थेंत इच्छादि धर्म अजिबात नष्ट होतात, असें म्हणणें चुकीचें आहे. इच्छादि धर्म असतात पण ते शुद्ध स्वरूपांत असतात, असें श्रुतीनें या अध्यायाच्या पहिल्या खण्डांत स्पष्ट सांगितलें आहे. जीवन्मुक्ताला स्वतःविषयीं कोणतीही इच्छा नसली तरी, त्याच्या बुद्धींत जगत्कल्याणाची इच्छा असते. त्याप्रमाणेंच त्याचा अहम् म्हणजे मी हा प्रत्यय देखील ब्रह्माशीं एकरूप झाला असला तरी, इन्द्रियादिकांना अधिष्ठान या नात्यानें त्याचा उपयोग होत असतो. सारांश, त्याची जीवितसंस्था देवतामय झालेली असते. त्याची वृत्ति बालकाप्रमाणें निर्मत्सर व सरळ असतें, असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे ( उ. नि. र. प्र. बृह० अ. ३ ब्रा ५ मं. १ पृ. ३६६ ). अशा जीवन्मुक्ताचा देहपात झाल्यावर त्याच्या जीवितांतील देवता-शक्ति आपआपल्या अधिष्ठानांशीं एकरूप कशा होतात त्याचें वर्णन मुण्डकोपनिषदांत आलें आहे ( उ. नि. र. प्र. मुण्डक ३. २. ७ पृ. १०५-१०६ ). दृष्टान्तच द्यावयाचा झाला

तर तो असा देतां येईल कीं, एखाद्या विशिष्ट हेतूनें स्थापन झालेली संस्था तो हेतु पूर्णपणें तडीस गेल्यावर ज्याप्रमाणें विसर्जन केली जाते, म्हणजे तिचे घटकावयव कृतकृत्य होऊन आपआपल्या ठिकाणीं जातात, त्याप्रमाणेंच उत्क्रान्तीच्या हेतूंशीं निगडित करून परमेश्वरानें स्थापन केलेली ही जीव-संस्था परमेश्वराच्या हेतूप्रमाणें चालून, शेवटीं या जीवसंस्थेच्या मुख्य मुख्य घटकावयवांचे स्थानीं असलेल्या देवताशक्ति स्वस्थानीं जाऊन ही व्यष्टिरूप जीवसंस्था समष्टीमध्यें विलीन होते. मात्र या संस्थेपैकीं बुद्धिरूप देवता इतर देवतांप्रमाणें समष्टींत विलीन न होतां, ती ब्रह्मरूप होते. ही गोष्ट दशोप-निषदांत अनेक ठिकाणीं आली आहे. ही सर्वांगीण कृतकृत्यता संपादन करण्याकरितांच आत्मज्ञानाची इच्छा करावी, आत्मतत्त्वाचें संशोधन करावें, अशाविषयीं श्रुतीची आज्ञा ( विधि ) स्पष्ट आहे. हीं विधिवाक्यें इतरत्रही आलीं असून या अध्यायाच्या सहाव्या खण्डांत स्पष्ट आलीं आहेत.

औपनिषद् विद्येंत ब्रह्मप्राप्तीच्या साधनांचा विचार अनेक ठिकाणीं झाला आहे. तथापि, या अध्यायाच्या पांचव्या खण्डांत ब्रह्मचर्य हेंच एक ब्रह्म-प्राप्तीचें साधन होय असें दर्शविलें आहे. हें जरी खरें असलें तरी, या ब्रह्म-चर्यांतच तप, अध्ययन निष्काम कर्तव्याचरण इत्यादिकांचा अन्तर्भाव केला असल्यामुळें, सर्व मुख्य मुख्य साधनें ब्रह्मचर्य या शब्दानें श्रुतीनें एकत्र आणिलीं आहेत. या साधनांचें एकीकरण श्रुतीनें एका महत्त्वाच्या तत्त्वावर केलें आहे. मानवी जीवितांत क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांची एकमेकींशीं अनुकूलता असणें अत्यंत अगत्याचें आहे. या दोन शक्तींचें मीलन ज्या मानानें होत जाईल त्या मानानें जीवात्म्याची उन्नति होते; म्हणून क्रिया व ज्ञानशक्ति यांच्या एकीकरणास किंवा दृढानुकूल्यास जे सद्गुण शील, व आचार उपयोगीं पडतील तेंच ब्रह्मचर्य होय असें श्रुतीनें पाचव्या खण्डांत निःसंशय सिद्ध केलें आहे. ब्रह्मचर्याचें लक्षण दर्शविणारें श्रुतीनें प्रतिपादन केलेलें हें तत्त्व अत्यंत व्यापक व फारच महत्त्वाचें आहे. मनुष्यानें आपल्या बुद्धीचें शुद्धीकरण व विकास यांच्याबरोबरच आपल्या आचरणावरही

काळजीपूर्वक लक्ष ठेविलें पाहिजे, म्हणजे त्याचे हातून ब्रह्मचर्याचा खरा अभ्यास होईल व या मार्गानेंच तो ब्रह्मप्राप्तीच्या शिखरास पोहोंचेल. पांचव्या खण्डांत श्रुतीनें वर्णन केलेल्या ब्रह्मचर्याचा थोडासा विचार केल्यास कर्मयोगांतील सर्व मुख्य तत्त्वें त्यांत अन्तर्भूत झालीं आहेत असें निःसंशय दिसून येईल. कर्म, उपासना व ज्ञान या तिहींचें पूर्ण सहकार्य होणें हेंच कर्मयोगाचें तात्त्विक स्वरूप होय; व तेंच या ब्रह्मचर्याच्या तपशीलवार वर्णनांत पूर्ण समाविष्ट झालें आहे. शिवाय क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांच्या सहकारितेनें श्रुतीनें निश्चित केलेलें ब्रह्मचर्याचें स्वरूप हा तर कर्मयोगाचा प्राणच आहे. या तत्त्वाला श्रुतीनें या पांचव्या खण्डांतील विवेचनांत सर्वतोपरी प्राधान्य दिलें आहे. कर्मयोग हीं अक्षरें जरी श्रुतीनें येथें उच्चारलीं नसलीं तथापि, कर्मयोगाचीं सर्व मुख्य तत्त्वें प्रतिपादन करून हाच ब्रह्मप्राप्तीचा प्रत्यक्ष व उत्कृष्ट असा मार्ग होय असें श्रुतीनें प्रस्तुत अध्यायाच्या पांचव्या खण्डांत निःसंदिग्धपणें सांगितलें आहे.

सातव्या खण्डापासून इन्द्र–विरोचनाचें आख्यान सुरू झालें आहे. त्यांत इन्द्राची उत्कट जिज्ञासा अत्यंत स्पृहणीय अशी दर्शविली आहे. त्याप्रमाणेंच विरोचनाची जिज्ञासा दुर्बळ किंवा मंद असल्यामुळें, प्रजापतीच्या उपदेशाचा त्यानें कसा विपर्यास केला तेंही चांगलेंच दाखविलें आहे. इन्द्रानें दृढनिश्चयानें, काळजीपूर्वक ब्रह्मविद्येचा अभ्यास केला व अध्ययनाबरोबरच ब्रह्मचर्यव्रताचें उत्कृष्ट पालन केलें, म्हणून त्याला पूर्ण ब्रह्मज्ञान संपादन करितां आलें, असें या आख्यानाचें तात्पर्य आहे. जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थांचें विवेचन करून प्रजापतीनें इन्द्राला आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे. या तीनही अवस्थांना व त्यांच्या व्यवहारांना आत्म्याचा आधार असला तरी, आत्मा स्वतः त्या अवस्थांनीं किंवा व्यवहारांनीं मुळींच लिप्त होत नाहीं. आत्मतत्त्वाखेरीज इतर सर्व विषय सापेक्ष नित्य व अनित्य या धर्मांनीं युक्त असतात, म्हणून ते सर्व विषय केवळ व्यावहारिक दृष्टीनेंच सत्य आहेत असें म्हणावें लागतें. परंतु आत्मा हा शुद्ध, अकृत्रिम व

अलिप्त असल्यामुळें, त्याचा सत्यपणा निरपेक्ष आहे असें ठरतें. याच अभिप्रायानें नामरूपात्मक सृष्टि किंवा प्राण–इंद्रियें हीं सत्य असून आत्मा हें त्या सत्याचेंहि सत्य होय असें बृहदारण्यकांत म्हटलें आहे ( उ. नि. र. प्र. बृह. १ ब्रा. ६ मं. ३ पृ. १५६; व अ. २ ब्रा. १ मं. २० पृ. २७।२८ . सापेक्ष सत्य व निरपेक्ष सत्य यांतील फरक दाखवून या अध्यायाच्या तिसऱ्या खण्डांत आत्म्याची निरपेक्ष सत्यता प्रतिपादन केली आहे. आत्म्याचें हें शुद्ध व सत्य स्वरूप समजावून देऊन प्राजपतीनें इन्द्राचें ज्ञान परिपूर्ण केलें आहे.

तेराव्या खण्डापासून उपसंहारास प्रारंभ होऊन तो पंधराव्या खण्डाच्या शेवटीं समाप्त झाला आहे. त्यांत परब्रह्माच्या सर्वाधार, सर्वनियामक इत्यादि स्वरूपांचें प्रतिपादन करून त्या परब्रह्माचें पूर्ण ज्ञान संपादन करणें हीच मानवी जीविताची इतिकर्तव्यता होय असें सांगितलें आहे. आणि शेवटच्या पंधराव्या खण्डांत प्रथम ब्रह्मविद्येची उपदेशपरंपरा सांगून पुढें साधकाला अभ्युदयनिःश्रेयसकारक अशी निष्ठा सांगितली आहे. हीच कर्मयोगनिष्ठा होय. गीतेच्या आठराव्या अध्यायांत ५१ व्या श्लोकापासून जी निष्ठा सांगितली आहे, त्या निष्ठेचीं तत्त्वें आणि या पंधराव्या खण्डांत प्रतिपादन केलेल्या निष्ठेचीं तत्त्वें अगदीं एकच आहेत. या अध्यायाच्या पंधराव्या खण्डांतील योगनिष्ठेंतील कर्मयोगाचें स्वरूप श्रुतीनें अधिक स्पष्ट केलें आहे, हाच या श्रुतिप्रतिपादित निष्ठेचा विशेष होय. याप्रमाणें ब्रह्मविद्या व तन्मूलक कर्मयोग यांचें प्रतिपादन करून श्रुतीनें हा अध्याय समाप्त केला आहे.



# ( छान्दोग्य ) शुद्धिपत्र



| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | ३ | सामान्य | विशेष |
| १२ | २,५ | श्रुणोति | शृणोति |
| ,, | १०,१३ | उद्गीथ | उद्गीथ |
| ,, | २० | ह अयम् | ह यः अयम् |
| २० | ११ | वाक | वाक् |
| ,, | ९,१३ | उद्गीथ | उद्गीथ |
| २२ | २४ | दूग्धे | दुग्धे |
| २३ | ८ | होय. तसेंच | होय. आदित्य हा उत्, वायु हा गी व अग्नि हा थ होय. तसेंच |
| ३९ | २६ | नाम् | नाम |
| ४३ | ३ | त्यांत | त्याच |
| ५३ | १३ | यक्षते | यक्ष्यते |
| ५५ | २० | जाहे | आहे |
| ६२ | १२ | प्रतिर्हर्या | प्रतिहर्तर्या |
| ६४ | १० | मत्रेयः | मैत्रेयः |
| ६६ | ७ | क्षब्द | शब्द |
| ८३ | ८ | विधन | निधन |
| ८८ | ५ | प्रातहार | प्रतिहार |
| ,, | ७ | ( ग्राह्मम् ) | ( ग्राह्यम् ) |
| ८९ | १२ | अतिमृत्यु सामं | अतिमृत्यु सप्तविधं साम |

## शुद्धिपत्र

| | | | |
|---|---|---|---|
| ९० | १२ | स एव– | स य एव– |
| ९१ | ८ | शामति | शाम्यति |
| ९२ | २३ | ०मायुरति | ०मायुरेति |
| ९३ | १३ | ०स्त यन्निधनमेतन्नृह– | ०स्तं यन्निधनमेतद्बृह– |
| ,, | २४ | भवात | भवति |
| ९६ | १४ | द्या: | द्यौः |
| ९७ | १९ | ऐता: | एता: |
| १०१ | २ | तद्व्रम् | तद्व्रतम् |
| १०३ | १८ | स्तुवीत् | स्तुवीत |
| १०६ | २६ | मृत्यूम्......ब्रुयात् | मृत्युम्......ब्रूयात् |
| ११४ | २ | आभितप्ताया: | अभितप्ताया: |
| ११५ | ८ | ब्रह्यवादिनो | ब्रह्मवादिनो |
| ,, | ११ | माध्यदिनम् | माध्यंदिनम् |
| ११८ | ४ | लोके | लोक |
| ,, | २४ | वैश्वदेवाचें | विश्वेदेवांचें |
| १३१ | १५ | वै अमृतानि | वै अमृतानाम् अमृतानि |
| ,, | १७ | अमृतें | अमृतांचीं अमृतें |
| १३२ | १२ | दृट्बा | दृष्ट्वा |
| १३४ | १६ | पिबत्न्ये– | पिबन्त्ये– |
| १३५ | २२ | य चतुर्थ– | यच्चतुर्थ– |
| १३६ | १० | ०दुतेति | ०दुदेति |
| १३८ | २ | ०र्ध्वे उदेत्य | ०र्ध्वमुदेत्य |
| ,, | ३ | त्यः स्वराज्यं | स्वाराज्यं |
| ,, | ४ | आदिव्य: | आदित्यः |
| १४३ | १ | इदम् | इयम् |
| १४५ | ४ | आकश– | आकाश– |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | ६ | पूणर्म् | पूर्णम् |
| १४६ | १ | अस्यै | अस्य |
| ,, | १० | ०त्यपासीत | ०त्युपासीत |
| ,, | १९ | प्रत्युङ् | प्रत्यङ् |
| १४९ | २१,२३ | ह्वद्दय | हृदय |
| १५५ | १९ | ०राणियान् | ०रणीयान् |
| १८७ | ८ | च उलूलवः | च घोषाः उलूलवः |
| ,, | १३ | पदार्थ आणि सर्व | पदार्थ, सर्व मनोरथ आणि |
| १९८ | १६ | ०पर्णाः अस्मै | ०पर्णाः नाम अस्मै |
| २०१ | २३ | संवृक्क | संवृङ्क्त |
| ,, | २५ | संवृक्के | संवृङ्क्ते |
| २०३ | २१ | दंष्ट्रः | दंष्ट्रः |
| २०४ | १३ | एषा | सा एषा |
| २०५ | ५ | अद्यऽतेत्ति | अद्यतेऽत्ति |
| २०८ | ९ | आमन्नयांचक्रे | आमन्त्रयांचक्रे |
| २०९ | ८ | परिचरन्ती | चरन्ती |
| २१२ | ११ | सौम्य | सोम्य |
| २१५ | ३,५ | सौम्य | सोम्य |
| ,, | १ | भगवानीति | भगवानिति |
| ,, | १७ | विद्रान् | विद्वान् |
| २१७ | ७ | समिघ | समिध |
| २१८ | ४ | ब्रवाणि । | ब्रवाणि इति । |
| ,, | ५ | कलाः | कला |
| २२० | ७ | अम्नः | अग्नेः |
| ,, | २३ | कलः | कला |
| २२१ | २ | साम्य | सोम्य |

| | | | |
|---|---|---|---|
| २२३ | २१ | एवः | एषः |
| २२८ | ६ | अश्वीन् | अग्नीन् |
| ,, | १४ | ब्रम्हचारि- | ब्रह्मचारि- |
| २३२ | ९ | यवम् | एवम् |
| २३३ | १४ | भुञ्जमो | भुञ्जामो |
| २३४ | २४ | भुञ्जमः | भुञ्जामः |
| २३५ | १३ | त | ते |
| ,, | १७ | आजगाम् | आजगाम |
| २३६ | ३ | °मीदृशा शशासेति अन्या | °मीदृशा अन्या- |
| २४० | १३ | गमपति | गमयति |
| २४६ | २२ | तप्यपानाना ँ | तप्यमानाना ँ |
| २४८ | ५,१४ | ऋष्येत् | रिष्येत् |
| २५१ | ४ | ब्रह्मा मानवः | ब्रह्मा एव एकः मानवः |
| २५९ | ६ | ज्यष्ठः | ज्येष्ठः |
| २६१ | १६ | श्रष्ठः | श्रेष्ठः |
| २६२ | १४ | °शकतर्तें | °शकतर्ते |
| २६७ | १८ | वैवाघ्र- | वैयाघ्र- |
| २६८ | ६ | पौर्णिमास्याम् | पौर्णमास्याम् |
| ,, | १९ | अजस्थ | आज्यस्य |
| २७१ | २२ | वेथ | वेत्थ |
| ,, | २३ | अहुतौ | आहुतौ |
| २७६ | ९ | तास्मिन्नैत- | तस्मिन्नेत- |
| २८२ | २१ | ब्रह्मह्य हा | ब्रह्महा |
| २९३ | ४ | प्रासः | प्रातः |
| २९६ | ५ | वैश्वनरो | वैश्वानरो |
| २९७ | ११ | °मान्मानं | °मात्मानं |

# शुद्धिपत्र

| | | | |
|---|---|---|---|
| २९७ | १२ | व्यपतिष्यन्मा | ° व्यपातिष्यन्मां |
| ३०० | १ | यन्मा | यन्मां |
| ३०२ | १० | वैश्वनरो | वैश्वानरो |
| ३०८ | ४ | °दित्यस्तप्य– | °दित्यस्तृप्य– |
| ३०९ | ८ | दिशः तप्पन्ति | दिशः तृप्यन्ति |
| ३१० | २१ | तृतुर्थीम् | चतुर्थीम् |
| ३११ | २४ | तृप्तिं प्रजया | तृप्तिं तृप्यति प्रजया |
| ३१२ | १ | तप्यन्त्याम् | तृप्यन्त्याम् |
| ,, | १४ | जुहूयात् | जुहुयात् |
| ३१३ | ९ | प्रदूयते | प्रदूयेत |
| ,, | १५ | अथि | अपि |
| ३२२ | १९ | एकने | एकेन |
| ३२८ | ६ | साम्य | सोम्य |
| ३३६ | २ | अश्रुतम् अविज्ञातम् | अश्रुतम् अमतम् अविज्ञातम् |
| ३४० | १८ | उर्ध्वः | ऊर्ध्वः |
| ३४१ | १८ | ° त्विज्ञाप– | °न्विज्ञाप– |
| ३४४ | २४ | तद्धस्य | तद्धास्य |
| ३४६ | ५ | यत्रैत्पुरुषः | यत्रैतत्पुरुषः |
| ३४८ | २२ | शुङ्न | शुङ्गेन |
| ३५३ | ८ | संपद्य | सति संपद्य |
| ३५४ | ४ | सवम् | सर्वम् |
| ,, | ५ | भनवान् | भगवान् |
| ३५५ | ४ | °रियममह– | °रियमह– |
| ३५६ | २० | °उर्जीन्स्त्रवे– | °उजीवन्स्त्रवे– |
| ३६३ | ४ | सः आत्मा । | तत् सत्यम् । सः आत्मा । |
| ३६४ | १६ | °संपद्येतेव– | °संपद्येतैव– |

## शुद्धिपत्र

| | | | |
|---|---|---|---|
| ३६६ | १८ | जानसि | जानासि |
| ३६९ | ५ | गृह्वति | गृह्वाति |
| ,, | १२ | °मिमं° | °मिदं° |
| ३८६ | २५ | रार्शी | राशिं |
| ३८७ | ११ | आपः | अपः |
| ३८८ | १९ | जन्मांत | मंत्रांत |
| ३९० | ८ | समाचें | मनाचें |
| ४०१ | १० | पशूं° वयां° सि | पशूंश्च वयां° सि |
| ,, | ,, | °न्यावत्कीट- | °न्याकीट- |
| ,, | १८ | आपः | अपः |
| ,, | २१ | अहृदयम् | अहृदयज्ञम |
| ४०८ | ८ | पावनतः | पानवतः |
| ४१३ | १६ | ययाकामचारः | यथाकामचा°ः |
| ४१४ | २२ | भुयान् | भूयान् |
| ४१७ | २ | श्रुणुयुर्न | शृणुयुर्न |
| ४१९ | २३ | भुयः | भूयः |
| ४२२ | २ | पितृहासिति | पितृहासीति |
| ४३८ | ७ | शत | शतम् |
| ४४७ | १३ | तदमिन् | तदस्मिन् |